काव्यसंग्रह. ३१.

महाराष्ट्रकविवर्यमुक्तेश्वरकृत

# महाभारत.

## ३. वनपर्व.



हें

वामन दाजी ओक

हेडमास्तर, हायस्कूल, रायपुर;

यांनीं अनेक हस्तलिखित प्रतींवरून शुद्ध करून, पुराणेतिहासविषयक

व अवांतर माहितीच्या टीपा देऊन

तयार केलें,

तें

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक

तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१८९८.

किंमत १॥ रुपये.

महाराष्ट्र भाषेचें आणि कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं पाहणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करतों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.

# मुक्तेश्वरकृत महाभारत.

## ३. वनपर्व.

(ओंव्या.)

### अध्याय पहिला.

### उपोद्धात.

ॐ नमो विश्वंभरा ! देवा ! । अभेदभावें तुझी सेवा ।

---

१. मूळ महाभारतांत सर्व पर्वांपेक्षां वनपर्व मोठें आहे; व याच्या खालोखाल आदिपर्व आहे. परंतु मुक्तेश्वरकृत महाभारतांत आदिपर्वाच्या मानानें वनपर्व फारच लहान आहे. मुक्तेश्वरकृत आदिपर्वांत ओंवीसंख्या सात हजारांवर आहे व वनपर्वांत सुमारें तीन हजार चारशें आहे. ग्रंथसंख्या कमी होण्याचें कारण असें दिसतें कीं मूळ भारतांत विस्तृत रीतीनें सांगितलेलीं आख्यानें व उपाख्यानें थोडक्यांत आटपण्याची खबरदारी मुक्तेश्वरानें घेतली. मुक्तेश्वरानें कोणतीं आख्यानें थोडक्यांत आटपलीं आहेत, हें त्या त्या स्थलीं आम्हीं सांगूं. उद्वेगजनक व अशुभ अशा कथानकांनीं पूर्ण असल्यामुळें महाभारत व विशेषतः वनपर्व वाचूं नये अशी पुष्कळ भोळ्या माणसांची समजूत आहे. ही समजूत तैलंगणांत फारच जारीनें चालू आहे. त्यांची ही समजूत दृढ होण्यास एक विशेष कारण झालें तें असें:—संस्कृत भारताचें तेलंगू भाषेंत भाषांतर करीत असतां वनपर्वापर्यंत येऊन तो भाषांतरकर्ता एकाएकीं मृत झाला. पुढें दुसऱ्या भाषांतरकर्त्यानें वनपर्व सोडून बाकीच्या पर्वांचें भाषांतर केलें. अशा रीतीनें राहून गेलेल्या वनपर्वाचें, पुढें दीडशें वर्षांनीं, एका कवीनें भाषांतर करून आपल्या नांवानें तें प्रसिद्ध न करितां पूर्वकवीच्या नांवानेंच तें प्रसिद्ध केलें. आपलें नांव प्रसिद्ध न केल्यामुळें तो वांचला खरा, परंतु त्याला पुष्कळ त्रास सोसावा लागला, अशी त्या लोकांची समजूत आहे. भारत वाचतांना तेलंगी लोक नेहमीं वनपर्व गाळतात ! व कित्येक भोळे म्हातारे आपल्या महाभारताच्या पोथींतून वनपर्वाचीं पानें काढून टाकितात ! २. '**ॐ नमो**' या शब्दांनीं एकादा ग्रंथ किंवा ग्रंथाचा भाग सुरू करण्याची, जुन्या महाराष्ट्रकवींत, चालच पडून गेली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ ज्ञानेश्वरी, शिवलीलामृत इत्यादि ग्रंथ पहा. 'ॐ' या प्रणवाला हिंदुलोक फार पूज्य समजतात व प्रत्येक हिंदूला या शब्दाविषयीं कांहीं ना कांहीं तरी माहिती असतेच. या प्रणवाविषयीं ज्यांना अधिक माहिती पाहिजे असेल त्यांना ती अथर्ववेदांतर्गत गोपथब्राह्मणांत सांपडेल. या ब्राह्मणांत प्रणवोपनिषद् नामक एक उपनिषद् आहे. 'ॐकारं पृच्छामः को धातुः किं प्रातिपदिकम्' इत्यादि प्रश्नांनीं या उपनिषदाला प्रारंभ झाला. यांत एकंदर प्रणवासंबंधानें छत्तीस प्रश्न आहेत व त्या प्रश्नांना उत्तरेंही आहेत. वायुपुराणांत प्रणवासंबंधी एक अध्याय आहे. मांडूक्योपनिषदांतही प्रणवाच्या योग्यतेविषयीं पुष्कळ सांगितलें आहे. **अ**

तूंचि विश्वा[1]सरे[2]सी जीवा । प्र[3]तीति बा[4]णे निर्धारें[5]. ॥ १
हरिहरसूर्यगणेशशक्ति । तूंचि एक ब[6]हुधा व्यक्ति ।
जेथें धांवे मनोवृत्ति । तेथें तूं ए[7]कू. ॥ २
महालक्ष्मी कु[8]ळस्वामिनी । भै[9]रवदेव दं[10]डपाणी ।
त्याचे चरण चिंतितां मनीं । सिद्धी होती वो[11]ळगण्या. ॥ ३
मुक्तेश्वरें एकनाथु । यातें साष्टांग [12]प्रणिपातु ।
गु[13]रुस्वरूप म्हणोनि हेतु । ग्रंथारंभीं वंदावा. ॥ ४

## कथारंभ.

आतां तृतीय पर्वीची कथा । जनमेजयें सादरें पुसतां । वैशंपायन विशेष

---

म्हणजे विष्णु, **उ** म्हणजे शिव आणि **म्** म्हणजे ब्रह्मा, तेव्हां ओम् हें देवत्रयाचें नाम होय. ज्याप्रमाणें हिंदू लोक प्रणवाला पूज्य मानितात त्याचप्रमाणें जैन लोकही मानितात. जैनग्रंथांत प्रणवाला फार पवित्र व पूजनीय मानिलें आहे. अ, अ, आ, उ, म्, या पांच अक्षरांचा मिळून 'ओम्' हा प्रणव झाला आहे, अशी जैन लोकांची समजूत आहे. पहिला **अ** 'अरिहंत' शब्दाचा द्योतक आहे. अरिहंत म्हणजे ज्याच्या आत्म्याला मुक्ति मिळून जो तीर्थंकर या पदवीला पोहोंचला तो. दुसरा **अ** 'अशरीर' किंवा 'सिद्ध' यांचा द्योतक आहे. अशरीर म्हणजे नश्वर देहापासून मुक्त झालेला आत्मा. **आ** हें अक्षर 'आचार्य'शब्दद्योतक आहे. **उ** हें अक्षर 'उपाध्याय' (आचार्यापेक्षां कमी दर्जाचा गुरू) शब्दाचें द्योतक आहे. **म्** हें 'मुनि'शब्दार्थक होय. या पांच अक्षरांला मिळून 'पंचपरमेष्ठिन्' असें नांव आहे.

१. 'विश्वाचिया' असा अन्य पाठ आहे. २. विश्वास बसेल असें करिशी, शिकविशी, उपदेशसी. ३. खातरी, अनुभव. ४. बाणणें=प्रतीति येणें. ५. निश्चयानें. ६. 'व्यापक' असा अन्य पाठ आहे. ७. जुने कवी अकारांत शब्द उकारांत व ओकारांतही लिहितात. ८. मुक्तेश्वराची कुलस्वामिनी कोल्हापुरची महालक्ष्मी होय; व कर्नाटकांतील सोनारीचा बहिरोबा हा त्याचा कुलस्वामी होता. ९. शिवाचें एक उग्रस्वरूप. या रूपानें काशीक्षेत्रावर शिव सत्ता चालवीत आहे. भैरवाचें वाहन कुत्रा. भैरवाच्या आज्ञेशिवाय काशींत कोणी येऊं शकत नाहीं व काशीहून कोणी बाहेर जाऊं शकत नाहीं, अशी समजूत आहे. काशीयात्रेला निघण्याच्या पूर्वीं यात्रेकरूंना भैरवाष्टक नांवानें ब्राह्मणांना भोजन घालावें लागतें. काशींत मेलेला मनुष्य कितीही पापी असला तरी भैरव त्याला मुक्ति देतो अशी समजूत आहे. काशींत, मनुष्य मरण्याच्या पूर्वीं तो मुक्तीला योग्य व्हावा म्हणून भैरव त्याला त्याच्या पापाबद्दल शिक्षा करितो. या शिक्षेला भैरवयातना म्हणतात. भैरव आठ आहेत त्यांचीं नांवें:—असितांग, रुद्र, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति किंवा कपाल, भीषण आणि संहार. १०. भैरव व यम या दोहोंसही हें नांव आहे. ११. आलिंगन देणाऱ्या, जवळ रहाणाऱ्या, आश्रय करणाऱ्या. १२. नमस्कार. १३. एकनाथ हा मुक्तेश्वराचा आजा (आईचा बाप) असून गुरूही होता. 'गुरुस्वामी म्हणोनि हित' असा अन्य पाठ आहे.

वक्ता । प्रश्नापाठीं निरोपी. ॥ १ ॥ 'माझे पितामह[1] पांडव । सांडोनी राज्य-संपदा सर्व । वना गेलिया महानुभाव[2], । काय कैसें वर्तलें? ॥ २ ॥ त्रयोदश[3] वर्षें वनांतरीं । चर्मांबरजटाधारी । कंदमूळफळाहारी । काळ कैसा क्रमियेला? ॥ ३ ॥ सुकुमार वनितांची[4] पुतळी । याज्ञसेनी[5] गुणवेल्हाळी । अरण्यवासक्लेशा-[6]नळीं । उरली कैशी? सांग पां.' ॥४॥ वैशंपायन म्हणे, 'राजा! । वना जातां[7] धर्मराजा । तयामागें सकळ प्रजा । पाठोपाठीं चालिली. ॥ ५ ॥ येकं[8] पिटिती हृदयवदनें[9] । म्हणती, 'तुजविण[10] गेलों प्राणें । तूं जाशील तेथें नेणें । आमुतेंही दयाळा[11]! ॥ ६ ॥ तूं वससील जिये स्थळीं । तेथें वसूं कुटुंबमेळीं[12] ।

---

१. आजे. (पितामह=बापाचा बाप, मातामह=मातेचा बाप.) २. उदारचित्त. ३. 'त्रयोदश वर्षें वनांतरीं' असें म्हटलें आहे; परंतु बारा वर्षें अरण्यवास व एक वर्ष अज्ञातवास असें पाहिजे. ४. मूळांत 'प्रवरा सर्वयोषिताम्' असें आहे. ५. द्रौपदी. यज्ञकुंडांतून उत्पन्न झाल्यामुळें द्रौपदीस हें नांव मिळालें. ६. अरण्यवासांत होणारे क्लेश तेच अग्नि त्यांत. अरण्यांत होणारे क्लेश अनेक आहेत व अग्निही अनेक आहेत. तेव्हां क्लेशांना जी अग्नींची उपमा दिलेली आहे ती योग्य आहे. शिवाय द्रौपदीला वर 'पुतळी' असें म्हटलें आहे. अशी सुकुमार 'पुतळी' अग्नींतून सुखरूप बाहेर पडणें फारच कठिण आहे असें दाखविण्याकरितां 'अरण्यवासक्लेशा-नळीं' हें पद योजिलें आहे. ७. 'वर्द्धमानपुर' नांवाच्या द्वारांतून उत्तर दिशेनें पांडव वनांत जाण्यास निघाले असें मूळांत सांगितलें आहे. ८. येक या शब्दाचा अर्थ 'कित्येक लोक' असा घेतला पाहिजे. कारण 'पिटिती' हें क्रियापद अनेकवचनी आहे. [असाच प्रयोग अनंतकवीनेंही केला आहे:—'**एक** जाउनी **सांगती** सिते । अनर्थ मांडिला तूझिया सुतें. ॥' कुशलवाख्यान १३—काव्यसंग्रहग्रंथमाला पृष्ठ ३७.] असे हे दोष उत्तम कवींच्या कृतीला गालबोटाप्रमाणें शोभ-तात. ९. हृदय=छाती; वदन=मुख, तोंड. हृदय पिटिती=ऊर बडवून घेऊं लागले. वदन पिटिती= (१) तोंडांवर मारून घेऊं लागले म्हणजे बोंबलूं लागले. (२) नशीब खोटें आहे असें दाखवि-ण्याकरितां भालावर मारून घेऊं लागले. अति दुःख झालें म्हणजे तें मनांत राहूं शकत नाहीं; त्याला कोणत्या ना कोणत्याही प्रकारचें बाह्य स्वरूप मिळालेंच पाहिजे असा मानसशास्त्राचा एक नियम आहे. ऊर बडविणें, जमिनीवर लोळणें, मोठ्यानें रडणें इत्यादि प्रकारें बाह्य स्वरूप मिळाल्यावर मनांतलें दुःख बरेंच कमी होतें. या नियमाला अनुसरून पांडववियोगानें दुःखित झालेली प्रजा नानाप्रकारें आक्रोश करूं लागली. यावरून पांडवांविषयीं लोकांच्या मनांत असलेली अप्रतिम पूज्यबुद्धि व्यक्त होते. अतिशय दुःख होण्याला अतिशयच प्रीति लागते. तेव्हां लोकांत पांडवांविषयीं केवळ पूज्यबुद्धिच नसून त्यांच्याविषयीं प्रेमही वसत होते हें या ओंवीवरून व्यक्त होतें. १०. 'तुजविण गेलों प्राणें' असें म्हणण्यांत 'आमच्या जीवाप्रमाणें तूं आम्हांला प्रिय आहेस' असा अर्थ बोध होतो. ११. 'दयाळा' असें विशेषण योजून धर्म दयाळू असल्यामुळें आ-पली प्रार्थना व्यर्थ जाणार नाहीं अशी पौरांनीं आपली खात्री दर्शविली. १२. धर्मांबरोबर असलेल्या लोकांच्या मेळेला (समुदायाला)च कुटुंब असें समजून.

या [1]दुष्टाच्या हातातळीं । राहों न शकों सर्वथा.' ॥ ७ ॥ आलिंगुनियां प्र-जांतें । धर्म शांतवी समस्तांतें । म्हणे, 'भीष्म विदुर जेथें । तेथेंचि मीही जाण पां. ॥ ८ ॥ नेम सारूनि त्रयोदश वर्षी । मी येतसें तुम्हांपाशीं । चिंता सांडूनि मानसीं । स्वस्थ [2]सर्वी असावें. ॥ ९ ॥ मजसंगतीं येतां तुम्हां । दु-र्जन म्हणती चळले नेमा । प्रजा नेलिया नगरी आम्हां । [3]भग्न भांडें ज्यापरी. ॥ १० ॥ आमचें कल्याण तुम्हां करणें । तरी येकाळीं नगरा जाणें, । वनवास क्रमूनि मज येणें । तुम्हांपाशीं सर्वथा.' ॥ ११ ॥ यापरी शांतवूनी जनां । परतविलें [4]तिन्ही वर्णा । ब्राह्मण म्हणती, 'गेलिया [5]प्राणा । तुज सांडोनी [6]नव-जावें. ॥ १२ ॥ वेदशास्त्रपुराणश्रवणें । हरिहरनामसंकीर्तनें । जपतपक्रिया-अनुष्ठानें । काळ कंठूं तुजसंगीं. ॥ १३ ॥ तुजसंगतीं संतोषचित्तें । आचरोनी [7]तपश्चर्येतें । तुझें राज्य साधे तूतें । ऐसें करूं निर्धारें. ॥१४॥ तुजसंगीं [8]महा-राजया! । आचरोनी तपश्चर्या । तूं पावसी [9]निजऐश्वर्या । हेंचि करूं [10]तात्काळीं. ॥१५॥ नाश होय [11]शत्रूच्या [12]कुळा । युद्धीं जयश्री घाली माळा । ऐसी आचरों तपः-कळा । तरी ब्राह्मण तुझे [13]पां. ॥ १६ ॥ तपें दुष्टकर्मांचें दहन । भजनें हरिहर सुप्रसन्न । होती ऐसें आराधन । [14]तुजलागोनी आराधों.' ॥ १७ ॥ धर्म म्हणे, 'यथार्थ स्वामी! । होणार तैसें वदतसां तुम्ही । परंतु माझ्या अंतर्यामीं । चिंता वर्ते अपार. ॥ १८ ॥ खडतर क्षुधेच्या [15]हुताशीं । पीडा पावाल अरण्यवासीं ।

---

१. दुर्योधनाच्या. २. सर्वांनीं. ३. फुटलेलें, फुटकें. ४. क्षत्रिय, वैश्य, शूद्र. ५. 'तुजविण गेलों प्राणें' या शब्दांपेक्षां 'गेलिया प्राणा' हे शब्द अधिक प्रेमद्योतक आहेत. कारण पहिल्या वाक्यांत पांडवांना प्राणाप्रमाणें प्रिय मानिलें आहे व दुसऱ्या वाक्यांत त्यांना प्राणांहूनही अधिक प्रिय मानिलें आहे. ६. जाऊं नये. ७. 'महातपश्चर्येतें' असाही पाठ आहे. 'महा'-शब्दानें धर्माला लौकर राज्य मिळवून देण्याविषयींची ब्राह्मणांची इच्छा व्यक्त होते. कारण महातपश्चर्येनें म्हणजे घोर तप आचरिल्यानें कार्यप्राप्ति लौकर होते हें प्रसिद्धच आहे. ८. म-हाराज शब्दाचें संबोधन. ९. निजऐश्वर्या=गतवैभवास, स्वराज्यास. १०. सध्यां, सांप्रतकाळीं. ११. दुर्योधनादिकांच्या. १२. कुळशब्दाचे अर्थः—'कुलं जनपदे गोत्रे सजातीये गणेऽपि च.' येथें 'कुळ' शब्दाचा अर्थ 'सजातीय' असा घेतां येणार नाहीं. कारण तसा अर्थ घेतल्यास दुर्योध-नाच्या कुळांत पांडवही येतात. तेव्हां 'नाश होय शत्रूच्या कुळा' यांत पांडवांचाही नाश व्हावा असा अर्थ येऊं शकेल. तेव्हां 'कुळ' शब्दाचा अर्थ 'सजातीय' किंवा 'गोत्र' असा घेतां येणार नाहीं. म्हणून 'कुळ' शब्दाचा 'गण' असाच अर्थ घेतला पाहिजे. 'गण' म्हणजे अनु-यायी. १३. 'जाण' असाही पाठ आहे. १४. करितां, प्रीत्यर्थ. १५. क्षुधेला नेहमीं अग्नीची उपमा देत असतात. ज्याप्रमाणें चुलींतला अग्नि तांदूळ इत्यादि धान्य शिजवितो, त्याच-

तेव्हां आम्हीं दरिद्र पुरुषीं[1] । दुःखें प्राण त्यजावे. ॥ १९ ॥ दीप रक्षिजे निर्वातीं[2] । तेंवि तुम्हांतें पाळिजे भक्ती[3] । अरण्यवासप्रळयावर्ती[4] । प्राणकळिका[5] मावळेल. ॥ २० ॥ वेढूनियां वल्कलांबरें । विभूति[6] लेपूनि शरीरें । आम्हीं जातसों सांचारें[7] । दृष्टीस तुम्ही देखतसां.' ॥ २१ ॥ ब्राह्मण बोलती धर्मातें, । 'उदरभरण[8] न घालूं[9] तूतें । कंदमूळफळजळातें । [10]अंगें कष्टें मेळवूं. ॥ २२ ॥ दरिद्र भोगूं सत्संगतीं । हे हरिहरइंद्राची संपत्ती । कुसंगीं ऐश्वर्यप्राप्ति । तोची नरक निर्धारें. ॥ २३ ॥ विष्णुस्मरणें लोटलिया घडी । चारी[11] पुरुषार्थ जोडती जोडी । सत्संगाची अगाध गोडी । मोक्षपदीं[12] असेना. ॥ २४ ॥ आमुची भरणपोषणचिंता । तुवां न करावी कृपावंता[13]! । अनंत सृष्टींचा पाळिता । तो[14] रक्षील सर्वांतें.' ॥ २५ ॥ भीडा न बोलवे वाणी । धर्में मस्तक ठेविला चरणीं,[15] । म्हणे, 'अवश्य येईजे वनीं । रक्षावया[16] दीनांतें.' ॥ २६ ॥ कान्यकुब्ज तैलं[17]भु-

---

प्रमाणें क्षुधारूपी अग्नि आपण खाल्लेल्या अन्नाच्या पचनक्रियेला साहाय्यभूत होतो अशी समजूत आहे. या पोटांतल्या अग्नीला जठराग्नि असें नांव आहे. या अग्निसंबंधानें भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें म्हटलें आहे:—'अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥' (भगवद्गीता—अ० १५ श्लो० १४.) याचा अर्थः—मी जठराग्नि होऊन प्राण्यांच्या देहामध्यें शिरून राहतों, आणि प्राण अपान यांशीं मिळून चतुर्विध अन्नांचें पचन करितों । (सुबोधचंद्रिका).

१. पुरुषांनीं. तृतीयेचीं, सप्तमीचीं व संबोधनाचीं रूपें जुन्या कवितेंत अनेक आढळतात. २. हवा नाहीं अशा स्थळीं; कारण हवेंत दिवा राहूं शकत नाहीं. ३. भक्तीनें. ४. अरण्यवास हाच प्रलयकालचा आवर्त (भोंवरा) त्यांत. ५. कळिका=कलिका, कळी, अस्फुटित पुष्प. परंतु 'कळिका' शब्द येथें ज्योत या अर्थीं योजिला आहे. ज्याप्रमाणें तेल संपल्यावरोबर दिव्याची ज्योत विझून जाते त्याचप्रमाणें आयुष्य संपल्याबरोबर आयुष्यरूपी ज्योत विझून जाते अशी समजूत आहे. ६. विभूति=(१) भस्म, (२) ऐश्वर्य, संपत्ति. ७. खरोखर. ८. पोटाकरितां अन्न. ९. मागूं, देण्याविषयीं भीड घालूं. १०. 'आंगकष्टें' असाही पाठ आहे. आंगकष्टें=स्वतः मेहनत करून, तुला त्याबद्दल किंचितही त्रास न देतां. ११. धर्म, अर्थ, काम, मोक्ष. १२. चाणक्यनीतींत म्हटलें आहे:—'मूर्खा यत्र न तिष्ठंति यत्र साधुसमागमम् । यत्र शांतिः सदा तत्र स्वयं स्वर्गमुपागतम् ॥.' १३. 'कृपावंता' या विशेषणानें धर्माला ब्राह्मणांच्या भरणपोषणाविषयीं फार चिंता होती असें व्यक्त होतें. १४. परमेश्वर. १५. ब्राह्मणांच्या पायांवर. १६. दुर्योधनादिकांच्या दुष्ट कृत्यांना त्रासून त्या दुष्टांपासून आपलें रक्षण करण्याकरितां ब्राह्मण, पांडवांबरोबर वनांत जावयास तयार झाले. पण ब्राह्मण वनांत जाण्यास तयार झाले ते पांडवांचें संरक्षण करावें या उद्देशानें नव्हे तर स्वतःचें संरक्षण व्हावें या उद्देशानें. असें असूनही त्यांना धर्मराज म्हणतात कीं, 'तुम्हीं आमच्याच संरक्षणाकरितां येतां.' तेव्हां

क्त । कामरूपी[1] उत्कल[2] बहुत । पंचगौड[3] असंख्यात । ब्राह्मण संगीं चालिले. ॥ २७ ॥ गुर्जर[4] महाराष्ट्र कर्नाटक । आंध्र[5] चौल[6] मल्याळ[7] देख । पंचद्रा-

---

या वाक्यावरून युधिष्ठिराचें अप्रतिम सौजन्य दिसून येतें. १७. या देशाला 'कान्यकुब्ज' असें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, सोमवंशीय विजयकुलोत्पन्न कुशिक राजाचा चौथा पुत्र कुशनाभ यानें महोदय नामक पुरी स्थापिली होती. याच्या शंभर मुली वायूच्या कोपानें वक्र (कुब्जा) झाल्या! तेव्हांपासून मुलींच्या वक्र शरीरावरून कुशिक राजाच्या या नगरीला कान्यकुब्ज असें नांव पडलें. कनोज हें शहर भागीरथीचे पश्चिमेस व लखनौ शहरापासून सुमारें ६५ मैलांवर वायव्य दिशेस आहे. १८. 'तैलंग मुक्त' असा अन्य पाठ आहे. यावरून 'तैलभुक्त' म्हणजे तैलंगी लोक असा अदमास करितां येतो. परंतु मुक्तेश्वरानें तैलंग लोकांना तैलभुक्त कां म्हटलें आहे हें समजत नाहीं. तैलंग लोक पुष्कळ तेल खाण्याविषयीं प्रख्यात आहेत असें निदान आमच्या तरी कानांवर आलें नाहीं. मंत्रपुर ऊर्फ मंथेनकडील तैलंगी ब्राह्मण तूप खाण्याविषयीं प्रख्यात आहेत खरे, परंतु तेही तेलाला फार कंटाळतात; पण नागपुरी लोक पोळीशीं तूप खातात खरे! तैलंगी लोकांना आंबट पदार्थांची फार आवड असते, असें कानांवर आलें आहे.

१. आसाम प्रांतांतील. आसामप्रांताच्या पश्चिमभागाला कामरूप देश असें नांव आहे. याच प्रांतांतून ब्रह्मपुत्रा नदी वाहते. या देशांतल्या लोकांची मंत्रतंत्राविषयीं प्रख्याति आहे. यांना अनेक रूपें घेतां येतात अशी समजूत आहे, व यामुळेंच यांना कामरूपी असें नांव पडलें. या प्रांतांत उत्तम हत्ती सांपडतात. या देशाविषयीं असें लिहिलें आहे:—'कालेश्वरं श्वेतगिरिं त्रैपुरं नीलपर्वतम् । कामरूपाभिधो देशो गणेशगिरिमूर्धनि ॥ योनिपीठं कामगिरौ कामाख्या तत्र देवता ॥' (तंत्र). याच देशाला 'प्राग्ज्योतिष' असेंही नांव आहे. कालिका पुराणांत याविषयीं असें लिहिलें आहे:—'करतीया सत्यगङ्गा पूर्वभागावधिश्रिता । यावत् ललितकान्तास्ति तावत् देशं पुरं तदा ॥ तत्र देवी महामाया योगनिद्रा जगत्प्रसूः । कामाख्या रूपमादाय सदा तिष्ठति शोभना ॥ अत्रास्ति नदराजोऽयं लौहित्यो ब्रह्मणः सुतः । अत्रैव दश दिक्पालाः स्वे स्वे पीठे व्यवस्थिताः ॥ अत्र स्वयं महादेवो ब्रह्मा विष्णुश्च सर्वदा । चंद्रः सूर्यश्च सततं वसतेऽत्रैव पुत्रक ॥ सर्वे क्रीडार्थमायाता रहस्यदेशमुत्तमम् । अत्र श्रीः सर्वतो भद्रा भोग्यमत्र सदा बहु ॥ अत्रैव हि स्थितो ब्रह्मा प्राङ्क नक्षत्रं ससर्ज ह । ततः प्राग्ज्योतिषाख्येयं पुरी शक्रपुरीसमा॥' (कालिकापुराण—अध्याय ३७.) रघुराजा या राज्यांत आला असतां या देशाच्या राजानें त्याचा फार उत्तम रीतीनें सत्कार केला. याचें वर्णन कालिदासकृत रघुवंशाच्या चौथ्या सर्गांत आहे. २. ओढ्याप्रांत (ओरिसा). 'जगन्नाथप्रांतदेश उत्कलः परिकीर्तितः.' याच देशांतल्या लोकांनीं रघूला कलिंग देशाचा रस्ता दाखविला (रघुवंश—स० ४ श्लो० ३८.) ३. गौड, कान्यकुब्ज, सारस्वत, मैथिल आणि उत्कल. हे पंच गौड नर्मदेच्या उत्तरतीरीं राहणारे होत. ४. गुजराथी लोक. ५. तैलंग लोक तैलंगण देशाचें मूळचें नांव आंध्रदेश असें आहे. प्राचीन नकाशावरून आंध्रदेश व तैलंगदेश निरनिराळे असल्याचें दिसून येतें. परंतु हल्लीं आंध्रदेश व आंध्र भाषा अनुक्रमें तैलंगदेश व तैलंग भाषा याच नांवा-

विडी अनेक । धर्मासंगीं चालिले. ॥ २८ ॥ प्रथम दिवशीं चालतां पंथीं । गगनीं वोळवितू[1] गभस्ती[2] । जान्हवीतीरा[3] केली वस्ती । पवित्रस्थळीं पवित्रीं. ॥ २९ ॥ प्रमाणाख्य वटस्थळीं[4] । गंगोदकप्राशनें[5] सकळीं[6] । निशा क्रमितां अंशुमाळी । उदया आला सांभाळूं[7]. ॥ ३० ॥ सारूनियां प्रातःकर्म । पुढां चालिला राजा धर्म । अरण्यपंथीं नानाद्रुम[8] । चरण[9] पुष्पीं पूजिती. ॥ ३१ ॥ द्रौपदी[10] ब्राह्मणांचे क्लेश । दृष्टीदेखतां बहुवस । कोमेल[11] धर्माचें मानस । शोकानळें दग्धलें. ॥ ३२ ॥ सावध करूनि धर्मातें । नेत्र प्रमार्जिले[12] हातें । म्हणे, 'संसारदुःखार्णवातें[13] । आजी कळलें राया[14]!' ॥ ३३ ॥ नेत्र झांकूनी उभय करीं । मूर्च्छित[15] पडला धरणीवरी । अकस्मात तये अवसरीं । शौनकमुनी[16] पातला. ॥ ३४ ॥ 'शोकभयाचे आघात । क्षणक्षणां होती प्राप्त । मूर्ख होती व्याकुळचित्त । ज्ञानें[17] पंडित भ्रमेना. ॥ ३५ ॥ मनीं कल्पिसी लोभास राया! । ज्ञानें पहातां सर्वही

---

खालीं मोडतात. सर्व तैलंग लोक आपल्याला आंध्रदेशस्थ म्हणवून घेतात. आंध्रकौमुदी नामक एक ग्रंथ आहे. त्यांत तैलंगी भाषेचें व्याकरण आहे. ६. चौल किंवा चोल देश सध्यां तंजावरचेंच नांव असें कित्येकांचें मत आहे. कित्येकांच्या मतें चोल देश द्रविड देशाच्या दक्षिणेस असून याच्यावरूनच पूर्वकिनाऱ्याला चोलमंडळ (सध्याचें कारोमंडळ) असें नांव मिळालें. [भरतस्थलादर्श—पृ० २०.] ७. मल्याळ म्हणजे मलबार. यालाच पूर्वीं मलयवर किंवा केरळ म्हणत असत. ८. तामिळ (द्रविड), कर्नाट (कानडे), गुर्जर, महाराष्ट्र, तैलंग. हे नर्मदेच्या दक्षिणतीरीं राहणारे होत. [स्वाध्याय—पृ० २३०.]

१. चढणें. २. सूर्य. ३. भागीरथी. ४. याच वटाच्या खालीं कांहीं ब्राह्मण येऊन पांडवांना मिळाले अशी मूळांत कथा आहे. ५. त्या दिवशीं पांडवांना कांहीं खाण्याला न मिळाल्यामुळें ते पाणी पिऊनच निजून राहिले. ६. सगळ्या मंडळींनीं. ७. सर्वांना संभाळणारा. ८. अनेकप्रकारचे वृक्ष. ९. वनांत झाडांवरून खालीं पडत असलेलीं पुष्पें अनायासें धर्माच्या पायांवर पडत. तर कवि म्हणतात कीं तीं पुष्पें आपोआप पडत नसून धर्मराजाविषयीं आपली पूज्य बुद्धि दाखविण्याकरितां अरण्यांत झाडें आपल्या पुष्पांनीं धर्माच्या पदांची पूजा करीत आहेत. हें उत्प्रेक्षा अलंकाराचें उदाहरण आहे. १०. 'दृषदीं' असा अन्य पाठ आहे. दृषदीं म्हणजे खड्यावरून चालतांना होणारे. ११. दयार्द्र. १२. पुशिले. धर्माचे डोळे कोणी प्रमार्जिले हें सांगितलेलें नाहीं. १३. 'दुःखार्णव हें तूतें' असा पाठ आहे. संकटरूपी समुद्र. १४. 'शाहणिया' असाही पाठ आहे. १५. मूळांत 'निषसाद महीतले' म्हणजे जमिनीवर बसला असें आहे. १६. हा मोठा ऋषी होता. हा भृगुकुलोत्पन्न असून याच्या बापाचें नांव शुनकऋषी. हाच ऋग्वेद प्रातिशाख्य व इतर कित्येक वैदिक ऋचांचा कर्ता. १७. 'ज्ञानी पंडित भ्रमे ना' असाही पाठ आहे

माया[1] । अवलंबूनि विचार धैर्या । खेद सांडीं मानसा. ॥ ३६ ॥ आपत्काळ देखोनि पुढें । ज्ञानियां आंगीं वीरश्री चढे । कोटीदु:खांचे[2] दळवाडे । विवेकलता विभांडी. ॥ ३७ ॥ ज्ञानें नासे[3] संसारभ्रम । विष्णुस्मरणें पातकें भस्म । कळिकाळ[4] अतिदुर्गम[5] । धैर्यबळें लोटावा. ॥ ३८ ॥ तपें[6] जोडीं इच्छिलें फळ । ऐसें बोलती शास्त्रकुशळ । आतां तुवां[7] चंचळ । चित्त निश्चळ रक्षावें. ॥ ३९ ॥ तपोधनातें सिद्ध पुरुष । सिद्धी करूनी देती[8] वश । तेणें बळें नाना क्लेश । तृणप्राय[9] नासती.' ॥४०॥[10] धौम्य[11] म्हणे, 'विचार सुमती । आराधूनियां गभस्ती[12] ।

---

१. माया म्हणजे जिच्या योगानें वस्तु नसतांना वस्तु असल्याचा भास होतो, ज्या शक्तीच्या योगानें परमात्म्याला अज्ञानाची उपाधी होऊन जीवात्म्याची उत्पत्ति झाली. या माया शब्दाबद्दल निरनिराळ्या तत्वज्ञांचीं निरनिराळीं मतें आहेत; व या माया शब्दाबद्दल जितका मतभेद आहे तितका दुसऱ्या कोणत्याही शब्दाबद्दल नसेल. माया म्हणजे काय याची पूर्ण माहिती करून न घेतां परधर्माच्या लोकांनीं आमच्या धर्माची थट्टा मांडण्यास सुरुवात केली ही त्यांची मोठी चूक आहे. ज्यांना माया, ब्रह्म इत्यादिकांविषयीं पूर्ण माहिती पाहिजे असेल त्यांनीं श्रीमच्छंकराचार्यकृत उपनिषद्भाष्यें वाचावीं. २. समूह, समुदाय. ३. खरोखर संसार मिथ्या असून त्याच्या अस्तित्वाविषयीं आपल्याला केवळ भ्रम होतो; व गुरूपासून ज्ञानप्राप्ती झाल्यावर हा भ्रम नाहींसा होतो अशी वेदांत्यांची समजूत आहे. ४. 'अष्टकाळ' असा अन्य पाठ. पांडव अरण्यवास करावयाला गेले तेव्हां कलिकाळ आला नव्हता. कारण कृष्णावतार संपल्यानंतर कलियुगाला आरंभ झाला असें भागवतांत सांगितलें आहे. शिवाय भारतीयुद्ध झाल्यानंतर युधिष्ठिरशक सुरू झाला व तेव्हांपासूनच कलीस आरंभ झाला असें विद्वान् लोकांनीं ठरविलें आहे. तेव्हां पांडवांच्या वनवाससमयीं कलिकाळ नव्हता हें उघड आहे, म्हणून येथें 'कलिकाळ' असें म्हटलें आहे तें चुकीनें पडलें असावें. 'अष्टकाळ' असा जो अन्यपाठ आहे तो योग्य आहे. 'अष्टकाळ म्हणजे दिनाचे व रात्रीचे मिळून जे आठ प्रहर ते असें समजावें. 'अष्टकाळ' असा पाठ नसून 'कष्टकाळ' असा पाठ असता तर प्रस्तुत स्थळीं विशेष शोभला असता. कारण शौनक मुनी आपत्काल धैर्यानें कंठण्याविषयीं पांडवांना उपदेश करीत आहेत. तेव्हां 'कळिकाळ' किंवा 'अष्टकाळ' या पाठांपेक्षां 'कष्टकाळ' हा पाठ येथें अधिक शोभला असता हें निर्विवाद आहे. बहुधा लेखकप्रमादानें 'कष्टकाला'चें 'कलिकाल' असें भ्रष्ट रूपांतर झालें असावें. ५. जाण्यास कठीण. ६. 'जोडेल' असाही पाठ आहे. ७. 'मनश्चंचलमस्थिरम्' असें भगवद्गीतेंत म्हटलें आहे. ८. 'देवता' असा अन्य पाठ. ९. गवताप्रमाणें. १०. मुळांत शौनक ऋषीच्या उपदेशानें वनपर्वाचा दुसरा अध्याय भरून गेला आहे. त्या अध्यायांत उपदेशाचे सुमारें सत्तर श्लोक आहेत. येवढा उपदेश मुक्तेश्वरानें सहा ओंव्यांत संपवून टाकला. पुष्कळ प्रकरणें थोडक्यांत आटपल्यामुळें मुक्तेश्वरकृत वनपर्व बरेंच लहान झालें आहे असें जें आम्हीं मागें म्हटलें आहे त्याचें हें एक उदाहरण आहे. ११. पांडवांचा पुरोहित. वनवासांत पांडवांबरोबर राहून यांनीं पांडवांना अनेक तीर्थें दाखविलीं. १२. सूर्य.

मागां आपत्काळ बहुतीं । कीर्तिवंतीं क्रमियेला. ॥ ४१ ॥ चतुराननें[1] निर्मिल्या प्रजा । त्या क्षुधें[2] पीडितां महाराजा! । सूर्य प्रतिपाळी वोजा[3] । पिता जैसा पुत्रातें. ॥ ४२ ॥ रस[4] शोषी उत्तरायणीं[5] । जळ मोकळी[6] दक्षिणायणीं । औ-षधी पोषी चंद्र[7] किरणीं । हेंही सामर्थ्य सूर्याचें. ॥ ४३ ॥ म्हणोनी विश्वासी प्रतिपाळिता । सूर्यचि जाणा[8] तत्वता[9] । सूर्यापरता अन्नदाता । दुजा नाहीं त्रैलोक्यीं. ॥ ४४ ॥ सूर्यकिरणें होती घन[10] । घन[11]वृष्टीपासाव[12] अन्न । अन्नापा-सुनी प्रजा जाण । वेद[13]प्रमाण निर्धारें. ॥ ४५ ॥ सूर्यचि ब्रह्म सूर्यचि आत्मा। सूर्य नाशी अज्ञानतमा । विष्णु शंकर देव ब्रह्मा । सूर्यरूपें जाणावीं[14].॥४६॥ यालागीं भानुमय[15] अन्न । प्राणियातें[16] प्राणधारण[17]। करितां सूर्यआराधन । पूर्ण

१. ब्रह्मदेवानें. [ब्रह्मदेवाला चतुरानन, चतुर्मुख, चतुरास्य अशीं नांवें आहेत, कारण त्याला चार मुखें आहेत असें समजतातः—दर्दुरमुख (यानें ऋग्वेद जपतो), अश्वमुख (यानें यजुर्वेद जपतो), जंबुकमुख (यानें अथर्वण वेद जपतो), श्वमुख (यानें सामवेद जपतो). या शि-वाय खरमुख होतें तें छिन्न झालें.] २. भुकेनें. ३. काळजीनें, चांगुलपणानें. ४. जल, पाणी. ५. व्योमकक्षेच्या उत्तरभागीं ज्या सहा महिन्यांत सूर्य असतो त्या सहा महिन्यांला उत्तरायण अशी संज्ञा आहे. ६. मोकळें सोडी, वर्षरूपानें पृथ्वीवर टाकी, पाऊस पाडी. ७. चंद्राला 'ओषधीश' 'ओषधिनाथ' असें नांव आहे, कारण तो त्या ओषधींचें पोषण करतो. 'पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः' (गीता १५—१३)=मी रसमय सोम होऊन सर्व औषधींचें पोषण करतों.—या प्राचीन समजुतीस अनुलक्षून हें वर्णन आहे. ८. 'जाणावा' असाही पाठ आहे. ९. खरोखर. १०. मेघ. ११. मेघापासून पडलेला पाऊस. १२. पासून. १३. 'आदित्यात् जायते वृष्टिः वृष्टेरन्नं ततः प्रजा' असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. [मनुस्मृति—अध्याय ३ श्लो० ७६.] याचा भावार्थः—सूर्यापासून वृष्टि उत्पन्न होते, त्या वृष्टीपासून अन्न उत्पन्न होतें आणि त्या अन्नापासून प्रजा उत्पन्न होतात. याला वेदांतही प्रमाण आहे. 'प्राचीन आर्य लोकांला पर्जन्योत्पत्तीचें खरें कारण माहीत न-व्हतें असें यजुर्वेदांतील आपस्तंभ शाखेच्या संहितेच्या द्वितीय अष्टकाच्या चौथ्या अध्यायांत पुढील वचन आहेः—'अग्निर्वा इतो वृष्टिमुदीयति मरुतः सृष्टां नयति यदा । खलु वा असावा-दित्योन्यग्रश्मिभिः पर्यावर्ततेऽथर्वणिति. ॥' याचा अर्थः—अग्नि हा पर्जन्याचें कारण आहे; वायु हा पर्जन्याला जिकडे तिकडे नेतो. परंतु पर्जन्याचें खरें कारण सूर्याची उष्णता होय. सूर्य किरणांनीं पाण्याची वाफ होते आणि ती वर आकाशाकडे निघून जाते; तेथेंही वाफ थंड झाल्यावर उदकांच्या रूपानें खालीं येते. याप्रमाणें पर्जन्याची उत्पत्ति आहे.' [सरलार्थ-बोधिनी गीता—पृष्ठ ४९१.] १४. 'जाणावे' असा अन्य पाठ. १५. भानूपासून उत्पन्न झाल्या-मुळें 'भानुमय' असें म्हटलें आहे. १६. 'प्राणियांचें' असें पाठांतर आहे. १७. जिवंत राहण्याचें साधन.

काम[1] तुझे होती. ॥ ४७ ॥ कार्तवीर्य[2] वैन्य[3] नाहुष[4] । आपत्काळीं पावती क्लेश । आराधूनी देव दिनेशें[5] । विश्व[6]लोक पाळिला. ॥ ४८ ॥ तैसेंची तुवां धरूनि[7] जीवीं[8] । तपीं[9] प्रसन्न करावा रवी । ब्राह्मण पोषणाची गोवी[10] । तो फेडी[11] तात्काळ.' ॥ ४९ ॥ गंगा[12]जळीं राहोनि धर्में । शुचिष्मंत नित्य नेमें । धौम्यें उपदेशिलीं नामें । अष्टोत्तरशतें[13] सूर्याचीं. ॥ ५० ॥ ब्रह्म[14]याने उपदेशिलीं

---

१. इच्छा. २. सहस्रार्जुन. हा कृतवीर्याचा मुलगा असून माहिष्मती (प्रस्तुतचें चोळीमहेश्वर) येथें राज्य करीत असे. याला दत्तात्रेयाच्या प्रसादानें सहस्र हस्त, इच्छिलेल्या जागीं ताबडतोब नेणारा सुवर्ण रथ इत्यादि अनेक वर मिळाले. हा रावणाचा समकालीन असून यानें आपल्या नगरांत रावणाला बरेच दिवस कैदेंत ठेविलें. परशुराम घरीं नसतां जमदग्नीच्या आश्रमांतून यानें जबरदस्तीनें कामधेनु नेली. याबद्दल परशुरामाला राग येऊन त्यानें कार्तवीर्याचा वध केला. वायुपुराणांत याचें असें वर्णन आहे कीं, हा फारच न्यायी राजा होता. यानें ८५००० वर्षेंपर्यंत राज्य केलें, व तितक्या अवधींत यानें दहा हजार यज्ञ केले. ३. वेनपुत्र. वैन्य या नांवावरून हा वेन किंवा वेण राजाचा पुत्र असावा असें वाटतें. परंतु ऋषींच्या शापानें वेण पुत्रविरहितच मेला. तेव्हां वैन्य म्हणजे वेण मेल्यावर त्याच्या वामहस्तापासून ऋषींनीं उत्पन्न केलेला पृथुराजा. (हा वैन्य व पृथुराजा एकच नसून, हा वेण कुलांत उत्पन्न झालेला दुसरा एखादा राजा असावा असें कित्येकांचें मत आहे.) पृथूला पहिला राजा म्हणतात व याच्या नांवावरूनच या भूला पृथ्वी असें नांव मिळालें. ४. ययाति. हा प्रख्यात नहुष राजाचा मुलगा ययाति. शुक्रकन्या देवयानी हिच्याशीं याचा विवाह झाला. परंतु देवयानीची सेवा करण्याकरितां आलेल्या शर्मिष्ठा नामक असुरकन्येवर त्याची प्रीति जडल्यामुळें त्यानें तिच्याशींही लग्न लाविलें. यामुळें देवयानीला वाईट वाटलें व तिनें याबद्दल आपल्या बापाजवळ कुरकुर केली. शुक्रानें 'तूं नेहमी म्हातारा हो' असा ययातीला शाप दिला. ययातीनें क्षमा मागितल्यावर आपलें वार्धक्य दुसऱ्याला देऊन दुसऱ्याचें तारुण्य आपण घेण्याची व तें पाहिजे तेव्हां परत करण्याची शक्ति शुक्रानें ययातीस दिली. त्याप्रमाणें ययातीनें आपला कनिष्ठ पुत्र पुरू याचें तारुण्य घेऊन त्याला आपलें वार्धक्य दिलें. अशा रीतीनें हजार वर्षें तारुण्य भोगून राज्यासह पुरूचें तारुण्य पुरूला परत दिलें. ५. सूर्य. ६. विश्वाप्रमाणें विस्तृत असलेला लोक म्हणजे राज्य. फारच मोठें राज्य—असा अर्थ. ७. धरूनि=(विश्वास) ठेवून. सूर्योपासना केल्यानें कामसिद्धि होते या गोष्टीवर विश्वास ठेवून. ८. जीवीं=मनांत. ९. तपश्चर्या करून. १०. गुंतागुंत, संकट. ११. फेडी=निवारण करी, दूर करी. 'फेडील' असा अन्य पाठ. १२. पाण्यांत तपश्चर्या करण्याला योगशास्त्रांत 'जलसमाधि' असें नांव आहे. १३. एकशें आठ. 'शत' असा अन्य पाठ. १४. कोणताही उपदेश गुरुमुखानें आल्याशिवाय तो कामाचा ठरत नाहीं अशी आपल्या लोकांची व ग्रंथकारांची समजूत झाल्यामुळें प्रत्येक मंत्राकरितां किंवा उपदेशाकरितां गुरुपरंपरा दाखविण्याची ते नेहमी काळजी घेतात. या

शक्रातें[1] । शक्रें कथिलीं **नारदातें** । **नारदें** दिधलीं **धौम्यातें** । तेणें **धर्मातें** उपदेशिलीं. ॥ ९१ ॥ बारा[2] श्लोकीं अति उत्तमें । अष्टोत्तरशतें[3] सूर्यनामें । **धर्मा** उपदेशिलीं **धौम्यें** । सिद्धिप्रदें तात्काळ. ॥ ९२ ॥ स्मरण करितां एकचित्त । कृपेनें कळवळिला दीननाथ[4] । म्हणे, '**कौं**तेय[5] माझा सुत[6] । क्लेशातीत[7] करावा.' ॥ ९३ ॥ पुढती **धर्में** करितां स्तवन । **सूर्य** पातला न लगतां क्षण । तेजें कोंदलें[8] मही गगन । सुप्रसन्न बोलतु. ॥ ९४ ॥ 'जें जें इच्छील तुझें मन । तें तें पावसी फळ पूर्ण[9] । प्रसाद देतसे स्वल्पान्न । चतुर्विध[10] सुस्वाद. ॥ ९५ ॥ वाढितां पावेल हे वृद्धीतें । तेणें ब्राह्मण सहस्रशतें[11] । प्रतिपाळुनी कष्टकाळातें । अरण्यवास क्रमावा. ॥ ९६ ॥ लोटलिया तेरा वर्षें । शत्रू नाशती अनायासें[12] । स्वराज्य पावसी संतोषें । सागरान्त[13] पृथ्वीचें.' ॥ ९७ ॥ [14]बोल बोलती सर्वत्र । सूर्यें दीधलें थाळीपात्र[15] । परी तें **व्यासाचें**[16] वक्त्र[17] । व-

---

नियमाला अनुसरून सूर्याष्टोत्तरशतनामांचें माहात्म्य दाखविण्याकरितां या स्थळीं त्या संबंधाची गुरुशिष्यपरंपरा दिलेली आहे.

१. इंद्राला. २. महाभारत—वनपर्व—अध्याय ३ श्लोक १६ पासून २८ पर्यंत. ३. 'शत' असाही पाठ आहे. ४. 'कृष्णनाथ' असा अन्य पाठ. ५. धर्म. ६. धर्म हा यमधर्माचा पुत्र. कर्ण हा सूर्याचा पुत्र. असें असून धर्म हा 'माझा सुत' असें सूर्य म्हणतो हें कसें? येथें 'सुत' म्हणजे पुत्र असा न घेतां पौत्र असा अर्थ घेतला पाहिजे. कारण सूर्याचा पुत्र यम व यमाचा धर्म म्हणजे सूर्याचा नातु. ७. दुःखरहित. ८. व्यापिलें, भरून गेलें. ९. 'संपूर्ण' असाही पाठ आढळतो. १०. चतुर्विध अन्नः—(१) भक्ष्य (दांतांनीं चावून खाण्याचे पदार्थ. उ० भात, पोळ्या, अनरसे इ०), (२) भोज्य (दांतांना विशेष त्रास न देतां खाऊन टाकण्याचे पदार्थ. उ० क्षीरान्न, श्रीखंड इ०), (३) चोष्य (जिव्हेवर ठेवून रसास्वादनानें क्रमशः खाण्याचे पदार्थ. उ० गूळ, खडीसाखर इ०), (४) लेह्य (दांतांनीं चावून रसांश घेतल्यानंतर अवशिष्ट राहिलेला भाग ज्या पदार्थांतून सोडले जातात ते. उ० ऊंस इ०). ११. असंख्य—असा अर्थ. १२. 'अनायासें शत्रु नाशती' असें जरी सूर्यानें सांगितलें तरी शत्रूंचा नाश करण्याकरितां पांडवांना फारच श्रम पडले असें पुढच्या कथानकावरून दिसून येईल. दुर्योधनादिकांना मारण्याकरितां पांडवांना आपल्या वंशांतील बहुतेक पुरुषांची आहुती द्यावी लागली. १३. सागर आहे अंतीं जिच्या. पृथ्वी चारी दिशांकडून समुद्रांनीं वेष्टित आहे अशी पौराणिकांची समजूत आहे. या समजुतीला अनुसरून 'सागरान्त पृथ्वी' म्हणजे सर्व पृथ्वी. १४. 'लोक' असाही पाठ आहे. १५. स्थाली, पाकपात्र, भक्ष्य शिजविण्याचें भांडें. 'स्थाली स्यात्पाटलेखयोः' इति मेदिनी. १६. महाभारताचा कर्ता वेदव्यास. 'अष्टादशपुराणानां कर्ता सत्यवतीसुतः' अशी लोकोक्ति आहे. परंतु पुष्कळ विद्वान् या वचनावर विश्वास ठेवीत नाहींत. कारण अष्टादश पुराणांत परस्परविरुद्ध अशीं अनेक वचनें सांपडतात. १७. वक्त्र=तोंड, वाणी.

दलें नाहीं भारतीं.[१] ॥ ५८ ॥ असो, ऐसा देऊनि वरु । स्वस्थळा गेला सहस्रकरु[२] । उदकाबाहेर युधिष्ठिरु । सुखसंतोषें निघाला. ॥ ५९ ॥ नमस्कारिलें धौम्यचरणा । आलिंगिलें चौघांजणा । भीमा, पार्था आणि नंदना[३] । माद्रीचिया आवडी. ॥ ६० ॥ फिटला चिंतेचा विटाळु । हरुषें निर्भर कुरुनृपाळु । सूर्यप्रसादें ब्राह्मणकुळु । पाळिता झाला काननीं. ॥ ६१ ॥ तृप्त झालिया असंख्य द्विज । यानंतरें चौघे अनुज[४] । पाठी आपण धर्मराज । त्यानंतर द्रौपदी. ॥ ६२ ॥ भोजनीं तोषवी ब्राह्मण । नित्य नित्य पुराणश्रवण । सकळसहित कुरुनंदन । काम्यकवना पातला. ॥ ६३ ॥ जान्हवीतीरींचे[५] ब्राह्मण । कु[६]-

१. मुक्तेश्वर म्हणतो कीं धर्माला सूर्यानें स्थाली दिली अशी कथा जरी लोकांत प्रचारांत आहे तरी अशी कथा व्यासकृत महाभारतांत सांगितलेली नाहीं. हें मुक्तेश्वराचें म्हणणें रास्त दिसत नाहीं. कारण धर्मानें तपश्चर्या केल्यानंतर प्रसन्न होऊन धर्माला सूर्य म्हणतो:–'गृह्णीष्व पिठरं ताम्रं मया दत्तं नराधिप । यावद्वत्स्यंति पांचाली पात्रेणानेन सुव्रत ॥ ७२ ॥ फलमूलामिषं शाकं संस्कृतं यन्महानसे । चतुर्विधं तदन्नाद्यमक्षय्यं ते भविष्यति ॥ ७३ ॥' [महाभारत–वनपर्व–अध्याय ३.] यावरून मुक्तेश्वराजवळ असलेली भारताची पोथी सध्यांच्या भारताच्या पोथीपेक्षां फार भिन्न होती असें दिसतें. मुक्तेश्वराच्या आदिपर्वांत आणि सभापर्वांतही असा प्रकार कोठें कोठें आढळतो तो आम्ही दाखविण्याचा यत्न जेथें तेथें केला आहे. २. सूर्य. ३. नकुल आणि सहदेव यांना. ४. धाकटे बंधू. ५. गंगेच्या कांठीं म्हणजे काशी इत्यादि गंगेच्या कांठांवर असलेल्या ग्रामीं राहणारे. ६. 'स्थानेश्वराच्या नैर्ऋत्येस व दिल्लीच्या वायव्येस सरस्वती आणि दृषद्वती या दोन नद्यांच्या दरम्यान जो प्रदेश, त्याला प्राचीन काळीं कुरुक्षेत्र म्हणत. हल्लीं कित्येक लोक ठाणेश्वर म्हणजेच कुरुक्षेत्र असें जें म्हणतात, तें अगदीं चुकीचें आहे. पुराणांमध्यें कुरुक्षेत्र ऊर्फ धर्मक्षेत्र याची सीमा खालीं दिल्याप्रमाणें आहे. श्लोक:–'दक्षिणेन सरस्वत्या दृषद्वत्युत्तरेण च । ये वसंति कुरुक्षेत्रे ते वसंति त्रिविष्टपे ॥' (महाभारत–वनपर्व–अ० ८३ श्लो० ४.) या कुरुक्षेत्रांतच कुरुक्षेत्र नांवाचें सरोवर असून, त्याचें प्राचीनत्व वेदांच्या बरोबरीनें ठरतें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पांचव्या शतकांत होऊन गेलेला 'वराहमिहिर' यानें कुरुक्षेत्र-सरोवराचा उल्लेख केला आहे. त्याप्रमाणेंच कुरु, या सरोवराचे ठिकाणीं व्रतस्थ होता असेंही सांपडतें. त्याच्याही पूर्वीं या सरोवराचें वर्णन उर्वशीच्या संबंधानें आलें आहे. तें असें कीं, हरवलेली उर्वशी चार सख्यांसहवर्तमान वसलेली ह्याच कुरुक्षेत्र सरोवराच्या कांठीं पुरूरव्याला सांपडली. इतकेंच नव्हे; पण ह्या सरोवराच्या प्राचीनत्वाचा संबंध ऋग्वेदाशीं थडकून, दधीच ऋषीचें कथानक देत असतां, ह्याच सरोवराला ब्रह्मसर असें नांव देऊन, त्याचें वर्णन दिलें आहे. तें असें कीं, दधीच ऋषीच्या मृत्यूनंतर त्याच्या शरीराचा शोध इंद्र करीत असतां, त्याला दधीचीचें घोडतोंड कुरुक्षेत्रांतील या ब्रह्मसरोवरांत सांपडलें! यावर सांगितलेल्या अतिपुरातन सरोवराला चक्रतीर्थ असेंही नांव आहे.' (भारतस्थलादर्श–

रुक्षेत्रींचे तपोधन । [1]यमुनातीरींचे वेदज्ञ । [2]सरस्वतीतीरवासी. ॥ ६४ ॥ [3]श-
रयूतीरनिवासी । [4]अग्निहोत्री [5]सामग्रीसी । येते झाले त्या वनासी । धर्मासंगीं
वसावया. ॥ ६५ ॥ [6]येरीकडे [7]हस्तनापुरीं । धृतराष्ट्र चिंतेच्या सागरीं । [8]पडला
तये अवसरीं । 'काढीं' म्हणे 'विदुरातें. ॥ ६६ ॥ [9]हृदयकुंडीं [10]वडवानळ ।

---

पृष्ठ २९.) या कुरुक्षेत्र मैदानांतच कौरवपांडवांचा घनघोर संग्राम झाला. याच क्षेत्राला स्यमंतपंचक असेंही म्हणतात. कारण परशुरामानें मारलेल्या क्षत्रियांच्या रक्तानें भरलेलीं पांच कुंडें याच क्षेत्रांत होतीं अशी समजूत आहे.

१. प्रयाग येथें गंगेला मिळालेली नदी. ही यमाची बहिण आहे अशी कथा आहे. २. सरस्वती नांवाच्या नद्या दोन आहेतः—(१) प्रयाग (अलाहाबाद) येथील त्रिवेणीसंगमांत गंगायमुनांला गुप्तरीतीनें मिळालेली नदी. (२) हिमालयांतून निघून कुरुक्षेत्राजवळून वाहत गेलेली नदी. ३. ही नदी हिमालयांतील एका सरोवरांतून निघून औधप्रांतांतून भागीरथीला येऊन मिळाली आहे. हिच्या कांठीं अयोध्या शहर आहे. या नदीला पूर येऊन दोन तीनवेळां अयोध्या वाहून गेली होती असेंही ऐकण्यांत आहे. श्रीरामानें पौरांसह याच नदींत मानव देह सोडून दिव्यशरीराचा स्वीकार केला व रामावतार संपविला. 'शरद्वतीतीर' असाही पाठ आहे. ४. अग्निहोत्र हा यज्ञ प्रत्येक गृहस्थानें नित्य सकाळीं व संध्याकाळीं करावयाचा असून तो जन्मभर करावा लागतो. भार्याविरहित पुरुषाला हा यज्ञ करितां येत नाहीं. या यज्ञाच्या कर्त्यास 'अग्निहोत्री' म्हणतात. ५. खाण्यापिण्याची सामग्री बरोबर घेऊन. धर्माला सूर्याकडून स्थाली मिळाली हें ब्राह्मणांना माहित नसल्यामुळें त्यांनीं खाण्यापिण्याची आपआपली सामग्री बरोबर आणिली असेल. ६. दुसरीकडे. आतांपर्यंत पांडवांविषयीं सांगून कवि आतां धृतराष्ट्राकडे वळतात. ७. यालाच 'हस्तिनापुर' 'नागपुर' अशीं अन्य नांवें आहेत. हें शहर पुरुकुलोत्पन्न हस्तिराजा यानें वसविलें, म्हणून यास 'हस्तिनापुर' असें नांव पडलें. दुसरें असेंही आढळतें कीं अत्रिपुत्र सोम हा अरण्यांत फिरत असतां, एका हत्तीला एका विहंगमानें उचलून नेलें असें त्यानें पाहिलें; तेव्हां त्या जाग्यावर त्यानें एक शहर वसवून त्याला या चमत्कारस्मरणार्थ 'हस्तिनापुर' असें नांव दिलें. हें शहर विद्यमान मिरत शहराच्या पूर्वेस गंगाकांठीं असावें असें विद्वानांचें अनुमान आहे. ८. 'पडोनी बुडे' असा अन्य पाठ आहे. ९. हृदयरूपी कुंडांत. हृदयाला यज्ञकुंडाची उपमा दिली आहे. १०. समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करणारा अग्नि. याची कथा अशीः— और्व नामक एक मोठा भार्गववंशोत्पन्न मुनि होता. त्यास असें कळलें कीं, कार्तवीर्यकुलोत्पन्न राजांनीं भार्गवसंततीचा उच्छेद करून आपल्या कुलांतील स्त्रियांस द्रव्यनिमित्त बहुत पीडा दिली. तेव्हां यानें त्यांच्या नाशासाठीं तपःप्रभावानें भयंकर अग्नि उत्पन्न केला. त्यामुळें क्षत्रियांस फार त्रास झाला, तेव्हां ते और्वपितरांस शरण गेले. नंतर पितरांच्या आज्ञेवरून और्वानें आपला कोपानल समुद्रांत टाकिला. यासच 'वडवाग्नि,' 'वडवानल' असें म्हणतात, कारण याचें मुख वडवे(घोडी)सारखें आहे.

प्रदीप्त करूनी [1]कुंतीबाळ । वना गेले ते स्नेहाळ । केंवि होती आमुतें. ॥६७॥ याचेनि दुःखें प्रजालोक । अहोरात्री करिती शोक । शापशब्दाचा [2]पावक । [3]कौरववनासीं लाविती. ॥ ६८ ॥ प्रजा [4]भजती स्नेहभावें । पांडव विषाद सांडिती [5]जिवें । ऐसा [6]उपाव विदुरा! दैवें । सांगीतला पाहिजे.' ॥ ६९ ॥ विदुर म्हणे पुढतो [7]पुढतीं, । 'तेंचितें [8] तुज सांगिजे किती? । हितविचारु [9] तुझ्या चित्तीं । संचरेना [10] सर्वथा. ॥७०॥ अझूनी तरी विवेकें [11] सुमती । पश्चात्ताप [12] धरूनि चित्तीं । आप्त [13] धाडूनि वनाप्रती । शीघ्र पांडव पाचारीं [14]. ॥ ७१ ॥ कुमर [15] धरोनियां करीं । घालीं [16] धर्माच्या चरणावरी । पल्लव [17] पसरोनी करुणोत्तरीं [18] । 'क्षमा करावी मागिल [19].' ॥ ७२ ॥ दुर्योधन आणि दुःशासन । शकुनी आणि चवथा कर्ण । धर्मा हस्तीं वोपुनी [20] प्राण । दान [21] मागें तयातें. ॥ ७३ ॥ मस्तक घालुनी भीमाउदरीं [22] । दुःशासन निवेदीं करीं । दुर्योधनाचे शिरीं । हस्त स्थापीं

---

१. 'कुंतीबाळ' असें जरी म्हटलें आहे तरी पांचही पांडव घेतले पाहिजेत. २. अग्नि. ३. कुरुवंशांत उत्पन्न झाल्यामुळें पांडवांनाही कौरव म्हणतां येईल. परंतु येथें 'कौरव' शब्द 'दुर्योधन व त्याचे अनुयायी' याच अर्थांत योजलेला आहे. ४. भजती=सेवा करूं लागतील, प्रीतिपूर्वक दुर्योधनाचें श्रेष्ठत्व कबूल करतील. ५. जिवें सांडिती=अजीबात मनापासून सोडून देतील, भोगलेल्या संकटांबद्दल त्यांना वाईट वाटणार नाहीं. ६. उपाय, युक्ति, कार्यसिद्धि होण्याचें साधन. ७. धृतराष्ट्राचें भाषण संपलें नाहीं तोंच. ८. मागें पुष्कळ वेळां सांगितलेलें. ९. विचारू=विचार. १०. मी सांगितलेल्या हिताच्या गोष्टी तुझ्या मनांत भरतच नाहींत. ११. विवेक म्हणजे सारासार विचार. ज्याला इंग्रेजींत conscience म्हणतात त्याचें 'विवेक' हें कार्य. १२. 'पश्चात्तापेन शुध्यति' या नियमाला अनुसरून कितीही पापी असला तरी तो पश्चात्तापानें पवित्र होतो. कारण पश्चात्ताप म्हणजे कृतकर्माबद्दल वाईट वाटणें व तसें पुढें न वागण्याविषयीं दृढनिश्चय. हा पश्चात्तापाचा नियम बौद्ध धर्म शिवाय करून प्रत्येक धर्मांत आहे. १३. एके ठिकाणीं म्हटलें आहे:—'आप्तस्तु यथार्थवक्ता.' १४. परत बोलावीं. १५. दुर्योधनादिक शंभरपुत्र. १६. चरणावरी घाल=त्यांना धर्माला नमस्कार करूं दे, धर्माच्या पायांवर डोकें ठेवूं दे. १७. पदर. १८. 'करीं' असाही पाठ आहे. करीं=हातीं. १९. मागें घडलेल्या गोष्टींबद्दल, पांडवांना द्यूतांत जिंकणें, द्रौपदीचा अपमान करणें इत्यादि गतापराधाबद्दल. 'मागिल्या' असा अन्य पाठ आहे. २०. सोंपवून, धर्माच्या हातीं देऊन. २१. या सर्वांना प्राणदान देण्याबद्दल धर्माला विनंति कर. २२. पोटीं. भरसभेंत द्रौपदीचा मानभंग करण्याविषयीं दुःशासनानें प्रयत्न केला म्हणून भीमाचा त्याच्यावर फार राग होता. व भीमानें याला मारण्याविषयीं प्रतिज्ञा ही केली होती, म्हणून धृतराष्ट्राला विदुर म्हणतो कीं भीमाची कृपा संपादून दुःशासनाबद्दल त्याच्या मनांत असलेला क्रोध काढून टाक.

धर्माचे. ॥ ७४ ॥ अर्जुनाचीं चरणकमळें । स्पर्शावीं कर्णाच्या[१] कपाळें । सहदे-
वाच्या क्रोधविटाळें । शकुनिसीं[२] शुभ लक्षिजे. ॥ ७५ ॥ तो वांचवीं त्याचे हातीं ।
ऐसी दाखवीं स्नेह भक्ति । आलिंगुनी अश्रुपातीं । मस्तक शिरीं धर्माचा. ॥७६॥
ऐशी वडिलपणाची[३] बुद्धी । आचरोनी विवेक विधी । येणें कल्याण येऱ्हवीं[४] अवधी[५] ।
आली जाण तव पुत्रां. ॥ ७७ ॥ यां[६] परि वर्ततां स्नेहभावें[७] । तरीच चुकती
मृत्यु कवे[८] । हा सुविचारु तुझेनि जीवें[९] । आतांचि[१०] धरिला पाहिजे. ॥ ७८ ॥
जरी नायकती[११] दुर्जन । तरी भीष्म कृपाचार्य द्रोण । प्रेरूनियां[१२] चौवेजण[१३] ।
निग्रहुनी[१४] रक्षावे[१५]. ॥ ७९ ॥ गारुडी सर्प घाली बंदीं[१६] । व्याघ्रसमुदाय वधिजे
व्याधीं[१७] । तैसे सर्वही [१८]दुर्बुद्धी । तुवां बुद्धिवंतें रक्षावे. ॥ ८० ॥ कोळजीं[१९] उदेला[२०]
जो व्रण[२१] । तो स्वहस्तें छेदीं शस्त्रें करुन[२२] । तेंवि सस्नेह करूनि प्राण । दुष्टदं-
डण करावें. ॥ ८१ ॥ हनन[२३] रक्षण[२४] अथवा त्यागु[२५] । त्यांतें[२६] स्वीकारी येक मार्गु ।
तरिच खंडेल चिंतारोगु । येऱ्हवीं[२७] अनर्थ रोकडा[२८]. ॥ ८२ ॥ कुळासहित[२९] विश्वं[३०]
जना । उद्धरावें ऐसें इच्छी मना । तऱ्ही[३१] हे त्यागिल्या[३२] संपूर्णा । यश संतोष

---

१. अर्जुन आणि कर्ण हे प्रतिस्पर्धी होते. आपआपल्या अस्त्रविद्येविषयीं दोघांनाही सारखाच अभिमान वाटत असे. २. भारतयुद्धांत शकुनी सहदेवाच्याच हातून मेला. ३. वडील मनुष्यांना शोभेल अशी. ४. मी उपदेश केल्याप्रमाणें न वर्तल्यास. ५. समाप्ति. ६. या परि=मी सांगितल्याप्रमाणें. ७. सध्यां जो वैरभाव आहे तो सोडून स्नेहभावानें वर्तल्यास. ८. पकड. ९. जीवें=जीवानें, मनानें. १०. 'आतांचि' शब्दानें विलंब लावल्यास परिणाम चांगला होणार नाहीं असें दाखविलें. ११. मी सांगितल्याप्रमाणें पांडवांशीं सख्य करण्याला तुझे पुत्र कबूल होणार नाहींत तर. १२. हें काम हातांत घेऊन, दुर्योधनादिकांना वळविण्याचा यत्न करून. १३. (१) भीष्म, (२) द्रोण, (३) कृपाचार्य, (४) तूं (धृतराष्ट्र) या चौघांनीं मिळून. १४. दुर्योधनादिकांना शिक्षा करून. १५. (पांडवांना संकटापासून) व कौरवांना मरणापासून सोडीव—असा अर्थ. १६. मंत्रसामर्थ्यानें गारुडी लोक सर्पाला आपल्या ताब्यांत आणतात. १७. शिकार करणारे, किरात, पक्षी, मृग इत्यादि अरण्यवासी प्राण्यांना मारण्याचा ज्यांचा धंदा आहे ते. १८. दुर्योधनादिक शंभरपुत्र, कर्ण, शकुनी इत्यादिकांना. १९. हृदयावर, छातीवर. २०. उदयास आलेला, उत्पन्न झालेला. २१. जखम. २२. हे दोन चरण सुभाषितरूप आहेत. २३. मारणें. २४. संकटापासून मुक्त करणें. २५. त्याग करणें किंवा टाकून देणें. २६. त्यांपैकीं. २७. असें न झाल्यास. २८. रोकडा अनर्थ=ज्या कृत्यांत अनर्थाशिवाय दुसरी गोष्टच सांपडावयाची नाहीं. म्हणजे तुझ्या पुत्रांचा समूळ नाश होईल—असा अर्थ. २९. आपल्या कुळाचें रक्षण करून इतर सर्व लोकांचेंही रक्षण करावें अशी जर तुझी इच्छा असेल तर. ३०. सर्व. ३१. दुर्योधन, दुःशासनादि पुत्र. ३२. त्यागिल्यानें.

पावशी. ॥ ८३ ॥ [1]युवराज्य वोपूनि धर्मराजा । [2]इतुकेन कल्याण तवात्मजा । एक भावें तुज प्रजा । सकळ भजतील निर्धारें.' ॥ ८४ ॥ ऐकोनि विदुराचें उत्तर । क्रोधें [3]धडकला [4]राजेश्वर । [5]बिभीषणवाक्यें [6]दशशिर । रामायणीं ज्या परी. ॥ ८५ ॥ '[7]पांडुपुत्र धर्मराज । त्यातें दे म्हणशी स्वराज्य । माझे [8]वीर्यज ममात्मज । त्यांतें त्यागूं सांगशी ! ॥ ८६ ॥ [9]ब्रह्मनिष्ठाचीं लक्षणें । तुझ्या ठायीं ज्ञान चिन्हें । बुद्धि बोधिली [10]समदर्शनें । [11]शत्रु मित्र तुज नाहीं. ॥ ८७ ॥ जेव्हां विचार पुसावा तुतें । तेव्हां स्तविशी पांडवांतें । सदा निंदिशी मम पुत्रांतें । अभेदता या नांव ? ॥ ८८ ॥ राज्य हाता आलें तुतें । विश्व शून्य वाटे मातें । अखंड तुझिया वचनामृतें । प्राण हा गांजित. ॥ ८९ ॥ राज्य [12]हारविलें [13]पणीं । आपण [14]गुंतले आपुल्या वचनीं । तूं [15]छळितोशी क्षणक्षणीं । हा विवेक कोणता ? ॥ ९० ॥ [16]दुःखविभागी होशी भ्राता । वि[17]चार पुसणें हे मूर्खता । आतां

---

१. 'युवराज्य' शब्द बरोबर नाहीं 'यौवराज्य' असा शब्द पाहिजे. कारण युवराज शब्दाला 'तस्य भाव:' या अर्थीं ष्यण् प्रत्यय लागून यौवराज्य असें रूप होतें. २. इतुकेन= इतकें केल्यानें, असें केल्यानें. ३. संतापला, पेटला, प्रदीप्त झाला. ४. धृतराष्ट्र. ५. रामाला सीता परत देऊन त्याच्याशीं सख्य करण्याविषयीं बिभीषणानें रावणाला उपदेश केला. हा उपदेश रावणाला आवडला नाहीं व तो बिभीषणावर फार क्रुद्ध झाला—या रामायणांतल्या गोष्टीकडे येथें लक्ष्य आहे. कवीला बिभीषणाची गोष्ट सुचण्याचें कारण असें दिसतें कीं बिभीषण व विदुर हे दोघेही वयानें धाकटे असून नीतिमत्तेनें आणि बुद्धिमत्तेनें श्रेष्ठ होते व आपआपल्या वडील भावांना उपदेश करीत होते. या साम्यामुळें बिभीषणाचें उदाहरण या स्थळीं विशेष शोभतें. ६. रावण. ७. खरोखर हस्तिनापुराचें राज्य पांडवांचें; कारण पंडु हा सर्व राज्याचा मालक होता. हें पुढील ओंवींत सांगितलें आहे:—'ज्येष्ठ अंधत्वें उणाविला । विदुर कनिष्ठत्वें अवमानिला । राज्यासनीं अभिषेकिला । पांडुराजा समस्तीं ॥' (मुक्तेश्वरकृत महाभारत—आदिपर्व—अध्याय २५ ओंवी ८६; काव्यसंग्रहग्रंथमाला—पृष्ठ २१७). परंतु पंडु हा अकालींच मृत्यु पावल्यामुळें धृतराष्ट्र राज्य पाहत होता. तेव्हां धृतराष्ट्र 'स्वराज' असें जें म्हणतो तें यथार्थ नाहीं. ८. वीर्यापासून उत्पन्न झालेले. ९. व्याजोक्तीनें धृतराष्ट्र विदुराची निंदा करीत आहे. १०. भेदभाव न ठेवतां, निःपक्षपातबुद्धीनें. ११. सर्वांच्या ठिकाणीं समभाव असल्यामुळें शत्रु किंवा मित्र उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. १२. द्यूत खेळून पांडवांनीं आपलें राज्य हारविलें. १३. पैजेंत. १४. त्यांनीं केलेल्या पणांमुळेंच त्यांना अरण्यवास भोगावा लागत आहे. १५. स्वकर्मानें पांडव वनांत गेले असून त्याबद्दल तूं मला नेहमी दोष देतोस व अशा रीतीनें माझा छळ करितोस. १६. तूं माझा भाऊ असल्यामुळें माझ्या दुःखाचा तूं वाटेकरी होशील या उद्देशानें. १७. सल्लामसलत.

द्विधा[1] न करीं चित्ता । पांडवांप्रति जाईजे. ॥ ९१ ॥ यासी विलंब न करीं क्षणु' । 'अवश्य' म्हणे क्षेत्ता[2] प्राज्ञु[3] । नमस्कारूनी ज्येष्ठचरणु[4] । निघता झाला तात्काळीं ॥ ९२ ॥ रथेशीं आला काम्यकवना[5] । श्रवण जालें[6] कुरुभूषणा[7] । हांसोनि बोले भीम[8] अर्जुना । 'विदुर आला किमर्थ? ॥ ९३ ॥ पुढती[9] द्यूता बोलाविलें, । कीं पश्चात्तापें चित्त द्रवलें, । कीं [10]हरिलें राज्य देवविलें[11] । भीष्म-द्रोणें विचारें'. ॥ ९४ ॥ विदुर पातला[12] दर्शना । पांचही जणीं वंदिलें[13] चरणा । स्नेहें देऊनी आलिंगना[14] । एकासनीं बैसले. ॥९५॥ विदुर म्हणे, 'गुणैकराशी ! ।

१. द्विधा=दोन भाग. मर्मभेदक वचनांनीं माझ्या मनाला त्रास देऊं नकोस—असा अर्थ. २. विदुर. ३. शहाणा. ४. धृतराष्ट्र हा विदुराचा वडील भाऊ, कारण दोघेही व्यासपुत्र. ५. काम्यकवन कोठें होतें हें बरोबर समजत नाहीं. हें वन अमक्याच ठिकाणीं आहे असें महाभारतांत कोठेंही सांगितलें नाहीं; तरी वनपर्वांत असें सांगितलें आहे कीं:—'ततः सरस्वतीकूले समेषु मरुधन्वसु । काम्यकं नाम ददृशुर्वनं मुनिजनप्रियम् ॥' (वनपर्व—अध्याय ५ श्लोक ३.) यावरून काम्यकवन कुरुक्षेत्राजवळ व सरस्वतीनदीला लागून होतें असें दिसतें. अरण्यवासांतल्या बारा वर्षांपैकीं बराच काळ पांडवांनीं या वनांत घालविला. यावरूनही हें वन हस्तिनापुराच्या जवळच असावें असें वाटतें. कारण हस्तिनापुरांत आपल्याविरुद्ध काय काय प्रयत्न चालले आहेत हें जाणण्याकरितां पांडवांनीं जवळचेंच वन वास करण्याकरितां शोधून काढलें असेल, असें मानणें सयुक्तिक दिसतें. ६. झालें. ७. पांडवांना. ८. मूळांत भीम बोलला असें नाहीं. तर विदुराला येतांना पाहून धर्मराजानें त्याच्या आगमनाबद्दल कांहीं कल्पना काढिल्या असें आहे. मोरोपंतकृत महाभारतांतही असेंच आहे:—'दुरुनि विदुरा विलोकुनि धर्म म्हणे, 'दृष्टि निववीली वडिलें । कुरुकुळकल्याणचि हें वरि विधिनें लोकरीतीनें मढिलें ॥ १६ ॥ जे न्यायामृत टाकुनि दाढनि अन्यायमद्य कुनर पिते । जाणों करणार हरण शस्त्रांचें द्यूत करुनि पुनरपि ते' ॥ १७ ॥' (काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृष्ठ ३.) मूळ महाभारतांतही अशाच अर्थाचे श्लोक आहेत. तेव्हां एक तर मुक्तेश्वराजवळ असलेली महाभारताची पोथी सध्याच्या पोथीपेक्षां भिन्न असेल किंवा जवळ पोथी न ठेवतां वाचलेल्या गोष्टी लक्षांत ठेवून, त्यांवरून मुक्तेश्वरानें महाभारत लिहिलें असेल असें वाटतें. ९. पुनः. १०. आपल्याजवळून कपटानें घेतलेलें. ११. आपणांला मिळेल असें केलें. १२. पातला=पावला. संस्कृत 'प्राप्' धातूपासून 'पाव' असें रूप झालें. 'पातला' हें रूप 'व'चा लोप होऊन, संस्कृत व मराठी भूतकालवाचक प्रत्यय (त+ला) लागून सिद्ध झालें आहे. [मराठी भाषेचें नवीन व्याकरण—पृष्ठ ८९.] १३. पांडव क्षत्रिय होते व विदुर दासीपासून उत्पन्न झालेला असल्यामुळें क्षत्रियांपेक्षां हलक्या जातीचा होता. असें असूनही पांडव त्याला नमस्कार करितात ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. विदुर हा पांडवांचा चुलता असून मोठा नीतिमान् होता म्हणून तो वंदनार्ह होता असें दिसतें. १४. 'परिरंभना' असा अन्य पाठ आहे.

विचार पुसतां तुमचे विशीं[1] । सुबुद्धि[2] बोलिलों कळली[3] तैशी । हितकारिणी सर्वांतें. ॥ ९६ ॥ परि ते नातळे हृदयीं । तें विस्तारें सांगणें काई? । 'मातें[4] त्यागूनिया जाई । पांडवांप्रति आनंदें'. ॥ ९७ ॥ या लागीं त्यागूनि भ्रातृजां[5] अधमां । तुजप्रती पातलों देवद्रुमा[6]! । दर्शनें पावलों विश्रामा, । सर्व श्रमा विसरलों'. ॥ ९८ ॥ धर्म म्हणे, 'बहुत[7] बरवें । इच्छिलें तैसें घडविलें देवें, । स्नेहदृष्टी सांभाळावें । बालकांतें काननीं'. ॥ ९९ ॥ हस्तिनापुरीं अंबिकासुत[8] । पश्चात्तापें[9] अतिसंतप्त । विदुरवियोगें अद्भुत[10] । खेद मानी मानसीं. ॥ १०० ॥ 'बाह्य[11] अक्षम[12] चक्षुहीन[13] । बुद्धि आंधळी विदुराविण । [14]देहीं न धरे माझा प्राण । अंध झालों सबाह्य.' ॥ १०१ ॥ म्हणे, 'संजया[15]! विदुराविण । देहीं न धरे[16] माझा प्राण । तुवां करूनियां गमन । पाचारूनी[17] आणावा.' ॥ १०२ ॥ संजय मानुनी[18] राजाज्ञा । सवेग पातला काम्यकवना । भेटोनियां पांचांजणा[19] । निरोपें[20] सांगे विदुरातें. ॥ १०३ ॥ म्हणे, 'विदुरा! सवेग उठीं । रायें[21] प्राण धरिला कंठीं । तुज न देखतां दृष्टी । देह त्यागील[22] तात्काळ.' ॥ १०४ ॥ धर्म म्हणे, 'जाई शीघ्र । विलोकीं अग्रजाचें अंघ्र[23].' । विदुर चालिला दिसे[24] व्यग्र[25] । धर्माचेनि वियोगें. ॥ १०५ ॥ सवेग पातला गजाव्हया[26] । नमस्कारिलें

---

१. विशीं=विषयीं. २. सदुपदेश. ३. मला जी योग्य वाटत होती ती. ४. मातें=मला (धृतराष्ट्राला). ५. पुतणे दुर्योधनादिक. ६. कल्पवृक्षा! ७. फार चांगलें. ८. धृतराष्ट्र. ९. विदुराला पांडवांकडे निघून जाण्याविषयीं सांगितल्याबद्दल झालेल्या अनुतापें. १०. 'अति-अद्भुत' असाही पाठ आहे. ११. बाहेरचीं कामें करण्याकरितां, जगतांतले व्यापार चालविण्याकरितां. १२. अयोग्य. १३. आंधळा असल्यामुळें धृतराष्ट्राला दुसऱ्याच्या साहाय्यावांचून कांहीं करतां येत नसे. १४. 'आतां मातें वागविजे कोण?' असाही पाठ आहे. १५. हा धृतराष्ट्राचा सारथि होता. हा सूतपुत्र असूनही सत्यवक्ता व निस्पृह होता. १६. धरवे. १७. बोलावून. १८. मानुनी=शिरसावंद्य मानुनी, (राजाज्ञेला) मान देऊन. १९. पंचपांडवांना. २०. धृतराष्ट्राचा निरोप. २१. धृतराष्ट्रानें. २२. तूं पुन्हां येऊन भेटशील या आशेनें काय तो धृतराष्ट्र जिवंत राहिला आहे; नाहीं तर त्यानें केव्हांच प्राण सोडिला असता—असा अर्थ. २३. पाय. 'अंघ्र' शब्द बरोबर नाहीं. 'अंघ्रि' असा शब्द पाहिजे. अंघ्रि=पाय. 'पदंघ्रिश्चरणोऽस्त्रियाम्'इत्यमरः ॥ यमक जुळविण्याकरितां शब्दांचा अंत्यस्वर बदलण्यास मुक्तेश्वर मागें पुढें पाहत नाहीं. धर्मानें असें म्हणण्याच्या अगोदर मोरोपंताच्या महाभारतांत भीमाचें क्रोधमूलक वचन आहे:—'भीम म्हणे, 'बापाजी! । जा समयीं, येथवांचि कां धाई? । तूं येथ नसावें, या भावें करितो बरीच कांधाई ॥' (काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व. अध्याय पहिला, गीति ३१ पृष्ठ ५.) २४. 'परि' असाही पाठ आहे. २५. दुःखी. २६. हस्तिनापुरा. 'गजसाव्हया' असाही पाठ आहे.

पूर्वजपायां[1] । हृदय मेळवूनी[2] हृदया । प्रज्ञाचक्षू[3] आलिंगी. ॥ १०६ ॥ 'विदुरा ! न देखतां तुतें । विश्व शून्य वाटे मातें । अखंड तुझिया वचनामृतें । प्राण हा संतोषे.[4]' ॥ १०७ ॥ विदुर पातला[5] देखोनी । दुर्योधन[6] कर्ण शकुनी[7] । दुःशासन ही मिळोनी । गूढ विचार मांडिला. ॥ १०८ ॥ 'पांडव अरण्यवासा गेले । परी शल्य नाहीं खंडलें[8] । पुच्छ धरूनी सोडिलें । सर्पमुख ज्यापरी. ॥ १०९ ॥ आतां एकचि बुद्धि[9] ऐशी[10] । आम्ही जाऊनी दळभारेशीं[11] । पांडव एकटे वनवासीं । रात्रीं[12] मारूनी सांडावे[13]. ॥ ११० ॥ दुरी यादव पांचाल । आला नाहीं जंव गोपाळ । पांडव आहेत जंव निर्बळ । तंव मारूनी

---

१. पूर्वी (अगोदर) झालें आहे जन्म ज्याचें, त्याच्या पायां, वडील भावाच्या पायां, धृतराष्ट्राच्या पायां. २. कडकडून भेटले—असा अर्थ. आलिंगन देणें हें प्रेमाचें लक्षण आहे. ३. धृतराष्ट्र. प्रज्ञाच (बुद्धि) आहे चक्षु (डोळे) ज्याचे. डोळ्यांनीं आंधळा असल्यामुळें धृतराष्ट्र सर्व कामें आपल्या बुद्धीच्या जोरावर करित असे, म्हणून त्याला प्रज्ञाचक्षू असें नांव पडलें. धृतराष्ट्र आंधळा जरी होता तरी फारच बुद्धिमान् होता. ४. विदुर व धृतराष्ट्र यांच्यांत जरी नेहमी मतवैचित्र्य असे तरी त्यांचें एकमेकांवरचें प्रेम कधींही कमी झालें नाहीं, ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. धृतराष्ट्रानें केलेल्या कृत्यांबद्दल विदुर नेहमी त्याला टोंचून बोलत असे. त्याची निंदा करित असे व त्याच्या पुत्रांना धडधडित शिव्याही देत असे. असें असूनही विदुरावरची धृतराष्ट्राची प्रीति किंचितही कमी झाली नाहीं. तेव्हां हें खऱ्या बंधुप्रीतीचें उदाहरण आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे? ५. परत आलेला. ६. कोणतीही गोष्ट करावयाची असली कीं कर्ण, शकुनी व दुःशासन या तिघांच्या सल्ल्यानें तो दुर्योधन करीत असे. दुर्योधनानें केलेल्या कोणत्याही दुष्ट कृत्यांत यांची सल्ला नव्हती असें कधींही झालें नाहीं. ७. शकुनी हा गांधारदेशाचा राजा असून नेहमीं हस्तिनापुरास दुर्योधनाबरोबर राहत होता हें कसें? तो हस्तिनापुराला नेहमीं येत असे, असेंही मानितां येत नाहीं. कारण गांधार म्हणजे हल्लींच्या कंदाहारच्या आसपासचा प्रांत असें विद्वान् लोकांनीं सिद्ध केलें आहे. तेव्हां इतक्या दूरदेशाहून, स्वराज्य सोडून शकुनि नेहमी हस्तिनापुराला येत असे असें मानणें रास्त होणार नाहीं. ८. 'छेदूनी' असा अन्य पाठ आहे. ९. येथें 'बुद्धि' शब्द 'युक्ति' या अर्थीं योजिला आहे. १०. पुढें सांगितलेल्या प्रकारची. ११. सैन्यासहवर्तमान. १२. रात्रीं जाण्याचें कारण असें कीं तेव्हां पांडव निजलेले असल्यामुळें सावध राहणार नाहींत, यावरून पांडवांच्या शौर्याला कौरव फार भीत होते असें दिसतें. कारण कौरव 'दळभारेशीं' जाणार होते व पांडव तर 'एकटे'च होते. असें असूनही पांडवांवर रात्रीं हल्ला करूं असें दुर्योधन म्हणतो. तेव्हां पांडव एकटे असूनही जर ते सावध राहतील तर आपल्याला व आपल्या सैन्याला ते पराजित करतील अशी दुर्योधनाला भीति होती असें व्यक्त होतें. १३. टाकावे.

सांडावे. ॥ १११ ॥ न [1]कळतां **भीष्मद्रोणां** । नेणतां [2]**धृ**तराष्ट्राच्या मना । करावें **पां**डवाच्या [3]हनना । [4]पुढां प्रकट [5]होतसे.' ॥ ११२ ॥ वि[6]चार करितां चौघेजणीं । **व्यास** देव जाणोनी मनीं । [7]गगनमार्गें सभास्थानीं । [8]अकस्मात् उतरला. ॥ ११३ ॥ **व्यास** म्हणे, 'गा! [9]सुपुत्रा! । [10]सावधानें दो[11]षपात्रा । स्वपुत्रांच्या कपटमंत्रीं[12] । न विचारिशी मूर्खत्वें. ॥ ११४ ॥ राज्य हिरोनी दवडिलें[13] वना । [14]मागुती [15]ते चालिले [16]त्यांच्या हनना । तयां [17]दुर्बुद्धी दुर्जनां । निषेध कैसा न करिशी?' ॥ ११५ ॥ **धृ**तराष्ट्र म्हणे, '**व्या**सराया! । स्पर्श [18]करीतसें तुझिया पायां । जरी पुत्रांची [19]कपटमाया । [20]जाणें अथवा मी प्रेरीं[21]. ॥ ११६ ॥ [22]हे [23]प्रवर्तले **पां**डववधीं । वना जातील दुर्बुद्धी । तरी मी प्राण त्यजीन [24]आधीं । हे त्रि[25]शुद्धी जाण पां.' ॥ ११७ ॥ ऐकोनी [26]पुत्र पावले [27]शंका । सांडिला हन-

---

१. कारण भीष्मद्रोणांला ही गोष्ट कळल्यास ते असें कधींही करूं देणार नाहींत. २. आजपर्यंतच्या धृतराष्ट्राच्या वर्तनावरून तो आपल्या मुलाच्या म्हणण्याच्या बाहेर जाईल असा संभव नव्हता. परंतु भीष्मद्रोणांच्या सांगण्यावरून कदाचित् तो वळेल अशी दुर्योधनादिकांना भीति वाटली. ३. हनन=मारून टाकणें, ठार करणें. ४. गुप्तरीतीनें पांडवांना ठार केल्यानंतर त्यांच्या मृत्यूची वार्ता पुढें आपोआप बाहेर येईल व ते कोणत्या रीतीनें मेले हें लोकांना माहित नसल्यामुळें आपणावर कोणीं दोष लादणार नाहीं—असा उद्देश. ५. मूळ महाभारतांत व **मो**रोपंतकृत महाभारतांत या चौकडीनें केलेल्या मसलतीचें वर्णन अधिक विस्तृत व मनोरंजक रीतीनें केलें आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—वनपर्व—अध्याय १ गीति ३८-४९ पृष्ठ ६-७.] ६. पांडवांना मारण्याविषयींचा. ७. आकाशपंथानें. ८. एकाएकीं. ९. धृतराष्ट्रा! १०. तुझे पुत्र काय करून राहिले आहेत याविषयीं तूं चौकशी करित नाहींस या दोषामुळें. ११. दूषण करण्याला योग्य. १२. मसलत. १३. पाठविलें. पांडवांचें राज्य हिरावून घेऊन त्यांना अरण्यवास करण्याला लाविलेंस असें धृतराष्ट्राला व्यास टोंचून बोलतात. १४. त्यांना इतका त्रास दिल्यानंतरही. १५. तुझे पुत्र. १६. पांडवांच्या. १७. ते (दुर्योधनादिक तुझे पुत्र) या शब्दाचीं विशेषणें. १८. तुझ्या पायांची आण वाहतों हा अर्थ प्रस्तुतस्थळीं विशेष शोभतो. माझ्याकडे कांहीं अपराध नाहीं असें दाखविण्याचें हें एक लक्षण आहे. १९. पांडवांना मारण्याकरितां माझ्या पुत्रांनीं योजिलेली कपटयुक्ति. २०. मला माहित असेल तर तुझ्या पायांची शपथ आहे—असा अर्थ. मला माहित नाहीं—हा सरलार्थ. २१. त्यांनीं योजिलेल्या कपटयुक्तींत माझें कोणत्याही प्रकारचें अंग नाहीं—असा अर्थ. असें बोलून धृतराष्ट्र आपलें निरपराधित्व व्यक्त करितो. २२. दुर्योधनादिक. २३. जर उद्युक्त होतील. २४. ते अरण्यांत जाण्याच्या पूर्वींच. २५. 'सत्य' असाही पाठ आहे. त्रिशुद्धी=त्रिवार खरें. हा शब्द याच अर्थीं ज्ञानेश्वरींत योजलेला आहे. हा शब्द येथें 'त्रिकरणशुद्धी' याच अर्थीनें योजिलेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नाचा आवांका,[1] । व्यास म्हणे 'नरनायका![2] । प्रज्ञाचक्षू! अवधारीं.[3] ॥ ११८॥
चतुराननें[4] निर्मिली क्षिती[5] । चारी[6] खाणी[7] वर्ततां भूतीं । कामधेनु[8] शक्राप्रती ।

त्रिकरणशुद्धी म्हणजे मन, वाचा आणि कर्म या तिहींत एकसारखेपणा म्हणजे विचार, उच्चार आणि आचार या तिहींत ज्या क्रियेसंबंधीं नेहमीं मेळ असतो ती क्रिया. 'मी त्रिकरणशुद्धीनें ही प्रतिज्ञा करितों' म्हणजे माझ्या मनांत जें आहे तेंच मी बोलेन व तसेंच मी करीन—असा अर्थ. त्रिशुद्धीची किंवा त्रिकरणशुद्धीची निषेधार्थक व्याख्या अशी:—मनीं एक, बोलणें दुसरें व आचरण तिसऱ्याच प्रकारचें असें न करणें. म्हणजे 'वचस्येकं, मनस्येकं, कर्मण्येकं' अशा रीतीनें वागणें. २६. धृतराष्ट्रपुत्र. २७. आपला बेत सिद्धीस जाणार नाहीं अशाबद्दल.

१. बेत. २. धृतराष्ट्रा! ३. ऐक. ४. ब्रह्मदेवानें ५. पृथ्वी. ६. 'बहु' असाही अन्य पाठ आहे. ७. चार प्रकारचे प्राणी:—उद्भिज्ज, अंडज, स्वेदज व जरायुज. उद्भिज्ज म्हणजे भूमि भेदून अंकुरादिरूपानें वर येणारे वृक्ष, तृण इत्यादि; अंडज म्हणजे अंड्यापासून झालेले पक्षी, सर्प इत्यादि; स्वेदज म्हणजे घामानें आणि उबेनें उत्पन्न झालेले मत्कुणादि, आणि जरायुज म्हणजे मनुष्यपश्वादिक प्राणी. 'जरायु' नांवाचे चर्मानें मनुष्य पश्वादिकांचे गर्भ वेष्टित असतात, म्हणून त्यांस 'जरायुज' म्हणतात. जरायु म्हणजे व्यावहारिक महाराष्ट्र भाषेंत 'वार' म्हणतात, तेव्हां ज्या प्राण्यास उपजतेवेळीं वारेचें वेष्टण असतें ते प्राणी जरायुज. स्वेदज, अंडज, आणि उद्भिज्ज यांजविषयीं विशेष माहिती मनुस्मृतींत आहे:—'पशवश्च मृगाश्चैव व्यालाश्चोभयतोदतः । रक्षांसि च पिशाचाश्च मनुष्याश्च जरायुजाः ॥ ४३ ॥ अंडजाः पक्षिणः सर्पा नक्रा मत्स्याश्च कच्छपाः । यानि चैवंप्रकाराणि स्थलजान्यौदकानि च ॥ ४४ ॥ स्वेदजं दंशमशकं यूकामक्षिकमत्कुणम् । उष्मणश्चोपजायंते यच्चान्यत्किंचिदीरितम् ॥ ४५ ॥ उद्भिज्जाः स्थावराः सर्वे बीजकांडप्ररोहिणः । ओषध्यः फलपाकांता बहुपुष्पफलोपगाः ॥ ४६ ॥ [म०स्मृ० अ० १ ला.] भावार्थः—पशु, मृग, दोन दंतपंक्तीनें युक्त असे व्यालादिक (सिंहादिक), राक्षस, पिशाच, आणि मनुष्य हे जरायु, म्हणजे गर्भाचें जें आवरणचर्म त्यांत प्रथम होऊन नंतर त्यांतून उत्पन्न होतात, अतएव ते जरायुज होत. पक्षी, सर्प, मगर, मत्स्य आणि कांसव हे प्रथम अंडाचे ठायीं उत्पन्न होतात म्हणून हे अंडज होत. स्थलाचे ठायीं होणारे सरठादिक व उदकाचे ठायीं होणारे शंखादिक ते क्रमानें स्थलज व औदक जाणावे. डांस, माशा, यूका, मक्षिका, ढेंकूण हे घर्मापासून उत्पन्न होतात, अतएव ते स्वेदज होत आणि असे जे दुसरे प्राणी उष्मापासून होतात ते उष्मज होत. बीज व भूमी यांचा भेद करून जे उत्पन्न होतात (वृक्ष) ते उद्भिज्ज होत. ते दोन प्रकारचे आहेत; कितीएक बीजापासून होणारे व कितीएक त्या त्या शाखा भूमींत लावल्यानें होणारे. जे कितीएक [व्रीहि, यव इत्यादि] वृक्ष पुष्कळ फलपुष्पांनीं युक्त होऊन फळें पक्व झाल्यानेंच आपण नष्ट होतात ते औषधि होत. [म० स्मृ० प्रा० भा०]. ८. समुद्रमंथनसमयीं निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक. या धेनूपासून प्रत्येक कामना पूर्ण होते म्हणून हिला कामधेनु म्हणतात. हिलाच सुरभि असें म्हणतात. देवांना व ऋषींना यज्ञाकरितां ही घृत पुरवीत असते. ही आपल्या दुधानें शिवाची रोज पूजा करित असते. कामधेनूला 'हविर्धानी' असेंही नांव आहे.

जाऊनी करी शोकातें. ॥ ११९ ॥ 'माझे पुत्र वृषभ[1] सकळ । कष्ट भोगिती सर्वकाळ । दुःख[2] देखोनी, तळमळ । मज अपार वाटतसे. ॥ १२० ॥ नागर शकट[3] रथ[4] गोणियां[5] । धान्यमळणीं तेलघाणिया । पाठीं बहु भार वाहोनियां । अहोरात्र[6] शिणती[7] ॥ १२१ ॥ दगड, माती, काष्ठभार[8] । सदां[9] मारिती निष्ठुर[10] । गाळीप्रदानें[11] अपार । कष्ट[12] करितां वोपिती[13] ॥ १२२ ॥ शीत उष्ण पर्जन्य[14] वात । निराश्रयें[15] सर्व साहत । भुके[16] तृणोदक[17] नेदिती[18] । उपेक्षिती[19] निर्दय ॥ १२३ ॥ वत्सें[20] बंधनीं[21] तळमळती । भुकेल्या आक्रोशें बोभाती[22] । धेनुका-[23]

१. बैल. २. माझ्या पुत्रांना होत असलेले क्लेश. ३. शकट=गाडा. 'शक्नोति भारं वोढुं शकटः' (महेश्वरकृतामरविवेकाख्यटीका.) मोठमोठें सामान नेण्याकरितां केलेला गाडा. 'शक्नोति भारं वोढुं जीवयितुं वा'। तदुक्तम्-'शकटः शाकिनी गावो यानमास्कंदनं स्वनम्। अनूपः पर्वतो राजा दुर्भिक्षे नव वृत्तयः ॥' इति. [श्रीभानुजिदीक्षितकृत व्याख्यासुधासहित अमरकोष.] ४. रथ=लढाईंत उपयोगीं पडणाऱ्या गाड्या. प्रत्येक वीराच्या रथाला नांव असतें, व त्या रथाला लाविलेल्या झेंड्यावरून हा अमक्याचा रथ आहे असें ओळखींत असत. रथ म्हणजे साधारण (युद्धांत जात असोत किंवा नसोत) प्रवासाच्या गाड्या असाही कधीं कधीं अर्थ होतो परंतु 'रथ' हा शब्द युद्धांत योजण्याच्या गाड्या याच अर्थीं बहुतेक योजला जातो. 'याने चक्रिणि युद्धार्थे शतांगः स्यंदनो रथः' इत्यमरः. रथांना नेहमीं घोडे जुंपित असत, क्वचितच बैल जुंपण्याचा प्रसंग येई. ५. बैलांच्या पाठीवर धान्याच्या गोण्या भरून व्यापाराकरितां प्रांतोप्रांतीं हिंडणारे व्यापारी अद्यापपर्यंत आपल्या देशांत दृष्टीस पडतात. ६. रात्रंदिन. ७. काबाड कष्ट करिती, व त्यामुळें श्रमी होती. ८. काठ्या, दांडकीं. ९. 'प्रतोद' असाही पाठ आहे. प्रतोद=चाबूक. १०. दयाहीन लोक. ११. गाड्यांना जुंपलेले बैल लौकर न चालल्यास त्यांना तोंडास येतील तशा शिव्या देणारे गाडीवान सध्यांही अनेक दृष्टीस पडतात. १२. कामधेनु म्हणते कीं, 'माझे पुत्र काम करित नाहींत म्हणून त्यांना शिव्या मिळतात असें नाहीं. माझे पुत्र नेहमीं काबाडकष्ट करित असतात असें असूनही लोक त्यांना शिव्या देत असतात. तेव्हां माझ्या पुत्रांची स्थिति फारच शोचनीय आहे' असा सुरभीच्या सांगण्याचा भाव. १३. देती, शिव्या देती-असा अर्थ. १४. पाऊस. १५. निराश्रित असल्यामुळें, त्यांना साह्य करण्याला कोणी नसल्यामुळें. १६. 'भुकेल्या' असा अन्य पाठ. १७. तृण आणि उदक, खाण्याला गवत व पिण्याला पाणी. १८. देत नाहींत. १९. काळजी घेत नाहींत. २०. गोवत्सें, गोपुत्र. २१. दोरीनें बांधून ठेविल्यामुळें. २२. मोठ्यानें ओरडती. २३. धेनुकासेहुनि= गाईच्या ओटीपासून-आंचळांपासून-सडांपासून. येथें धेनु या संस्कृत शब्दाचा कास या प्राकृत (मराठी) शब्दाशीं समास झाला आहे. अशा प्रकारचे समास जुन्या कवींच्या ग्रंथांत कधीं कधीं सांपडतात. परंतु अशा समासांना व्याकरणाची संमति नाहीं. 'अक्कलशून्य' इत्यादि शब्द कधीं कधीं उपयोगांत आलेले दिसतात. परंतु असल्या शब्दांचा उपयोग 'प्रयोगशरणा वैयाकरणाः' या न्यायानें रास्त म्हणावयाचा.

सेहुनि ओढिती । पय[1] प्राशितां मातेचें. ॥ १२४ ॥ मेल्या[2] वोपिती[3] अनामिका । त्वचेच्या[4] करिती दोर पादुका[5] । ऐसें कर्म[6] सुरनायका[7]! । किमर्थ त्यांतें निर्मिलें? ॥ १२५ ॥ शक्तिनें[8] खांदीं[9] पाठीवरुतें । वोढुनि नेती बहु भारातें । आक्रोशें[10] पावती कष्टातें । तें दुःख मातें अपार. ॥ १२६ ॥ ऐसे नानापरीचे[11] क्लेश । पुत्र भोगिती बहुवस.[12]' । ऐकोनी इंद्र करी हास्य । म्हणे, 'परिस पवित्रे[13]! ॥ १२७ ॥ तुझे पुत्र असंख्यात । सुखी[14] बहुत दुःखी बहुत । स्वल्प[15] पुत्रांलागीं चित्त । व्याकुळ करणें कासया[16]? ॥ १२८ ॥ दीन दुबळ त्यागूनि सृष्टी । सुखिये सभाग्य पाहूनि दृष्टी । तुवां असावें सुख संतुष्टी । खेद पोटीं न मानावा.' ॥ १२९ ॥ येरी[17] म्हणे, 'जी! निर्धारीं । समान स्नेह[18] सकळांवरी । मातृस्नेहाभीतरी । भेदभावना असेना. ॥ १३० ॥ त्यांमाजीं[19] सात्विकें[20] भाग्यहीनें[21] । जें जें दुःख भोगिती दारुणें[22] । त्यांलागीं[23] मातेचेनि मनें । खेद अपार पाविजे. ॥ १३१ ॥ स्वेच्छें[24] भक्षुनी मातले क्षिती । काममदें बोकोळती[25] । दुर्बळ देखोनी बडविती[26] । फुंफाटती[27] परद्वेषें. ॥ १३२ ॥

---

१. दूध. २. मेल्यानंतर. ३. म्हार. अनामिका=ज्यांना नांव नाहीं किंवा ज्यांचें नांव उच्चारण्यास अयोग्य असे लोक. असे लोक अर्थात् महार इत्यादि अंत्यज लोक होत. ४. कातड्याच्या, चामड्याच्या. ५. संन्यासी वगैरे पारमार्थिक विचार करणाऱ्या मंडळींनीं घालण्याच्या लांकडाच्या पादरक्षकांनाच 'पादुका' अशी व्यवहारांत संज्ञा आहे. तरी 'पादुका' शब्दानें प्रत्येक प्रकारच्या पादरक्षणसाधनाचा बोध होऊं शकतो. 'पादुका, पादूः, उपानत् त्रयमपि पादत्राणस्य 'जोडा इति ख्यातस्य' (महेश्वरकृतामरविवेकाख्यटीका.) ६. 'ऐसे श्रम' असाही पाठ आहे. ७. इंद्रा! ८. 'अशक्त ते' असें पाठांतर आहे. ९. खांद्यावर. १०. 'अशक्तें' असाही पाठ आहे. ११. अनेकप्रकारचे. १२. पुष्कळ प्रकारचे. १३. हिंदुधर्मांत कामधेनू फारच पवित्र मानिली आहे. सर्व देव व ऋषी हिचा नेहमीं मान ठेवून हिची पूजा करित असत. हिचा योग्य सत्कार न केल्यामुळें दिलीपाला पुष्कळ दिवसपर्यंत संतति झाली नव्हती. १४. तुझ्या पुत्रांपैकीं सर्वच दुःखी आहेत असें नाहीं. कांहीं सुखी आहेत, कांहीं दुःखी आहेत. १५. दुःखी असलेल्या थोड्या पुत्रांकरितां. १६. कशाकरितां? म्हणजे त्यांच्याकरितां व्याकुळ होण्याचें कारण नाहीं—असा अर्थ. १७. येरी=दुसरी. येथें कामधेनू. १८. स्नेह=प्रेम. १९. त्यामाजीं= पुत्रांपैकीं. २०. स्वभावानें गरीब. २१. दुर्दैवी. स्वभावानें गरीब असल्यामुळें लोक फार त्रास देतात व अशा रीतीनें भाग्यहीन बनावें लागतें. २२. 'दीनें' असा अन्य पाठ. २३. इतर पुत्र कितीही सुखी असले तरी दुर्दैवी पुत्रांबद्दल आईला फार वाईट वाटत असतें—असा अर्थ. २४. मनास वाटेल तसें अभक्ष्य भक्षण करून. २५. मदोन्मत्त होती. २६. 'पीटिती' असा अन्य पाठ आहे. २७. 'कीं पाटिती परशब्दें' असा अन्य पाठ आहे.

तयां वेदाज्ञा[1] वेसणी । विहिताचार[2] दावणी[3] । बांधोनी दंडावे हे वाणी । ब्रह्मयाचीं जाण पां. ॥ १३३ ॥ दीनें दुर्बळें अशक्तें । तैन्ही[4] पाविजे दुःखातें । परम खेद वाटे मातें । जाण निश्चितें सुरेशा![5]' ॥ १३४ ॥ तोषोनि बोले [6]अमरपाळ, । 'करिती वृषभाचा[7] सांभाळ । तयांसी सुखाचा सुकाळ[8] । ते चिरकाळ[9] भोगवीं. ॥ १३५ ॥ पुत्रातुल्य[10] पशूंतें पाळी । त्यालागीं मेघ इच्छिलें[11] काळीं । पाडूनि पिकवी महीतळीं[12] । तृण धान्य सर्वदां. ॥ १३६ ॥ करिती वृषभांचें पीडण । त्यांवरि पाडूनी अवर्षण[13] । शेतीं न पिके तृण धान्य । नासे प्राण दुर्भिक्षीं[14]. ॥ १३७ ॥ स्वचक्र[15] परचक्र[16] टोळ[17] मूषक[18] । चिकेट[19] तांबरा[20]

---

१. ज्याप्रमाणें नाकांत वेसण घालून बैलाला ताब्यांत आणितात त्याचप्रमाणें वेदाज्ञेनें दुष्ट लोकांना ताळ्यावर आणिलें पाहिजे. २. योग्य वर्तणूक. ३. बैल, गाई वगैरे जनावरांना एका ओळींत बांधण्याची दोरी. ज्याप्रमाणें दावणीच्या योगानें जनावरांना योग्य मार्गी बांधून ठेवितात व त्या जागेहून हालूं देत नाहींत त्याचप्रमाणें विहिताचाराच्या योगानें लोकांना सन्मार्गी बांधून ठेवतां येतें. म्हणजे विहिताचारानें बद्ध झालेले लोक सन्मार्गापासून ढळत नाहींत—असा अर्थ. ४. तन्ही=तरी, दीन दुर्बळ व अशक्त असूनही. म्हणजे जे लोक फार उन्मत्त होऊन लोकांना त्रास देतात त्यांना शिक्षा मिळाली पाहिजे व दुःखही भोगायला लाविलें पाहिजे. असें असून दुष्ट लोकांना तर कांहींच शिक्षा मिळत नाहीं. उलटपक्षीं दीन, दुर्बळ व अशक्त आणि म्हणूनच जे लोकांना कोणत्याही प्रकारें त्रास देत नाहींत अशा प्राण्यांना (उदाहरणार्थ माझे पुत्र वृषभ यांना) जगांत दुःख भोगावें लागत आहे—असा भावार्थ. ५. इंद्रा! ६. देवांचा पालन कर्ता म्हणजे इंद्र. ७. बैलांना. बैलाला ऋषभ आणि वृषभ अशींही नांवें आहेत. ८. 'सुखाचा' असें म्हटल्यावर पुन्हां 'काळ' शब्दाला 'सु' जोडून सुकाळ म्हणण्याची आवश्यकता नव्हती. कारण 'सुकाळ' म्हणजेच सुखानें घालविलेला काळ. तेव्हां 'सुखाचा सुकाळ' असें म्हणण्यांत पुनरुक्तीचा दोष येणार आहे. सुख शब्दावर विशेष जोर देण्याकरितां कवीनें अशी शब्दयोजना केली असें मानिल्यास हा दोष समूळ नाहीं तरी बराच कमी होणार आहे. ९. अनंतकाळ, नेहमीं. १०. 'पुत्रातुल्य' हा समास बरोबर नाहीं. 'पुत्रतुल्य' असा पाहिजे. ११. इच्छिलें काळीं=पाहिजे तेव्हां, जेव्हां त्याला जरूर पडेल तेव्हां. १२. पृथ्वीवर. १३. अवर्षण=अनावृष्टि, पाऊस न पडणें. १४. दुर्भिक्षीं=दुष्काळांत, अन्नाभावामुळें. १५. आपल्या देशांतलें किंवा आपल्या राजाचें सैन्य. १६. दुसऱ्या देशाचें सैन्य. १७. शेतांतलें धान्य, एक दाणाही न ठेवतां, खाऊन टाकणारे प्राणिविशेष. १८. मूषक=उंदीर. मुष् म्हणजे चोरणें या संस्कृत धातूपासून मूषक शब्द झाला आहे. १९. या रोगाला 'चिकटा' असेंही म्हणतात. हा रोग बहुतकरून जोंधळ्यांना होतो. या रोगामुळें झाडांतून रस निघतो व दाणा खराब होतो. २०. शेतास होणारा रोगविशेष. या रोगाला मध्यप्रांताकडे गेरवा म्हणतात. हा रोग बहुतकरून गव्हाच्या झाडांना होतो. हा रोग लागलेलीं झाडें गेरूप्रमाणें लाल होतात व पुढें धान्योत्पत्तीला अयोग्य ठरतात.

[1]आळिक । दुग्धश्रवादि अनेक । रोग उठती धान्यातें. ॥ १३८ ॥ [2]कष्ट घेउनी सदाकाळ । न करिती वृषभाच्या सांभाळ । त्या दोषाचें हें फळ । मी भोगवीं तयांतें. ॥ १३९ ॥ वत्सा [3]अभ्यास नाहीं [4]तृणीं । क्षुधित ओढिती [5]कासेहुनी । तेणें दोषें मी क्षोभोनी । क्षय करीं [6]वंशाचा.' ॥ १४० ॥ धेनु म्हणे, 'स्वामी एक । [7]सकळां देई सारखें सुख.' । संतोषोनी सुरनायक । शांतविलें [8]वरदहस्तें. ॥ १४१ ॥ यालागीं धृतराष्ट्रा! पवित्रा! । अवलोकुनी [9]स्नेहसूत्रा । स्वपुत्रांसमान पांडुपुत्रां । करीं [10]बहुसाल वाटतें. ॥ १४२ ॥ [11]पवित्र [12]प्रसन्न सर्वगुणी । [13]दीनप्राय कष्टती वनीं । हें देखोनी तुझ्या मनीं । खेद कैसा उपजेना? ॥ १४३ ॥ [14]नगरस्वामी वसती वनीं । [15]नाथ ते अनाथ दिसती रानीं ।

---

१. हा एक धान्यनाशक किडा आहे. यालाच कित्येक लोक आळी असें म्हणतात. २. कष्ट घेऊनी=स्वतः कष्ट सोसून. ३. 'अशन' असाही अन्य पाठ आहे. ४. तृणीं अभ्यास नाहीं=(ज्या वत्साला) गवत खाण्याची संवय नाहीं. ५. कासेहुनी=मातेच्या कासेहुनी, मातेचें स्तन पीत असतांना—असा उद्देश. ६. 'वैश्यांचा' असाही अन्य पाठ आहे. या पाठानुसार अर्थ केल्यास 'कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्' या भगवद्गीतोक्तवचनांत [अध्याय १८ श्लोक ४४] शेतकी, गुरें पाळणें व वाणीपणा अशीं वैश्यांचीं तीन कर्मे सांगितलीं आहेत तदनुरूप यथाशास्त्र न वागणाऱ्या वैश्यास होणारी शिक्षा या व मागील ओव्यांत सांगितली आहे. ७. सर्वांना, हा दुर्बळ किंवा हा सबळ असा भेदाभेद न करितां. ८. मूळ भारतांत ही धेनूची गोष्ट जरा भिन्न रीतीनें दिलेली आहे ती अशीः—'एका शेतकऱ्यानें नांगरास दोन बैल लाविले होते. त्यांत एक पुष्ट व एक कृश होता. जो रोडका होता त्याच्यानें नांगर ओढवेना म्हणून शेतकरी त्यास वारंवार मारी. हें पाहून सुरभीच्या मनास फार दुःख झालें आणि ती सर्व हकीकत इंद्रास सांगून त्यास ती शरण गेली. आपल्या दुर्बल पुत्राच्या (बैलाच्या) दैन्यानें सुरभीला दुःख झालें असें पाहून इंद्रास दया आली आणि त्यानें त्या शेतकऱ्याच्या शेतावर विपुल वृष्टि करून धान्य उत्पन्न केलें. आणि त्या कृश बैलाला मुक्त केलें.' ज्याप्रमाणें सबळ व दुर्बल पुत्रांवर सुरभीची सारखी प्रीति होती तशीच स्वपुत्रांवर व अरण्यवास भोगीत असलेल्या पांडवांवर तूं समान प्रीति ठेव असें व्यास या आख्यानाच्या द्वारें धृतराष्ट्राला सूचवितात. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—वनपर्व—अध्याय १ गीति ५९-६४ पृष्ठें ९-१०.] ९. स्नेहसूत्र=स्नेहा(प्रेमा)संबंधी नियम. सर्वांवर सारखें प्रेम ठेवावें हा नियम. १०. बहुत, फारफार. ११. पांडवांकडून कोणत्याही प्रकारचा अपराध घडला नाहीं म्हणून ते पवित्र. १२. नेहमीं ज्यांची मुद्रा संतोषित असते. 'संपन्न' असाही पाठ आहे. १३. दीनाप्रमाणें. १४. नगरस्वामी=नगराचे स्वामी म्हणजे राजे. 'नगरस्वामी' असें विशेषण लावून पांडवांचा या हस्तिनापुरच्या गादीवर हक्क आहे असें व्यास सूचवितात. १५. नाथ=मालक, रक्षणकर्ता, पुढारी, अधिपती.

श्रीमंत भिणंगप्राय धरणी । लोळती हें अनुचित. ॥ १४४ ॥ तुज देखतां तुझे कुमर । अरण्यवासी वनीं पामर । अति पाप हें अपार । उभय लोकीं मज वाटे. ॥ १४५ ॥ लक्ष्मीवंताहूनि विशेष । दीना सांभाळी जगदीश । म्हणोनी 'अनाथबंधु' हा घोष । भुवनत्रयीं न समाय. ॥ १४६ ॥ धृतराष्ट्रा! पांडूहूनी बहुत । विदुरीं आकळे माझें चित्त । दीन सात्विक विष्णुभक्त । परम साधु

१. भिकारी. २. धरणी लोळती=जमिनीवर निजतात. अरण्यवासांत पांडवांना मृदुशय्या मिळण्याचा संभव नव्हता. तेव्हां अर्थात् त्यांना कुश इत्यादि गवतावर किंवा उघड्या जमीनीवर निजावें लागत असे हें उघड आहे. ३. अनुचित=(तुला) अयोग्य. ४. तुजदेखतां=तूं पाहत असतां, तुझ्या डोळ्यापुढें. तूं जीवंत असतां—असा उद्देश. ५. तुझे कुमर=पांडव. खरोखर तुझे (धृतराष्ट्राचे) कुमर म्हणजे दुर्योधनादिक असा अर्थ झाला पाहिजे. परंतु येथें पांडवांबद्दल धृतराष्ट्राच्या मनांत प्रीति उत्पन्न करण्याकरितां 'पांडव तुझेच पुत्र आहेत' असें व्यासांनीं म्हटलें आहे. शिवाय 'तुझे कुमर' असें म्हणण्यांत, भावाच्या पुत्रांना आपल्या पुत्राप्रमाणेंच वागविलें पाहिजे असाही बोध निघूं शकतो, व असा ध्वन्यर्थ इष्टही आहे. ६. 'अरण्यवासी' असें म्हटल्यानंतर 'वनीं' असें पुन्हा म्हणण्याची आवश्यकता नव्हती. हा पुनरुक्तिदोष मुक्तेश्वराच्या ग्रंथांत बऱ्याच ठिकाणीं दृष्टीस पडतो. ७. पामर=दीन. ८. 'अतिपाप' असें म्हटल्यावर 'अपार' हें विशेषण जोडण्याची जरूरी नाहीं. ९. उभय लोक=इहलोक व परलोक. कित्येकांच्या मतें इहलोकांत केलेल्या कर्मांची फलप्राप्ति परलोकांत होते. कित्येकांच्या मतें परलोक वगैरे कांहींएक नाहीं; या जन्मीं केलेल्या कर्मांचें फल पुढच्या जन्मीं याच जगांत भोगावें लागतें. १०. श्रीमंत लोकांहून. ११. अधिक काळजीनें. १२. अनाथांचा बंधु, दीनांचा रक्षण कर्ता. परमेश्वर अनाथ लोकांचें विशेष काळजीनें रक्षण करितो म्हणून त्याला 'अनाथबंधु' असें नांव पडलें. संकटांत असलेल्या मनुष्याचें समाधान करण्याकरितां ईश्वराचें अनाथबंधुत्व फार उपयोगी पडतें. १३. स्वर्ग, मर्त्य, पाताल. १४. जगदीश 'अनाथबंधु' आहे ही त्याची कीर्ति भुवनत्रयांत भरून आणखी उरलेली आहे. म्हणजे अनाथबंधुत्वाविषयीं ईश्वर फारच प्रख्यात आहे—असा अर्थ. १५. आकळणें म्हणजे जाणणें किंवा आटोपणें. येथें आकळे म्हणजे प्रीतीच्या योगानें बद्ध होई. १६. सात्विक=स्वभावानें गरीब. मनुष्यस्वभावाचे तीन भाग केले आहेत. सात्विक, राजस, तामस. या गुणांच्या व्याख्या भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितल्या आहेत:— 'सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते । ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत ॥ १ ॥ लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा । रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ॥२॥ अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादोऽमोह एव च । तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥३॥' (श्रीमत्भगवद्गीता—अध्याय १४ श्लो० ११,१२,१३.) अर्थः—'हे कुंतीपुत्रा! जेव्हां या शरीराच्या सर्व इंद्रियांत ज्ञानरूपी प्रकाश पडतो तेव्हां सत्वगुणाची वृद्धि झाली असें समजावें. ॥ १ ॥ हे भरतश्रेष्ठा! रजोगुणाची वृद्धि होऊं लागली म्हणजे परद्रव्याची कांक्षा, कार्य करण्याची प्रवृत्ति, कर्माचा आरंभ, अस्वास्थ्य व इच्छा यांची

म्हणोनी. ॥ १४७ ॥ तैशीच त्वांही करावी करणी[1] । स्वपुत्रांहूनी सहस्रगुणी[2] । पांडव साधु हें जाणोनी । स्नेह विशेष करावा. ॥ १४८ ॥ शत पुत्रांची जैशी माया[3] । विशेष पांडवीं धरावी राया ! । विदुर[4] स्नेहाळ दीन हृदया । दीन वदना जाणावें. ॥ १४९ ॥ कैसे कंठिती वनवासातें । कैंवी पावती अभिवृद्धीतें । अहोरात्र ऐशी चित्तें । चिंता पाळीं अपार. ॥ १५० ॥ स्वपुत्र[5] वांचवावे चिरकाळ[6] । संपदा असावी अढळ । तरी वनां जाउनी तात्काळ । पांडव नगरा आणावे. ॥ १५१ ॥ ऐश्वर्यपदीं आपुले सुत । अक्षयी असावे जीवें[7] जीत । ऐसें इच्छिशी तरी त्वरित । पवित्र पांडव बुझावीं[8]. ॥ १५२ ॥ दुर्योधनें[9] जाउनी वनीं । सुहृद् गौरवावे वचनीं । मानें आणूनी राजासनीं । बैसवावे स्वहस्तें[10]. ॥ १५३ ॥ हें न करितां नरेश्वरा ! । कुळक्षयो[11] पातला घरा । पुढतो[12] पुढती हेंचि चतुरा ! । काय किती सांगावें ?' ॥ १५४ ॥ धृतराष्ट्र म्हणे, 'द्वैपायना[13] ! । मस्तक वहातसें तुझिया चरणा । हेंचि[14] उपदेश दुर्योधना । आपुल्या मुखें त्वां कीजे.' ॥ १५५ ॥ व्यास म्हणे, 'मी जातसें[15] । मैत्रेय[16] ये-

---

त्पत्ति होते. ॥ २ ॥ हे कुरुकुलोत्पन्न अर्जुना ! विवेकराहित्य, प्रवृत्तिराहित्य, सावधानराहित्य व मोह हीं तमोगुणवृद्धीचीं लक्षणें होत. ॥ ३ ॥' [सुबोधचंद्रिका.]

१. करणी=कृति. 'णी' हा प्रत्यय येथें व्यापारार्थी (स्वार्थी) आहे. जसें पेरणी, कापणी. . हजारोंपट सद्गुणी. ३. प्रीति, प्रेम. ४. विदुराची स्तुति धृतराष्ट्राजवळ व्यास वारंवार रितात याचें कारण असें दिसतें कीं धृतराष्ट्रानें 'माझ्या घरून निघून जा' असें जें मागें विदुला म्हटलें होतें तसें त्यानें पुन्हा म्हणू नये. ५. दुर्योधनादिक. ६. पुष्कळवर्षेपर्यंत. ७. 'जीवें ीत' हें पुनरुक्तिदोषाचें उदाहरण आहे. ८. समजूत कर. ९. पांडवांच्या संकटांला कारणीभूत र्योधनच असल्यामुळें त्यानेंच अरण्यांत जाऊन पांडवांची समजूत करून, त्यांना नगरांत घेऊन ावें व त्यानेंच स्वहस्तें धर्माला गादीवर बसवावें असें व्यास सांगतात. १०. दुर्योधनानें स्वतः ापल्या हातांनीं. ११. कुळ म्हणजे दुर्योधनादिक येवढाच अर्थ घेतला पाहिजे. १२. पुनः-नः. १३. हे व्यासा ! व्यासाचें जन्म यमुना नदींतील द्वीपांत झाल्यामुळें त्याला द्वैपायन असें ्हणतात व त्या नदीचा रंग कृष्ण (काळा) असल्यामुळें व्यासाला कृष्णद्वैपायन असेंही म्हणतात. ४. आतांपर्यंत मला सांगितलेला. १५. धृतराष्ट्रानें आपल्या मुलाला उपदेश करण्याविषयीं सांतलें असतांना तसें न करितां व्यास 'मी जातों; मैत्रेय येऊन उपदेश करील' असें सांगतात. ्हां दुर्योधनाला उपदेश करण्याचें व्यासांनीं टाळलें, याचें कारण असें दिसतें कीं, आपण ादेश केल्यास दुर्योधन आपलें ऐकणार नाहीं हें व्यासाला पक्कें माहित होतें. अशा रीतीनें ापलें न ऐकतां आपला अपमान केल्यास दुर्योधनाला शाप देण्याचा प्रसंग येईल हेंही व्याला माहित होतें. तेव्हां आपल्याच वंशजाला शाप देण्याचा प्रसंग आपल्यावर न यावा म्हन व्यासानें दुर्योधनाला स्वमुखानें उपदेश केला नाहीं. १६. मुनिविशेष. हा पराशरषीचा शिष्य होता.

ईल सावकाशें । तो सांगेल तें मानसें । सर्वीं तुम्ही धरावें'. ॥ १५६ ॥ अ[1]-
दृश्य होतां **व्यास मुनी** । **मैत्रेय** आला तेचि क्षणीं । नमस्कारिला सभास्थानीं ।
**भीष्मद्रोणें धृतराष्ट्रें**. ॥ १५७ ॥ आतां **मैत्रेय** वदेल वचनें । तीं न[2] मानितां
**दुर्योधनें** । ऋषिशापोक्तिपाषाणें[3] । हृदयमर्मीं ताडिला. ॥ १५८ ॥ तेंचि भा[4]-
विकीं परिसावें । जें बोलिलें **व्यासदेवें** । तेंचि **म**[5]हाराष्ट्रवैभवें । अर्थ मिरवे
[6]सारिखा. ॥ १५९ ॥ इति **अरण्यपर्व भारत** । **लीलाविश्वंभरानुग्रहीत** । **मुक्ते-
श्वराचा** वचनार्थ । पवित्रप्राय परिसोतें. ॥ १६० ॥

## अध्याय दुसरा.

**कौ**[8]रवनरेंद्र आदरें म्हणे, । 'पवित्र तीर्थें पुण्यारण्यें[9] । अवलोकुनी येथें येणें ।
कृपेनें जालें[10] स्वामिया[11]!' ॥ १ ॥ **मैत्रेय** म्हणे **धृ**तराष्ट्रातें, । 'अवलोकुनी बहुत
तीर्थें । **काम्यकवना** पातलों; तेथें । **पांड**व दृष्टीं देखिले. ॥ २ ॥ जटा[12] वल्कलें[13]
अजिनांबरी[14] । शीतोष्णपीडा[15] फळाहारी[16] । कष्टतां देखोनि अंतरीं । खेद अद्भुत

१. दिसेनासा होतां. पूर्वींचे ऋषि मंत्रसामर्थ्यानें बसलेल्या जागेवरून अदृश्य होत म्हणजे एकाएकीं दिसेनासे होत. एकाएकीं अंतर्धान पावत. २. न मानितां=न ऐकतां, मान न देतां. ३. शापाच्या उक्ति (वचनें) शापोक्ति, ऋषीच्या शापोक्ति ऋषिशापोक्ति. ऋषिशापोक्तिरूपी पाषाण ऋषिशापोक्तिपाषाण. त्यांनीं ऋषिशापोक्तिपाषाणें=मैत्रेयऋषीनें दिलेल्या शापरूपी दगडांनीं. ४. भाविक जनांनीं. ५. या प्रथम अध्यायांत सांगितलेल्या सर्व कथा सांगावयाला मूळभारतांत नऊ अध्याय लागले आहेत. यावरून मुक्तेश्वराचें वनपर्व मूळापेक्षां फार लहान कां झालें हें सहज समजणार आहे. ६. यावरून मूळभारतापेक्षां आपलें भारत कोणत्याही रीतीनें कमी नाहीं अशी मुक्तेश्वराची समजूत होती असें दिसतें. ७. या अध्यायाला 'पांडववनाभिगमन' असें नांव दोन पोथ्यांत आढळतें. ८. धृतराष्ट्र. ९. पूर्वीं ऋषि, मुनि इत्यादि तपःसंपन्न लोक अरण्यांत राहत असत व म्हणून तेव्हां अरण्यांना पुण्याचीं स्थानें समजत असत. १०. झालें. 'केलें' असाही पाठ आहे. ११. स्वामी म्हणजे संन्यासी. परंतु हा शब्द पुष्कळ वेळां आपल्यापेक्षां मोठ्या मनुष्यांना संबोधन करण्यांत योजिला जातो. तेलंगी भाषेंत हा शब्द बहुमानसूचनार्थ नांवाच्या पुढें जोडला जातो. जसें:—रामस्वामी, कृष्णस्वामी, नारायणस्वामी, इत्यादि. तेलंगी शूद्र 'स्वामी' याच शब्दानें ब्राह्मणांना हाका मारितात. तामिळ लोकांतही 'स्वामी' ह्या शब्दाचा याच अर्थीं प्रयोग होतो. १२. 'तरु' असाही पाठ आढळतो. १३. झाडांच्या साली. वल्कल= वाकळ; फाटकें वस्त्र, चिंधी. झाडाच्या सालीचें वस्त्र. १४. कातड्याचीं वस्त्रें परिधान करणारे. [अजिन+अंबरी=कातडें, मृगचर्म+वस्त्रधारी.] १५. थंडी आणि उष्णता यांनीं पीडित. १६. सूर्याकडून स्थाली मिळाल्यामुळें पांडवांना 'फळाहारी' राहण्याचें कारण नव्हतें. दुर्योधनादिकांच्या मनांत पांडवांविषयीं दया उत्पन्न करण्याकरितां मैत्रेयानें असें सांगितलें असेल.

उदेला[1]. ॥ ३ ॥ तुझिया पुत्रांचा अविवेक । ऐकोनि[2] वाटलें परम दुःख । तिहीं लोकांमाजी एक । बरवें[3] कोणी न म्हणती. ॥ ४ ॥ पुरुषें तंव[4] जगावें जगीं । जंव अपकीर्ति न शिवे अंगीं, । अपयशवंत तो कुमार्गी । जितेंची[5] प्रेतासमान. ॥ ५ ॥ बरवें न करितां न पवे[6] बरवें । अधर्म केल्यानें कैंवी पावे ? । विष भक्षुनी अमर व्हावें । हें अघटित[7] ज्या परी. ॥ ६ ॥ तूं आणि पितामहो[8] । वर्तमान[9] असतां पाहा हो ! । पुत्रीं[10] करावया कलहो । कारण कांहीं असेना. ॥७॥ भीड सोडुनी न बोले वचनीं[11] । तरी **भीष्म** अपजयो पावेल रणीं । पुत्रशोकाचा[12] वडवाग्नी[13] । तुज ग्रासील निर्धारें.' ॥ ८ ॥ तेंवीचि[14] म्हणे, 'दुर्योधना ! । चित्त द्यावें माझिया वचना । स्वल्पासाठीं[15] महाप्राज्ञा ! । पाप अद्भुत[16] जोडिलें. ॥ ९ ॥ नश्वर[17] राज्य जोडिलें वेगीं । परि अपकीर्ति जोडिली युगानुयुगीं[18] । कु-

---

१. उदेला=उगला, उद्भवला, उत्पन्न झाला, वाटला. 'उदेला' या धातूचें वर्तमानकाळचें रूप प्रचारांत नाहीं. [मराठी व्याकरणावरील निबंध—पृष्ठ १४०.] २. पांडवांकडून ऐकून. ३. चांगलें. दुर्योधनानें केलेलें कार्य चांगलें आहे असें. ४. तोंपर्यंत. ५. जिवंत असूनही. ६. पवे=पावे. ७. असंभव. ८. आजा (भीष्म). 'आणि भीष्म पितामहो' असा अन्य पाठ आहे. 'पितामह'शब्दाची साधनिका अशीः—मह (पुल्लिंग) आणि मही (स्त्रीलिंग). हे प्रत्यय पितृ (-ता) आणि मातृ (-ता) ह्यांस जोडल्यानें, अनुक्रमें बापाचा व आईचा, बाप आणि आई, ह्या अर्थाचीं नामें होतात. म्हणजे, पितामह (बापाचा बाप, आजा), पितामही (बापाची आई, आजी). मातामह (आईचा बाप), मातामही (आईची आई). वरील शब्दांमागें प्र लावल्यानें, ते एक पायरी मागें जातात. म्हणजे प्रपितामह (बापाच्या बापाचा बाप, पणजा), प्रपितामही (बापाच्या बापाची आई, पणजी). प्रमातामह (आईच्या बापाचा बाप). [मराठी भाषेचें नवीन व्याकरण—पृष्ठ १७६ नियम ४५७.] ९. वर्तमान=जिवंत. १०. पुत्रांनीं, दुर्योधनादिक व पांडव यांनीं. ११. वचनीं=शब्दांत. दुर्योधनाच्या म्हणण्याच्या विरुद्ध—असा अर्थ. १२. तूं पुत्रांला आतां ताळ्यावर आणणार नाहींस तर तुला पुत्रशोक भोगावा लागेल—असा उद्देश. १३. वडवाग्नीच्या उत्पत्तीविषयीं पुढील गोष्ट ऐकण्यांत येतेः—शिवाच्या भालनेत्रांतून निघालेला वह्नि, मदनाला जाळून, विश्वाचा नाश करूं लागला. या अग्नीपासून विश्वाचें संरक्षण करण्याकरितां ब्रह्मदेवानें त्याला वडवेचें (घोडीचें) रूप दिलें. वडवा वह्नीला घेऊन पितामह समुद्राजवळ गेले व लोकहितार्थ वडवेला आपल्याजवळ ठेवण्यास त्यांनीं समुद्रास सांगितलें. अग्नि जरी समुद्राचा स्वाभाविक शत्रु होता तरी समुद्रानें लोकहितार्थ पितामहाचें म्हणणें कबूल केलें व वडवानलाला आपल्याजवळ जागा दिली. (कालिकापुराण—अध्याय ४१ पहा.) याविषयीं आणखी माहिती मागें पृष्ठ १३ टीप १० मध्यें दिली आहे. १४. तेंवी=त्याच प्रमाणें. ज्या प्रमाणें धृतराष्ट्राला उपदेश केला त्याचप्रमाणें. 'तैसा' असा अन्य पाठ. १५. स्वल्प लाभासाठीं. पारमार्थिक दृष्ट्या राज्यप्राप्ती हा कांहीं मोठा लाभ नाहीं. कारण राज्य नश्वर आहे. १६. विचित्र. विचित्र पाप म्हणजे फार पाप. १७. नाशिवंत. १८. मिळविलेलें 'राज्य' 'नश्वर'

बुद्धि विषयकुसंगीं[1]। केवण्या दृष्टी गोंविली?[2] ॥ १० ॥ यावरी विरोधें[3] व्याधि[4] विषम। संगिया संगीं[5] व्यापला परम। झडले भ्रूलतेचे[6] रोमें[7]। सारासार विचारीं. ॥ ११ ॥ गेलें प्रतिष्ठेचे घ्राण[8]। उभय लोकीं न दाखवीं वदन। कुंश्चित[9] दुर्गुणांचें दर्शन। उघड दिसती जनदृष्टी. ॥ १२ ॥ यास औषध[10] देतसें एक। करावें पांडवांशीं सख्य। तेणें आरोग्य[11] तात्कालिक। हें निश्चयें[12] जाण पां. ॥ १३ ॥ जें वर्तलें नाहीं सृष्टी[13]। ऐशी ऐकों तुझी रहाटी[14]। मी सांक्षेपें[15] पावलों भेटी। याचि लागीं या ठाया. ॥ १४ ॥ बुद्धिभ्रंश झाला तुम्हां। कोण्या

---

म्हणजे फार दिवस टिकणारें नव्हे. परंतु जोडलेली 'अपकीर्ति' 'युगानुयुगीं' टिकणारी आहे असें सांगून मैत्रेयऋषी दुर्योधनाला त्याचें स्वतःचें मौर्ख्य व त्यानें करून घेतलेलें स्वतःचें नुकसान दाखवीत आहेत. गमविलेल्या कीर्तीच्या मानानें मिळविलेलें राज्य कांहींच नाहीं असा मैत्रेयाच्या म्हणण्याचा उद्देश.

१. विषयांच्या वाईट संगतींत. 'रूपं शब्दो गंधरसस्पर्शाश्च विषया अमी' इत्यमरः. विषयांचा संग करणें म्हणजे या पांचही विषयांसंबंधानें जगांतल्या इतर लोकांपेक्षां आपण श्रेष्ठ असलों पाहिजे अशी मनांत इच्छा बाळगून विषयलंपट बनून जाणें. आधींच दुर्योधनाची 'कुबुद्धि' त्यांतून ती 'विषयकुसंगीं' लागल्यामुळें फारच बिघडली आहे—असा भावार्थ. २. कवण्या दृष्टीं=कोणत्या उद्देशानें. ३. विरोध=वैर, पांडवांशीं केलेलें शत्रुत्व. ४. रोग. विषम व्याधि=सुधरण्यास कठिण पडेल असा रोग. ५. संगिया संगीं=तुझे जे सोबती त्यांच्याही पर्यंत. ही विरोधरूपी विषम व्याधि तुलाच जडली आहे असें नाहीं तर जे तुला पांडवांचा छळ करण्याकरितां प्रोत्साहन देतात त्या तुझ्या सोबत्यापर्यंतही ती जाऊन पोहोंचली आहे—असा मथितार्थ. ६. भिवयांचे. ७. केस. ८. घ्राणाचे दोन अर्थ होतातः—(१) नाक. (२) नाकानें वास घेण्याची कृति. येथें 'घ्राण' हा शब्द श्वासोच्छ्वास किंवा वास घेण्याची शक्ति या अर्थीं योजलेला आहे. 'झडले भ्रूलतेचे रोम' व 'गेलें प्रतिष्ठेचे घ्राण' हे दोन्हीं 'विरोध व्याधि विषम' याचे परिणाम होत. कोणतीही व्याधि पुष्कळ दिवसपर्यंत राहिली म्हणजे डोक्याचे केस, भिवयांचे केस इत्यादि झडतात हें प्रसिद्धच आहे. व्याधि विषम झाली व रोगी मृत्युपंथाला लागला म्हणजे घ्राण, कर्ण इत्यादि इंद्रियांची शक्ति कमी कमी होत जाते. या नियमाला अनुसरून दुर्योधनाची विरोधरूपी व्याधि विषम झाल्यामुळें प्रतिष्ठारूपी घ्राण गेलें हें ठीकच झालें. ९. 'कुश्चित' शब्द बरोबर नाहीं. 'कुत्सित' असा पाहिजे. कुत्सित=अधम. 'निकृष्टप्रतिकृष्टार्वरेफयाप्यावमाधमाः। कुपूयकुत्सितावद्यखेटगर्ह्याणकाः समाः॥' इत्यमरः. १०. विरोधाला व्याधीची उपमा दिल्यामुळें सख्याला औषधाची उपमा देणें योग्य आहे. ११. आरोग्य=विरोध व्याधीपासून मुक्ति. १२. निश्चयार्थक. १३. जी गोष्ट या जगांत पूर्वीं कधीं ही झाली नाहीं अशी. १४. रहाटी=रीत, तुझी वागण्याची रीत. १५. मुद्दाम, अगत्यपूर्वक.

कर्मे पाडिलें भ्रमा ? । [1]मर मर [2]सौबेळा ! अधमा ! । महा [3]अनर्थी गोंविलें. ॥१५॥ रक्षुनीयां तुझें चित्त । गोड [4]बोलोनी होशी आप्त । तेंवी वैरी तुझा घात । करावया उदेले. ॥ १६ ॥ [5]ओखद [6]कडवट लागे जाण । परी तें अमृतापरी वांचवी प्राण । माझें हितोपदेश वचन । [7]निष्ठुर नव्हे जाण पां. ॥ १७ ॥ न करीं [8]बलवंतांशीं स्पर्धा । सांडीं अविचार आग्रहो क्रोधा । देईं धर्माची संपदा । जे अन्यायें [9]हरितली. ॥ १८ ॥ [10]नागायुतबलसंपन्न । परम योद्धा भीमसेन । [11]धनुर्धरांमाजी अर्जुन । [12]जामदग्न्यासारिखा. ॥ १९ ॥ असंख्य ऋषिगणांचा मेळू ।

---

१. 'परम' असाही पाठ आहे. २. हे शकुने! सुबलस्यापत्यं पुमान् सौबलः. इतर सर्वांना सोडून शकुनीलाच शिव्या देण्याचें कारण असें आहे कीं यानें पांडवांची संपत्ति कपटद्यूताच्या बळानें हरण करून दुर्योधनास मिळवून दिली व पांडवांस अरण्यांत पाठविलें. अशा रीतीनें पांडवांच्या संकटांस हाच मूळ कारण होय. म्हणून याच्यावर मैत्रेयाचा विशेष क्रोध. ३. संकटांत. ४. 'बोलती होती' असा अन्य पाठ आहे. ५. ओखद=औषध. हिंदुस्थानी लोक या शब्दाचा नेहमीं उपयोग करीत असतात. उत्तरहिंदुस्थानांत 'ष' चा उच्चार 'ख' सारखा करितात. जसें:—पुरुख=पुरुष. [मोरोपंतकृत मंत्रभागवत—द्वितीय स्कंध—गीति २८.] ६. कडू. ७. निष्ठुर नव्हे=द्वेषबुद्धीनें सांगतों आहें असें नाहीं. ८. पांडव बलवंत कसे होते हें पुढच्या ओंवीपासून सांगितलें आहे. ९. हिरावून घेतली, अन्यायानें पांडवांजवळून घेतली—असा अर्थ. १०. नाग—हत्ती; अयुत—दहा हजार=दहा हजार हत्तींच्या बळांनीं युक्त. ११. शस्त्रविद्येंत प्रवीण अशा लोकांपैकीं. १२. हा जमदग्नीचा धाकटा मुलगा असून विष्णूचा सहावा अवतार होय अशी समजूत आहे. याच्या हातीं नेहमी परशु (कुऱ्हाड) असल्यामुळें याला परशुराम म्हणतात. याची आई रेणुका. हिच्यावर जमदग्नीचा कोप झाल्यामुळें त्यानें तिला मारून टाकण्याविषयीं आपल्या मुलास आज्ञा केली. परशुरामाच्या वडील चौघा भावांनीं आईला मारण्याचें नाकारिलें. परंतु बापाच्या आज्ञेंत तत्पर असणाऱ्या परशुरामानें आईचा शिरच्छेद केला. आपली आज्ञा पाळल्याबद्दल खुष होऊन जमदग्नीनें परशुरामास इच्छित वर मागण्यास सांगितलें. परशुरामानें आपल्या मृत आईला जिवंत करण्याविषयीं वर मागितला व रेणुका पुन्हा जिवंत झाली. परशुराम आश्रमांत नाहीं असें पाहून कार्तवीर्यानें जमदग्नीची गाय जबरदस्तीनें नेली. जेव्हां परशुरामाला ही गोष्ट समजली तेव्हां त्यानें कार्तवीर्याशीं युद्ध करून त्याचा नाश केला व आपली गाय परत आणिली. ही गोष्ट जेव्हां कार्तवीर्याच्या मुलांना कळली तेव्हां त्यांना परशुरामाचा फार राग आला व ते जमदग्नीच्या आश्रमावर चालून गेले. परशुराम आश्रमांत नाहीं असें पाहून त्यांनीं जमदग्नीला मारिलें. ही गोष्ट परशुरामाला कळतांच त्यानें कार्तवीर्यपुत्रांचा वध केला व निःक्षत्रिय पृथ्वी करण्याची प्रतिज्ञा केली. आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्याकरितां त्यानें एकवीस वेळां पृथ्वीवरच्या क्षत्रियांचा संहार केला. अशा रीतीनें निःक्षत्रिय पृथ्वी करण्याचा यानें यत्न केला तरी दशरथ, जनक इत्यादि क्षत्रिय याच्या

पातला धर्मातें सांभाळूं । त्यातें कृपेनें कुंतीबाळू । प्रतिपाळिती काननीं. ॥२०॥ बलिष्ठ, आप्त, परम साधु । त्यांशीं करिशी व्यर्थ विरोधु । मरोनी जोडावा कुशब्दु । अपयशाचा त्रिजगीं. ॥ २१ ॥ आतां निर्वैरें निजमानसीं । सख्यत्व करावें सुहृदांशीं । त्यांचा विभाग देउनी त्यांसी । सुखसंतोषें असावें. ॥ २२ ॥ ऐसें न करितां भूपाळा! । क्षयो पातला जाण कुळा । अन्यथा असे तरी रविमंडळा । पतन हो कां भूमंडळीं. ॥ २३ ॥ बाहुयुद्धीं जरासंध । भीमें मारिला वीर प्रसिद्ध । हिडिंबबकासुरांचा वध । केला हें जाणतसां. ॥ २४ ॥ प्रस्तुत

हातून सुटले. हा क्षत्रियद्वेष्टा परशुराम दाशरथी रामाच्या हातानें पराभव पावला. कित्येकांच्या मतें हा परशुरामावतार येथेंच संपला; व कित्येकांच्या मतें हा सप्त चिरंजीवीपैकीं एक असून महेंद्रपर्वतावर अद्यापपर्यंत तपश्चर्या करीत आहे. कार्तिकेयापेक्षां आपण कमी शौर्यवान् नाहीं असें दाखविण्याकरितां यानें एकदां क्रौंच पर्वताचा भेद केला होता. धनुर्विद्येंत हा फारच प्रवीण होता. भारतयोद्धा भीष्म हा परशुरामाचा पट्टशिष्य. कर्णही परशुरामाचाच शिष्य पण प्रियशिष्य नव्हे. परशुराम हा शंकराचा शिष्य होय.

१. आप्त=बांधव, मित्र, हित इच्छिणारा. एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'आप्तस्तु यथार्थवक्ता.' येथें आप्त म्हणजे दायाद असें समजावें. २. बलिष्ठ व परम साधु हीं दोन विशेषणें पांडवांना लावून मैत्रेय सुचवितात कीं पांडव दुर्योधनादिकांपेक्षां शारीरिक उन्नतींत श्रेष्ठ आहेत व मानसिक उन्नतींत ही श्रेष्ठ आहेत. 'बलिष्ठ' मनुष्य स्वभावानें 'परम साधु' कधीं ही रहावयाचा नाहीं, असा साधारण नियम असूनही दुर्योधनादिकांपेक्षां बलिष्ठ असलेले पांडव स्वभावानें त्यांपेक्षां उदात्त होते, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अशा रीतीनें पांडवांचे सद्गुण गाइल्यास त्यांच्याबद्दल दुर्योधनाच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होईल असें मैत्रेयास वाटलें असावें. ३. अपकीर्ति मैत्रेयानें 'तुझी कीर्ति मलिन होईल' अशा अर्थाचा दुर्योधनाला पुष्कळ वेळा उपदेश केला. अपकीर्तीवर विशेष जोर देण्याचें कारण असें आहे कीं, 'संभावितस्य या कीर्तिर्मरणादतिरिच्यते' 'प्रतिष्ठित पुरुषाला मरणाहून अकीर्ति अधिक दुःखकर आहे' [गीता–अ० २ श्लो० ३४.] या नियमाला अनुसरून सभ्य लोकांना कीर्तीची विशेष चाड असते. परंतु दुर्योधन राज्यापेक्षां कीर्तीला विशेष महत्व देणारा नव्हता व म्हणूनच मैत्रेयाच्या उपदेशाचा त्यावर परिणाम झाला नाहीं. ४. वैररहित, कोणी वैरी राहणार नाहीं असें. ५. राज्याचा वांटा, पांडवांपासून द्यूतांत हिरावून घेतलेली संपत्ति. ६. अन्यथा=दुसऱ्या प्रकारें, माझ्या सांगण्याच्या विरुद्ध. 'क्षयो पातला जाण कुळा' हें माझें म्हणणें खोटें ठरेल तर. आपलें म्हणणें खोटें ठरल्यास अमका एक उत्पात होईल किंवा अमकी असंभवनीय गोष्ट घडल्याशिवाय माझें म्हणणें खोटें ठरणार नाहीं असें सांगून आपल्या म्हणण्याचें सत्यत्व सिद्ध करण्याची रीत इतर देशापेक्षां हिंदुस्थानांत विशेष दृष्टीस पडते. ७. सूर्यबिंब. ८. बाहुयुद्धीं=मल्लयुद्धांत, कुस्तींत. मल्लयुद्ध व गदायुद्ध या विषयीं भीम प्रसिद्ध होता. ९. हिडिंबवधाविषयीं काव्यसंग्रह–मुक्तेश्वरकृत महाभारत–आदिपर्व–पृष्ठ ३३४–३४१ पहा. बकवधाविषयीं काव्यसंग्रह–मुक्तेश्वरकृत महाभारत–आदिपर्व–पृष्ठ ३४२–३४८ पहा.

किर्मीर महादैत्यु । भीमहस्तें पावला मृत्यु । त्याशीं वैर करितां मृत्यु । [1]बंधुसहित पावशी.' ॥ २५ ॥ ऐकोनी मैत्रेयाच्या वचना । क्रोध नावरे दुर्योधना, । [2]आरक्तता पातली नयना । [3]खदिरांगार ज्यापरी. ॥ २६ ॥ [4]दुःखें [5]सोडी दीर्घ [6]हुंकार । जेंवी फूत्कारें [7]महाविखार । [8]गजशुंडाकार कर । तेणें [9]जानु ताडिली. ॥ २७ ॥ [10]पादांगुष्ठें रेखित धरणी । सरोष मौन्यें [11]अधोवदनीं । हें देखोनी मैत्रेयमुनी । [12]प्रळयानळ क्षोभला. ॥ २८ ॥ म्हणे, 'दुर्जना ! पापरूपा ! । हित सां-

१. भीमासह. २. तांबडेपणा. डोळे रागानें लाल झाले–असा अर्थ. ३. खदिरांगार= खैराचा निखारा. ४. 'दुःखें' म्हणण्यापेक्षां 'दुःखें व रागें' असें म्हटलें असतें तर विशेष शोभलें असतें, कारण दुःखाचें चिन्ह फक्त मुकाट्यानें रडणें; परंतु 'हुंकार' हें क्रोधाचें व किंचित् दुःखाचें चिन्ह आहे. शिवाय हुंकाराला सर्पाच्या फूत्काराची उपमा दिली आहे. सर्प केवळ दुःखामुळें फूत्कारित नसतो. दुःखानें तो जेव्हां चवताळतो व जेव्हां तो क्रोधाविष्ट होतो तेव्हांच तो फूत्कार करूं लागतो. ५. 'मुखें सोडी' असा अन्य पाठ आहे. ६. 'धुधुःकारें' असें पाठांतर आहे. ७. विषारी सर्प. ८. हत्तीच्या सोंडेच्या आकाराचा. मूळांत 'गजशुंडाकार' किंवा 'गजकराकार' हें कराचें विशेषण केलेलें नसून 'उरू' याचें विशेषण केलें आहे. हत्तीची सोंड वरच्या भागाला जाड असून खालच्या बाजूला निमुळती असते म्हणजे तिची जाडी कमी कमी होत जाते. याकरितां सोंडेची उपमा मांडीलाच विशेष शोभते. ९. मूळांत 'जानु' असें नसून 'उरू' असें आहे:–'उरूं गजकराकारं करेणाभिजघान सः । दुर्योधनः स्मितं कृत्वा चरणेनोल्लिखन्महीम् ॥' (महाभारत–वनपर्व–अ० १० श्लोक २९). १०. पायाच्या आंगठ्यानें. ११. तोंड खालीं घालून. कोणत्याही मनुष्यानें सांगितलेली गोष्ट आपल्याला पसंत नसली व तसें सांगण्याचें धैर्य नसलें म्हणजे तोंड खालीं घालून कांहीं उत्तर न देतां स्तब्ध राहणें हें मानवी स्वभावाला अनुसरूनच आहे. अशा रीतीनें मनुष्य स्तब्ध राहिला म्हणजे आपलें म्हणणें त्याला आवडलें नाहीं असें शहाण्या मनुष्यानें लागलेंच समजावें. १२. प्रलयसमयींचा अग्नि. प्रत्येक कल्पाच्या अंतीं प्रलय होऊन जगाचा नाश होतो. या प्रलयांत महा भयंकर अग्नि उत्पन्न होतो व तो सर्व सृष्टीला जाळून भस्म करितो–अशी समजूत आहे. प्रलयाची कल्पना प्रत्येक धर्मांत आहे; परंतु प्रत्येक धर्मांत प्रलय होण्याच्या रीती निरनिराळ्या आहेत. ख्रिस्तांचा Doomsday (जगाच्या न्यायाचा दिवस) व आमचा प्रलय जवळपास एकच होत. ख्रिस्तांच्या मतें जगाचा अंत झाल्यावर ईश्वर व ईश्वरपुत्र न्यायासनावर बसून मनुष्यांच्या पापपुण्याचा निवाडा करितात असें आहे. व हिंदूंच्या मतें प्रलय झाल्यावर जिकडेतिकडे पुष्कळ वेळपर्यंत शांतता राहते, व मग जगदुत्पत्तीला पुन्हां सुरुवात होते. असो. दुर्योधनाच्या डोळ्यांना खदिरांगाराची उपमा दिल्यामुळें मैत्रेयाला खदिरांगारापेक्षां भयंकर अग्नीची उपमा देणें भाग पडलें. प्रलयाग्नीपेक्षां भयंकर अग्नि दुसरा कोणताच नसल्यामुळें प्रलयाग्नीला 'खदिरांगार' तृणवत् आहे–असा भाव.

गतां [1]आलाशि कोपा, । आतां घेईं माझ्या शापा । भस्म होशी स्वकुळेशीं. ॥२९॥ [2]हेचि मांडी गदाप्रहारीं । चूर्ण होईल, [3]रणचत्वरीं । पादलत्ता बसतील शिरीं । [4]वज्रप्राय **भीमा**च्या. ॥ ३० ॥ माझें [5]अभंग [6]शापवचन । पालटूं न शके [7]**चतुरानन.'** । ऐसें बोलूनि [8]तपोधन । निघता झाला तात्काळ. ॥ ३१ ॥ **धृत**राष्ट्र लागोनी पायीं । म्हणे, 'स्वामिया! [9]उच्छाप देईं'. । ऋषि म्हणे, 'जाण हृदयीं । शाप उच्छाप [10]मद्वाक्यें ॥ ३२ ॥ माझें पाळिल्या [11]वचन । न बाधे शाप-[12]हुताशन । आज्ञा भंगितां दारुण । [13]कुळक्षयो निर्धारें.' ॥ ३३ ॥ पुढें **धृत**राष्ट्र

---

१. आलाशि कोपा=कोपाच्या स्थितीला आलास, क्रोधासक्त झालास. २. जी मांडी कानें ताडिली. यावरून २७ व्या ओंवींत 'जानु ताडिली' असें जें म्हटलें आहे तें 'मांडी ताडिली' असें पाहिजे होतें असें दिसतें. मूळांत 'उरू' असेंच असल्यामुळें आमच्या म्हणण्यास बळकटी येते. ३. रणांगणीं. चत्वर=अंगण, प्रांगण, अजिर. ४. वज्रतुल्य=वज्रासारखें. येथें 'वज्रप्रहारासारखें' असा अर्थ घेणें बरें. कारण 'वज्रप्राय' हें 'पादलत्ता' याचें विशेषण आहे. वज्र म्हणजे दधीचि ऋषीच्या हाडांपासून तयार केलेलें इंद्राचें आयुध. (वज्राच्या उत्पत्तीविषयीं महाभारत—वनपर्व—अ० १०० पहा.) वज्रप्रहारानें मोठमोठे पर्वतही छिन्नविच्छिन्न होतात—अशी समजूत आहे. इंद्रानें वज्रानें पर्वतांचे पंख तोडले अशी तर मुळीं कथाच आहे. ५. ज्याला भंग नाहीं असें, जें कधींहीं खोटें ठरणार नाहीं असें. अमोघ, अबाध्य, अखंड्य. ६. काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—वनपर्व—अध्याय १ गीति ८३-८५, पृष्ठ १२ पहा. ७. चतुर्मुख ब्रह्मा. ब्रह्मदेवाला प्रथम पांच मुखें होतीं. परंतु एक मुख शिवानें काढून टाकल्यामुळें ब्रह्मदेव चतुरानन झाला. ८. तपच आहे धन ज्याचें. ऋषि व मुनि यांना नश्वर ऐश्वर्याची पर्वा नसते. कारण तपाच्या प्रभावानें त्यांना, मोठमोठ्या धनिकांसही असंभव भासणाऱ्या गोष्टी सहज करतां येतात. याच कारणामुळें ऋषि, मुनिप्रभृति मंडळींना स्वतःचीं तपश्चर्याच धनाप्रमाणें वाटते. ९. उच्छाप=पावलेल्या शापापासून मनुष्य मुक्त होण्याकरितां देण्याचा वर. निरपराधी मनुष्याला अपराधी समजून शाप दिल्यास किंवा शाप दिलेल्या मनुष्यास स्वापराधाबद्दल मनापासून पश्चात्ताप झाल्यास उच्छाप देण्याची चाल आहे. दुर्योधन निरपराधी नव्हता व कृतकर्माबद्दल त्याला पश्चात्तापही वाटला नव्हता; म्हणून दुर्योधन उच्छापाला पात्र नव्हता. म्हणूनच मैत्रेयानें उच्छाप न देतां, 'माझी आज्ञा पाळल्यास शाप बाधणार नाहीं,' असें सांगितलें. १०. मी आतांपर्यंत जीं वाक्यें बोललों तींच शाप होत व तींच उच्छाप होत—असा भाव. मैत्रेयांनीं दिलेला उपदेश उच्छाप समजावा; व त्यांनीं दिलेला शाप तो प्रत्यक्ष शाप आहे हें उघडच दिसत आहे. अशा रीतीनें मैत्रेयांनीं बोललेल्या वाक्यांत शाप आणि उच्छाप हे दोन्ही होते असें समजावें. ११. पांडवांशीं सख्य करण्याविषयीं केलेला उपदेश. १२. अग्नि. १३. 'कुलक्षयः' असा संस्कृत शब्द. 'विसर्गाच्या मागें **अ** असून पुढें **अ** अथवा मृदु व्यंजन आलें असतां त्या विसर्गाचा **उ** होतो; तो **उ** आणि मागचा **अ** मिळून **ओ** होतो.' या नियमाला अनुसरून 'कुलक्षयः' याचें 'कुळक्षयो' असें रूप झालें. नेहमीं

विनवी वाणी, । 'किर्मीर कैसा वधिला वनीं ? । ऐकावया आवडे मनीं । बळ प्रताप **भीमा**चा.' ॥ ३४ ॥ **मैत्रेय** म्हणे, 'न बोलें मुखें[1] । सर्वेही **विदुरा**शीं ठाउकें, । तो सांगेल तें कौतुकें । श्रवण तुम्हीं करावें.' ॥ ३५ ॥ **मैत्रेय** क्षोभूनि[2] गेलियावरी, । **धृतराष्ट्र विदुरा**तें पाचारी[3], । 'किर्मीर **भीमा**चिये करीं । पडिला कैसा मज सांग.' ॥ ३६ ॥ **विदुर** म्हणे, 'ऐक श्रोत्रीं[4] । राज्य हरितल्या[5] तुझ्या पुत्रीं । लोटल्या तीन अहोरात्री[6] । **धर्म**राजबंधूसी. ॥ ३७ ॥ मार्ग क्रमूनियां चरणीं[7] । प्रवेशले **काम्यकवनीं** । तेथें प्रवर्तली रजनी[8] । वृक्षमूळीं भूशय्या. ॥ ३८ ॥ लोटलिया अर्धनिशीसमयो[9] । वृक्षमूळीं[10] भूप्रळयो[11] । झडझडाटें[12] सुटला वायो । तेणें धूसर[13] दाटलें. ॥ ३९ ॥ राक्षसाचे विकट[14] हांके[15] । वनदेवता घाबरी शंके, । श्वापदें पळती प्राणधाकें, । व्याघ्रसिंहादि अपार. ॥४०॥ रोधूनी[16] **पां**डवपंथू । उभा ठेला काळमृत्यू । विशाळ बळाचा प्रतापू । भयानक माजला. ॥ ४१ ॥ विक्राळ दाढा महाक्रूर । नेत्र भोंवडी चक्राकार[17] । मुखीं नाशिकीं वैश्वानर[18] । ज्वाळा सांडी धडधडां. ॥ ४२ ॥ मुखें गांजवी[19] घोर शब्दू, । 'बक[20] माझा सहोदर बंधू । त्याचा तुम्हीं केला वधू । निरपराधें[21] दुष्ट हो !

---

याच नियमाला अनुसरून **मुक्तेश्वर** विसर्गाचा **ओ**कार करित असतो असें नाहीं. पुष्कळ ठिकाणीं या नियमाला न जुमानतांही **मुक्तेश्वरा**नें विसर्गाचा **ओ**कार केला आहे. उ० 'अपजयो पावेल रणीं' (मुक्तेश्वरकृत महाभारत—वनपर्व—अध्याय २ ओवी ८ चरण २).

१. (मी) मुखें न बोलें—असा अन्वय करावा. मैत्रेय म्हणतात कीं, 'किर्मीरवधाची गोष्ट मी स्वतः आपल्या तोंडानें सांगणार नाहीं. दुर्योधनाच्या व धृतराष्ट्राच्या वर्तनाबद्दल फार तिटकारा आल्यामुळें धृतराष्ट्राच्या सभेंत आणखी कांहींवेळ बसून किर्मीरवधाची गोष्ट सांगण्याचें मैत्रेयानें नाकारिलें असावें. मूळभारतांत 'नाहं वक्ष्यामि ते भूयो न ते शुश्रूषते सुतः' असें म्हटलें आहे. २. रागानें संतप्त होऊन. ३. बोलावी. ४. कानांनीं. ५. हिरावून घेतल्यानंतर. ६. दिवस आणि रात्र. ७. पायांनीं. 'चरणीं' असें येथें मुद्दाम सांगण्याचें कारण असें दिसतें कीं, पांडव हे राजपुत्र असल्यामुळें पायांनीं चालत जाणें हें त्यांच्या योग्यतेला शोभत नव्हतें. असें असून दुर्योधनाच्या कृतीमुळें त्यांना चालत जावें लागलें असें धृतराष्ट्राच्या लक्षांत यावें. ८. रात्र झाली, रात्र प्राप्त झाली. ९. अर्धरात्रीची वेळ. १०. झाडाच्या खालीं, जेथें पांडव निजले होते तेथें. ११. 'वनीं मांडिला महाप्रळय' असाही पाठ आहे. १२. भयंकर आवाज करीत. १३. धूसर=धुरळा. १४. भयंकर. १५. शब्द. १६. रोधूनी=बंद करून. १७. गोलाकाराचे, वाटोळे. १८. अग्नि. १९. गाजवी=ओरडे. २०. राक्षसविशेष. २१. अपराध नसतां. निर्+अपराध=निरपराध.

॥ ४३ ॥ त्याचा सूड ध्यावा हातें[1] । सर्वदा शोधीं भीमसेनातें । आजी अ-
कस्मात येथें । सांपडलेती वैरी हो! ॥ ४४ ॥ आतां भीमाचेनि[2] रक्तें । महा-
नदी निर्मूनी एथें । स्वर्गीं निमाल्या[3] बकातें । तोषवीन तर्पणीं[4]. ॥ ४५ ॥ हें
वन माझें वसतिस्थान । एथें पोतला[5] पावे मरण, । आतां[6] सर्वांचें[7] भक्षण । करीन
क्षण न लागतां.' ॥४६॥ त्याचें रूप देखतां नयनीं । मूर्च्छा पावली याज्ञसेनी[8], ।
धर्मद्रुमातें[9] वेष्टुनी । [10]कीर्तिवल्लिका ज्यापरी. ॥४७॥ हें देखोनी वृकोदरू[11] । [12]भं-
गिता झाला विशाळ तरू । [13]गांडीवचाप धनुर्धरू । [14]सज्जिता झाला झडकरी॥४८॥

---

१. हातें=आपल्या हातानें. २. भीमाचेनि=भीमाच्याच. ३. मेलेल्या. ४. गृहस्थानें दररोज करावयाच्या पंचमहायज्ञांपैकीं पितृयज्ञ नामक यज्ञाचा तर्पण हा एक भाग आहे. हा तर्पणविधि करतांना आपल्या मृत पूर्वजांचीं व मृत बांधवांचीं नांवें गोत्रें घेऊन, त्यांना परलोकीं जल मिळण्याकरितां, दररोज कांहीं पाणी सोडतात. ५. आलेला मनुष्य—असा अर्थ. ६. 'आतां तुम्हां सर्वांचे' असाही पाठ आहे. ७. ब्राह्मणांसह पंच पांडवांचें. ८. द्रौपदी. संस्कृत 'अ'कारांत नामांस 'इ' प्रत्यय लावल्यास गोत्रापत्यार्थीं नामें होतात; जसें:—मरुत्—मारुति, रावण—रावणि, द्रोण—द्रौणि, दक्ष—दाक्षि, दशरथ—दाशरथि वगैरे. ९. वृक्षातें. १०. कीर्तिरूपी लता. ११. वृक नामक अग्नि उदरांत (पोटांत) असल्यामुळें भीमाला वृकोदर असें नांव पडलें. १२. भंगिता=उपटिता. भीमसेनाची युद्ध करण्याची रीत बहुतकरून हीच होती. मोठमोठे वृक्ष उपटून त्यांनीं शत्रूंचा नाश करण्याची युक्ति भीमाला चांगली साधली होती असें दिसतें. हिडंबासुरवध, बकासुरवध, उपकीचकवध इत्यादि प्रसंगीं भीमानें वृक्षांचाच उपयोग केला होता. १३. हें गांडीव मूळ सोमाचें चाप. सोमापासून हें वरुणाला मिळालें. वरुणापासून अग्नीनें अर्जुनाकरितां मागून आणिलें. खांडववनदहनसमयीं आपणांला (अग्नीला) इंद्रादिक देवांपासून रक्षण्याचें सामर्थ्य अर्जुनाला यावें म्हणून अग्नीनें हें गांडीव चाप अर्जुनाला दिलें. कृष्णनिर्वाणापर्यंत अर्जुनाला या चापाचा उपयोग करितां आला. तदनंतर हें चाप उचलण्याचीही शक्ति अर्जुनाला राहिली नाहीं. हें धनुष्य अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन, (महाभारत—आदिपर्व—अ० २२५ श्लोक १-९) अर्जुनास दिलें. वीरांच्या धनुष्यांस भिन्न भिन्न नांवें होतीं असें दिसतें:—कर्णाचें 'कालपृष्ठ,' अभिमन्यूचें 'रौद्र'. या 'गांडीव' धनुष्याचें वर्णन (विराटपर्व—अध्याय ४३ श्लोक १-७ यांत) केलें आहे तें असें:—विराटपुत्र उत्तर आणि बृहन्नडा यांचें संभाषण चाललें असतां बृहन्नडा उत्तरास म्हणते, 'हे उत्तरा तूं मला विचारलेंस, तें हें अर्जुनाचें गांडीव नामक धनुष्य आहे. हें शत्रूंचा संहार करण्यास समर्थ आहे. हें लोकांमध्यें प्रख्यात आहे. हें सर्व आयुधांहून उत्कृष्ट आहे. हें सुवर्णालंकृत आहे. हें अर्जुनाचें गांडीव धनुष्य मोठें प्रबल आयुध आहे. याला हजार धनुष्यांचें बल आहे. हें राष्ट्राचा उत्कर्ष करणारें आहे. या धनुष्यानें पार्थ, देवांना आणि मनुष्यांना रणामध्यें जिंकतो. हें अनेक प्रकारच्या रंगांनीं चित्रविचित्र केलेलें आहे; हें सडसडीत बारिक आहे; हें लांब व अविद्ध आहे; पूर्वीं हें धनुष्य ब्रह्मदेवानें एकहजार वर्षें धारण केलें; प्रजापतीनें ५०३ वर्षें,

भीम निवारी[1] पार्थातें, । 'किर्मीरवध माझेनि हातें । होणार यालागीं स्वस्थचित्तें । कौतुक दृष्टीं विलोकीं.' ॥४९॥ विंध्याद्रीवरी[2] महा मेरू[3] । गजासुराशीं नंदिके-[4]

इंद्रानें ८५ वर्षें, सोमदेवानें ५०० वर्षें व वरुणानें १०० वर्षें धारण केलें; ३२॥ वर्षें श्वेतवाहन (ज्याच्या रथाला शुभ्रवर्ण घोडे असतात अशा) अर्जुनापाशीं आहे. ह्या धनुष्याचा पराक्रम मोठा आहे; हें सुंदर आहे; हें उत्कृष्ट व मनोहराकृति धनुष्य अर्जुनाला (अग्निद्वारा) वरुणापासून प्राप्त झालें. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ३ गीति ९९-१०१ पृष्ठ ७७-७८.] १४. चापाला बाण लाविता झाला.

१. किर्मीराशीं युद्ध करूं नकोस असें सांगितलें. २. उत्तरहिंदुस्थान व दक्षिणहिंदुस्थान यांच्यामध्यें असणारी पर्वतांची रांग. हा विंध्याद्रिपर्वत सप्तकुलपर्वतांपैकीं एक आहे. हा पर्वत मध्यदेशाची दक्षिणेकडची सीमा होय. (मनुस्मृति–अध्याय २ श्लो० २१ पृष्ठ १६ पहा.) मेरू पर्वताच्या भोंवतीं जसा सूर्य फिरतो तसा आपल्याही भोंवतीं फिरावा असें या पर्वतास वाटलें; परंतु सूर्यानें असें करण्याचें नाकारिलें. याबद्दल विंध्याद्रीला राग आला व सूर्यचंद्रांच्या मार्गांत अडथळा आणण्याकरितां तो खूप उंच वाढूं लागला. वाढतां वाढतां तो इतका उंच वाढला कीं त्याच्या योगानें सूर्याची गति कुंठित होऊन हिंदुस्थानच्या एका भागावर सतत दिवस व दुसऱ्या बाजूला सतत रात्र अशी स्थिति झाली. याबद्दल देवांना भीति वाटून ते विंध्याद्रीचा गुरु अगस्त्य ऋषि याला शरण गेले. अगस्त्य ऋषि काशी येथें राहत होते; व आपणाला पुण्यक्षेत्र काशी सोडून बाहेर जाण्याचा प्रसंग न यावा म्हणून त्यानें आपले पायही तोडून घेतले होते. परंतु देवांच्या आग्रहामुळें त्याला काशी सोडून जाणें भाग पडलें. आपले गुरू आपल्याकडे येत आहेत असें पाहून येवढा मोठा झालेला विंध्याद्री गुरूला साष्टांग नमस्कार घालण्याकरितां खालीं वांकला. 'मी दक्षिणहिंदुस्थानांतून परत येईपर्यंत तूं असाच वांकलेला रहा,' अशी विंध्याद्रीला आज्ञा करून अगस्त्य ऋषि दक्षिणेकडे चालते झाले ते पुन्हा कधींही परत आले नाहींत. म्हणून विंध्याद्री तसाच वांकलेला राहिला व सूर्याची गति पूर्वीप्रमाणें सुरळित चालली. सूर्यचंद्रांची गति विंधल्यामुळें (रोधल्यामुळें) त्याला 'विंध्याद्रि' असें अन्वर्थक नांव पडलें व तेंच अद्यापिही चालू आहे. 'विंध्य' शब्द व्यध्–विध्=विद्ध करणें, अडथळा करणें, या धातूपासून निघाला आहे. [महाभारत–वनपर्व–अध्याय ९६-१०५.] ३. या पर्वताविषयीं भागवत, देवीभागवत, महाभारत इत्यादि ग्रंथांत माहिती दिली आहे. वरील ग्रंथांपैकीं प्रत्येक ग्रंथांत सांगितलेली माहिती इतर ग्रंथांत सांगितलेल्या माहितीपेक्षां बरीच भिन्न दिसते. हा पर्वत भूमीच्या मध्यभागीं असून याच्या भोंवतीं सर्व द्वीपें, पर्वत इत्यादि वर्तुलाकारानें आहेत अशी समजूत आहे. हा पर्वत सोन्याचा असून सूर्य व ग्रह याच्या भोंवतीं नेहमीं फिरत असतात. याची उंची चौऱ्यांशीं हजार योजनें आहे. कित्येकांच्या मतें हिमालयाच्या शिखरांपैकीं मेरु एक शिखर असावें असें आहे. हिमालयाच्या आग्नेय दिशेकडे पसरत गेलेला उत्तरेकडील जो भाग त्याला उपमेरू असें नांव प्रचारांत आहे. कैलास पर्वत मेरू पर्वताचा एक

श्वरू । तेंवि नर आणि निशाचरू[1] । युद्धकदनीं मिसळले.॥९०॥ वृक्षयुद्धीं[2] दारुण । द्रुमविरहित[3] झालें वन, । मग उचलोनी चंड[4] पाषाण[5] । परस्परें हाणिती. ॥९१॥ क्रोश द्विक्रोशीं[6] शैलशृंगें[7] । एकमेकांतें ताडिती रागें । तींही[8] सरलिया आंगें । मल्लयुद्धा मिळाले. ॥ ९२ ॥ राज्यदारार्थी[9] सकाम । वाळीसुग्रीवां[10] महासंग्राम । तेंवी **किर्मीर** आणि **भीम** । घोर द्वंद्वीं[11] पेटले. ॥ ९३ ॥ मुष्टिलत्ता[12] लथडवे[13] थडका[14] । हुमणिया[15] कोंपर हाणिती देखा । चडकणा[16] ताडुनिया मुखा । दंत पाडूं

---

भाग आहे. रामायणांतील पुढील उताऱ्यांवरून या म्हणण्यास बळकटी येते:—'अधिष्ठितो यथा मेरु: श्रीवैश्रवणशंकरैः' (वाल्मीकिकृत रामायण—बालकांड—सर्ग १ श्लोक ३१.) यावरून पार्वती, शंकर, कुबेर यांची राहण्याची जागा (कैलास) व मेरू एकच असावेत किंवा कैलास मेरूचा भाग असावा असें दिसतें. ज्योतिषशास्त्रांत भूमध्यरेषा कोठकोठून जाते हें सांगतांना म्हटलें आहे:—'यल्लंकोज्जयनीपुरोपरिकुरुक्षेत्रादि देशान् स्पृशन्. सूत्रं मेरुगतं बुधैर्निगदिता सा मध्यरेषा भुवः' या श्लोकावरूनही मेरू हिमालयाचें शिखर असावें असें दिसतें. ४. सांबशिवाचें वाहन. नंदिकेश्वर हा सुरभीचा आवडता पुत्र असून शिवगणांपैकीं एक आहे. इंद्राच्या ऐरावताच्या तोडीचा हा बलवान आहे. दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा वीरभद्रानें विध्वंस केला तेव्हां नंदिकेश्वरानें भग नामक ऋत्विजास बद्ध केलें होतें. शैवांत वसवमतानुयायी जे लोक आहेत ते या नंदिकेश्वराची फार भक्ति करीत असतात. कारण त्यांची अशी समजूत आहे कीं, बसव म्हणून जो त्यांचा पंथस्थापक होऊन गेला तो नंदिकेश्वराचा अवतार होय.

१. रात्रीं फिरणारा राक्षस. २. 'करितां युद्ध' असा अन्य पाठ. ३. कोठेंही झाड नाहीं असें. ४. प्रचंड. ५. दगड. ६. दोन कोस उंच. ७. पर्वतशिखरें. ८. 'सरलिया पिट्टनी आंगें' असाही पाठ आहे. ९. राज्याकरितां, व पत्नीकरितां. १०. किष्किंधेचा राजा ऋक्षराजा याचे वाली आणि सुग्रीव असे दोन पुत्र. बापाच्या मरणानंतर ज्येष्ठ पुत्र वाली हा गादीवर बसला. सुग्रीव हा वालीच्या आज्ञेंत नेहमी तत्पर असे. अशा रीतीनें दोघे भाऊ एकमेकांवर प्रेम करीत होते. वाली मोठा प्रतापी असल्यामुळें एकदां एका मायावी नामक राक्षसाशीं युद्ध करीत तो एका गुहेंत शिरला. त्या गुहेंतून तो पुष्कळ दिवसपर्यंत बाहेर न आल्यामुळें वाली आंतच मृत झाला असें समजून सुग्रीव गादीवर बसला. कांहीं दिवसांनीं वाली गुहेंतून बाहेर आला व सुग्रीवाला राज्य करतांना पाहून त्यास अनिवार कोप आला. त्या कोपांत वाली सुग्रीवावर धांवून गेला; तेव्हां उभयतांचें घोर युद्ध जाहलें. येथें याच युद्धाचा उल्लेख आहे. या युद्धांत सुग्रीवाचा पराभव झाला. पुढें सुग्रीवाचा मित्र श्रीराम याच्या हातून वाली मरण पावला. [रामायणें भाग १—मंत्ररामायण—किष्किंधाकांड—गीति ३१-७१.] ११. द्वंद्वयुद्धाला. १२. लाथा बुक्क्या. १३. प्रहार. १४. ठोंसा. १५. थापटी. १६. चडक, चडकण, चडकणी=चपेट, चापटी, थपाटी.

भाविती. ॥ ९४ ॥ [1]मर्मस्थळीं लाविती [2]कळे । [3]ग्रीवा पिळिती हस्तबळें । [4]थापा हाणोनी 'डोळे । [5]फोडूं' म्हणती बळिष्ठ. ॥ ९५ ॥ [6]हस्तपाद [7]कवळूनियां चरणीं । उसळोनी सांडिती [8]ऊर्ध्व गगनीं । उडी घालोनियां [9]मूर्ध्नी । फोडावया तळपती. ॥ ९६ ॥ न [10]लेखिती येर येर । [11]माजले [12]व्याघ्र [13]काळकुंजर । [14]आरण्यरोही वृषभ थोर । [15]फुंफाटती अतिरागें. ॥ ९७ ॥ [16]कामिनीकटाक्षांचे बाण ।

---

१. ज्या ठिकाणीं मारल्यास मनुष्याच्या जीवाला विशेष धक्का पोहोंचण्याचा संभव आहे तें मानवशरीरांतील ठिकाण. उदाहरणार्थः—छाती, मान इत्यादि. अशी समजूत आहे कीं पूर्वयुगांत प्रत्येक मनुष्याला (व कधीं कधीं इतर प्राण्यांनाही) एकच मर्मस्थान असे; व त्या मर्मस्थानाला जोंपर्यंत धक्का पोहोंचला नाहीं तोंपर्यंत तो मनुष्य कांहीं केल्यानेंही मरत नसे. सीताहरणसमयीं रावणाची व जटायूचीं जेव्हां गांठ पडली व जेव्हां त्या दोघांची लढाई झाली तेव्हां जटायूपुढें रावणाचें कांहीं चालेना. तेव्हां रावणानें जटायूजवळून त्याचें मर्मस्थान युक्तीनें काढून घेतलें व नंतर जटायूचा पराभव केला. कित्येक पुरुषांचें मर्मस्थान त्यांच्या शरीरांत नसून त्यांच्या शरीरांहून भिन्न अशा एखाद्या वस्तूंत असल्याचेंही ऐकण्यांत येतें. कोणा एका राजपुत्राचें मर्मस्थान द्वीपांतरांत जपून ठेवलेल्या राजहंसपक्ष्याच्या ठिकाणीं होतें. म्हणजे या पक्ष्याच्या मरणावर राजपुत्राचें मरण अवलंबून होतें. २. कळ=तीक्ष्ण क्लेश, असह्य वेदना, तिडीक. ३. 'करिवा' असाही पाठ आहे, 'करिवा' असा शब्द मराठी भाषेंत कोठेंही दिसत नाहीं. 'करवा' असा शब्द आहे. 'करवा म्हणजे तोंडांत घालून चावण्यास योग्य केलेला ऊंस. तेव्हां येथें 'करिवा' बद्दल 'करवा' असें घेऊन अर्थ केल्यास असा अर्थ होतो कीं 'करवा' तोंडांत घालून ज्याप्रमाणें खूब पिळतात त्याचप्रमाणें तें एकमेकांच्या शरीरांला पिळून काढूं लागले. 'ग्रीवास्थळीं चेंपिती बळें' असाही पाठ आहे. ४. थापा=थापट्या, चपाट्या. ५. 'फोडूं' असाही अन्य पाठ आहे. ६. हातपाय. ७. एकेठिकाणीं आणून. शत्रूचे हात आणि पाय एके ठिकाणीं आणून, शत्रूचें शरीर गोळ्याप्रमाणें बनवून लाथेनें वर उडवीत असत. ८. वर. ९. कपाळ. १०. एकमेकांच्या शक्तीची पर्वा करीत नव्हते. म्हणजे आपला शत्रु फार शूर आहे असें पाहून घाबरून जात नव्हते; उलट शत्रुसंहरणार्थ आपलें शौर्य दाखवीतच होते. ११. उन्मत्त झालेले. १२. 'जैसे' असा अन्य पाठ. १३. काळकुंजर=मृत्यूप्रमाणें फारच भयंकर दिसणारे हत्ती. १४. आरण्यरोही=वनांत वाढलेले. रोह म्हणजे वाढ. अरण्यांत वाढणारे बैल स्वेच्छाचारी असल्यामुळें फारच मदोन्मत्त असतात. १५. डुरक्या फोडिती, बैल फार क्रोधासक्त झाले म्हणजे जो एक प्रकारचा शब्द करतात तो. १६. स्त्रियांचें सौंदर्य, प्रेम इत्यादि हेच पुरुषाचें मन जिंकण्यास स्त्रियांजवळ असलेले बाण होत; अशी कवींची एक कल्पना आहे. कोणत्याही पुरुषाला वश करावयाचें असेल तर स्त्रिया या कल्पित पण प्रबलतम शस्त्रांचा उपयोग करितात; व या अस्त्रांच्या साहाय्यानें त्या अनेक प्रसंगीं पुरुषांना आपले दास बनवितात.

विरक्ता[1]आंगीं तृणप्रमाण[2]। तेंचि[3] असुराचें[4] ताडण। भीमाआंगीं नोढळे[5]. ॥ ५८॥ धर्मनिरूपणाचे शब्द। अनाचारिया हृदयभेद। तेंवी भीमप्रहारें खेद। असुर पावे आगळा. ॥ ५९॥ पशु ओढिजे[6] गळबंधनीं[7]। तेंवी दोर्दंड[8] उचलुनी ग्रीवास्थानीं[9]। कवळूनी[10] आंसुडितां[11] चरणीं। शैलपाडें[12] पडियेला. ॥ ६०॥ म्हणे[13] 'मी अंतींचा[14] सांगाती[15]। प्राण ठेवणें माझ्या हातीं। पडोनी उपडा या क्षिती। कदा नुठीं[16] मागुता'. ॥ ६१॥ लात वोपूनी[17] हृदयीं। ग्रीवा रागें रगडिली पायीं। किर्मीरातें तये समयीं। मृत्यु भेटों पातला. ॥ ६२॥ लत्ताप्रहारें कपाळमोक्षू[18]। शुभ्रवर्ण[19] आंतले[20] चक्षू। कडकडाटें उलथे वृक्षु। तेंवी गर्जो[21]नियां पाडिला. ॥ ६३॥ मुख पसरिलें विक्राळ। जिव्हा लवथवित[22] विशाळ। वमित[23] रुधिराचे कल्लोळ[24]। प्रेतदशा[25] पातली. ॥ ६४॥ भूमि त्रांहाटुनी[26] बळि[27]-

१. ज्याला इहलोकाच्या वस्तूंसंबंधीं वासना राहिली नाहीं असा ईशभक्त पुरुष. आपण केलेल्या सत्कृत्यांबद्दल फलाची इच्छा न करितां आपण केलेलीं कृत्यें ईश्वरार्पण करीत सदाचरणानें वागणाऱ्या पुरुषालाही 'विरक्त' असें म्हणतात. सुखदुःख, लाभालाभ, जयापजय, शत्रुमित्र या सर्वांना समान मानणाऱ्या पुरुषालाहीं 'विरक्त' अशी संज्ञा आहे. २. गवताप्रमाणें. कामिनीकटाक्ष इतर लोकांना बाणाप्रमाणें जरी त्रास देतात तरी ते विरक्त लोकांना मुळींच बाधत नाहींत—असा अर्थ. शुकमहर्षी व रंभा यांच्याविषयींचें आख्यान या म्हणण्याचें उदाहरण आहे. ३. तेंचि=त्याचप्रमाणें. येथें हा शब्द 'तेंवि' या अर्थीं योजलेला आहे. ४. किर्मीरराक्षसाचें. ५. न लागे, पीडा न देई. ६. 'वेष्टित' असा अन्य पाठ आहे. ७. गळ्यांत दोरी बांधून; पशूला ओढावयाचें असेल तर त्याच्या गळ्याला बांधून त्या दोरीनें तो पशू ओढून नेतात हें सुप्रसिद्धच आहे. ८. बाहुदंड. ९. मान. १०. घट्ट धरून. ११. ओढतां, हिसका दिल्या कारणानें. १२. पर्वतासारखा. १३. हें भीमाचें भाषण आहे. १४. मृत्युदेवाचा, यमाचा. १५. सोबती. १६. उठूं नकोस. [न+उठीं=नुठीं. 'न'मधल्या 'अ'काराचा लोप अथवा परसवर्ण झाला. अशा रीतीनें 'न'मधला 'अ' नाहींसा झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतात. उ० न+उरे=नुरे; न+असे=नसे इ०.] १७. मारूनी. १८. डोकें फोडून टाकणें, कपाळमोक्ष होऊन कपाळांतून ज्याचे प्राण जातात तो फार पुण्यवान् अशी समजूत आहे. परंतु मृत्युसमयीं किर्मीराचें डोकें आपोआप फुटलें नाहीं, तें भीमानें फोडलें. म्हणून वरच्या समजुतीप्रमाणें किर्मीर पुण्यवान् होता असें म्हणतां येत नाहीं. १९. पांढऱ्या रंगाचे. डोळे पांढरे करणें हें मृत्यूचें एक लक्षण आहे. २०. 'आतळले' असाही पाठ आहे. २१. प्रचंड शब्द करून. २२. लवलवीत, मृदुपण पाहण्यास असह्य. २३. ओकून. २४. लाट. २५. 'प्रेतदशा' व 'प्रेतकळा' हे समानार्थक नाहींत. यांत भेद आहे. 'प्रेतदशा' प्राप्त होणें म्हणजे मरून प्रेत बनणें, व एकादा मनुष्य फारच अशक्त झाला म्हणजे त्यावर 'प्रेतकळा' आली असें म्हणतात. २६. आपटून. २७. भीम.

वंत । म्हणे, '[1]बकाचे अश्रुपात । यमलोका जाउनी त्वरित । आपले हस्तीं [2]परिमार्जीं.' ॥ ६५ ॥ [3]निर्जरीं पिटोनि [4]टाळी । माथां [5]वोपिली पुष्पांजळी । [6]म्हणती, 'भीमा! [7]आतुर्बळी । होईं जयवंत सर्वदा. ॥ ६६ ॥ जे जे पांडवांचे वैरी । मदोन्मत्त, दुराचारी । ते ते वधूनी आपुले करीं । [8]कौतुक दावीं आमुतें.' ॥ ६७ ॥ [9]यापरी किर्मीराचें हनन । करुनी, विजयी भीमसेन । [10]ऐकोनी धृतराष्टाचें मन । अति [11]उद्विग्न [12]पुत्रार्थी. ॥ ६८ ॥ [13]विवेकविचारचक्षुहीन । पुत्र-

---

१. किर्मीरवधापूर्वीच भीमानें बकाला मारिलें होतें. तेव्हां तो अगोदरच जाऊन यमसदनीं आपण भीमाच्या हातून पराजित झालों म्हणून रडत बसला असें मनांत आणून सध्यां मरून पडलेल्या किर्मीराला भीम म्हणतो कीं, 'तूं जाऊन आपल्या भावाचे नेत्राश्रु पुसून टाक.' युद्ध सुरू होण्याच्या पूर्वी पांडवांना किर्मीर म्हणाला होता कीं, 'तुमच्या रक्तानें मी आपल्या मृत भावाला (बकासुराला) तर्पण देईन.' हें किर्मीराचें म्हणणें लक्षांत आणून आतां भीम त्या म्हणण्याबद्दल त्या (मृत) किर्मीराला चिडवितो. २. पुसून टाक. ३. निः+जरीं=ज्यांना जरा (वार्धक्य) नाहीं ते निर्जर, देव त्यांनीं. ४. टाळी पिटणें परमानंदाचें लक्षण आहे. कोणताही मनोविकार फार प्रबल झाला म्हणजे तो कोणत्या ना कोणत्या प्रकारानें बाहेर येतो. ५. अर्पिली. ६. पांडवांबरोबर असलेले ब्राह्मण म्हणती असें समजावें. ७. अतुल बलवान्. ८. 'युद्धस्य कथा रम्या' या न्यायानें स्वतःवर युद्ध करण्याचा प्रसंग न येतां युद्ध पाहिल्यास व युद्धाच्या गोष्टी ऐकल्यास 'कौतुक' कां वाटणार नाहीं? परंतु हें वाक्य आशीर्वादरूपक असल्यामुळें त्याचा हास्यरसोत्पादक अर्थ करूं नये; वात्सल्यामुळें असा आशिर्वाद दिला असें समजावें. कौतुक—कुतूहल. ['**कौतुकं** नर्मणीच्छायामुत्सवे कुतुके मुदि । पारंपर्यागतख्यातमङ्गलोद्वाहसूत्रयोः ॥' इति हैमः; '**कौतुकं** त्वभिलाषः स्यादुत्सवे इति नर्महर्षयोः। कुतूहले हि तत्प्रोक्तम्' इति मेदिनीकारः; '**कौतुकं** मङ्गले हर्षे हस्तसूत्रे कुतूहले' इति शाश्वतः.] ९. याप्रमाणें. १०. किर्मीरवधाची गोष्ट ऐकून. ११. दुःखी. १२. अर्थयतीति अर्थी=इच्छा करणारा. पुत्रस्य अर्थी पुत्रार्थी=पुत्राची इच्छा करणारा. हा शब्द संतति नसल्यामुळें पुत्रप्राप्तीकरितां नेहमीं प्रयत्न करणाऱ्या पुरुषाला लावितात. परंतु हा शब्द येथें सुताभिलाषी या अर्थानें घेतां येत नाहीं. कारण धृतराष्ट्राला शंभर पुत्र होते. तेव्हां धृतराष्ट्र पुत्रप्राप्तीची इच्छा करीत होता असें मानितां येत नाहीं. म्हणून येथें पुत्रार्थी म्हणजे पुत्रांचें हित इच्छिणारा असा अर्थ (जरी तो प्रचारांत नाहीं तरी) घेतला पाहिजे. १३. हें धृतराष्ट्राचें विशेषण. हें ओवीचें प्रथम चरण एक पद आहे. धृतराष्ट्र कर्मचक्षु व ज्ञानचक्षु या दोहोंलाही मुकला होता हें या पदानें सुचविलें आहे. पदाचा अर्थः—विवेक (चांगला मार्ग कोणता व वाईट मार्ग कोणता हें जाणण्याची शक्ति), विचार (चांगला मार्ग कोणता व वाईट मार्ग कोणता हें जाणण्याविषयीं करावयाची मानसक्रिया), चक्षु (डोळे) या तिहींनीं हीन म्हणजे विरहित. धृतराष्ट्राला प्रज्ञाचक्षू असें एक नांव आहे; परंतु या विशेषणानें त्याचें प्रज्ञाचक्षुत्व नष्ट झालें असें दर्शविलें आहे.

मोहाचें तम[1] दारुण[2] । निरसोनी[3] आत्महिताचरण[4] । चिंतागर्ते[5] पडियेला. ॥६९॥ 'हिडिंब किर्मीर दैत्यु[6] । ज्याचेनि[7] हस्तें पावले मृत्यु । त्याशीं विरोध करोनी सुतु । केंवी क्षेम[8] वांचती? ॥ ७० ॥ महा अनर्थ दिसे पुढां.' । परम चिंतेच्या सांकडा[9] । प्रज्ञाचक्षु[10] होउनी वेडा । मरणांत[11] पडियेला. ॥ ७१ ॥ असो. कौरवीं[12] हिरोनी राज्य । वना दवडिला[13] धर्मराज, । हें वर्तमान अधोक्षज[14] ।

---

१. तम=अज्ञान, मोहपाश. 'तमांसि गुणतिमिरसैंहिकेयाः' इति त्रिकांडशेषः. २. दारुण=भयंकर ज्याचा परिणाम फार भयंकर होईल असा. ३. सोडून. ४. स्वतःचें हित होईल असें वर्तन. पांडवांशीं वैर करण्याचें सोडून त्यांना त्यांचें राज्य देणें. कवि सुचवितात कीं पांडवांशीं सख्य करण्यांतच धृतराष्ट्राचें खरें हित होतें. परंतु तसें न केल्यामुळें धृतराष्ट्र चितारूपी खळग्यांत पडला. ५. खळगा. धृतराष्ट्र चक्षुहीन असल्यामुळें त्याच्या चिंतेला गर्तेची जी उपमा दिली आहे ती अगदीं योग्य आहे. ६. दैत्य आणि राक्षस हे एक नव्हेत. दैत्य हे कश्यप ऋषीला दितीपासून झालेले पुत्र व त्यांचे वंशज. हे देवांचे सावत्र बंधु होत. उदाहरणार्थः—हिरण्याक्ष, बलि, इ०. देवांत व दैत्यांत नेहमीं वैरभाव असे. राक्षस म्हणजे रात्रीं हिंडणारे व नरमांस भक्षणारे प्राणिविशेष. अमरकोशांत म्हटलें आहेः— 'असुरा दैत्यदैतेयदनुजेंद्रारिदानवाः । शुक्रशिष्या दितिसुताः पूर्वदेवाः सुरद्विषः ॥' [प्रथमकांड स्वर्गवर्ग—श्लो० १२.] 'राक्षसः कौणपः ऋव्यात् क्रव्यादोऽस्रप आशरः ॥ ६२ ॥ रात्रिचरो रात्रिचरः कर्बुरो निकषात्मजः । यातुधानः पुण्यजनो नैर्ऋतो यातुरक्षसी ॥ ६३ ॥' [प्र०कांड स्वर्गवर्ग.] यावरून स्पष्ट दिसून येईल कीं दैत्य आणि राक्षस हे अगदीं भिन्न आहेत. किर्मीर आणि हिडंब हे दैत्य नव्हते, राक्षस होते. तेव्हां त्यांना येथें 'दैत्यु' म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. ७. ज्या भीमाच्या. ८. सुखानें, कोणत्याही प्रकारची हानि न पावतां. ९. संकट. १०.धृतराष्ट्र. धृतराष्ट्र अंध असून, बुद्धीनें सर्व विषय जाणणारा होता म्हणून त्यास 'प्रज्ञाचक्षू' असें नांव असे. ११. मरणांत म्हणजे मरणप्राय दुःखांत असें समजावें. १२. कौरवांनीं. 'कौरव' शब्दाची तृतीया. १३. पाठविला. १४. श्रीकृष्ण. 'अधोक्षज' हा समास तीन तऱ्हेनें सोडवितां येतोः—(१) अधः कृतं अक्षजं ऐंद्रियकं ज्ञानं येन सोऽधोक्षजः ॥ म्हणजे जो इंद्रियांच्या साहाय्याशिवाय सर्व क्रिया करूं शकतो (कान नसून ऐकूं शकतो, डोळे नसून पाहूं शकतो, पाय नसून चालूं शकतो इ०) तो अधोक्षज=विष्णु किंवा कृष्ण. (२) अधोक्षाणां जितेंद्रियाणां जायते प्रत्यक्षो भवति सोऽधोक्षजः ॥ म्हणजे जो जितेंद्रिय लोकांना दर्शन देतो तो अधोक्षज=विष्णु किंवा श्रीकृष्ण. (३) अधोक्षजं ज्ञानं यस्य सोऽधोक्षजः ॥ म्हणजे ज्याचें ज्ञान इंद्रियविरहित आहे तो अधोक्षज. पहिला विग्रह व दुसरा विग्रह हे बहुतेक समानार्थकच आहेत. वरील विग्रहांवरून अधोक्षज हें नांव कोणत्याही देवाला लावतां येईल असें दिसून येईल. परंतु हें नांव फक्त कृष्णालाच लावित असतातः—'वनमाली बलिध्वंसी कंसारातिरधोक्षजः ॥' [अमरकोश—स्वर्गवर्ग—श्लो० २१ उत्तरार्ध.]

ऐकता झाला द्वारके[1]. ॥ ७२ ॥ सत्वर संजोगुनी[2] रथ । वृष्णी[3] अंधक[4] सुहृदां[5]सहित । वना पातला कृष्णनाथ । धर्मराजाजवळिकें. ॥ ७३ ॥ द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न । क्लेश भगिनीचे[6] ऐकोन । तोही पातला समाधान । करावया धर्माचें. ॥ ७४ ॥ धृष्टकेतु[7] चैद्यपाळ[8] । कैकयराजा[9] अतिस्नेहाळ । परिसोनियां क्लेशकाळ । येते झाले जवळिकें. ॥ ७५ ॥ अवघे पातले काम्यकवना । जंव अवलोकिलें कुरुनंदना; । अवस्था देखोनी नयना । अश्रुपात सकळांतें.॥७६॥

---

१. द्वारकानगरी. द्वारका ही आनर्त देशाची (छप्पन्न देशांपैकीं सौराष्ट्र देश व सध्यांचा काठेवाडकडचा प्रांत) राजधानी. हिला आनर्त नगरी व अब्धिनगरी असेंही म्हणतात. याच नगरीला कुशस्थली असें आणखी एक नांव आहे. ही राजधानी बारा योजनें विस्तीर्ण असून फारच सुशोभित होती असें भागवताच्या दशम स्कंधांत सांगितलें आहे. प्रथम कृष्ण व बलिराम हे यादवांसह मथुरेस राहत होते. परंतु जेव्हां कालयवनानें मथुरेस वेढा दिला व जरासंधही मथुरेवर स्वारी करण्यास उद्युक्त झाला, तेव्हां श्रीकृष्णानें मथुरेंतील सर्व लोकांस पशुधनादिकांसहवर्तमान विश्वकर्म्याच्या हातून द्वारकेंत नेऊन ठेवविलें. तेव्हांपासून सर्व मंडळी द्वारकेसच राहूं लागली. इतर नगरांप्रमाणें द्वारकाही अगोदर भूमीवर होती; परंतु जेव्हां त्या नगरीला शत्रूकडून वारंवार फार त्रास होऊं लागला तेव्हां कृष्णानें विश्वकर्म्याकडून ही नगरी जमिनीवरून काढवून समुद्रांत बांधविली. कृष्ण निजधामास गेल्यावर सात दिवसांनीं ही समुद्रांत बुडाली. जुनी द्वारका हल्लींच्या द्वारकेच्या आग्नेय दिशेस सुमारें शंभर मैलांवर होती असें विद्वानांचें म्हणणें आहे. रैवतक पर्वताजवळ द्वारका होती अशीही माहिति मिळते. रैवतक पर्वत म्हणजे जुनागडाजवळ असलेली गिरनार टेंकडी असावी असा विद्वानांनीं शोध लाविला आहे. तेव्हां जुनी द्वारकानगरी जुनागडजवळच कोठें होती असें दिसतें. सध्यांची द्वारका गुजराथेंत पश्चिम समुद्राच्या कांठीं आहे. हिचे उत्तर-अक्षांश सुमारें २२० व पूर्वरेखांश ६९० आहेत. ज्यांना द्वारकेचें सुंदर वर्णन वाचावयाचें असेल त्यांनीं 'शिशुपालवध' नामक माघकवीचें काव्य वाचावें. २. तयार करून. ३. यादव. यदुकुलांत वृष्णि नामक चारपांच प्रख्यात पुरुष होऊन गेले. यांच्या संततीलाही वृष्णि असें नांव असे. ४. यदुकुळांत अंधक नांवाचे दोघे राजे झाले. (१) यदुकुलोत्पन्न सात्वत नामक राजाच्या सात पुत्रांपैकीं सहावा. (२) वरील अंधकाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या अनु नामक राजाचा पुत्र. या अंधकांच्या वंशजांनाही अंधक अशी संज्ञा होती. हें अंधकांचें घराणें यदुवंशांत फार प्रख्यात होतें. ५. आप्तांसह. ६. द्रौपदीचे. ७. हा चेदिकुलोत्पन्न असून चेदिदेशावर राज्य करीत होता. याची राजधानी शुक्तिमती नामक नगरी होती. यानें करेणुमती नामक आपली बहीण माद्रीपुत्र नकुल यास दिली होती. याच्या रथाचे घोडे सारंग्या रंगाचे होते. भारती युद्धांत हा द्रोणाचार्यांच्या हातून मृत झाला. ८. चेद देशाला पाळणारा. हे धृष्टकेतूचेंच विशेषण आहे. ९. केकय देशाचा राजा.

कवळुनियां[1] श्रीकृष्णपाय । मोहें[2] द्रौपदी मोकली[3] धाय, । श्रीकृष्ण म्हणे, 'स्वस्थ[4] माये[5]! । सर्व ठाउकें मज झालें. ॥७७॥ कर्ण, शकुनी, दुःशासन, । चौथा कपटी दुर्योधन । या चौघांचें रक्तप्राशन[6] । पृथ्वी[7] करील निर्धारें. ॥ ७८ ॥ करीन कौरवांचा क्षयो । तरीच श्रीकृष्ण देवकीतनयो; । खेद संतापाचा वायो[8] । झगटों नेदीं मानसा.'॥७९॥ पांचाळ[9] म्हणे, 'यादवेश्वरा[10]! । आज्ञा करीं मज किंकरा[11], । कौरव मारूनी धरेभारा[12] । मी फेडीन स्वहस्तें.

१. मिठी घालून. २. दुःखामुळें. ३. सद्गदित होऊन रडूं लागली, मोठ्यानें गळा काढून दुःख करूं लागली. ४. रडूं नकोस, आक्रोश करण्याचें कारण नाहीं—असा भावार्थ. याच अर्थाची मोरोपंताची गीतिः—'ऐसें वदोनि रडतां कृष्ण म्हणे, 'अंब! तूं नकोचि रडों। कळवळतें मन्मन सखि! या शोकाचळभरें नको चिरडों. ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० १६ आर्या २२.] ५. आई, अंब. 'राजपत्नी गुरोः पत्नी मित्रपत्नी तथा सती । पत्नीमाता स्वमाता च सर्वास्ता मातरः स्मृताः ॥' ह्या स्मृतिवचनाप्रमाणें द्रौपदीला कृष्णानें 'माये' असें संबोखिलें तें ठीकच, कारण कृष्णाचे मित्र जे पांडव त्यांची ती बायको होती. ६. सहनशीलतेविषयीं पृथ्वी विख्यात आहे. असें असूनही पृथ्वी त्या चौघांचें रक्त प्राशन करील असें कृष्ण म्हणतो. असें म्हणण्यांत, ते चौघे फारच दुष्ट (सहनशील पृथ्वीलाही राग येईल असें कृत्य केल्यामुळें) आहेत असें दाखविण्याचा कृष्णाचा उद्देश दिसतो. 'रक्त प्राशन पृथ्वी करील' याचा अर्थ त्यांच्या अंगांतलें रक्त पृथ्वीवर पडेल म्हणजे शत्रूंच्या शस्त्रघातानें ते मरतील असा घेतला तरी चालेल. ७. मोरोपंतानें हाच अर्थ (माझें म्हणणें खोटें होणार नाहीं असा) दुसऱ्या रीतीनें व्यक्त केला आहे:—'झालें कधींच न मृषा, होईल मदुक्त काय हो! लटिकें? ॥ २५ ॥ होइल मद्वच न मृषा, केव्हांतरि वारिराशि आटेल, । ग्रहगण गळेल, हिमगिरिराज खचेल, क्षितीहि फाटेल ॥ २६ ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—महाभारत—वनपर्व—अध्याय २, पृष्ठ १७]. मुक्तेश्वराच्या व मोरोपंताच्या वर्णनांत हा भेद दिसून येतो कीं मुक्तेश्वराचें लक्ष नेहमीं अर्थाकडे असतें व सर्व अर्थ थोडक्यांत आणण्याची या कवीला एक संवयच आहे असें म्हटलें तरी चालेल. मोरोपंतांचें लक्ष अर्थाकडे असूनही आपलें वर्णन विशेष खुबीदार कसें होईल याकडे नेहमीं असतें. ८. खेद आणि संताप यांना वायूची (झंझावाताची) उपमा दिली आहे; तेव्हां मनाला वृक्षाची उपमा दिली पाहिजे होती. ही उपमा अध्याहृत आहे असें समजावें. ज्याप्रमाणें वायू वृक्षांना त्रास देतो तसा खेदसंतापरूपी वायूपासून मानसरूपी वृक्षाला त्रास करून घेऊं नकोस—असा भावार्थ. ९. पांचाल देशाचा राजा धृष्टद्युम्न. १०. कृष्णा! ११. किंकर म्हणजे कनिष्ठ प्रकारचा सेवक, ज्या सेवकास मालकाच्या आज्ञेबाहेर चकारशब्दही बोलतां येत नाहीं तो. 'सेवकः किंकरोऽधमः' आपण किंकर आहों असें म्हणून धृष्टद्युम्नानें आपला विनय दाखविला. किं करोमि कुर्यात् वा इति स्वामिनं पृच्छति इति किंकरः । अथवा कुत्सितं करोति इति. 'काय करूं महाराज' असें विचारणारा सेवादक्ष चाकर याला किंकर

॥ ८० ॥ नेमस्त[1] वधीन मी द्रोणातें, । शिखंडी[2] वधील भीष्मातें, । अर्जुन निवटिल कर्णातें, । सौबळातें[3] सहदेव. ॥ ८१ ॥ एक शत धृतराष्ट्राचे कुमर । एकला वधील वृकोदर । आज्ञा देईल रुक्मिणीवर[5] । तरी आतांची उठावें.' ॥ ८२ ॥ अर्जुन म्हणे, 'जगजेठी[6]! । तुझी कृपा आमुचे गांठी । असतां कौरवांच्या कोटी । तृणप्राय आमुतें. ॥ ८३ ॥ शपथे[7] गुंतला धर्मराजा, । यालागीं[8] नचले आमुचा काजा[9] । द्रौपदी गांजिली हे लज्जा[10] । क्षत्र[11]-

म्हणावें. किंवा जो काम नीट करीत नाहीं, कारण चाकरच तो, म्हणूनही त्याला किंकर म्हणावें. १२. पृथ्वीवरचा भार. दुष्ट पुरुषांचा भार पृथ्वीला सहन होत नाहीं अशी समजूत आहे.

१. न चुकतां. द्रोणाचार्यांनीं द्रुपदाचा अपमान केला होता या अपमानाबद्दल सूड उगविण्याकरितां द्रुपदानें तपश्चर्या केली व अग्नीच्या कुंडांतून द्रोणाला मारणारा धृष्टद्युम्न पुत्र मिळविला. अशा रीतीनें धृष्टद्युम्नाचें जन्म द्रोणवधाकरितांच मुद्दाम झाल्यामुळें मी खातरीनें द्रोणाला मारीन असें धृष्टद्युम्न म्हणतो. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वरकृत महाभारत आदिपर्व अध्याय ३२ पहा]. २. द्रोणवधाकरितां जसा धृष्टद्युम्न जन्मला होता तसा भीष्मवधाकरितां शिखंडी जन्मला होता. [शिखंडीविषयीं अधिक माहिती पाहिजे असल्यास महाभारत—उद्योगपर्व—अ० १६५-१९२ पहा.] ३. शकुनी. 'सुबलस्यापत्यं पुमान् सौबल:.' ४. या ओवीशीं समानार्थक पंतांची आर्या:—'द्रोणाशि मी शिखंडी भीष्माशि वधील, काय हें खोटें?। ...............॥ ३० ॥ मारावा दुर्योधन भीमें पार्थेंहि कर्ण, हा नियम। न चुकेल, जसा न चुके निमिषहि करितां प्रजासुहानि यम ॥ ३१ ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—महाभारत—वनपर्व—अध्याय २, पृष्ठ १७.] ५. रुक्मिणीचा पति. रुक्मिणी ही विदर्भाधिपति भीमक याची लक्ष्मीच्या अंशांनीं जन्मलेली कन्या. हिची प्रीति लहानपणींच कृष्णावर बसली होती व हिच्या आईबापांच्याही मनांत हिला कृष्णालाच द्यावयाचें होतें. परंतु हिचा ज्येष्ठ बंधु रुक्मी हा कृष्णाचा द्वेष्टा असल्यामुळें त्यानें हिला आपला मित्र शिशुपाल यास देण्याचें ठरविलें व लग्नाचीही तयारी केली. परंतु रुक्मिणीनें, आपल्यास लौकर नेण्याविषयीं, कृष्णाला गुप्त बातमी पाठविली. कृष्णानें बलरामासह येऊन रुक्मिणीचें हरण केलें व तिच्या हरणसमयीं आड आलेल्या राजांचा वध व मानभंग केला. याच कथानकावर तेलंगी भाषेंत 'रुक्मिणीकल्याण' [कल्याण=लग्न] नामक सुंदर काव्य आहे. याच कथानकावर मराठींत विठ्ठल, एकनाथ, व जयरामस्वामी यांनीं काव्यें केलीं आहेत. 'रुक्मिणीपरिणय' नामक एक काव्य संस्कृतांतही आहे. ६. जगजेठी=जगज्ज्येष्ठ, जगामध्यें मोठा=श्रीकृष्ण. ७. बारा वर्षें अरण्यवास व एक वर्ष अज्ञातवास करूं अशी शपथ. ८. या कारणामुळें, धर्म शपथेंत गुंतला यास्तव. ९. कार्य, काम, शत्रुहनन करून राज्य मिळविण्याचें काम. १०. फारच निंद्य गोष्ट. ११. क्षत्रियांचा जो धर्म त्याच्या अनुरोधानें विचार केल्यास.

धर्मी आमुचिया.' ॥ ८४ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'धर्ममूर्ति ! ।[1]शाल्वें वेढिली द्वारावती, । त्यास्तव संग्रामाच्या गुंतीं । मी गुंतलों [2]नावेक. ॥ ८५ ॥ तुमचा वृत्तांत ध्यावया देख । आळस झाला [3]कांहींयेक, । इतुक्यामाजी हें कौतुक । परम वैरीं दाखविलें. ॥ ८६ ॥ मी [4]स्वभावें असतों [5]तेथें । तरी करूं ने[6]दितों कपटद्यूतातें, । पाडुनी सौबळाचे दांतांतें । [7]कूटपाश भंगितों. ॥ ८७ ॥ बोलों नेदितों [8]पैजेतें, । पाहों नेदितों द्रौपदीतें, । धर्मराज वनवासातें । निघे ऐसें न घडतें. ॥ ८८ ॥ गुंतलों शाल्वाचिये युद्धीं । तंव [9]दुर्जनां फावली संधी. । असो. याचें उसणें युद्धीं । [10]निस्तरीन निर्धारें.' ॥८९॥ इति श्रीभारत **वनपर्वणि** । पुढां परिसिजे [11]विचक्षणीं । मुक्तेश्वरकवीची वाणी । [12]व्यासाश्रयें [13]चामके. ॥ ९० ॥ इति **अरण्यपर्व** भारत । मुक्तेश्वरकविविरचित । श्रोतीं देऊनी चित्त । परिसिलें पाहिजे. ॥ ९१ ॥

---

१. हा शाल्वदेशीय राजा असून कृष्णाच्या हातून मृत झालेल्या शिशुपाळाचा धाकटा भाऊ होता. हा रुक्मिणीहरणसमयीं यादवांच्या हातून पराजित झाला होता. तेव्हांपासून हा कृष्णाचा द्वेष करूं लागला. पुढें जेव्हां कृष्णानें शिशुपालास मारिलें तेव्हां तर हा फारच खवळला. जगांतून सर्व यादवांना नाहींसे करण्याचा निश्चय करून घोर तपश्चर्या केली व रुद्राला प्रसन्न करून त्याजजवळून मयासुरनिर्मित विमान मागून घेतलें. त्यावर बसून यानें आकाशांतून द्वारकेवर वृक्षशिलादिकांची वृष्टी केली. कृष्ण व बळिराम हे तेथें नसतांना यानें द्वारकेच्या लोकांना फार त्रास दिला. पुढें कृष्णाचें व याचें घोर युद्ध झालें त्यांत हा कृष्णाच्या हातून मृत झाला. [महाभारत—वनपर्व—अध्याय १४-२२; व भागवत—स्कंध १० अ० ७६-७७ पहा. काव्यसंग्रहग्रंथमाला—कृष्णविजय—उत्तरार्ध—पृष्ठ १९२-२०१.] २. क्षणभर. ३. थोडासा, कांहींसा. ४. स्वतः. ५. द्यूतखेलनाच्या जागीं, हस्तिनापुरांत. ६. करूं नेदितों—(मी) करूं दिला नसता, खेळण्याचा प्रसंगच येऊं दिला नसता. ७. कपटाचे फांसे, कपटरूपी पाश. ज्या कपटद्यूतरूपी बंधनांच्या योगानें पांडव बद्ध झाले तीं कपटद्यूतबंधनें तोडून टाकिलीं असतीं—असा भावार्थ. द्यूतच खेळूं दिलें नसतें हा सरलार्थ. ८. धर्मानें अगोदर आपल्या सर्व राज्याची पैज लाविली, नंतर चार भावांसह आपलीच पैज लाविली; भावांसह जेव्हां पैजेंत धर्माला दुर्योधनानें जिंकिलें तेव्हां धर्मानें द्रौपदीची पैज लाविली. ९. दुर्योधनप्रभृति मंडळीला. 'दुर्योधना' असाही पाठ आहे. १०. काढीन. ११. शहाण्यांनीं. १२. व्यासाच्या आश्रयानें, व्यासकृत महाभारताला अनुसरून असा अर्थ. १३. जाई, चाले.

## अध्याय तिसरा.

धर्म म्हणे, 'जी कृष्णराजा ! । शाल्व पातला [1]कवण्या काजा ? । वैरां[2]चें कारण अधोक्षजा ! । [3]मजही कळलें [4]पाहिजे.' ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'ऐका सकळ, । [5]राजसूययज्ञीं [6]शब्द [7]कुटिल । बोलतां [8]निमाला [9]शिशुपाळ । माझेनि हस्तें जाण पां. ॥ २ ॥ [10]तें दुःख धरोनियां चित्तीं । [11]शिशुपाळबंधूचिये प्रीती ।

---

१. कोणत्या कारणामुळें, कोणत्या उद्देशानें. २. शाल्व आणि कृष्ण यांच्यांतल्या वैमनस्याचें. ३. येथें 'मजही' असें म्हणण्याचा उद्देश असा दिसतो कीं, ग्रामांत राहणाऱ्या लोकांनाही गोष्ट (शाल्ववधाची) कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें कळेलच; परंतु अरण्यांत राहत असल्यामुळें मला (धर्माला) ही गोष्ट कळण्याचा संभव नाहीं. म्हणून ती गोष्ट मला सांगा. ४. महाभारतांत बहुतकरून कोणतीही गोष्ट स्वतंत्रपणें वर्णिलेली नाहीं. ती गोष्ट होऊन गेल्यानंतर ती गोष्ट झाली अशाबद्दल कोणीतरी जिज्ञासू चौकशी करितो व त्याला उत्तरादाखल ती गोष्ट सांगण्यांत येते. ५. राजसूययज्ञ सर्व यज्ञांत मुख्य मानिला आहे. ज्या राजाला सम्राट् म्हणजे चक्रवर्ती व्हावयाचें असेल त्यानें हा यज्ञ केलाच पाहिजे असा नियम होता. अगोदर सर्व राजांना आपले सामंतिक बनविल्याशिवाय हा यज्ञ करितां येत नाहीं. धर्मराजानें हा यज्ञ केला होता. याच यज्ञांत श्रीकृष्णानें शिशुपालाचा वध केला. हा यज्ञ केल्यानंतर धर्म सम्राट् झाला व तेव्हांपासून युधिष्ठिरशकास प्रारंभ झाला. परंतु पुढें धर्माला वनवास करावा लागल्यामुळें युधिष्ठिरशक बंद पडला व पुढें भारतयुद्धानंतर तो पुन्हा सुरू झाला. ६. कुत्सितशब्द, शिव्या. ७. कपटी. ८. मेला. ९. शिशुपाल हा सोमवंशीय दमघोष राजाचा पुत्र. ह्याची माता श्रुतश्रवा ही वासुदेवाची भगिनी, तेव्हां हा कृष्णाचा आतेभाऊ. शिशुपालाच्या आजाचें नांव चेदि म्हणून याला 'चैद्य' अथवा 'चेदिप' आणि ह्यांच्या देशास 'चेदि' असें नांव पडलें. या देशाची राजधानी शुक्तिमती नामक नगरी. शिशुपाल हा हिरण्यकशिपूचा अंशावतार होय. यास जन्मतः तीन डोळे व चार हात होते. हा कृष्णाच्या मांडीवर बसला तेव्हां याचे दोन हात व एक डोळा गळून पडले. तत्क्षणींच श्रुतश्रवा भयभीत होऊन कृष्णास शरण गेली आणि 'यास मारणार नाहीं, असें वचन दे' असें त्यास म्हणाली. 'मी या शिशुपालाचे शतापराध क्षमा करीन' असें कृष्णानें आपल्या आतेस वचन दिलें. नंतर तो द्वारकेस परत आला. पुढें राजसूययज्ञांत इंद्रप्रस्थ येथें कृष्णाची अग्रपूजा करावी असें ठरलें. ती गोष्ट शिशुपालास पसंत न पडून त्यानें भीष्माची आणि कृष्णाची अद्वातद्वा बोलून अतोनात निंदा केली. ती कृष्णास सहन झाली नाहीं, तेव्हां त्यानें शिशुपालाचे शंभर अपराध होतांच आपल्या चक्रानें त्याचें शिर तोडिलें व तो तत्काळ मरण पावला. (सभापर्व—अ० ४५.) ह्या शिशुपालवधाच्या कथानकावर माघकवीचें एक उत्तम संस्कृत काव्य आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वर—सभापर्व—अध्याय ११ पृष्ठ ११९-१२६.] १०. शिशुपालाच्या मरणामुळें झालेलें. ११. आपला बंधु जो शिशुपाल त्याच्यावर असलेल्या प्रीतीमुळें.

सौभें[1] वेढिली द्वारावती । बलात्कारें मी नसतां[2]. ॥ ३ ॥ विमानयानीं[3] जैसें नगर । असंख्य दैत्यगणांचा भार[4] । बळें रोधिलें[5] द्वारकापूर । हाहाःकार प्रजांतें. ॥ ४ ॥ खंचिल्या[6] पैरिघाच्या[7] पाळी[8], । भंगिल्या दुर्गाच्या पौळी[9], । मोडिल्या गोपुरें[10] आटाळी । विध्वंस केला अपार. ॥ ५ ॥ कळस[11] पताका तो-[12]रणें, । भंगिलीं वनें[13] शृंगारवनें[14], । प्रजाबाळकें[15] घेतलीं प्राणें । किती येक[16] निष्ठुरें[17]. ॥ ६ ॥ मुखें दुरुक्ति बोले परम । म्हणे, 'केउता[18] यादव अधम । कृष्णवर्ण[19] कृष्णनाम । कृष्णवदन[20] तयाचें. ॥ ७ ॥ शिरच्छेद करुनी त्याचा । सूड घेइन शिशुपाळाचा.' । ऐशी ऐकोन कठिण वाचा । नगरवासी भयाभित[21]. ॥ ८ ॥ ते वेळीं सांब[22] गद[23] अक्रूर । रुक्मिणी सत्यभामेचे[24] कुमर । प्रद्युम्नादि[25]

---

१. येथें 'शाल्वें' असें पाहिजे होतें. 'सौभ' हें विमानाचें नांव आहे. २. कृष्ण धर्माच्या राजसूययज्ञांत गुंतल्यामुळें द्वारकेस गेला नव्हता. ३. रुद्राच्या प्रसादानें मिळविलेलें विमान. ४. समुदाय. ५. वेढा दिला. ६. हे तिन्ही शब्द समानार्थक आहेत. ७. 'पौळीच्या' असाही पाठ आहे. पौळी=देवळ वगैरेच्या सभोंवतीं घातलेली भिंत. ८. भिंती. 'मौळी' असाही पाठ आहे. मौळी=शिरें. ९. वेशीवरील इमारती. १०. बुरूज. ११. शिखर. देवळांच्या शिखराला हा शब्द लावीत असतात. १२. 'तोरणोऽस्त्री बहिर्द्वारं' इत्यमरः । तोरण म्हणजे बाहेरचें द्वार, दाराचे बाहेरच्या भागालाही तोरण म्हणतात. हा शब्द पुल्लिंगीही आहे व नपुंसकलिंगीही आहे. 'तोरणोऽस्त्री पुरद्वारं' असाही पाठ आहे. या पाठाप्रमाणें तोरण म्हणजे पुरद्वार (दिल्ली दरवाजा). १३. उपवनें, बाग. १४. उपवनांत श्रेष्ठ, जेथें तरुण व तरुणी विहार क्रीडा करितात तीं उपवनें. अशा उपवनांला इंग्रेजींत 'Lovely bowers' असें म्हणतात. [Compare:—

"The breezy covert of the warbling grove,
That only sheltered thefts of harmless love."

Goldsmith's *Deserted Village*.]

१५. प्रजारूपी बाळकांचीं. १६. किती येक=अनेक. १७. 'किती एक अधमें निष्ठुरें' असाही पाठ आहे. १८. किती. १९. काळ्या रंगाचा. २०. काळ्या तोंडाचा म्हणजे जगांत तोंड दाखविण्यास ज्याला जागा नाहीं असा. २१. 'भयाभित' या पुढें 'जाहले' हें अध्याहृत समजावें. २२. हा जांबवतीपासून कृष्णास झालेला मुलगा. हा मोठा शूर होता. दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा ही याची बायको. हिच्याशीं यानें राक्षसविधीनें विवाह केला, असें म्हटलें तरी चालेल. याच्याच पोटांतून निघालेल्या मुसळाच्या योगानें सर्व यादवांचा नाश झाला. कृष्णाला या नांवाचे दोन पुत्र होते. एक रोहिणीपासून झालेला व दुसरा देवरक्षितेपासून झालेला. २३. एक यादव वीर. याच्या बापाचें नांव श्वापल्क व आईचें नांव गंधिनी. शतधन्वापासून स्यमंतकमणि घेणारा हाच. यानेंच कृष्ण व बलिराम यांस

महावीर । सिद्ध जाले संग्रामा. ॥ ९ ॥ हस्ती[1], पदाती, रथें[2], । भार चालिले असंख्यात । वीरवाद्यें गर्जना करित । हृदय भेदे असुरांचें.॥ १० ॥ उग्रसेनें[3] पाळिली पुरी । यंत्रें औषधें शस्त्रीं अस्त्रीं । मध्यें गुल्मीं[4] द्वारोद्वारीं । भार अपार कोंदले. ॥ ११ ॥ असंख्य यादवांचे[5] कुमर[6] । गृहीं ठेवुनी वडील नर । तरुण निवडिले झुंजार[7] । वीरश्री[8] संभ्रमें. ॥ १२ ॥ तैशीच सौभाची ही सेना । लोहो[9] पंजरें[10] गुंडिली जाणा । पराक्रमें[11] करिती गर्जना । नर कंदना पेटले. ॥ १३ ॥ उभय[12] दळीं[13] मिळोनियां झुंजा[14] । शस्त्रें लेउनियां[15] ओजा । नेमें घालुनियां पैजा[16] । परस्परां हाणिती.॥ १४ ॥ वणवा[17] लागतां श्वापदें[18] भग्न[19]। तेंवी असुरसेना पलायमान ।

---

मथुरेस नेलें. २४. सत्यभामा ही कृष्णाची फारच आवडती वायको. हिच्याचकरितां कृष्णानें इंद्राशीं युद्ध करून नंदनवनांतील पारिजात वृक्ष हिच्या उपवनांत आणिला. २५. मदनाच्या अंशानें कृष्ण व रुक्मिणी यांच्या पोटीं जन्मलेला मुलगा. यानेंच शंबर नामक असुराचा वध केला. याची स्त्री मायावती.

१. चतुरंग सेनेचीं हीं तीन अंगें होत. चौथें अंग अश्व होय. २. 'हस्ती वाजी पदाती' असाही पाठ आहे. ३. हा कंसाचा पिता व कृष्णाचा आजा. ४. सैन्याचा विभाग. प्रत्येक गुल्मांत ४५ पदाती, २७ घोडे, ९ रथ व ९ हत्ती असतात. ५. द्वापारांतले 'यादव' व सध्याचे 'जाधव' हे एकाच वंशांतले असावेत असा एक नवीन तर्क निघाला आहे. द्वापारांत कृष्णाच्या वेळीं यादवांची संख्या फारच मोठी होती असें दिसतें. भारतीं युद्धाच्या वेळीं कृष्णानें दुर्योधनास छप्पन कोटी यादव सहाय करण्यास दिले होते यावरून ही गोष्ट व्यक्त होते. ६. कुमार या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश. कुमार म्हणजे मुलगा (पुत्र), मग तो कितीही वर्षांचा असो. परंतु येथें 'कुमर' शब्द लहान मुलें या अर्थीं योजलेला आहे. ७. योद्धे, लढवय्ये. ८. वीरश्री म्हणजे वीराची जी श्री (संपत्ति)=शौर्य. ९. लोखंडी. १०. 'पंजर' या शब्दाचा मूळचा अर्थ 'पिंजरा'. येथें 'हाडांचा पिंजरा' असाही अर्थ होईल. 'लोहो पंजरें गुंडिली—लोखंडी हाडांनींच केलेली आहे कीं काय अशी (सेना)—ज्यांत अति बलवान् असुर होते अशी सेना—असा अर्थ करावा. ११. 'शस्त्रें झळकती जेंवी घन । माजी वीज तळपती' असाही पाठ आहे. १२. 'आपापल्या धनियांच्या काजा । उभय दळें मिसळलीं झुंजा' असाही पाठ आहे. १३. सैन्यीं. १४. युद्ध. १५. घेउनियां. १६. अमक्याला मारल्याशिवाय मी राहणार नाहीं, अमक्याचा शिरच्छेद केल्याशिवाय मी अन्न घेणार नाहीं, अमक्याला बद्ध केल्याशिवाय मी परतणार नाहीं—अशा प्रकारच्या शपथा घेऊन. १७. अरण्यांतल्या वृक्षांच्या घर्षणानें जो अग्नि उत्पन्न होतो तो. या अग्नीच्या योगानें कधीं कधीं अरण्यांचीं अरण्यें जळून भस्म होतात व आसपासच्या गांवांचाही कधीं कधीं नाश होतो. अशाच प्रकारच्या अग्नीनें अमेरिकेंतील दोन तीन शहरें जळून गेल्याची वार्ता नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. १८. 'तळपे पवन' असाही पाठ आहे. १९. भग्न—नाश पावतात—असाही अर्थ होऊं शकतो व आपली नेहमीं राहण्याची जागा सोडून इकडे तिकडे पळत सुटतात—असाही होऊं शकतो.

होतां देखोनी, मग प्रधान । क्षेमवृद्धी[1] या नांवें ॥ १५ ॥ मोकली बाणांचा जेलधरु[2] । तेणें त्रासला यादवभारु । देखोनी जांबुवंतीचा कुमरु । सांब नामा धाविन्नला. ॥ १६ ॥ रथ लोटुनिया[3] पुढारां । असंख्यबाणीं[4] भेदिलें असुरां । खेद पावोनी माघारा । पाठी देउनी[5] पळाला[6]. ॥ १७ ॥ हें[7] देखूनी वेगवान । सौभसेना अतिदारुण । घेऊनियां धनुष्यबाण । सांबा उजू पातले. ॥ १८ ॥ ते पाहोनी[8] बाणवृष्टी । गदा पडताळुनि मुष्टी । दैत्य ताडिला[9] भूतळवटीं[10] । प्रेत होवोनि पाडिला[11]. ॥ १९ ॥ [12]जीर्ण वृक्ष मोडूनी पडे । तेंवी दानव प्राणें विघडे, । हें देखतां घालून [13]होडे । [14]विविधनामा धाविन्नला. ॥ २० ॥ चारुदेष्ण रुक्मिणीकुमर । तेणें विविध ताडिला[15] थोर । जैसा शक्रें[16] वृत्रासुर[17]; ।

१. क्षेमवृद्धि हा शाल्वाचा सेनापति होता. येथें त्याला प्रधान म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. शाल्वाचा प्रधान द्युमान् हा होता. २. मेघ, वर्षाव. ३. लोटुनियां=सैन्याच्या दाटींतून महत्संकटानें पुढें नेऊन. ४. भेदिलें=ताडिलें, शरघात करून जर्जर केलें. ५. रणांगणांतून पाठ दाखवून पळणें फारच निंद्य मानिलें आहे. म्हणूनच उत्तरगोग्रहणसमयीं विराटाचा पुत्र उत्तर हा पळूं लागला तेव्हां त्याला धरण्याकरितां अर्जुनही मागें जाऊं लागला; परंतु शत्रूला पाठ दाखविणें क्षत्रियाला अयोग्य असें समजून तो शत्रूकडे तोंड करूनच मागें मागें जात होता.(महाभारत—विराटपर्व पहा.) ६. या क्रियापदाचा कर्ता क्षेमवृद्धि होय.सांब नव्हे.७.त्याचें पळणें. ८. 'साहोनी' असाही पाठ आहे. ९. 'ताडितां' असाही पाठ आहे. १०. भूमीवर. ११. 'पाडियलें' असाही पाठ आहे. १२. पुष्कळ दिवसांचा, क्षीण झालेला. येथें क्षेमवृद्धीला जीर्ण वृक्षाची उपमा दिलेली आहे त्यावरून असें दिसतें कीं जीर्ण वृक्ष पाडण्याला जसे फारसे श्रम लागत नाहींत त्याचप्रमाणें या असुराला मारण्याकरितां सांबाला फारसा त्रास पडला नाहीं. म्हणजे सांब श्रमावांचून असुराला मारण्याइतका शौर्यवान होता—असा मथितार्थ. १३. पैज. 'घोडे' असाही पाठ आहे. १४. यालाच विविंध असें नांव आहे. १५. मारिला. १६. इंद्र. (अशाच प्रकारच्या देवाला ग्रीकमध्यें Jupiter Pluvialis असें नांव आहे. आपल्या इंद्राच्या व यांच्याविषयींच्या पुष्कळ गोष्टी जमतात.) हा कश्यप व अदिति यांचा मुलगा आहे. हा वामनाचा (विष्णूचा) भाऊ होय. वेदांत सर्व देवतांपेक्षां याला अधिक महत्व दिलें आहे; परंतु पुराणांत ब्रह्मा, विष्णु व रुद्र यांच्याहून याला कमी महत्व दिलें आहे. बाकीच्या सर्व देवांचा हा राजा. हा अष्ट दिक्पालकांपैकीं एक असून याच्याकडे पूर्वदिशेचें स्वामित्व आहे. १७. वृत्रासुराची कथा भागवताच्या सहाव्या स्कंधांत सांगितली आहे. हा पूर्वजन्मीं शूरसेन देशाचा (हा देश सांप्रतच्या दिल्लीजवळ होता असें कित्येकांचें मत आहे) राजा. हा एकदां विमानांत बसून जात असतां महादेवाच्या अंकावर बसलेल्या पार्वतीस पाहून हांसला, याबद्दल पार्वतीला राग येऊन तिनें 'तुला असुरयोनि प्राप्त होईल' असा यास शाप दिला. नंतर, इंद्राच्या हातून मृत झालेल्या विश्वरूप नामक पुत्राच्या मरणानें दुःखित झालेल्या त्वष्टा नामक प्रजापतीनें हवनांतून यास उत्पन्न केलें व वृत्रासुर असें

भांडणीं तैसे मिळाले. ॥ २१ ॥ तीक्ष्ण[1] सोडूनियां बाणजाळ । छेदिलें विविधाचें मौळें[2] । जैसा भंगिजे शैलें[3] । वज्रघातें सुरेंद्रें. ॥ २२ ॥ विविध मारिला चारुदेष्णें । हें देखोनी शाल्वें तेणें । प्रेरूनियां[4] असंख्य सैन्यें । आपण युद्धा पातला. ॥ २३ ॥ वांकुडी घालिजे महाघनीं । तेंवी वर्षाव बाणीं । मांडिला देखोनी द्वारकाजनीं । महाकल्पांत भाविला. ॥ २४ ॥ ज्येष्ठ[5] भीम[6]कीचा नंदन[7] । मदन कामेश्वर प्रद्युम्न । कुसुमशराचें संधान । साहों[8] न शके हरब्रह्मा. ॥ २५ ॥ त्रैलोक्य भेदिलें एकें बाणें[9] । त्यातें झुंजोनी जिंकिजे कोणें? । यादवांतें धैर्यवचनें । गर्जोनियां बोलत. ॥ २६ ॥ 'आजि कौतुक पहा हो! नयनीं । शाल्व निश्चयें मारीन रणीं, । जैसा त्रिपुरातें[10] भेदूनी । शिव

---

नांव ठेवून इंद्रास मारण्याची याला आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें जाऊन वृत्रासुरानें इंद्रास गिळिलें. जांभईच्या योगानें जेव्हां वृत्रासुरानें मुख पसरलें तेव्हां इंद्र बाहेर आला. पुनः दोघांचें युद्ध झालें. त्यांत इंद्राचा पराभव झाला. अशा रीतीनें वृत्राच्या हातून इंद्र पुष्कळ वेळा पराजित झाला. शेवटीं विष्णूनें इंद्रास सांगितलें कीं, 'दधीचि ऋषीच्या अस्थींपासून वृत्र मरेल.' दधीचि ऋषि ब्रह्मविद्येच्या संबंधानें इंद्राचा शिष्य असल्यामुळें त्यानें आपल्या देहाच्या अस्थि इंद्रास दिल्या. विश्वकर्म्यानें त्या अस्थींचें वज्र केलें व त्या वज्रानें वृत्रासुराचा इंद्रानें वध केला—या गोष्टीकडे येथें लक्ष्य आहे.

१. 'क्षणें' असा अन्य पाठ आहे. २. मस्तक. ३. पर्वत. पूर्वीं पर्वतांना पंख असत; त्या पंखांच्या योगानें पर्वत फार उन्मत्त झाले व पाहिजे तेव्हां उडून पाहिजे त्या गांवांवर पडत व सर्व गांव उद्ध्वस्त करित असत. अशा प्रकारें उन्मत्त झालेल्या पर्वतांचे पंख इंद्रानें आपल्या वज्रानें तोडून टाकले. ४. समागमें घेऊन व त्यांना प्रोत्साहन देऊन. ५. 'जो' असाही पाठ आहे. ६. भीमकाची (भीष्मकाची) कन्या, रुक्मिणी. ७. आनंद देणारा पुत्र. ['नंदनं वासवोद्याने सुते ना हर्षके त्रिषु' इति रत्नमाला.] ८. जिंकिलें. कामविकाराला वश झाला नाहीं असा पुरुष मिळणें कठिण म्हणून मदनानें तिन्ही लोक जिंकिले असें म्हटलें आहे. शुकऋषि, भीष्मपितामह इ० आजन्म ब्रह्मचारी यांचीं उदाहरणें कृष्णाला माहित नव्हतीं असें नाहीं. यांचीं उदाहरणें अपवादादाखल घेतल्यास कृष्णाच्या सामान्य नियमास बाध येणार नाहीं. ९. मदनाचे पांच बाण प्रसिद्ध आहेत. ते हे:—'अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका । नीलोत्पलं च पंचैते पंचबाणस्य सायकाः ॥' येथें सांगितलेला जो बाण तो या पांचांपैकीं एकही नव्हे. हा एक बाण म्हणजे कामविकार होय. १०. 'पूर्वीं देवदानवांचा दीर्घकाळ संग्राम होऊन, दानवांचा पराभव झाल्यावर, मयासुरानें आपले दोन मित्र, तारक आणि विद्युन्माली यांस समागमें घेऊन, दीर्घकालपर्यंत तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें. आणि वर मागितला कीं, 'मला शत शत योजनांच्या अंतरावर देवांस अभेद्य अशीं तीन फिरतीं पुरें करतां यावीं, व तीं ब्राह्मणांच्या

कल्याण पावला. ॥ २७ ॥ दिव्य वाजी[1] कनकरथू[2] । ध्वजीं मिरवे मकरकेतू[3] । चक्रीं चंद्रमा आदित्यू । जडिले तैसे भासती. ॥ २८ ॥ दारुकाचा[4] पुत्र सुमती । प्रद्युम्नाचा तो सारथी । युद्धीं[5] नानापरिच्या युक्ती । गति[6] विगति र-

शापास अभेद्य असून, महादेवाच्या बाणानें कदाचित् त्यांचा नाश झाला, तरी त्यांतून जें पुर अवशेष राहील त्याचा नाश होऊं नये.' त्यावरून ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणून सत्यलोकास गेले असतां, मयासुरानें पुष्य नक्षत्रावर लोह, रजत आणि सुवर्ण यांचीं, एकावर एक अशीं सारख्या अंतरानें तीन पुरें निर्माण केलीं, आणि तेथील आधिपत्य अनुक्रमानें तारकासुर, कमलाक्ष व विद्युन्माली त्या तिघांस दिलें. याशिवाय त्या तीन पुरांच्या आसमंतात् आणखीही कित्येक अंतरिक्षपुरें निर्मून त्यांत अन्य असुरांची राहण्याची व्यवस्था केल्यावर, सर्वांच्या ऊर्ध्वप्रदेशीं अतिदिव्य पुर निर्मून, त्यांत स्वतः आपण राहिला. मयासुरानें अशी व्यवस्था करून सर्वांस असें सांगितलें कीं, 'तुम्हीं इतःपर आपण होऊन देवांच्या वाटेस जाऊ नये, व उन्मत्तपणानें आचारहीन होऊन ईश्वरोपासनेचा अनादर करूं नये.' त्याप्रमाणें ते सर्व त्या नियमानुरूप बराच कालपर्यंत राहिल्यामुळें स्वस्थ होते. परंतु दुर्दैवेंकरून, त्यांस विपरीत बुद्धि उत्पन्न होऊन ते सर्व नियम त्यांनीं हळू हळू सोडण्यास आरंभ केला, त्यावरून सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले, तेव्हां ब्रह्मदेव सर्वांस घेऊन, महादेवाकडे येऊन, त्यांनीं असुरांचें वृत्त त्यांस निवेदन केलें. तें ऐकून महादेवांनीं पृथ्वीस रथाची कल्पना करून, ब्रह्मदेवास सारथि केलें, व अन्य देवांस ज्या ज्या स्थानीं योजावयाचें त्या त्या स्थानीं योजून विष्णूस धनुष्यावर योजण्यास बाण केलें, व पुष्य नक्षत्राचा योग येतांच तीं तीन पुरें समसूत्रांत क्षणभर यावयाचीं, तो क्षण साधून, महादेवांनीं त्रिपुरांचा नाश केला. तो करतांच तेथील अधिपति मरण पावून, अन्य असुर अन्य देवांनीं मारिले. मात्र मयासुर परमनियमशाली व ईश्वरोपासक असल्यामुळें, तेवढा वांचला.' [भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश.] या त्रिपुरासुरसंहाराकडे येथें लक्ष्य आहे.

१. घोडे. २. सोन्याचा रथ. ३. मकर (महामत्स्य) ज्याच्या केतूवर (ध्वजावर) आहे असा मदन. 'ध्वजीं' असें म्हटल्यावर 'मकरकेतु' असें म्हणण्याची जरूरी नाहीं. फक्त 'मकर' असें म्हटलें म्हणजे झालें, कारण 'ध्वज' आणि 'केतु' समानार्थक आहेत. ध्वजावर घोडा बैल इत्यादिकांचें चित्र काढण्याचा परिपाठ होता त्यास अनुलक्षून हें वर्णन आहे. श्रीधरानेंही असेंच वर्णन केलें आहे:—'कर्णाचे ध्वजीं रेखिला कुंजर । पार्थध्वजीं वायुकुमर । दोहीं दळीं वाद्यगजर । तुंबळ जाहला तेधवां. ॥ ९ ॥ कुंजर रेखित कर्णध्वज । विदारीत वायुतनुज. ॥ २८ ॥ [पांडवप्रताप–अध्याय ४९.] ४. हा कृष्णाचा सारथी. याचाच मुलगा प्रद्युम्नाचा सारथी. यावरून दारुकाचे वंशज यादवांकडे वंशपरंपरा सारथ्याचा धंदा करीत होते असें दिसतें. ५. 'युद्धीं जाणें बहुतांपरीच्या कृती' असाही अन्य पाठ आहे. ६. शहाण्या सारथ्याचा युद्धांत फारच उपयोग होतो. रथाला विविध गती देऊन सारथी आपलें व आपल्या मालकाचें पुष्कळवेळां शत्रूच्या शस्त्रांपासून संरक्षण करितो. म्हणूनच घोर भारतयुद्धाच्या वेळीं

थाच्या. ॥२९॥ शाल्वबाणाचिया कोटी । तोडुनी आपुली बाणवृष्टी । दावितां सौभाचिये दृष्टी । अंधकारू पातला. ॥ ३० ॥ शाल्व म्हणे, 'हो! कौतुक । म्हणत होतों हा बाळक । होय कृष्णाहूनी अधिक । कृष्णपुत्र निर्धारें.' ॥ ३१ ॥ तंव शैत्रूचीं गौत्रें गात्रें । बाणीं भेदिलीं कृष्णपुत्रें । झांकूनिया उभय नेत्रें । मूर्छित पडे रथांगीं. ॥ ३२ ॥ पडतां देखोनी मुख्य धुर । दैत्य करिती हाहाकार । भयें भेदुनी अंबर । दाही दिशा लंघिती. ॥ ३३ ॥ मुहूर्त

---

श्रीकृष्णानें अर्जुनाचें सारथ्य पतकरिलें होतें; व अर्जुनाशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला, तेव्हां आपलें सारथ्य करण्यास कर्णानें शल्याची विनवणी केली.

१. शाल्वाची. २. प्रद्युम्न एकसारखा बाण तोडीत गेला; व त्या बाणांच्या प्रकाशानें शाल्वाचे डोळे दिपून गेले—असा भावार्थ. ३. प्रद्युम्न. 'पुत्रादिच्छेत्पराजयम्' या न्यायानें प्रद्युम्नानें कृष्णावर ताण केलेली पाहून शाल्वास कौतुक वाटणें साहजिकच आहे. ४. शाल्वाचीं. ५. गात्रें गात्रें=सर्व शरीर. ६. 'मूर्च्छित पडे' या क्रियेचा कर्ता 'शाल्व' होय. ओंवींत या क्रियेचा कर्ता कोण आहे हें उघड करून न सांगितल्यामुळें कर्त्यासंबंधीं वाचक जरा घोंटाळ्यांत पडण्याचा संभव आहे. अशा रीतीनें कर्त्याची गडबड मुक्तेश्वराच्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडते. ७. धुर म्हणजे जूं. येथें धुर=धुरंधर=पुढारी. ८. फार दुःख झालें असतां जो उद्गार काढितात तो. याला 'अनुकरणवाचक शब्द' म्हणतां येईल किंवा नाहीं याबद्दल मतभेद आहे. हा 'अनुकरणवाचक शब्द' नाहीं असें आमचें मत आहे. 'अनुकरणवाचक शब्द' याचा शब्दार्थ घेतल्यास, दुसऱ्यानें उच्चारिलेले शब्द पुनः उच्चारिले असतां त्यांस 'अनुकरणवाचक शब्द' म्हणतां येईल हें खरें आहे. परंतु या शब्दाचा असा व्यवहारिक अर्थ घेतल्यास सर्व अवतरणांतर्गत वाक्यांस 'अनुकरणवाचक शब्द' म्हणावें लागेल. परंतु व्यवहारांत असें म्हणण्याचा प्रचार नाहीं. कोणत्याही क्रियेचा व्यापार चालत असतां जो एकप्रकारचा अव्यक्त शब्द (inarticulate sound) झाल्यासारखा भास होतो त्या शब्दासारखा शब्द मनुष्यांना करतां येत नाहीं. तसेंच मनुष्येतर प्राणी जे नानाप्रकारचे अव्यक्त (अर्थात् मनुष्यांना न समजणारे) शब्द करतात, त्या शब्दांसारखे शब्द उच्चारण्यास मनुष्य असमर्थ आहे. अशा प्रकारच्या अव्यक्त शब्दांबद्दल कांहीं बोलण्याचा प्रसंग आला तर ते शब्द आपल्यास उच्चारून दाखवितां येत नसल्यामुळें, त्या शब्दांचे सूचक होतील व आपणास उच्चारितां येतील असे नवीन शब्द मनुष्य शोधून काढितो. अशा रीतीनें मनुष्यानें शोधून काढिलेल्या अव्यक्तशब्दसूचक प्रतिशब्दांना 'अनुकरणवाचक शब्द' म्हणतात. कारण मूळचे जे अव्यक्त शब्द त्यांचें अनुकरण करण्याच्या उद्देशानें या नवीन प्रतिशब्दांचा उपयोग केला जातो.—उ० 'इंद्रा! मम क्रोधाग्नि धग धग धग जळतो!' 'छडी लागे चम चम विद्या येई घम घम;' कुत्रा भोंभों करतो; मांजर म्यांव म्यांव करते. ९०. पाणिनींचीं 'अइउण्' इत्यादि चतुर्दश माहेश्वरसूत्रें 'अनुकरणवाचक' होत असें भाष्यकार पतंजली यांचें म्हणणें आहे. कारण हीं सूत्रें महेश्वराच्या डम-

लोटलिया सौभपती । सावध होऊनी बैसला रथीं, । धनुष्यबाण घेऊन हातीं । प्रद्युम्न दृष्टी लक्षिला. ॥ ३४ ॥ लक्ष्यामाजी लक्ष बाण । सोडितां हस्तलाघवी निपुण । निर्वारितां[१] ही प्रद्युम्न । हृदयमर्मीं भेदला. ॥ ३५ ॥ बळी[२] शक्राचिये परी । दोघे झुंजता महामारीं[३] । धावो[४] टाळुनी घायानळीं[५] । कृष्णकुमर[६] ताडिला[७]. ॥ ३६ ॥ तेणें मूर्च्छना[८] आली थोरी । पहुडला[९] रथाचिये गुंढारीं[१०], । हें देखोनियां यादवभारीं । हाहाकार माजला. ॥ ३७ ॥ शत्रुबाणांचा[११] महामारू[१२] । आं-

---

रूमधून निघालेल्या ध्वनीचें अनुकरण करून बनविलेलीं आहेत. यावरून येवढें सिद्ध होतें कीं अव्यक्तशब्दांचें अनुकरण करणाऱ्या शब्दांनाच 'अनुकरणवाचक शब्द' अशी परिभाषिक संज्ञा लावतां येते. 'हाहा' हे अव्यक्त शब्द नाहींत. व्यक्त आहेत. म्हणून 'हाहा' याच्या अनुकरणाला 'अनुकरणवाचक शब्द' ही परिभाषिक संज्ञा लावतां येत नाहीं. ९. आकाश. 'अंबरं वाससि व्योम्नि कार्पासे च सुगंधके' इति विश्वः. १०. दहा दिशा=पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण, नैऋत्य, ईशान्य, वायव्य, आग्नेय, ऊर्ध्व, अधस्. ११. डोळ्याच्या पांपणीच्या पतनाला जितका वेळ लागतो त्याला निमेष म्हणतात; (अक्षिपक्ष्मपरिक्षेपो निमेषः परिकीर्तितः); अशा प्रकारच्या अठरा निमेषांना जितका वेळ लागतो त्याला काष्ठा असें नांव आहे; अशा प्रकारचे तीस काष्ठा मिळाल्यास एक कला होते; तीस कला मिळून एक क्षण होतो; व बारा क्षण मिळून एक मुहूर्त होतो. म्हटलें आहे:—'अष्टादश निमेषास्तु काष्ठा त्रिंशत्तु ताः कला । तास्तु त्रिंशत्क्षणस्ते तु मुहूर्तो द्वादशास्त्रियाम् ॥' [अमरकोश—प्रथमकांड—कालवर्ग—श्लोक ११.] मुहूर्त=सुमारें ४८ मिनिटें.

१. 'त्याणें तो' असाही पाठ आहे. २. प्रख्यात हरिभक्त जो प्रह्लाद याचा जो पुत्र विरोचन त्याचा हा पुत्र. हा दातृत्वाविषयीं फार प्रख्यात होता. इंद्रपदवी मिळविण्यासाठीं यानें नव्याण्णव यज्ञ केले व शंभरावा यज्ञ करित असतांना विष्णूनें वामनरूप धारण करून याकडे येऊन त्रिपाद भूमीची याचना केली. ती मिळाल्यावर दोन पावलांत पृथ्वी व आकाश आटपून तिसऱ्या पावलानें बळीस पाताळांत नेऊन ठेविलें. ३. निकराच्या लढाईत. ४. शरघात. ५. 'अवटाळोनी घायानळीं' असाही पाठ आहे. ६. प्रद्युम्न. ७. 'ताडिला' या क्रियेचा कर्ता 'सौभपतीनें' आहे असें समजावें. ८. घेरी, जिच्यामुळें मनुष्याची चेतनाशक्ति क्षणभर नष्ट होते ती क्रिया. ९. निजला. १०. उंच भाग. ११. शाल्वाच्या बाणांचा. १२. 'महा' आणि 'मारु' या दोन शब्दांचा हा जो संधी झाला आहे तो बरोबर नाहीं. कारण 'महा' हा संस्कृत शब्द व 'मार' हा प्राकृत शब्द. या प्रकारचा (एक संस्कृत एक प्राकृत अशा शब्दांचा) संधी व्याकरणसंमत नाहीं. जुन्या कवींच्या ग्रंथांत अशा प्रकारचा संधी केल्याचीं उदाहरणें कधीं कधीं दृष्टीस पडतात. अशा प्रकारचे दोष हे 'निरंकुशाः कवयः' या न्यायानें आदरणीय होत.

[1]गप्रत्यंगीं खोंचले [2]वारू । सारथियें [3]रहंवरु । [4]नगरमार्गें फिरविला. ॥ ३८ ॥ [5]पे-टोनी धेंडके [6]वैश्वानरु । तेंवी सावध कृष्णकुमरु । [7]जाला तंव [8]रहंवरु । ग्राममार्गें पळतसे. ॥ ३९ ॥ रागें सारथियातें म्हणत । '[9]मागें किमर्थ काढिला रथ ? । येणें [10]अपजयाची [11]मात । [12]न लगतां आंगीं लागली. ॥ ४० ॥ कृष्ण [13]बलिराम सात्यकी । खेद पावोनी [14]बोलती मुखीं । म्हणती आमुच्या कुळीं हा कीं । [15]क्लीब पुरुष जन्मला.' ॥ ४१ ॥ सारथी म्हणे, 'एक वचन । [16]विषम वेळे दिधला [17]मौन । जैसा झालिया [18]अपशकुन । माघारुनी चालिजे. ॥ ४२ ॥ आतां पाहें माझी कळा । [19]यांचि रथें शत्रूच्या [20]दळा । विध्वंसीन जैसा [21]अचळां । वज्र करी शतचूर्ण.' ॥ ४३ ॥ ऐसें बोलोनी [22]तेये अवसरीं । गर्जोनी फिर-विला [23]रथकेसरी । शत्रुभार [24]कुंजरशिरीं । [25]यशोमुक्तें साधावया. ॥ ४४ ॥ वि-

---

१. शरीराच्या सर्व भागाला. २. वारू=वार, शरीराला बाण लागून झालेली दुखापत. ३. रथ. ४. युद्धप्रदेश सोडून आडरस्त्यानें-असा भाव. ५. अग्नि पेट घेण्याच्या पूर्वी मंद असतो व पेट घेतल्यानंतर फारच उग्र होतो, तसेंच मूर्छित होता तेव्हां प्रद्युम्न फारसा भीकर दिसत नव्हता परंतु सावध झाल्यानंतर तो शौर्यानें उग्र दिसूं लागला-असा मथितार्थ. ६. अग्नि. प्राणिमात्रांच्या शरीरांत राहून अन्नपचन करणारा व वैश्वदेवसंबंधी अन्न देवांस नित्य पोहोंचविणारा अग्नि तो हाच. हा शांडिल्यगोत्रीय आहे असा समज आहे. ७. झाला, जाहला. ८. रथश्रेष्ठ. ९. युद्धभूमीच्या मागें. १०. प्रद्युम्न पराजित झाला अशी. ११. येथें लोकापवाद असा अर्थ. १२. न लगतां=न लागतां, कारण नसतां, वस्तुस्थिती तशी नसतां; म्हणजे मी पराजित झालों असें लोकांस वाटूं लागेल. १३. वसुदेवास रोहिणीपासून शेषाच्या अंशानें झालेला पुत्र. हा कृष्णाचा वडील भाऊ. गदायुद्धांत याच्यासारखा निपुण असा कोणीही झाला नाहीं. जरासंधाची गदायुद्धाविषयीं फार प्रख्याती होती परंतु तोही बलरामाच्या हातून एकोणीस वेळां पराभव पावला. भीम व दुर्योधन हे दोघेही गदायुद्धांत याचे शिष्य होते. १४. बोलतील. १५. नपुंसक. १६. कष्टकाळ, आपत्काल. १७. आपत्कालास मान देणें म्हणजे आपत्कालांत आपल्या जीवास धक्का पोहोंचणार नाहीं अशी युक्ति योजणें, रथावर बेशुद्ध पडलेल्या मालकाचें हरतऱ्हेनें रक्षण करणें सारथ्याचें कर्तव्य होय. १८. अपशकुन झाल्यास कार्यसिद्धि होणार नाहीं अशी समजूत असल्यामुळें शकुनावर विश्वास ठेवणारे लोक वाटेनें कांहीं अपशकुन झाल्यास घरीं परततात व कांहीं वेळ बसून पुन्हां कामाला जातात. १९. जो रथ मागें फिरविल्यामुळें तुला (प्रद्युम्नाला) इतकें वाईट वाटलें त्याच रथाच्या योगानें. २०. सैन्या. २१. पर्वतांना. पर्वतांना गति नसल्यामुळें त्यांना अचल म्हणतात. २२. त्या वेळीं. २३. रथश्रेष्ठ. २४. हत्तीच्या डोक्यावर असलेलीं. गीर्वाण साहित्यशास्त्रकारांनीं काव्यांची शोभा वाढविण्याकरितां अनेक संकेत मानिले आहेत त्यांस **'कविसमय'** अथवा **'कविसंप्रदाय'** असें म्हणतात. हत्तीच्या मस्तकांत मोत्यें असतात व तीं मिळविण्याकरितां सिंह नेहमी यत्न

मान सांडूनी[1] सौभपती । आरूढला आणिके[2] रथीं । धनुष्य घेऊनियां हातीं । शरसंधान लाविलें. ॥ ४५ ॥ दोघांचिये शरसंधानीं । भरलें गगन[3] आणि धरणी । प्रद्युम्न म्हणे, 'प्राणहानी[4] । आतां दावूं शत्रूतें.' ॥ ४६ ॥ पूर्वी कृष्णें उपदेशिलें । जैसें ब्रह्मतेज[5] प्रकटलें । तें ब्रह्मास्त्र[6] अभिमंत्रिलें । सद्गुरु-मुखापासूनियां. ॥ ४७ ॥ एकत्र मिळाले सहस्र तरणी[7] । तैसें तेज झळके गगनीं । कडकडाटे धरणी । सागरांत गिरीसीं.[8] ॥ ४८ ॥ भाळ, हृदय, बाहु-

करित असतो हाही एक कविसंप्रदाय गणिला आहे. खरोखर हत्तीच्या शिरावर मोत्यें कोठेंच दृष्टीस पडलीं नाहींत. परंतु काव्याला रम्यत्व यावें म्हणून भौतिक सृष्टींत नसलेली गोष्टही आहे असें मानण्याचा कवींना अधिकार आहे. कित्येक मुख्य कविसमय येथें देतों:—आकाश आणि पाप यांचें मालिन्य, कीर्ति व हास्य यांचें शुभ्रत्व, क्रोध व प्रीति यांचा रक्तिमा (तांबडेपणा), नदींत आणि सागरांत यथाक्रम पंकज आणि इंदीवर यांची उत्पत्ति, मरालादिक पक्ष्यांचा जलाशयांत संचार, चकोरांचें चंद्रकिरणपान, जलदागमकाळीं हंसांचें मानस स-रोवराप्रत आगमन, स्त्रीलत्ताप्रहारानें अशोकवृक्षांचें फुलणें, विरहसंतापानें तरुणांच्या हृदया-वरील हारांचें व हृदयांचें फुटणें, कामाचें चाप आणि बाण कौसुम (पुष्पमय), आणि त्याच्या धनुष्याची दोरी भ्रमरपंक्ती असणें, कामाच्या बाणांनीं आणि स्त्रीकटाक्षांनीं तरुणजनहृद-यांचा भेद, दिवसा (सूर्याच्या योगानें) अंभोजांचा आणि रात्रीं (चंद्राच्या योगानें) कुमुदांचा विकास, मेघगर्जनेनें मोरांचें नृत्य, अशोकाला फळें न येणें, वसंतांत जाईला फळें न येणें, गंधसार वृक्षांच्या (चंदनवृक्षांच्या) फलपुष्पांचा अभाव, स्त्रियांच्या पादाघातानें अशोकाचा, कटाक्षप्रेरणानें तिलकवृक्षाचा (तिळव्याचा), आलिंगनानें कुरबकाचा (कोरांटीचा), करस्पर्शानें प्रियंगूचा (वाघाटीचा), मद्यगंडूषसेकानें बकुलाचा, नर्मभाषणानें मंदाराचा, मृदुहसितानें चंपकाचा, मुखमारुतानें (तोंडाचा फुंकर घालण्यानें) आम्रवृक्षाचा, सुस्वर गायनानें मेरु वृक्षाचा (सुरंगीच्या झाडाचा), नृत्यानें कर्णिकाराचा (पांगाऱ्याच्या झाडाचा), पुष्पविकास होणें; हत्तीचें गंडस्थळ, सापाचें मस्तक, मत्स्य, वराह आणि वेणु यांत मोतीं असणें; चक्रवाक मिथुनांचा सूर्यास्ताबरोबर वियोग आणि सूर्योदयाबरोबर समागम, इत्यादि अनेक कविसमय प्राचीन ग्रंथांत आढळतात. प्राकृत कविवर्यांनींही यांचा आपापल्या काव्यांत प्रसंगानुरूप संनिवेश केला आहे. २५. यशोरूपी मोत्यें.

१. सोडून, विमानांतून खालीं उतरून—असा अर्थ. विमानांत बसून प्रद्युम्नाशीं युद्ध करणें अशक्य झाल्यामुळें शाल्व खालीं उतरला. २. दुसऱ्या. 'कनक' असाही पाठ आहे. ३. आ-काश. ४. मृत्यु. ५. ब्रह्मतेज किंवा ब्रह्मवर्चस् याची स्वामीनीं अशी व्याख्या केली आहे:—'ब्रह्मण: तप: स्वाध्यायादेर्वर्चस्तेजो ब्रह्मवर्चसम्.' ६. मूळांत ब्रह्मास्त्र असें नाहीं. एक शत्रुनाशक बाण असें म्हटलें आहे. 'रौक्मिणेयोऽपरं बाणं संदधे शत्रुनाशनम् ' (वनपर्व अ० १९ श्लोक १९.) ७. सूर्य. ८. पर्वतांसह.

मूळीं । शस्त्रभेदनें धरातळीं । पडतां[1] देखोनी तेचि काळीं । कृष्णपुत्रें मागुती. ॥ ४९ ॥ शिरच्छेदना[2] अतिसत्वर । जोडितां जो कां वरद[3] शर । जैसा प्रळयार्थ वैश्वानर[4] । जिव्हा काढी सलंबा[5]. ॥ ५० ॥ तो बाण देखतांचि नयनीं । हाहाकार माजला गगनीं । शक्र[6], कुबेर[7], नारदमुनी[8] । पवनवेगें पा-

१. ब्रह्मास्त्राच्या तेजानें सर्वांग कंपित होऊन शाल्व रथावरून खालीं पडतांना. २. शाल्वाचें डोकें उडविण्याकरितां. ३. कृष्णाच्या वरप्रसादानें मिळालेला. 'वरद शर' याचा अर्थ वर देणाऱ्यानें दिलेला शर, अथवा वर देणारा शर—असा होईल. ४. अग्नी. ५. लांब. अग्नीला सात जिव्हा आहेत; व येथें त्याच्या जिव्हा फार लांब आहेत असें सांगितलें आहे. मनुष्य फारच रागांत असला म्हणजे कधीं कधीं जीभ बाहेर काढून दांतांनीं चावित असतो. या नियमाला अनुसरून प्रलयाच्या समयीं अग्नि जेव्हां फारच क्रुद्ध होतो तेव्हां तो आपल्या सप्त जिव्हा बाहेर काढतो व त्या फारच लांब असल्यामुळें भयंकर दिसतात असें सांगण्याचा कवीचा उद्देश. अग्नीच्या सात जिव्हांची नांवें:—'काली कराली धूमा च लोहिता च मनोजवा । स्फुलिंगिनी विश्वरूपा सप्त जिव्हाः प्रकीर्तिताः ॥' इति गर्गः । यद्वा । 'भवति हिरण्या कनका रक्ता कृष्णा च सुप्रभा चान्या । अतिरक्ता बहुरूपेति सप्त सप्तार्चिषो जिव्हाः ॥ इति हलायुधः [रघुवंश—सर्ग १० श्लो० २१ हेमाद्रिकृत टीका], 'काली मनोजवा धूम्रा कराली लोहिता तथा । स्फुलिंगिनी विश्वरुचिः सप्त जिव्हा विभावसोः ॥' [अ० २ श्लो० ५ टीका.] ६. देवेंद्र. ७. 'स्वायंभुवमन्वंतरांतील पुलस्त्यपुत्र विश्रवा ऋषि त्याचा पुत्र. याची आकृति भयंकर आहे म्हणून यास कुवेर असें म्हणतात, परंतु याचें मुख्य नांव सोम असें होय. याच्या स्त्रीचें नांव ऋद्धि असून, कल्पारंभापासून उत्तरदिक्पाल असल्यामुळें तिला सौम्या असें नांव पडलेलें अजून चालत आहे. हा संपूर्ण यक्षांचा अधिपति व देवांचा धनाध्यक्ष आहे······याची सभा मोठी वर्णनीय असून, तींत नारदादि महान् महान् ऋषि सतत असतात. नलकूबर ते याचेच पुत्र होत······हेमकूट पर्वताच्या कैलास शिखरावर याचें कधीं कधीं राहणें होत असतें. परंतु याची मुख्य नगरी मानसोत्तर पर्वतावरील विभावरी नामक ती होय.' [भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश.] हा शंकराचा परमप्रिय मित्र. शिवाच्या प्रसादानें याला स्वेच्छाचारी पुष्पकविमान मिळालें. याला तीन पाय व आठ दांत व एक डोळा आहे. दुसऱ्या डोळ्याच्या जागीं एक पिंवळा ठिपका आहे. कुवेर=कुत्सितं बेरं शरीरं यस्य सः कुवेरः=कुष्टत्वानें ज्याचें शरीर दूषिलें आहे तो कुबेर. । 'कुत्सायां किति शब्दोऽयं शरीरं बेरमुच्यते । कुबेरः कुशरीरत्वान्नाम्ना तेनैव सोंऽकितः ॥' इति वायुपुराणम्. कुबेर हा विश्रवस् याचा मुलगा, म्हणून यास वैश्रवण असें म्हणतात. याला तीन पाय आणि आठ दांत असल्यामुळें कुरूपाचें सूचक असें 'कुतनु' हें नांव आहे. हा शिवाचा मित्र म्हणून याला 'ईशसख' असेंही म्हणतात. ८. प्रख्यात देवर्षि. दश ब्रह्ममानसपुत्रांपैकीं हा एक असून ब्रह्मदेवाच्या मांडीपासून उत्पन्न झाला. हा देवांची वार्ता मानवांना व मानवांची वार्ता देवांना सांगत असे अग्नी

ठविला. ॥ ९१ ॥ म्हणती 'प्रद्युम्ना! परियेसीं[1] । श्रीकृष्णहस्तें मृत्यु यासीं । विधीनें[2] नेमिले नेमासी । विपरीत तुवां न करावें. ॥ ९२ ॥ जोडिलें यश[3] घेई माथां । सोडी शाल्वा जीवन्मृता[4] । यातें वधील तुझा पिता । तात्का-ळिक[5] देखसी.' ॥ ९३ ॥ म्हणोनी केला जयजयकार[6] । सुमनें[7] वर्षले[8] सुरवर । अपजयो पावोनियां पामर[9] । शत्रु गेला स्वस्थाना.॥९४॥मुक्त झाली द्वारावती । आनंदली सर्व जगती । राजसूययज्ञाची समाप्ती । झालिया अंतीं पावलों[10]. ॥ ९५ ॥ शोभाविरहित देखिली पुरी, । भूषणांरहित नरनारी, । 'कारण पुसतां सविस्तरीं । वृत्तांत लोकीं बोलिला.' ॥ ९६ ॥ तेव्हां प्रतिज्ञा उत्तरीं । नेम करिता झाला मुरारी[11], । 'शाल्व मारिल्यावीण नगरीं । प्रवेश[12] न करीं

---

समजूत आहे. म्हणूनच शाल्व मारूं नकोस, असें सांगण्याकरितां प्रद्युम्नाकडे त्यांनीं नारद पाठविला. जेथें तेथें कलह उत्पन्न करण्याची याला संवय असल्यामुळें याला कलिप्रिय असें म्हणतात. वीणा नामक वाद्य यानेंच शोधून काढिलें अशी समजूत आहे. हा पूर्वजन्मीं दासीपुत्र व ऋषिजनांच्या प्रसादानें देवर्षि झाला. 'नारदस्मृती'चा हाच कर्ता आहे असें म्हणतात. ९. वायुवेगानें. वायूच्या वेगापेक्षां अधिक वेगानें जाणारा पदार्थ भौतिक जगतांत नाहीं अशी पूर्वजांची समजूत होती. परंतु प्रकाश व ध्वनि यांचा वेग वायूच्या वेगापेक्षां फारच अधिक आहे. वायूचा वेग एका तासास ८० मैल यापेक्षां अधिक कधींही राहत नाहीं. ध्वनीचा वेग एका तासास सुमारें ८०० मैल व प्रकाशाचा वेग एका सेकंदास सुमारें १९२००० मैल आहे!

१. ऐक. २. ब्रह्मदेवानें. ३. जोडिलें यश=मिळविलेलें यश, आतांपर्यंत शाल्वाशीं युद्ध करून त्याला जर्जर केल्याचें श्रेय तुलाच मिळणार आहे. म्हणजे शाल्वाला न मारल्यास आतां-पर्यंत तूं (प्रद्युम्न) दाखविलेल्या शौर्याची लोक किंमत करणार नाहींत असें नाहीं; तर त्याबद्दल लोक तुझी (शाल्वास न मारतां सोडून दिल्यासही) स्तुतीच करतील—असा मथितार्थ. ४. जिवंत असूनही मृतसमान झालेल्या शाल्वास. ५. लौकरच, थोड्याच वेळानें. ६. 'प्रद्युम्नाचा विजय असो' असा स्तुतिपर शब्द. ७. फुलें. ८. वर्षण करिते झाले, खालीं पाडते झाले. 'वृष (वर्ष)'=पाऊस पडणें, हें क्रियापद अकर्मक आहे; परंतु येथें त्याचा सकर्मकाप्रमाणें उपयोग केला आहे. 'वर्षले' याचा कर्ता 'सुरवर' व कर्म 'सुमनें' होय. ९. नीच मनुष्य, ज्ञानविहीन पुरुष. हलका माणूस. 'विवर्णः पामरो नीचः प्राकृतश्च पृथग्जनः । निहीनोऽपसदो जाल्मः क्षुल्लकश्चेतरश्च सः ॥' [अमरकोश—द्वितीयकांड—शूद्रवर्ग—श्लोक १६.] १०. प्राप्त झालों, द्वारकेला जाऊन पोहोंचलों. ११. मुरनामक असुराला मारल्यामुळें कृष्णाला हें नांव पडलें. हा असुर नरकासुराच्या वंशांतला होता. १२. यावरून कृष्ण द्वारकेंत आला नव्हता असें दिसतें. शाल्वाची गोष्ट कृष्णानें, द्वारकेहून सामोरा आलेल्या लोकांकडून गांवाबाहेरच ऐकली असें वाटतें.

सर्वथा.' ॥ ५७ ॥ बळभद्रा निरविलें[1] नगर । 'स्वस्थ रक्षावें नारीनर । करूनी सौभयाचा संहार । मींही सत्वर येतसें'. ॥ ५८ ॥ सवें घेउनी यादवसेना । उल्लंघूनी नगरें[2] नाना । पातलों सौभाचिया स्थाना । मनोवेगीं[3] या रथेशीं. ॥ ५९ ॥ वेळें[4] वेढिली शत्रुनगरी । जे कां वसे समुद्रोदरीं । अडा[5] लंकेचिया[6] परी । सुरासुरां दुर्गम. ॥ ६० ॥ सौभा जाणवली[7] मात । युद्धा येतसे कृष्णनाथ । पांचजन्य[8] परिसतां कृतांत । दैत्य मारा पेटला.[9] ॥ ६१ ॥ करूनी मावेचे दुर्ग[10], । झुंजा पेटला अभंग[11] । मांडला युद्धप्रसंग । रामरावणा[12]-सारिखा. ॥ ६२ ॥ दैत्य मावेचा[13] विंदानी[14] । विकार[15] दाखवी क्षणक्षणीं । अनेक रूपें देखतां नयनीं । धैर्य कोणा न धरवे. ॥ ६३ ॥ क्षणें प्रकाश, क्षणें र[16]-जनी, । क्षणें गगनीं[17], क्षणें धरणीं[18], । क्षणें[19] प्रगट[20] दिसे नयनीं, । क्षणैक गुप्त दि-

---

१. सोंपविलें. २. 'मंडळें' असा अन्य पाठ आहे. ३. मनाच्या वेगानें. न्यायशास्त्रकारांनीं मनाला द्रव्य मानिल्यामुळें मनाचा वेग कविसंप्रदायांत येऊं शकत नाहीं. मनोवेगापेक्षां अधिक वेग नाहीं अशी पाश्चात्यांचीही समजूत आहेः—

"How fleet is a glance of the mind
Compared with the speed of its flight
The tempest itself lags behind
And the swift-winged arrows of light."

*W. Cowper.*

४. 'येऊनी' असाही पाठ आहे. ५. 'अटक' असाही पाठ आहे. ६. रावणाची नगरी. ७. आपण आल्याची वार्ता शत्रूला न कळवितां शत्रूवर हल्ला करणें हें अधर्मयुद्ध होय; म्हणून कृष्णानें आपण आल्याची बातमी शत्रूला कळविली. ८. कृष्णाच्या शंखाचें नांव. पंचजन्यराक्षसाच्या अस्थीपासून झाल्यामुळें या शंखाला 'पांचजन्य' असें नांव पडलें. ९. 'म्हणती पातला' असाही पाठ आहे. १०. किल्ले. [शाल्व असुर असल्यामुळें किल्ले नव्हते त्या जागीं तो क्षणिक किल्ले उत्पन्न करीत असे.] ११. ज्याला भंग नाहीं अशा युद्धाला. १२. राम आणि रावण हे दोघेही अप्रतिम शौर्यवान् असल्यामुळें त्या दोघांचें युद्ध फारच निकराचें झालें. रामानें रावणाचीं शिरें तोडलीं कीं तीं पुन्हा उत्पन्न व्हावीं, तीं पुन्हा रामानें तोडावीं असें शतवेळां झालें, तरी रावण मरेना. शेवटीं अगस्त्य ऋषींनीं दिलेल्या बाणाचा प्रयोग करून रामानें रावण मारिला. [वाल्मीकिकृत रामायण—युद्धकांड पहा. काव्यसंग्रहग्रंथमाला—रामायणें भाग १—युद्धकांड—गीति ५८२-६०७—पृष्ठ १५०-१५२ पहा.] १३. कपटाचा. १४. जाणणारा. १५. विकार=प्रकृतींचा अन्यथा भाव. (येथें) रूपांतर. १६. रजनी=रात्रि. (येथें) अंधकार, काळोख. १७. आकाशांत (दिसे.) १८. पृथ्वीवर (दिसे.) १९. 'क्षणैक प्रकाश' असाही पाठ आहे. २०. स्पष्ट.

सेना. ॥ ६४ ॥ फरश[1], पट्टीश[2], पाश वज्रें[3], । गदा[4], मुद्गल, शूल[5], चक्रें । मुसल[6], तोमर[7], अपारें । शैल[8], पाषाण[9] वर्षत. ॥६५॥ [10]अंगारवृष्टी, सर्पवृष्टी, । नाना पर्वतशिळावृष्टी, । सिकतावृष्टी[11] भस्मवृष्टी[12] । यादवसेना भंगावया. ॥ ६६ ॥ अग्निपर्जन्य, वातगिरी[13] । पाडुनी ताडी शरधारीं[14] । तितुके [15]परिहारूनी दूरी । असंख्य वैरी मारिले[16].' ॥ ६७ ॥ मंत्रबाणें[17] लावूनी गुणीं । छेदूनी[18] पाडी चक्रपाणी[19] । [20]संसारक्लेश तत्वज्ञानी[21] । जेंवी परिहरी विचारें. ॥६८॥ मेघींहूनी पडती गारा[22], । तेंवी भूतळीं विखुरती[23] तारा[24] । असंख्य [25]वीज पडतां

१. फरश=परशु, कुऱ्हाड. २. पट्टीश किंवा पट्टिश=दांडपट्टा. 'पट्टिशो लोहदंडोऽयस्तीक्ष्णधारः क्षुरोपमः' [वैजयंती.] ३. येथें वज्र म्हणजे इंद्रायुध नव्हे. हिऱ्याप्रमाणें फारच कठिण (शत्रुशिर तोडण्यास समर्थ) असणारें आयुध असें समजावें. ४. गदा=लोहमयमुद्गल. ५. शूल=भाला. ६. मुसल=लोखंडी शस्त्र, हिंदुस्थानींत ज्याला सोंटा म्हणतात तशा आकाराचा परंतु लोखंडी. ७. तोमर=शस्त्रविशेष. ज्याला गुरगूज म्हणतात तो. हा घुसळण्याच्या रवीसारखा असतो. ८. पर्वत. ९. दगड. १०. विस्तवाचा पाऊस, आकाशांत जाऊन शत्रूच्या आंगावर अग्निकण टाकित होते त्यामुळें शत्रूला अंगारवृष्टि होते कीं काय असें वाटलें. ११. वाळूचा वर्षाव. १२. भस्मवृष्टी=राखेचा पाऊस. राखेचा पाऊस पाडण्याचें असें कारण दिसतें कीं, शत्रूच्या डोळ्यांत राख जाऊन त्यांला कांहीं दिसेनासें व्हावें. असें झालें म्हणजे शत्रूला जिंकण्यास फारसे प्रयास पडणार नाहींत. १३. वातगिरी=गिरिवात, पर्वतांनाही असह्य अशी हवा. या हवेचा परिणाम अग्निपर्जन्याला भयंकर रूप देणें होय. पवनाच्या साहाय्यानें अग्नि लौकर पेटतो हें सुप्रसिद्धच आहे. १४. शराच्या धारेनीं, तलवारीच्या जोरावर. १५. नाहींसे करून. १६. 'मारिले' याचा कर्ता मी (श्रीकृष्ण) आहे असें समजावें. १७. मंत्रबाण. १८. 'सांडी छेदुनी चक्रपाणी' असा अन्य पाठ आहे. १९. श्रीकृष्ण. २०. प्रपंचांतील दुःखें. २१. शहाणे पुरुष, विचारी जन, पंडित. २२. बर्फाच्या गारा, हिमपाषाण, करका, वर्षोपल. २३. पसरतात. २४. तारका, नक्षत्रें, चांदण्या. 'शस्त्रा' असा अन्य पाठ. २५. विजेचे प्रकार अनेक आहेतः—यांत्रिक, भौतिक आणि रासायनिक. त्यांतही भेद आहेतः–(अ) विद्युत् (वीज) दोन प्रकारची असते. (१) भावात्मक (positive), अभावात्मक (negative); (ब) पृथिवीवरील प्रत्येक पदार्थामध्यें ही दोन्ही प्रकारची वीज कमी अधिक मानानें सर्वदा असते. वातावरणही पृथिवीवरील एक पदार्थ असल्यामुळें यांत नेहमी विद्युत् खेळत असते. वातावरणांतली एकाच प्रकारची विद्युत् ढगांमध्यें जमते. याप्रमाणें भिन्न जातीच्या विद्युतांनीं भरलेले मेघ एकमेकांजवळ आल्याबरोबर '[1]भिन्नजातीच्या विजा एकमेकांना आकर्षितात' या शास्त्रीय नियमास अनुसरून ते एकमेकांवर आदळतात व त्यांच्या घर्षणा-

१. "Two bodies charged with the same electricity repel each other; two bodies charged with opposite electricities attract each other."

Gano's Physics. ( page 451 ).

धरा । भंगों पाहे तडाडें. ॥ ६९ ॥ त्यामाजी बाणाच्या संधानें । झाकिन्नलीं यादवसैन्यें, । दारुक म्हणे, 'स्वामी प्राणें । वांचतां मार्ग दिसेना. ॥ ७० ॥ सहस्र सूर्यांचीं मंडलें । तेंवी दाखवी एकेचि काळें । तितुकीं चंद्राचीं सोज्वळें । बिंबें दावुनी लोपवी.' ॥ ७१ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'स्वस्थ राहीं । धैर्यस्तंभ केवळीं पाहीं । विष्णुस्मरणें पाप कांहीं । नुरे तैसें करीन.' ॥ ७२ ॥ तंव रक्तोदकाचा जळधर । वर्षतां लोटले महापूर । ते देखोनी भयंकर । यादवसेना घाबरी. ॥ ७३ ॥ तंव द्वारकावासी परम आप्त । मनोवेगें धांडिला रथ, । नेत्रीं ढळत अश्रुपात । कृष्णनिकटीं पातला. ॥ ७४ ॥ सांगे उग्रसेनाचीं वचनें । शाल्वें घालोनी घालणें । वसुदेव घेतला प्राणें । सर्व यादवां देखतां. ॥ ७५ ॥ म्हणे, 'सांडीं युद्धाची आटाटी। पितृप्रेत पाहें दृष्टी, । देवकी शोकाब्धीच्या तटीं । ते शांतवीं स्वमुखें.' ॥ ७६ ॥ मनीं विचारिजे हृषीकेशें । हें साचार घडेल कैसें? । बळभद्र जितां असतां मानसें । कल्पिलें

पासून प्रचंड तेज उत्पन्न होतें. यालाच आपण वीज असें म्हणतों. आकाशांतल्या विजेसारखी वीज यंत्राच्या साहाय्यानें आपण उत्पन्न करूं शकतों. अंतरिक्षोत्पन्न विजेचे सर्व धर्म या कृत्रिम विजेच्या आंगीं असतात. विजेपासून पुष्कळ प्राण्यांचा नाश होतो हें सर्वविश्रुतच आहे.

१. 'ऐशा' असाही पाठ आहे. २. आलिंगीं. म्हणजे धैर्याचें अवलंबन कर—असा अर्थ. ३. रक्तरूपी उदकाचा किंवा रक्त (लाल) उदकाचा (पाण्याचा). ४. पाऊस. ५. धाडिला=हांकिला. 'धांवतां रथ' असाही अन्य पाठ आहे. ६. आपण खरोखर दुःखी आहों असें भासविण्याकरितां तो रडत होता. ७. आटाटी=खटपट, विजय मिळविण्याकरितां श्रम. ८. बापाचें प्रेत, वसुदेवाचें मृत शरीर. ९. ही यदुकुलोत्पन्न देवक राजाची मुलगी व वसुदेवाची स्त्री. कंसाची ही चुलत बहीण. एकदां कंसाला घेऊन देवकी सासरीं जात असतां अशी आकाशवाणी झाली कीं, 'हिच्या (देवकीच्या) पुत्रापासून तुला (कंसाला) मरण प्राप्त होईल.' अशी आकाशवाणी ऐकून कंस देवकीला मारावयाला गेला. परंतु 'माझा प्रत्येक मुलगा जन्मल्याबरोबर ठार करण्यास तुला देईन' असें वचन देऊन वसुदेवानें कंसाच्या हातून आपली बायको सोडविली. पुढें देवकीचे सात पुत्र कंसानें मारिले. कृष्ण मात्र त्याच्या हातून सुटला. १०. आपल्या मुखानें शोक न करण्याविषयीं आईला सांगून. ११. हृषीकांचा (देहमात्रांतील इंद्रियांचा) ईश (स्वामी) तो हृषीकेश. देहाचीं सर्व इंद्रियें विष्णूच्या प्रसादानेंच सुरळित चालत आहेत (कारण विष्णु पालनकर्ता आहे) अशी समजूत असल्यामुळें विष्णूला हें नांव पडलें. महाभारतांत म्हटलें आहे:—'हृषीकाणींद्रियाण्याहुस्तेषामीशो यतो भवान् । हृषीकेशस्ततो विष्णो ख्यातो देवेषु केशव ॥' [महाभारत.] 'जो ईश इंद्रियांचा, किंवा वश इंद्रियें जया असती । यास्तव त्या क्षेत्रज्ञा, नाम **'हृषीकेश'** जाहलें म्हणती. ॥ ४७ ॥' [नामार्थदीपिका—पृ० ६.] १२. खरोखर. १३. जिवंत. १४. मनानें.

कोणां न वचे पैं. ॥ ७७ ॥ सात्यकी प्रद्युम्न सांब गद । असतां वसुदेवाचा वध । करी ऐसा वीर प्रसिद्ध[1] । भुवनत्रयीं असेना. ॥ ७८ ॥ तंव विमानीहुनी तेथें । टाकिलें वसुदेवप्रेतातें । काष्ठप्राय[2] पादहस्त । विकृतानन[3] देखिलें. ॥ ७९ ॥ पुण्यें सरलीया स्वर्गीहुनी । भूतळीं लोटिती[4] जेंवी प्राणी । तेंवी येराच विमानीहूनी । वसुदेवप्रेत पडियेलें[5]. ॥ ८० ॥ मुक्तकेश[6] बीभत्सवदन[7] । देखोनी शंका पावलें मन । हस्तकींचें[8] धनुष्यबाण । गळोनी पडलें धरणीये[9]. ॥ ८१ ॥ नेत्र झांकोनियां मौन । स्तब्ध ठेला अधोवदन[10] । रज्जुसर्पाचें[11] दर्शन । जेंवी नेणता बोथरे[12]. ॥ ८२ ॥ सौदरें[13] विलोकी जगजेठी । तंव प्रेत न दिसे दृष्टी । नाहीं रक्तवनाची वृष्टी । ना सौभही दिसेना. ॥ ८३ ॥ सौभें विमान पळविलें । प्राग्ज्योतिषनगरा नेलें । तेथुनी सत्वरा पातलें । कृष्णदृष्टी मागुती. ॥ ८४ ॥ म्हणे, 'दानवी माया प्रबळ । मजही केलें अतिव्याकुळ । आतां याचें प्राणमूळ । पैं निर्मूळ करावें.' ॥ ८५ ॥ तंव गर्जिली आकाशवाणी, । 'श्रीकृष्ण देवा! चक्रपाणी! । शीघ्र सौभातें वधुनी । शुभ सर्वत्र करावें.' ॥ ८६ ॥ मग पावकास्त्र[14] अभिमंत्रुनी । संगें सुदर्शन प्रेरुनी । तेणें सौभातें तोडुनी[15] । रामें दशानन ज्यापरी. ॥ ८७ ॥ जैसें

---

१. आपल्या अतुल पराक्रमाविषयीं प्रख्यात असलेले. बळभद्र इत्यादि शूर पुरुष असतांना त्यांना न जुमानतां परम पूज्य अशा माणसास मारणारा पुरुष फारच प्रसिद्ध वीर असला पाहिजे हें उघड आहे. २. लांकडासारखे. मृत झालेल्या माणसाचे हातपाय मेल्यानंतर कांहीं वेळानें लांकडाप्रमाणें टणक होतात. ३. विकृत (तेजरहित) झालेलें आहे आनन (मुख) ज्याचें. ४. फलेच्छेनें पुण्य करणाऱ्याला स्वर्गप्राप्ति होते. परंतु त्याचें पुण्य सरल्याबरोबर त्याला पुनः पृथ्वीवर जन्म घ्यावा लागतो. परंतु निष्काम बुद्धीनें जे पुण्य करितात त्यांना मुक्ति मिळते व ते जन्ममरणांपासून सदैव दूर राहतात. खरे तत्वज्ञ स्वर्गादिक सुख मुक्तीपुढें तुच्छ समजतात. ५. पडियेलें=पाडियेलें=पाडिलें. ६. शेंडी सुटलेली. ७. वस्त्ररहित व रक्तानें आच्छादित असल्यामुळें बीभत्स. 'वास मलिन' असाही पाठ आहे. वास=वस्त्र. ८. हातांतलें. ९. पृथ्वीवर. १०. खालीं तोंड घालून. लाज वाटली म्हणजे व फार दुःख झाल्यास तोंड खालीं घालितात. ११. रात्रीं अंधारांत दोरी पडलेली असल्यास तिच्या ठायीं सर्पाचा भास होतो व सर्प आहे असें वाटून लोक भितात. तसेंच तें प्रेत खरोखर वसुदेवाचें नसून कृष्णाला आपल्या बापाचेंच प्रेत आहे अशी भ्रांति झाली व तो दुःख करूं लागला. जगत् खरोखर कांहीं पदार्थ नसून केवल भ्रांति आहे असें सिद्ध करण्यास वेदांती रज्जुसर्पभ्रांतीचें नेहमीं उदाहरण देतात. 'अजा सर्पाचें' असाही पाठ आढळतो. १२. भिई. 'होय तटस्थ' असाही पाठ आहे. १३. मोठ्या आदरानें, फार काळजीपूर्वक, विशेष लक्ष देऊन. १४. अग्न्यस्त्र. १५. वधुनी.

[१]मार्तंडमंडळ [२]खंडलें । [३]तेंवी विमान भंगिलें । [४]महासमुद्रीं बुडविलें । नौका[५]पोतें ज्यापरी. ॥ ८८ ॥ [६]मेरु खचोनी पडे धरणी, । कीं [७]प्रळयवीज [८]तडके गगनीं, । तेंवी [९]विमान भंगतां ध्वनी । उभयलोकीं न समाये. ॥ ८९ ॥ पूर्वी [१०]पार्वतीचेनि

---

१. सूर्यबिंब, मार्तंडमंडळ म्हणजे सूर्य ज्या मंडळाच्या मध्यभागीं आहे तें मंडळ ( Solar System ) असाही अर्थ होऊं शकेल; परंतु मुक्तेश्वराच्या वेळेस लोकांना या सूर्यमंडळाची ( Solar System ) माहिती नसल्यामुळें सूर्यमंडळ म्हणजे सूर्यबिंब, अशी जी समजूत सामान्य लोकांत प्रचारांत आहे तिलाच धरून चालणें योग्य होईल. सूर्य मृत अंडांस सचेतन करतो म्हणून त्याला मार्तंड असें नांव पडलें. 'मृतेंऽडे जायते यस्मात् मार्तंड इति चोच्यते' [मत्स्यपुराण.] 'मृतेंऽडे भवः=मार्तंडः । शकन्ध्वादिः (वा० ६-१-९४). २. सूर्यमंडळ खंडणें फारच कठिण आहे. तें अद्यापपर्यंत कोणीही केलें नाहीं. एकदां जमदग्नीच्या मनांत सूर्यमंडळास विद्ध करावें असें आलें होतें व जमदग्नि ऋषि परम समर्थ असल्यामुळें त्याच्या हातून तें काम कदाचित् झालेंही असतें. परंतु स्वतः सूर्यानें ब्राह्मण-वेष घेऊन आपल्याला न खंडण्याविषयीं जमदग्नीला प्रार्थना केली, व पुढें जमदग्नि स्वस्थ राहिला. 'खचलें' असाही पाठ आहे. ३. रुद्रानें दिलेलें विमान फार तेजस्वी असल्यामुळें त्याची सूर्यमंडळाशीं तुलना केली. ४. येथें 'समुद्र' शब्दाला 'महा' हें विशेषण जोडून समुद्राचा प्रचंड विस्तार व त्याचें भीकरस्वरूप व्यक्त केलें आहे. ५. पोत=शिशु. (येथें) लहान होडी—असा अर्थ. ['पोतः शिशौ वहित्रे च गृहस्थाने च वाससि' इति मेदिनी.] ६. मेरुपर्वत पृथ्वीच्या मध्यभागीं असल्यामुळें तो पृथ्वीवर पडेल तर प्राण्यांचें फार नुकसान होईल व अनेक उत्पात उत्पन्न होतील हें उघड आहे. ७. प्रळयकालीं प्रलयाग्नीनें सर्व जगत् जाळून भस्म केल्यावर त्या अग्नीला विझविण्याकरितां प्रचंड वृष्टि पडते व सर्व जगत् जलमय होऊन जातें अशी समजूत आहे. अर्थात् प्रचंड वृष्टीच्या वेळीं अनेक हृदयभेदक वीजा दिसतील हें उघड आहे. सामान्य वृष्टीच्या वेळीं पडणाऱ्या वीजा जर इतक्या भयंकर असतात तर प्रलयकालच्या वीजा फारच भयंकर असतील हें उघडच आहे. ८. चमके व कडकडाडून पडे. वीज पडण्याच्या वेळीं फारच भयंकर आवाज होतो हें सर्वांना माहितच आहे. ९. या विमानाविषयीं असें सांगतात कीं, हें विमान म्हणजे आकाशांत फिरणारी एक नगरीच होय. थांत सर्व सैन्यासह शाल्व राहूं शकत असे, तेव्हां हें विमान फारच मोठें असलें पाहिजे. एवढें मोठें विमान फुटल्यामुळें प्रळयकाळच्या विजेच्या आवाजाप्रमाणें आवाज झाला. १०. पार्वतीचेनि वरें=पार्वतीच्या पतीनें, शंकरानें. पार्वतीचें अगोदरचें नांव सती. सती ही दक्षप्रजापतीची मुलगी. दक्ष एकदां कैलासास आला असतां योगाभ्यासांत निमग्न असल्यामुळें शिवानें त्याचा योग्य सत्कार केला नाहीं, म्हणून त्या दिवसापासून दक्ष शिवाचा व सतीचा फार द्वेष करूं लागला. पुढें दक्षानें मोठा यज्ञ आरंभिला. त्या यज्ञास येण्याविषयीं त्यानें शिव व सती यांशिवाय सर्व देवांस बोलाविलें. बापानें आरंभिलेला यज्ञ पाहण्याविषयीं उत्सुक झालेली सती शिव 'नको' म्हणून सांगत असतां आमंत्रणाशिवायच दक्षाच्या घरीं गेली.

वरें । त्रिपुर भेदिला विष्णुशरें[1] । तेंवी भंगिलें यादवेश्वरें[2] । सौभ यान[3] सौभाचें. ॥ ९० ॥ तेथूनि[4] पडतां भूमंडळीं । गदाघात वोपिला मौळीं,[5] । प्राण त्यागुनी तात्काळीं । मोक्षधामीं प्रवेशे. ॥ ९१ ॥ मस्तकीं लागतां कृष्णगदा । [6]जीव पावला मोक्षपदा । शरीर वोपिलें रणगीधा[7] । भक्षावया भूतळीं. ॥ ९२ ॥ दैत्यसेना कृष्णशरीं । खंड विखंड सागरोदरीं[8] । पडतां भक्षिलें जळचरीं । मत्स्यमगरां संतोष. ॥ ९३ ॥ वटवृक्ष भंगे चंडवातें[9] । यक्षिणी[10] पळती गगनपंथें । तेंवी दैत्यगण[11] ते तेथें । विमानभंगें[12] पळाले. ॥ ९४ ॥ शाल्व मारिला ऐशियां[13] परी । मागां[14] अविवेक[15] हस्तिनापुरीं । वर्तला तो मा-

सती तिथें गेल्यावर दक्षानें तिचा अपमान केला व शिवाची निंदा केली. त्या योगानें सतीला कोप येऊन तिनें योगाग्नि चेतवून त्यांत स्वदेहाचा त्याग केला. पुढें हिमालय पर्वताच्या उदरीं पार्वती या नांवानें जन्मून शिव आपला पति व्हावा एतदर्थ तिनें घोर तपश्चर्या केली व शेवटीं तिनें शिवास पुनः वरिलें.

१. शिवानें त्रिपुरांचा वध केला तेव्हां विष्णूस धनुष्यावर योजावयाचा बाण केलें होतें. या गोष्टीवरून शिवाचा द्वेष करणारे वीरवैष्णव असें म्हणतात कीं, 'त्रिपुरांच्या संहाराचें सर्व श्रेय विष्णूलाच दिलें पाहिजे. कारण त्यानेंच बाणरूपानें सर्वांचा संहार केला. शिवानें कांहींएक केलें नाहीं.' २. (मी) कृष्णानें. ३. यान=वाहन, (येथें) विमान. शाल्व अंतरिक्षांत हिंडणाऱ्या विमानांत राहत असे व त्रिपुरासुर अंतरिक्षांतल्या पुरींत राहत असत. म्हणून शाल्वाला जी त्रिपुरासुरांची उपमा दिली आहे ती योग्य आहे. ४. अंतरिक्षांतून. ५. मोळी (मौलिः)=शिखा, शेंडी, किरीट, मुकुट. (येथें) शिर, मस्तक, डोकें. ६. शाल्वाचा आत्मा. ७. रणभूमीवरील गिधाडांस. ८. समुद्राच्या पोटांत. ९. प्रचंड वातानें, सोंसाट्याच्या हवेनें. १०. यक्षयोनींतील स्त्रिया. यांना कित्येक देवयोनींत गणतात व कित्येक अर्ध देवयोनींत गणतात. यांच्या उत्पत्तीविषयीं अशी गोष्ट सांगतातः—ब्रह्मदेवानीं कांहीं प्राणी उत्पन्न केल्यावर 'किं कुर्मः' (काय करूं) असें ब्रह्मदेवांस विचारिलें. त्यावर ब्रह्मदेवानें 'रक्षध्वम्' (प्राण्यांचें रक्षण करा) असें उत्तर दिलें. हें ऐकून त्यांना आनंद झाला व त्या आनंदाच्या भरांत कित्येकांनीं 'यक्षाम' (पूजन करूं) व कित्येकांनीं 'रक्षाम' (रक्षण करूं) असें म्हटलें; तेच क्रमानें यक्ष व राक्षस झाले. [वाल्मीकिरामायण—उत्तरकांड—सर्ग ४ श्लो० ९-१३ पहा.] हे कुबेराचे सेवक असून त्याच्या धनाचें व बागेचें संरक्षण करीत असतात. हरिविलासांत म्हटलें आहे:—'यक्षोत्तमा यक्षपतिं धनेशं रक्षंति वै प्रासगदादिहस्ताः.' यक्ष हे एक प्रकारचे पिशाच व ते विशेषतः बालकांना त्रास देतात अशी भोळ्या लोकांची समजूत आहे; व या समजुतीला अनुसरून यक्षिणीच्या अनेक गोष्टी रचण्यांत आल्या. ११. 'दैत्यांगना' असाही पाठ आहे. १२. 'विमानभंगतां' असा अन्य पाठ. १३. अशा रीतीनें, फार प्रयासानें—असा भावार्थ. १४. मागें मी नसतांना. १५. अविवेक=मौर्ख्य. पांडवांना द्यूतांत जिंकून वनवासाला पाठविलें हें मूर्खपणाचें कृत्य.

झिये शिरीं । शब्द[1] तुमचा बैसला. ॥ ९५ ॥ त्रयोदश वर्षें होतां पूर्ण । परिहरणें तुमचें ऋण[2] । आधीं गेलिया जीवन[3] । कासया सेतु[4] बांधणें[5]? ॥ ९६ ॥ वनवास लोटलिया पाठीं । पुढां बोलों विचार[6] गोष्टी । आतां आज्ञा देईं भेटी । वसुदेवाचे[7] मज जाणें.' ॥ ९७ ॥ सन्मानुनी धर्मराजातें, । आलिंगुनी भीमपार्थातें, । तैसेची नकुळसहदेवांतें, । स्नेहें भावें गौरवी. ॥ ९८ ॥ द्रौपदीतें शांतवी[8] वचनें, । 'भगिनी[9]! दुःशासनाचें उसनें[10] । फेडीन तेंव्हां तुझिया ऋणें । मुक्त जालों जाण पां. ॥ ९९ ॥ आतां स्वस्थ अंतःकरणीं । अखंड असावें माझिये स्मरणीं । स्वल्पकाळें राज्यासनीं । बैसवीन[11] धर्मातें.'

---

१. शाल्वाला मोठ्या युक्तीनें मारल्याबद्दल लोकांत माझी ख्याति झाली खरी, परंतु कृष्ण पांडवांचा सखा असूनही त्याच्या औदासिन्यानें पांडवांना वनवास भोगावा लागत आहे, असा लोकापवाद माझ्यावर आला, असा कृष्णाच्या म्हणण्याचा भाव. २. ऋण=कर्तव्य, तुम्हांला पुन्हां राज्य देण्याचें काम. ३. पाणी. ४. बांध, धरण. ५. या ओंवीचे दोन उत्तर चरण सुभाषितरूप आहेत. याला समानार्थक म्हण:—'वरातीपाठीमागून घोडा जाऊन काय उपयोग?' 'वयोगते किं वनिताविलासो जले गते किं खलु सेतबंधः?' । तसेंच 'गतोदके सेतुबंधो न कल्याणि! विधीयते.' [वाल्मीकिरामायण—अयोध्याकांड—सर्ग ९ श्लो० ५४.] ६. गेलेलें राज्य दायादांकडून कोणत्या उपायांनीं मिळवितां येईल याचा विचार. ७. यावरून असें दिसून येतें कीं पांडवांच्या वनवासाची गोष्ट ऐकल्याबरोबर वसुदेवाची भेट न घेतांच, कृष्ण रणांगणांतून परस्पर पांडवांकडे आला. अशा रीतीनें आपली कळकळ बाळगणाऱ्या कृष्णावर पांडवांची भक्ति कां राहणार नाहीं? ८. सांत्वी, सांत्वन करी. ९. कृष्ण व द्रौपदी यांचें भावाबहिणीचें नातें असण्याला दोन कारणें आहेत. पहिलें कारण असें कीं पांडवांची आई कुंती ही कृष्णपिता वसुदेव याची बहीण. म्हणजे वसुदेव हा पांडवांचा मामा. मामाची मुलगी करण्याची जी सध्यां कित्येकांत चाल आहे ती पांडवांच्या वेळीं जारीनें प्रचारांत होती. या चालीला अनुसरून कृष्ण पांडवांचा श्याल झाला. अर्थात् पांडवांची स्त्री (ती कृष्णाची बहिण नसली तरी) कृष्णाला भगिनीतुल्य असली पाहिजे. दुसरें कारण असें कीं कृष्णाची बहिण सुभद्रा ही अर्जुनाची बायको; व पांचही पांडवांची स्त्री असल्यामुळें द्रौपदी अर्जुनाचीही स्त्री होती. म्हणजे द्रौपदी कृष्णाच्या बहिणीची सवत (बहिण) होती. अर्थात् कृष्णाचीही ती (द्रौपदी) सुभद्रेची (बहिणीची) सवत म्हणून बहिण झाली. १०. उसनें फेडणें=सूड उगवणें, पारिपत्य करणें, उलटें फेडणें, वैरशुद्धि करणें. ११. 'धर्माला मी राज्यासनीं बसवीन' असें ज्या अर्थीं कृष्ण खातरीपूर्वक सांगतो, त्या अर्थीं मी ईश्वराचा अवतार आहे, मला पाहिजे तें करितां येईल अशा अर्थानें कृष्ण बोलत असेल किंवा पांडवांच्या वेळीं यादव सार्वभौम नव्हते तरी पुष्कळ राजे त्यांच्या आज्ञेनें वागत असत, अशा रीतीनें सार्वभौमत्व नसतांही यादवांनीं पुष्कळ राजे आपले हस्तगत

॥ १०० ॥ रथीं वाहुनी सुभद्रेतें । प्रयाण केलें कृष्णनाथें । अष्टौ भावें पां-

करून ठेविले, तेव्हां पुष्कळ राजांवर आपली सत्ता चालत असल्यामुळें धर्माला राज्य मिळवून देणें कांहीं कठिण नाहीं अशा उद्देशानें कृष्णानें वरील शब्द उच्चारिले असतील.

१. बेऊन, बैसवून. २. ही देवकीवसुदेवांची मुलगी व कृष्णाची सखी बहिण. ही उपवर झाल्यावर दुर्योधनाला द्यावी असें बलरामाच्या मनांत होतें; परंतु अर्जुनाची व सुभद्रेची लहानपणींच प्रीति जडली होती, व कृष्णाच्याही मनांत ही अर्जुनालाच द्यावी असें होतें. पुढें तीर्थयात्रा करीत करीत अर्जुन द्वारकेस आला व यतिरूपानें सुभद्रेचें हरण केलें. हें ऐकून बलरामास फार राग आला परंतु कृष्णाच्या सांगण्यावरून शांत होऊन त्यानें अर्जुनास सन्मानपूर्वक परत बोलावून, त्यास सुभद्रा विवाहविधीनें दिली. ही सुभद्राहरणाची गोष्ट कै० अण्णा किर्लोसकर यांनीं आपल्या 'संगीतसौभद्र' नामक नाटकांत फारच मनोरंजक रीतीनें वर्णिली आहे. ३. आठ सात्विक भाव (शरीरज). सात्विकभाव—हे शरीरविकार आहेत. यांचे चार भेद मानतात. ते असे—"१ **कायिक** २ **मानसिक** ३ **आहार्य** आणि ४ **सात्विक**. (१) **कायिक**—शरीराचे जे चलनवलनादि व्यापार, आणि मनोविकार उत्पन्न झाल्यावर मुखावर होणारीं त्या त्या मनोविकारास योग्य अशीं चिन्हें. हे सर्व कायिक अनुभाव होत. (२) **मानसिक**—जसा मनोविकार उत्पन्न झाला असेल किंवा नाटकांत पात्रास त्या त्या प्रसंगीं जो मनोविकार उत्पन्न झाल्याचें अभिनयानें दाखवावें लागतें, तशी मनाची स्थिति असल्याचें दाखविणें किंवा प्रमोद ब्रह्मानंद समाधि इत्यादिक. (३) **आहार्य**—वेष धरून अभिनयद्वारा जें भाव दाखविणें तें. जसें:—विष्णूचें सोंग घेऊन चतुर्भुज होणें, सोंड लावून गणपति होणें इत्यादिक. ह्याचा नाटकांत मात्र उपयोग आहे. (४) **सात्विक**—सत्वगुणापासून उत्पन्न होणारे जे शारीरिक विकार ते आठ आहेत. त्यांचीं नांवें व लक्षणें:—(१) स्तंभ—शारीरिक सर्व धर्म कायम असतां कांहीं कारणांनीं अकस्मात् गतिनिरोध होतो तो. (२) स्वेद—घाम श्रमापासून उत्पन्न झालेला असला तर तो सात्विक भागांत गणला जाणार नाहीं; कारण तो मनोविकाराचें कार्य नव्हे. (३) रोमांच—क्रोध, भय, हर्ष, राग, इत्यादिकांपासून अंगावर कांटे उभे राहतात ते. (४) स्वरभंग—आवाज बदलणें. सर्दी झाली असतां जो आवाज बदलतो तो मनोविकारजनित नसल्यामुळें स्वरभंग समजूं नये. (५) वेपथु—अंगास कापरें सुटणें. हर्ष, भीति इत्यादिकांपासून हा होतो. साधारण एखाद्या वेळीं अंग कांपूं लागतें त्यास वेपथु म्हणत नाहीं; कारण तो कंप मनोविकारापासून उत्पन्न झालेला नसतो. (६) वैवर्ण्य—शरीराचा रंग पालटणें. (७) अश्रु—स्पष्टच आहे. (८) प्रलय—चेष्टानिरोध. स्तंभांत गतिनिरोध असतो, व ह्यांत चेष्टानिरोध असतो. निद्रेंतही चेष्टानिरोध आणि गतिनिरोध असतो; पण तो मनोविकारजनित नसल्यानें तेथें स्तंभ किंवा प्रलय मानीत नाहींत. येणेंप्रमाणें हे आठ सात्विकभाव आहेत." [रसप्रबोध—पृष्ट ६-८ पहा.]

डवांतें । प्रेमानंद वोसंडे. ॥ १०१ ॥ दिव्यवाजीयुक्त रथ । द्वारकेशीं दा-

१. पांडवांना आनंद होण्याचें कारण 'प्रयाण केलें कृष्णनाथें' हें नव्हे. कृष्णाची भेट झाल्याबद्दल व त्यानें दिलेल्या वचनाबद्दल पांडवांना आनंद वाटला. २. उत्तम घोडे जुंपले आहेत ज्याला असा. ३. द्वारकेविषयीं मागें आम्ही कांहीं माहिती दिली आहे. आतां आम्हांला कै० लोकहितवादी यांच्या ग्रंथांतून द्वारकेविषयीं अधिक उपयुक्त माहिती मिळाली आहे. याबद्दल त्या शोधक पुरुषाचे उपकार मानून ती माहिती वाचकांकरितां येथें देतों:—"द्वारका या चार आहेत; एक गोमती द्वारका, ही स्मार्तांची व वेट द्वारका ही वैष्णवांची आहे. शिवाय कोडीनूर ही मूळची द्वारका होय असें म्हणतात; आणि डाकोरास ही द्वारकेची मूर्ती आहे असें म्हणतात; एकूण चार द्वारका झाल्या. गोमती द्वारकेस शंकराचार्यांचा शारदामठ आहे. तेथें एक डोकी येवढें उंच असें श्रीयंत्र स्थापन केलें आहे. येथील देऊळ विश्वकर्म्यानें बांधिलें असें म्हणतात. येथें जी गाइकवाडांची गादी आहे तीस 'उग्रसेनाची गादी' म्हणतात. मुसलमानी धांदलींत गोडाणा रजपूत यानें या देवळांतील मूर्ति उचलून डाकोरास आणिली ती परत गेली नाहीं. पुढें स्थिरस्थावर झाल्यावर शंकराचार्यांनीं द्वारकेचे देवळांत नवीन मूर्ति बसविली. तेथेंच शंकराचार्यांची गादी आहे. हें पाहून वल्लभाचार्यांचे पुत्र विठ्ठलनाथजी यांनींही असें सांगितलें कीं, 'मला स्वप्नांत विहिरींत श्रीकृष्णमूर्ति आहे ती स्थापावी असा दृष्टांत झाला.' असें सांगितल्यावर त्याप्रमाणें ती मूर्ति सांपडली. तेव्हां तिची स्थापना गोमती द्वारकेपासून दहा कोसांवर दर्यांत जें द्वारका वेट आहे तेथें केली. या बेटद्वारकेंतील हें मंदिर मर्यादी, म्हणजे वल्लभाचार्यांचे रीतीप्रमाणें पांचवेळ पूजा व पांचवेळ दर्शन मात्र व्हावयाचें असून इतर वेळेस देऊळ बंद असतें आणि याच रीतीनें जें देऊळ असेल त्यास मर्यादी असें म्हणतात; व जेथें सर्ववेळ दर्शन होतें त्यास स्मार्तरीतीचें मंदिर म्हणतात. तेथें शंखोद्धार वगैरे अनेक तीर्थें असून अष्टनायकांचीं वगैरे देवळेंही पुष्कळ आहेत. तेथें भाट्ये, वाणी, लवाणे वगैरे वैष्णव फार येतात. येथें गोसांवी महाराजांचे शिष्यांचा अधिकार विशेष आहे. वैष्णवांचे छप्पन्न भोग वगैरे करणें तर येथेंच करितात. येथें देवाचे पैशाचीं दुकानें असून तेथें पैसाही फार आहे. या द्वारकेस जातांना दर्याचे कांठीं आरमुडें म्हणून एक गांव असून तेथें तप्तमुद्रा देतात. त्याचे जवळच गोपीतलाव म्हणून एक गांव असून तेथें चार कोस भूमि सर्व गोपीचंदनाची आहे व त्यामध्यें एक तलावही आहे. तेथें मुद्रा देण्याचा सांप्रदाय पीपाभगत म्हणून होता त्यानें काढिला असें म्हणतात. येथें मिराबाईचें मंदिर आहे. गोमतीद्वारकेस गाइकवाडी मामलेदार राहतात व तो गांव मोठा आहे. गोमतीद्वारकेची गोमती नदी ही खारे पाण्याची असून हें गांव बंदरही आहे. ज्या प्रांतांत ही द्वारका आहे, त्यास उखामंडल असें नांव आहे. हा प्रांत वाईट व खडकाळ असून त्यांत वाघीर लोकांची वस्ती आहे, वाघीर हे क्षत्रियवंशज असून त्यांस कावेही म्हणतात. त्यांनींच कृष्णाचें राज्य घेतलें. (?) पुढें ते १८०२ सालीं दर्यांत जहाजें घालून चोऱ्या वगैरे करूं लागले, याजमुळें इंग्रज व गाइकवाड हे एकत्र होऊन त्यांनीं त्यांचा प्रांत घेतला. व त्यांस पेन्शनें दिलीं. पुढें अलीकडे १८५६ सालीं ह्या वाघीरांनीं पुन: दंगा केला व

रुकें पथ । उल्लंघूनी द्वारकानाथ । द्वारावती पावला. ॥ १०२ ॥ तयापरी धृष्टद्युम्न । घेऊनी द्रौपदीचे[1] नंदन । पांचाळपुरा चालिला, वचन । गोवूनियां नियमाचें. ॥ १०३ ॥ धृष्टकेतु, केकयराजा । घेउनी आपुलालिया

---

त्यांनीं आपल्या प्रांतांतून गाइकवाडी मामलेदार पळवून लाविला. तेव्हां गायकवाडांनीं इंग्रजसरकारची मदत घेऊन बार्टनसाहेब याचे सहायानें तो दंगा मोडून वाघीरांचें गांव उजाड करून टाकिलें. त्यांनीं दहा वर्षें हा दंगा केला होता व त्यांत दोन्ही द्वारकेचें सर्व धन लुटीस गेलें होतें परंतु देऊळ मात्र कायम राहिलें. हें देऊळ फार सुंदर व उंच असून तें पांच कोसांवरून दिसतें. द्वारकेस जाणें तें कोणी दर्यांतून जातात, कोणी राजकोटावरून जातात व कोणी पंचतीर्थी करीत दर्याचे कांठानें जातात. पंचतीर्थांत पहिलें तीर्थ तुळशीश्याम हें गीरपर्वतांत असून तेथें गोड्या पाण्याचीं उष्ण कुंडें आहेत; दुसरें तीर्थ सोरटी सोमनाथ; तिसरें पोरबंदर उर्फ सुदामपुरी; चौथें माधवपुर, येथें मधुवनांत श्रीकृष्णाचा व रुक्मिणीचा जो विवाह झाला त्याचें बाहुलें आहे. आणि पांचवें द्वारकाक्षेत्र." [लोकहितवादीकृत उपयुक्त माहिती—भाग २ पृ० ८.] या चार द्वारकांपैकीं कोणत्या द्वारकेंत कृष्ण राहत होता, याचा शोध लागला नाहीं. ४. 'दारुकें' याचे तीन अर्थ होऊं शकतात. (१) दारुक नामक वनाच्या मार्गानें म्हणजे त्या वनांतून असा अर्थ. दारुक नामक वन फार प्रख्यात नाहीं तरी **'शिवतत्वसुधानिधि'** नामक शैवग्रंथांत या वनाविषयीं थोडी माहिती मिळते. या वनांत अनेक मोठमोठे ऋषि तपश्चर्या करीत असत. एकदां शिव व विष्णु यांनीं अनुक्रमें नवऱ्या बायकोचें रूप घेऊन व नग्न होऊन या वनांत संचार करण्याचा क्रम सुरू केला. शिवाच्या सौंदर्याला मोहित होऊन त्या वनांतील सर्व ऋषिस्त्रिया आपल्या पातिव्रत्याचा भंग करण्यास उद्युक्त झाल्या व स्त्रीरूपी विष्णूच्या सौंदर्यानें ऋषींचे तरुण पुत्र मोहित झाले. अशा रीतीनें दारुक वनांत एकच गडबड उडून गेली. तेव्हां सर्व ऋषि, हे हरिहर आहेत असें न ओळखल्यामुळें, त्या दंपतीवर रागावले, आणि 'आपलें लिंग काढून टाक' असें ते शिवास म्हणाले व शिवानें तसें केल्यावर सध्यां आपण पूजा करितों त्या महादेवाच्या पिंडीची उत्पत्ति झाली. हें वन द्वापारयुगांत होतें किंवा नाहीं याबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. व हें वन हिंदुस्थानच्या कोणत्या भागांत होतें हेंही समजत नाहीं. (२) कृष्णाच्या सारथ्याचें नांव दारुक याच्या योगानें (म्हणजे यानें रथ जलद चालविल्यामुळें) कृष्ण द्वारकेला पोहोंचला, असा सांगण्याचा उद्देश. (३) दारुक म्हणजे देवदारु वृक्ष. दारुकें पथ=देवदारुवृक्षांनीं भरलेला मार्ग.

१. द्रौपदीला पंचपांडवांपासून पांच पुत्र झाले. ते येणेंप्रमाणें:—धर्मापासून प्रतिविंध्य, भीमापासून श्रुतसेन, अर्जुनापासून श्रुतकीर्ति, नकुलापासून शतानीक, सहदेवापासून श्रुतकर्मा. हे सर्व भारतयुद्ध संपेपर्यंत जीवंत होते व निजलेले असतांना अश्वत्थामाकडून मारले गेले. [मोरोपंत—वनपर्व—अ० २ गीति ३८-४० पृष्ठ १८-१९.] २. 'वचन गोवूनियां नियमाचें'—वचन देऊन, तेरा वर्षें झाल्यानंतर कौरवांशीं युद्ध करून तुम्हांला राज्य मिळवून देण्यास येईन असें सांगून.

अनुजा । 'कौरववधा येतसों' पैजा । बोलोनियां चालिले. ॥ १०४ ॥ कृष्ण आणि धृष्टद्युम्न । यांनीं धनें दिव्य वसनें, । वोपिलीं तितुकीं कुरुभूषणें । ऋषीश्वरां अर्पिलीं. ॥ १०५ ॥ ऋषिब्राह्मणसहित प्रजा । वनीं विराजे धर्मराजा । कथा कीर्तनें परम वोजा । काळ सार्थक[1] करितसे. ॥ १०६ ॥ सांडूनियां काम्यकारण्या । पुढें पातले अद्वैतवना[2] । यावरी वर्तलें तें मना । चतुर श्रोतीं जाणावें. ॥ १०७ ॥ इति श्रीमहाभारते वनपर्वणि । कथा कामधेनुजननी । चतुर्विध[3] पुरुषार्थ सुधापानीं । तोषवीत जगातें. ॥ १०८ ॥ लीलाविश्वंभर[4]-पदनखा । उपमा तुळे बोधें[5] यमका । मुक्तेश्वर निष्कलंकरेखा । चित्त केलें आपुलें[6]. ॥ १०९ ॥

---

## अध्याय चवथा.

द्वारके गेलिया घनश्याम[7] । अद्वैतवनीं[8] राजा धर्म । जपी, तपी, सिद्ध परम । तयासंगें तोषले. ॥ १ ॥ पांचही बंधू आणि द्रौपदी । धौम्य सर्व ज्ञानाचा उदधी[9] । धर्मकर्म यथाविधी । सांगोपांग संपादी[10]. ॥ २ ॥ पौ[11]-रजनीं पांडवांप्रती । अपार अर्पिली धनसंपत्ती । ते ब्राह्मणां अर्पुनी[12] पुढती ।

---

१. सदुपयोग. २. मूळ भारतांत द्वैतवन असें आहे. पोथी पाहत भाषांतर न केल्यामुळें नांवासंबंधाची ही चूक झाली असें वाटतें. ३. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष. ४. लीला ही मुक्तेश्वराची आई व विश्वंभर हा त्याचा पिता. या दोहोंवर मुक्तेश्वराची पूर्ण भक्ति होती. ५. 'परम तयोम एका' असाही पाठ आहे. ६. 'पाहिजे' असा अन्य पाठ. ७. कृष्ण. ८. वनपर्व–अध्याय २३-२४ पहा. ९. समुद्र. १०. करीत असे, आचरीत असे. ११. पुरांत राहणाऱ्या जनांनीं, नगरवासी लोकांनीं. पांडवांच्या आज्ञेवरून सर्व नगरवासी जन परत निघून गेले, फक्त ब्राह्मण मात्र निघून गेले नव्हते असें मागें सांगितलें आहे. तेव्हां पांडवांना अपार संपत्ती देणारे हे पौरजन कोठून आले अशी शंका येण्याचा संभव आहे. हस्तिनापुरांतून पांडवांबरोबर आलेले पौरजन परत गेले ही गोष्ट खरी आहे, परंतु हे पौरजन व ते पौरजन एक नव्हते असें दिसतें. सध्यां पांडवांना धन देणारे पौरजन कृष्ण, धृष्टद्युम्न इत्यादि मंडळी पांडवांना पाहण्याकरितां येत असतां त्यांच्याबरोबर पांडवांच्या दर्शनाला आलेले इतर नगरवासी असावे असें दिसतें. १२. पौरजनांकडून मिळालेली संपत्ती पांडवांनीं ब्राह्मणांस दिली, यावरून संकटांत ही पांडव आपलें. कर्तव्य विसरत नव्हते हें व्यक्त होतें. आश्रितांना साहाय्य करणें हें प्रत्येक गृहस्थाचें कर्तव्य आहे व तें पांडवांनीं अरण्यवासांतही केलें.

प्रजा[1] मानें बोळविल्या[2]. ॥ ३ ॥ अद्वैतवना पहातां दृष्टी । शाल[3], तमाल[4], वृक्ष-
दाटी[5] । आम्र, मधु[6], कदंब[7] कोटी[8] । कर्णिकार[9] लागले. ॥ ४ ॥ हंस, मयूर,
पिक[10]पक्षी । शब्द करिती सुफळ[11] वृक्षीं, । तें कौतुक पहातां चक्षीं[12] । परम अ-
ल्हाद समस्तां. ॥ ५ ॥ सरस्वती[13] सरळ[14] वाणी । ऋषि गर्जती वेदध्वनी[15] । तंव
तेथें मार्कंडेय[16] मुनी । धर्मभेटी पातला. ॥ ६ ॥ पूजा सन्मान संतोषीं । घे-

---

१. पौरजन, नागरिक. २. 'बहु सन्मानें गौरविलें' असाही पाठ आहे. ३. साग्याचें झाड. उंच मनुष्याला कविजन या झाडाची उपमा देतात. उ० 'व्यूढोरस्को वृषस्कंधः शालप्रांशुर्महाभुजः' [कालिदासकृत रघुवंश—सर्ग पहिला श्लो० १३ पहा.] ४. ताडाचें झाड. ५. प्रचंड समूह. 'तालदाटी' असाही पाठ आहे. ६. यास हरणवेल किंवा हरणदोडी म्हणतात. ७. यास प्राकृतांतही कदंब असेंच म्हणतात व कोठें कोठें कळंबाचें झाड असेंही म्हणतात. ८. असंख्यवृक्ष. ९. 'द्रुमोत्पलः । कर्णिकारपरिव्याधो' इत्यमरः. याला प्राकृतांत पांगाऱ्याचें झाड म्हणतात. १०. कोकिळपक्षी. मृदुस्वराविषयीं याची प्रख्याती आहे. 'वनप्रियः परभृतः कोकिलः पिक इत्यपि' इत्यमरः. ११. फलांनीं भरलेल्या झाडांवर. पिकलेल्या फलांनीं युक्त असल्यामुळें वृक्ष फारच मोहक दिसत होते व त्यावर पक्षी बसून सुस्वर गायन करीत असल्यामुळें ते विशेषच चित्ताल्हादक दिसूं लागले असा कवीचा सांगण्याचा भाव. जेथें जेथें सज्जन जातील तेथें तेथें त्यांना आनंद होईल अशाच वस्तू राहतील असें दाखविण्याचा कविजनांचा नेहमीं यत्न चाललेला असतो. १२. डोळ्यांनीं. १३. सरस्वती ही विद्येची अधिष्ठात्री देवता. (ग्रीक व रोमन लोकांतही अशी देवता होती. तिला मिनर्वा (Minerva) म्हणत असत.) ही ब्रह्मदेवाची स्त्री. हिचें वाहन मयूर. ही विद्येची देवता असून ही ब्रह्मदेवाजवळ अद्यापपर्यंत विद्याध्ययन करीत असते अशी समजूत आहे. सरस्वती ही गणपतीची बायको आहे अशी जी लोकांत समजूत आहे तिला कोठें आधार नाहीं. १४. 'विशाल वनीं' असाही पाठ आहे. १५. वेदपठन. वेदपठन करण्याची चाल ही फार जुनी आहे असें दिसतें व तीच चाल अद्यापपर्यंत चालत आली. वेद म्हणणाऱ्या ब्राह्मणांत 'घनपाठी' व 'जटापाठी' म्हणून जे दोन प्रकार आहेत ते ही चाल जारीनें चालत असतांना उद्भवले असावेत असें वाटतें. असो. एकीकडून वेदश्रवण व दुसरीकडून पक्ष्यांचे मंजुलशब्द या दोहोंमुळें पांडव आपलें दुःख विसरले—असा भावार्थ. १६. हा मृकंड ऋषीचा मुलगा. 'अपुत्रस्य गतिर्नास्ति' याप्रमाणें आपली स्थिति न व्हावी म्हणून मृकंडऋषीनें भार्येसह घोर तपश्चर्या केली. तपाच्या अंतीं शंकर प्रसन्न झाला व 'काय वर पाहिजे?' म्हणून विचारूं लागला. तेव्हां 'मला पुत्र पाहिजे' असा मृकंड ऋषीनें वर मागितला. 'तुला दीर्घायुष्यी मूर्ख मुलगा पाहिजे कीं फक्त सोळा वर्षांपर्यंत जिवंत राहणारा सद्गुणी मुलगा पाहिजे?' असा शंकरानें ऋषीस उलट प्रश्न केला. त्यावर 'अल्पायुषी तरी कबूल परंतु सद्गुणीच मुलगा मला पाहिजे' असें ऋषीनें म्हटल्यावर 'तथास्तु' म्हणून शंकर अंतर्धान पावला. नंतर मृकंडाला हा मार्कंडेय नांवाचा मुलगा

ऊनी तोषला पुण्यराशी; । अवलोकुनी मग धर्मासी । हास्य करी [1]संतोषें. ॥ ७ ॥ धर्म म्हणे, 'करुणाराशी! । आमुची दशा देखोनि ऐशी । खेद मानिती देवर्षी । स्वामी हास्य किमर्थ?' ॥ ८ ॥ मार्कंडेय म्हणे, 'सुमती! । तुज देखोनी माझ्या चित्तीं । आठवला पवित्रकीर्ति । [3]दाशरथी श्रीराम. ॥९॥ जीर्ण वस्त्रातुल्य [4]धरणी । त्याग करूनी [5]पितृवचनीं । सहवर्तमान [6]बंधु [7]पत्नी । [8]दंडकारण्यीं राहिला. ॥ १० ॥ चौदा वर्षें वनवास । करितां [9]कांहीं न मानी त्रास । [10]शक्ति असोनी अधर्मलेश । [11]नातळेच तयातें. ॥ ११ ॥ बळें [12]शंका-

---

झाला. सोळा वर्षें झाल्यानंतर मृत्यूच्या दिवशीं हा देवालयांत बसून शिवाची आराधना करूं लागला. याच्या भक्तीला शंकर प्रसन्न होऊन त्यानें याला (मार्कंडेयाला) यमाच्या पाशापासून सोडविलें व 'तूं चिरायु हो' असा यास वर दिला. या मार्कंडेयाच्या चरित्रावर आंध्र भाषेंत उत्तम नाटक झालें आहे. 'अष्टादशपुराणानां कर्ता सत्यवतीसुतः' अशी जरी सामान्य समजूत आहे तरी मार्कंडेय पुराणाचा कर्ता हाच मार्कंडेय असावा अशी एक विशेष समजूत आहे.

१. येथें 'संतोषें' म्हणजे 'आनंदानें' असा अर्थ घेऊं नये. संतोषाचा 'आश्चर्य' असा अर्थ घ्यावा. कारण पांडवांना संकटांत पाहून मार्कंडेय ऋषीला कधींही आनंद होणार नाहीं. रामासारखीच पांडवांची स्थिति झाल्यामुळें इतिहासाची पुनरावृत्ती झाली हें पाहून मार्कंडेयाला आश्चर्य वाटलें व म्हणूनच मार्कंडेय हंसले. येथें हंसणें हा आनंदाचा परिणाम नसून आश्चर्याचा परिणाम होय. २. 'हास्य' यापुढें 'केलें' अध्याहृत आहे असें समजावें. ३. दशरथाचा मुलगा. फक्त राम म्हटल्यास तीन रामांचा बोध होतो. हे एकनेकांपासून ओळखतां यावे म्हणून एकाला दाशरथी राम, दुसऱ्याला परशुराम व तिसऱ्याला बलराम असें म्हणतात. दशरथ हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न रघुराजाचा पौत्र व अजराजाचा पुत्र होय. (अध्याय २५ पहा.) ४. पृथ्वी. ५. चौदा वर्षें अरण्यांत वास कर असें दशरथानें सांगितल्यावरून. ६. लक्ष्मण. ७. जनकराजाची मुलगी सीता ही रामाची पत्नी. ८. विंध्याद्रि व शैवलपर्वत या दोहोंमधील वनप्रदेश. पूर्वीं या जागीं मोठें राज्य होतें व इक्ष्वाकुकुलांतील दंडक नामक राजा येथें राज्य करीत होता. हा राजा जन्मापासून मूर्ख व उन्मत्त असल्यामुळें यानें एकदां आपल्या गुरूच्या मुलीवर बलात्कार केला. याबद्दल गुरूला फार क्रोध येऊन 'हा राजा, बल, कोश इत्यादिकांसहित एका सप्तकांत भस्म होईल' असा त्यानें राजास शाप दिला. त्या शापामुळें राजा भस्म झाला व त्याचा चतुःशतयोजनप्रमाण देश अरण्यमय झाला. म्हणूनच या अरण्याला दंडकारण्य असें नांव पडलें. ९. 'तिळतुल्य' असाही पाठ आहे. १०. रामाच्या शक्तीविषयीं व त्याच्या पितृभक्तीविषयीं कौसल्या दशरथास म्हणते, 'न चेमां धर्षणां रामो व्यसहिष्यदमर्षणः । नाधारयिष्यद्यदि ते गौरवं मंदरोपमम् ॥ शितैः शरैः स हि क्रुद्धो दारयेदपि मंदरम् । त्वां तु नोत्सहते हंतुं धर्मात्मा पितृगौरवात् ॥ ससोमार्कग्रहगणं नभस्ताराविचित्रितम् । पातयेद्यो विभुः क्रुद्धः सत्यान्न

हुनी [१]आगळा, । शिक्षा करूं शके [२]कळिकाळा, । परी नुलंघी धर्मागळा । सत्य भंगेल म्हणोनियां. ॥ १२ ॥ **भ**रतादिकीं [३]**पु**ण्यश्लोकीं । राज्य त्यजूनी राहिले [४]जपीं । सत्यच एक जोडिले लोकीं । म्हणोनी झालीं [५]**पु**राणें. ॥ १३ ॥ सत्यचि एक महाबळ । ज्याचा निश्चयो अढळ । ते पावती कैवल्यफळ । पृथ्वीतळ तें किती? ॥ १४ ॥ जैसा **दा**शरथी **राम** । तैसाच तूंही **पां**डव **धर्म** । सत्य संरक्षणें [६]काम । पूर्ण होती पैं तुझे.' ॥ १५ ॥ ऐसें सांगोनी **ध**र्मातें । आज्ञा पुसोनी **धौ**म्यातें । **मा**र्कंडेय [७]उत्तरपंथें । जाता झाला तपार्थ. ॥ १६ ॥ **मा**र्कंडेय गेलियावरी । [८]बकदाल्भ्य त्या [९]अवसरीं । **ध**र्माप्रती येउनी करी ।

---

व्यतिवर्तते ॥ आचालयेद्दारयेद्वा महीं शैलगताचिताम् । यस्तेजस्वी स ते पुत्रो गौरवान्नातिवर्तते ॥" [वाल्मीकिकृत रामायण.] ११. न स्पर्शे. 'नातळे चित्तीं तयाचे' असाही पाठ आहे. १२. इंद्राहून.

१. अधिक. २. यमास. ३. पुण्य (पवित्र) आहे श्लोक (कीर्ति) ज्यांची अशांनीं. 'पुण्यश्लोक' चार झाले:—'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' श्लोक=कीर्ति ['पद्ये यशसि च श्लोकः' इत्यमरः.] ४. **राम** अरण्यांतून परत येईपर्यंत **भ**रत **नं**दिग्रामीं **'रा**म'नाम जप करीत वैराग्यवृत्तीनें राहत असे. 'प्राण वेंचुनी पुण्यजनकीं' असाही पाठ आहे. ५. अठरा पुराणें आणि अठरा उपपुराणें. ६. इच्छा, मनोरथ. ७. उत्तरहिंदुस्थानांत पुष्कळ पुण्यतीर्थें व अनेक तपोवनें असल्यामुळें ऋषि व मुनि तपश्चर्या करण्याला नेहमीं उत्तरेकडेच जात असत. शिवाय उत्तरेस **हि**मालय असल्यामुळें त्या पर्वताच्या गुहा योगीजनांस फारच उपयोगाच्या आहेत. थोड्याच दिवसांमागें एका बंगाली गृहस्थानें हिमालयावर **'सिद्धाश्रम'** नांवाचें ऋषींचें वसतिस्थान पाहून आल्याबद्दल वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें होतें. यावरून पूर्वींपासूनच उत्तरहिंदुस्थानांत योगिजनांचा भरणा फार होता असें दिसतें. दक्षिणेकडे फार योगी राहत नव्हते याचें कारण असें दिसतें कीं तिकडे त्यांना राक्षस किंवा अनार्य लोकांपासून फार त्रास होत असे. याची **रा**मायणच साक्ष देत आहे. उत्तरेकडे पवित्र क्षेत्रें व योगिजन असल्यामुळें 'उत्तरयात्रेस जातों' या शब्दाचा अर्थ 'वैराग्य उत्पन्न झाल्यामुळें मी कुटुंब सोडून मोक्ष साधण्याकरितां चाललों' असा होऊं लागला. ८. या नांवाचा एक ऋषि. चिरंजीवीस सुखें व दुःखें कोणतीं असतात, त्यांविषयीं याचा व **इं**द्राचा संवाद झालेला होता (भार० वन० अ० १९३). अश्वमेध यज्ञ पांडवांनीं केला तेव्हां त्यांचा अश्व फिरत फिरत याच्या आश्रमाजवळ गेला; त्यामागून **अ**र्जुनादिक वीर चालले असतां मस्तकावर वटपत्र घेऊन उभा राहिलेल्या या ऋषीस त्यांनीं पाहिलें. त्याकाळीं **अ**र्जुनानें यास वंदन करून मस्तकावर वटपत्र घेण्याचें कारण विचारिलें. यानें 'छायेनिमित्त' म्हणून उत्तर देतांच 'आपण गृह कां बांधित नाहीं?' असा **अ**र्जुनानें प्रश्न केला, त्याचें उत्तर यानें 'आयुष्य अल्प आहे' असें दिलें. पुनः **अ**र्जुन म्हणाला, 'आपलें आयुष्य किती गत झालें?' यानें उत्तर दिलें, 'मी **ब्र**ह्मदेवाचीं वीस अहोरात्रेंच [त्रेचाळीस लक्ष वीस

निरूपण स्वमुखें. ॥ १७ ॥ ऋषी बोले सत्य वचन, । 'धर्मराया! तूं सर्वज्ञ । श्रेय[1] सिद्धीचें[2] कारण[3] । ओळखिलें त्वां येर्के[4]. ॥ १८ ॥ पवित्र ब्राह्मणांची संगती, । पवित्र ब्राह्मणांप्रति पाळिती, । पवित्रांची[5] सेवा करिती, । त्या नरां संपत्ति वोळगण्या[6]. ॥ १९ ॥ अरण्यवासीं[7] ऋषीश्वर । समीप पाळिशी शतसहस्र; । हे[8] लक्ष्मीदाते[9] ईश्वर । तुझ्या दारीं तिष्ठती. ॥ २० ॥ ब्राह्मण क्षत्रि-

---

सहस्र मानवी वर्षांचा एक पर्यय (चौकडी); असे सहस्रपर्यय झाल्यानें ब्रम्हदेवाचा एक दिवस होतो व तितक्याच प्रमाणाची याची रात्र होते] काय तीं पाहिलीं.' (जैमिनि अश्वमेध—अ० ६०). त्यावरून अर्जुनास अतिशय आश्चर्य वाटलें. नंतर उभयतांचा बराच संवाद होऊन कृष्णानें यास शिबिकेंत बसवून अश्वमेधार्थ हस्तिनापुरीं नेलें.' [भा० प्रा० ऐ० कोश.] ९. प्रसंगीं.

१. श्रेय=पुण्य, कल्याण. 'स्याद्धर्ममस्त्रियां पुण्यश्रेयसी सुकृतं वृषः' [अमरकोश—प्रथमकांड—कालवर्ग—श्लोक२४.] २. सिद्धी=कार्य सिद्धी. योगशास्त्रांत आठ प्रकारच्या सिद्धी मानिल्या आहेत:—'अणिमा, लघिमा, प्राप्तिः, प्राकाम्यं महिमा तथा । ईशित्वं च वशित्वं च तथा कायावसायिता.' अणिमा=वाटेल तेव्हां सूक्ष्मरूप घेऊन अणूयेवढें बनणें; लघिमा=पाहिजे तेव्हां शरीराचें वजन पाहिजे तितकें हलकें करणें; प्राप्तिः=इच्छित वस्तू योगसाधनानें मिळविणें; प्राकाम्यम्=दुर्निवार इच्छा व ती पूर्ण करण्याची शक्ति असणें. महिमा=पाहिजे तेवढें मोठें रूप धारण करणें; ईशित्वम्=इतरांपेक्षां श्रेष्ठत्व असणें. वशित्वम्=सर्व इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवणें. या आठ सिद्धी साध्य झाल्यास मनुष्य सर्व प्रकारें सुखी असतो अशी समजूत आहे. या आठ सिद्धी साध्य आहेत किंवा काल्पनिक आहेत हें सांगतां येत नाहीं. परंतु नीलकंठस्वामी नांवाचे योगी बेङ्गारिकडच्या चिंतामणि पीठाचे अधिपति आहेत. यांना या अष्ट सिद्धी साध्य आहेत असें विश्वसनीय माहितीवरून कळतें. यांचे दक्षिणेकडे अनेक शिष्य आहेत. हे स्वामी आपल्या शिष्यांपैकीं ज्यांना जी सिद्धी शिकण्याची इच्छा असेल त्यांना ती शिकवितात. आमच्या वाचकांपैकीं जे शोधक असतील त्यांनीं वरील स्वामींच्या द्वारें या सिद्धींच्याविषयीं कांहीं अधिक माहिती मिळवून जगापुढें मांडावी अशी आमची सूचना आहे. कै० महादेव मोरेश्वर कुंठे 'षड्दर्शनचिंतनिका'कर्ते यांचा या सिद्धींवर भरंवसा व तत्प्राप्तीसाठीं त्यांचा यत्नही चालू होता असें ऐकिण्यांत आहे. ३. येथें 'कारण' म्हणजे 'साधन' श्रेय व सिद्धि मिळविण्याचें साधन असा भाव. येथें साधन म्हणजे कारण असें समजावें. कारण करणाची व्याख्या देतांना 'तर्कसंग्रह'कार म्हणतात 'असाधारणं कारणं' या व्याख्येप्रमाणें येथच्या 'कारण' या शब्दाचा करण (साधन) असा अर्थ करितां येतो. ४. हें पांडवांनीं ओळखिलेलें. श्रेयाचें व सिद्धीचें एक साधन कोणतें हें पुढच्या ओवींत सांगितलें आहे. ५. 'ईश्वरार्चनें दिवस लोटिती' असाही पाठ आहे. ६. गळा पडणाऱ्या. ७. गादीवर बसून सार्वभौमपद भोगित असतां अनेक ऋषी बरोबर बाळगणें आश्चर्याची गोष्ट होणार नाहीं; परंतु राज्यभ्रष्ट होऊनही अनेक ऋषी बरोबर बाळगतो म्हणून बकदाल्भ्य धर्माची विशेष स्तुती करितात. ८. 'तेथें लक्ष्मीशीं ईश्वर' असा अन्य पाठ आहे. ९. संपत्ती देणारे; कारण ऋषींना असाध्य अशी कोणतीही गोष्ट नाहीं.

यांचें [1]बळ । ब्राह्मण क्षत्रियां क्षेम कुशळ; । करूनी शत्रूचें निर्मूळ । पृथ्वीतल भोगिशी. ॥ २१ ॥ ब्राह्मणांचें आशीर्वचन । तें क्षत्रियां शस्त्र बाण । ब्राह्मणकृपेचें अंगत्राण । वज्रकवच अक्षयी. ॥ २२ ॥ ब्राह्मण कोणते म्हणशी सृष्टी । जे कां वसती तुझ्या निकटीं । ऐशिया ब्रह्मांडांच्या कोटी । [2]रचूं शकती संकल्पें. ॥ २३ ॥ जेव्हां दृष्टी होई वांकुडी । तेव्हां त्रैलोक्य [3]जाळुनी सांडी । ऐशी ब्राह्मणांची [4]प्रौढी । तूं जाणशी सर्वज्ञा. ॥ २४ ॥ काम, क्रोध, लोभ मेळ । [5]वाचे हो नेदी सकळ । हा विलास सर्व काळ । ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणीं. ॥ २५ ॥ जया सर्वत्र ब्रह्मसृष्टी । [6]ब्रह्मबोधें तोषले पोटीं । ब्रह्म जाणोनी लोकीं रहाटी । [7]सदाचार वर्ततां. ॥ २६ ॥ [8]हृदयवृत्ती [9]वृत्तसंपन्न । अग्नीसेवा, वेदाध्ययन । [10]शमदमयुक्त तपोधन । सुख संतोषें संतुष्ट. ॥ २७ ॥ [11]पवन, [12]पावक, एकमेळीं । काननें जाळिती समूळीं, । [13]तेंचि मंत्रें शस्त्रहोळी ।

---

१. ब्राह्मणांच्या वेदाध्ययनाचें व तपश्चर्येचें बल व क्षत्रियांच्या युद्धकलेचें व शौर्याचें बल. ब्राह्मण हे क्षत्रियांचे आश्रित असल्यामुळें आपल्या तपश्चर्येचा कांहीं भाग ते क्षत्रियांनाही देत असत; व ब्राह्मण क्षत्रियांचे धर्मगुरु असल्यामुळें क्षत्रिय वीर स्वपराक्रमानें संकटांपासून ब्राह्मणांचें रक्षण करीत. अशा रीतीनें 'ब्राह्मण क्षत्रियांचे बळ' 'ब्राह्मण क्षत्रियां क्षेम कुशळ' होत असे. २. उत्पन्न करण्यास समर्थ आहेत. एकदां विश्वामित्र व वशिष्ठ यांच्यांत कांहीं वाद पडून वाद तोडण्याकरितां ते इंद्राकडे गेले. 'वाद तोडण्याकरितां मला मदत करण्यास सूर्य, चंद्र व शेष यांना घेऊन या' असें इंद्रानें सांगितलें. यावरून विश्वामित्र त्या तिघांना आणण्याकरितां गेले. परंतु सूर्य, चंद्र व शेष हे तिघेही आपआपल्या जगत्संरक्षणकार्यांत निमग्न असल्यामुळें 'आमचें काम करण्यास कोणी तयार असेल तर आपलीं कामें सोडून येऊं' असें त्यांनीं सांगितलें. सूर्यचंद्रादिकांच्या बदली देण्यास योग्य असें कोणी देण्यास नसल्यामुळें विश्वामित्र निरुत्साह होऊन परत आले. नंतर सूर्यादिकांना आणण्यास वशिष्ठ गेले; व आपण केलेल्या तपश्चर्येपैकीं एका दिवसाच्या तपश्चर्येच्या योगानें मूळच्या सूर्यचंद्रादिकांच्या जागीं नवीन सूर्यचंद्रादिक उत्पन्न करून मूळचे सूर्य, चंद्र व शेष यांस इंद्रसभेंत घेऊन आले! यावरून तापसी ब्राह्मणांना 'ब्रह्मांडाच्या कोटी' उत्पन्न करण्याची शक्ति होती हे उघड आहे. ३. दंडक राजाला त्याच्या राज्यासह भस्म केल्याची गोष्ट मागें सांगितलीच आहे. कपिलाच्या कोपानें सगराचे साठ सहस्र पुत्र दग्ध झाले ही गोष्ट प्रसिद्धच आहे. ४. महिमा. ५. 'वाचा होऊं नेदी विफळ' असाही अन्य पाठ आहे. ६. ब्रह्मसंबंधी बोधानें, तत्वविचारानें. ७. 'मंदाचार' असाही पाठ आहे. ८. 'द्वादशाग्नि व्रतसंपन्न'. असाही पाठ आहे. ९. संतोषयुक्त. १०. शम आणि दम हे तापसी जनांचे मुख्य गुण होत. शम म्हणजे शांति. 'शमथस्तु शमः शांतिः' इत्यमरः. दम म्हणजे इंद्रियनिग्रह. 'निग्रहो बाह्यवृत्तीनां दम इत्यभिधीयते.' ११. वायु. १२. अग्नि. १३. 'तेवीं मंत्र' असाही पाठ आहे.

शत्रुकुळातें होतसे. ॥ २८ ॥ भृगु[1], अंगिरा[2], वशिष्ठ[3], । कश्यप[4], आत्रेय[5], अगस्त्य, श्रेष्ठ । हे मुख्य करुनी ब्रह्मनिष्ठ । असंख्य वसती तव संगीं. ॥२९॥ त्या ब्राह्मणांचे सेवेस्तव[6] । इच्छिलें पावशी सुखवैभव.' । ऐसें बोलोनी महानु[7]-भाव । जाता झाला स्वआश्रमा. ॥ ३० ॥ व्यास[8], नारद[9], जांमदग्न्य[10], । पृथुश्रवा[11], इंद्रद्युम्न[12] । काश्यप[13], हारीत[14], स्थूणकर्ण[15], । भालुकी[16] आणि बृहदश्वा[17]. ॥ ३१ ॥

---

१. त्रिमूर्तींची परीक्षा करितांना विष्णूच्या छातीवर लाथ मारणारा हाच ऋषि. २. हा एक ब्रह्ममानसपुत्र होय. हा बृहस्पतीचा पिता. ३. रघुकुलोत्पन्न राजांचा पुरोहित. ४. ब्रह्ममानसपुत्रांतील एक. इंद्र, वामन व दैत्य यांचा पिता. ५. अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि. ६. सेवा केल्यामुळें. 'इच्छिलें पावशी सुखवैभव' याला कारण ब्राह्मणांची सेवा होय असें समजावें. ७. 'महानुभव' असाही पाठ आहे. 'महानुभव' म्हणजे ज्याला जगताविषयींचा अनुभव फार आहे असा. यानें ब्रह्मदेवाचीं वीस अहोरात्रें पाहिलीं होतीं म्हणून हें विशेषण या ऋषीला शब्दशः शोभतें. ८. **व्या**स म्हणजे वेदविस्तार करणारा. म्हणूनच याला वेदव्यास असें म्हणतात. हा **म**हाभारताचा कर्ता; व कित्येकांच्या मतें अष्टादश पुराणांचाही कर्ता हाच. ९. नारद. [ब्रह्मदेवाच्या शरीरापासून—मांडीपासून—झालेला नारद. नार=पाणी, द=देणारा. जो पितरांना पाणी (नार) देतो तो नारद. 'नारं पानीयमित्युक्तं तत्पितृभ्यः सदा भवान् । ददाति तेन ते नाम नारदेति भविष्यति ॥' **हरिवंश** नामक ग्रंथांत या देवर्षीचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—याची अंगकांति प्रज्वलिताग्नीप्रमाणें देदीप्यमान आहे, नेत्राची चकाकी बालार्कसदृश आहे, मस्तकावर जटाभार उन्नमित करून बांधला आहे. याचें शरीर सुवर्णालंकारांनीं भूषित केलेलें आहे. सखीप्रमाणें यानें आपल्या कक्षपुटांत एक मोठी वीणा बाळगली आहे. चंद्ररश्मीप्रमाणें शुक्लांबर धारण केलें आहे, कृष्णमृगचर्मनिर्मित उत्तरीयवस्त्रानें आपली काया आच्छादन केली आहे, दंडकमंडलु घेतलें आहे व हा कोणी दुसरा इंद्र आहे असा भास होत आहे. हा जगांतील गुप्त कलहांचा जाणणारा आहे. स्कंदासारिखा ब्रह्मचारी आहे. या महर्षीस कलहप्रिय देखील म्हणत असतात. हा विद्वान् आहे व तसाच गायनकलेंत निष्णात आहे. हा ब्रह्मसूनु आहे व जणूं काय अन्यकलीच आहे. देव व गंधर्वलोकांचा आदिवक्ता व मुनिश्रेष्ठ आहे. हा चारी वेद पठण करणारा आहे व मुख्य मुख्य याज्ञिकांकडून गाइला जाणारा आहे. या ब्रह्मर्षीस नारद म्हणत असत, हा चिरंजीव आहे व याचा ब्रह्मलोकांत संचार आहे.] १०. **ज**मदग्नीचा पुत्र. हा जमदग्नीचा पुत्र कोण असावा हें बरोबर समजत नाहीं. कारण जमदग्नीला **रु**मण्वान्, **सु**षेण, **व**सुमान्, विश्वावसु व **प**रशुराम असे पांच पुत्र होते. या पांचांनाही **जा**मदग्न्य म्हणतां येईल. ११. हा एक ब्रह्मर्षि होता. १२. या नांवाचा एक मोठा राजर्षि होऊन गेला. यानें मोठमोठे अनेक यज्ञ केले व त्या वेळीं ज्या दक्षिणा दिल्या त्यांकरितां सोडलेल्या उदकाचें एक सरोवर झालें. त्या सरोवराचें नांवहीं इंद्रद्युम्न असें पडलें. परंतु हा इंद्रद्युम्न व **पां**डवांबरोबर असणारा इंद्रद्युम्न एक नसावा असें वाटतें. १३. एक ब्रह्मर्षि. एकदां याच्या मनांत असें आलें कीं, देहामुळें अनेक क्लेश भोगावे

[1]वृषामित्र, [2]सुहोत्र, [3]होत्रवाहन, । [4]अग्निवेश्य, [5]शौनक जाण, । बृहदश्वा तपोधन, । [6]विभावसु, ते ठायीं. ॥ ३२ ॥ [7]कृतचेता, [8]सहस्रपात, । हे मुख्य करुनी असंख्यात । धर्मासंगीं तोषभरित । [9]सुखाडले वनवासी. ॥ ३३ ॥ धर्मासंगीं [10]सुखभोजन । तपश्चर्या, वेदाध्ययन, । धर्मराजा आशीर्वचन, । जय, कल्याण इच्छिती. ॥ ३४ ॥ यावरी एकांत [11]अवसरीं । सखेद द्रौपदी सुंदरी । म्हणे, '[12]राया! कवणे [13]परी । [14]अवलंबिलें [15]तुवां एथें? ॥ ३५ ॥ [16]दीन, तापसी, [17]शक्तिहीन । [18]शिलोंछवृत्ती वेंचिती कण; । तयां ऐसें हें वर्तणें । तें काय त्वां मांडिलें? ॥ ३६ ॥ वेंचितां धनाचिया कोटी । [19]आयुष्य नेमिलें घटिकासाठीं । तो [20]अवघा जन्म इये [21]रहाटी । अरण्यवासीं लोटिला. ॥ ३७ ॥ आज्ञा देई [22]भीमार्जुना । करूनी शत्रूच्या दहना । राज्य साधिलीया महाप्राज्ञा ! । [23]उभय लोकीं

---

लागतात त्या अर्थीं देह त्यागावा हें बरें. अशी याच्या मनांत इच्छा झाल्याबरोबर इंद्रानें यास मानव देहाची योग्यता सांगितली. देह न सोडण्याविषयीं उपदेश केला. १४. अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा हारीतस्मृतीचा कर्ता. १५. हा पांडवांबरोबर कांहीं दिवस द्वैतवनांत होता. याशिवाय याचाविषयीं कांहीं अधिक माहिती मिळत नाहीं. १६. हा भालुक नांवाच्या ऋषीचा पुत्र असावा. १७. 'यानें युधिष्ठिरास अनेक इतिहास ऐकविले, व अक्षविद्या आणि अश्वहृदयविद्या तीही सांगितली होती. या दोन विद्यांचा उपयोग असा होता कीं, पुन: द्यूतांचा प्रसंग आल्यास अनुकूल अक्ष (फांसे) पडावेत आणि युद्धांत पराजय होऊं नये.' [भा० व० प्रा० ऐ० कोश.]

१. हा स्वतपश्चर्येविषयीं प्रख्यात होता व पांडवांबरोबर पुष्कळ दिवस राहिला होता. २. एक प्रख्यात राजर्षि. ३. एक ब्रह्मर्षि. ४. हा प्रख्यात अगस्त्य ऋषीचा एक शिष्य व विंध्य पर्वताचा गुरुबंधु. हा धनुर्वेदांत मोठा प्रवीण होता. पांडव व कौरव यांचा गुरु द्रोणाचार्य हा याचा शिष्य. याच्याच पासून द्रोणानें 'ब्रह्मशिर' नामक अस्त्र संपादन केलें होतें. ५. हा शुनक ऋषीचा पुत्र. ऋग्वेदप्रतिशाक्याचा कर्ता. ६. विभावसु नांवाचा ऋषि शापामुळें कांहीं दिवसपर्यंत कूर्म होऊन पडला होता. परंतु हाच ऋषि पांडवांबरोबर होता असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. ७. हा ऋषी वेदाध्ययनाविषयीं व दीर्घ तपाविषयीं प्रख्यात होता. ८. हा एक मोठा ब्रह्मर्षि. ९. सुखावले. १०. सूर्यानें दिलेल्या स्थालींतून उत्पन्न झाल्यामुळें सर्व भोजनाचे पदार्थ स्वादिष्ट लागत होते हें उघड आहे. ११. प्रसंगीं. १२. 'कल्याण' असाही पाठ आहे. १३. रीति. १४. स्वीकारलें. १५. 'अवलंबूं कां' असा अन्य पाठ आढळतो. १६. जवळ धन वगैरे कांहीं नसल्यामुळें दीन. १७. शत्रूपासून आपलें रक्षण करण्यास शारीरिक सामर्थ्य नसल्यामुळें शक्तिहीन. 'कीर्तिहीन' असा अन्य पाठ. १८. शेतांत पडलेले दाणे टिपून उपजीविका करणारे. १९. 'आयुष्य नेमिलें घटिकासाठीं' म्हणजे मानवदेह क्षणभंगुर आहे—असा भाव. २०. 'आयुष्य न मिळे घटका त्रुटि' असाही पाठ आहे. २१. 'अद्यापि' असाही पाठ आहे. २२. भीम व अर्जुन यांच्या पराक्रमाविषयीं मूळांत म्हटलें आहे:—

सुखलाभ ॥३८॥ साधलिया स्वराज्य संपत्ती। यज्ञीं देवें[१] तृप्त होती, । श्राद्धीं[२] पितृगण अतिथी । अन्नदानें तोषती. ॥३९॥ हरेल दारिद्र्याचें[३] दुःख, । मित्रें बंधु पावती सुख, । अनित्य[४] संसारीं कौतुक । करूनी जाती दादुले.[५] ॥४०॥ जेणें पाविजे परम दुःख । काय तें साधुवृत्तीचें सुख? । धैर्य[६] उपहासिती लोक । म्हणती दीनें अशक्तें. ॥ ४१ ॥ टाकिशी रायाचे[७] धर्म । तोचि रायातें अधर्म । शांतीनें[८]

---

'अयं कुरून् रणे सर्वान् हन्तुमुत्सहते प्रभुः ॥ २३ ॥ त्वत्प्रतिज्ञां प्रतीक्षंस्तु सहतेऽयं वृकोदरः । योऽर्जुनेनार्जुनस्तुल्यो द्विबाहुर्बहुबाहुना ॥ २४ ॥ शरावमर्देऽशीघ्रत्वात्कालांतकयमोपमः । यस्य शस्त्रप्रतापेन प्रणताः सर्वपार्थिवाः ॥ २५ ॥ यज्ञे तव महाराज ब्राह्मणानुपतस्थिरे । तमिमं पुरुषव्याघ्रं पूजितं देवदानवैः ॥ २६ ॥' [वनपर्व—अ० २७.] २३. राज्य मिळाल्यास ऐहिक सुखांत निमग्न राहूनही यज्ञ, याग, दान इत्यादि सत्कृत्यें करून पारलौकिक सौख्यही मिळवितां येतें. शिवाय प्रजापालनरूपी आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावल्यास स्वर्गसुख आपोआप प्राप्त होतें.

१. यज्ञांतला हविर्भाग व सोमरस पिऊन देव आनंदित होतात अशी समजूत आहे. २. मृत मनुष्याच्या और्ध्वदेहिक क्रियेला श्राद्ध म्हणतात. श्रद्धेनें केल्यामुळें यास श्राद्ध म्हणतात. 'श्रद्धया दीयते यस्मात्तस्माच्छ्राद्धं निगद्यते' म्हणून बाप जिवंत असतां त्याला रोज शिव्या देणाऱ्या मनुष्यानें बाप मेल्यावर त्याचें श्राद्ध करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें आर्यसमाज इत्यादि नूतन पंथांचें म्हणणें आहे. बाप जिवंत असतांनाच त्याची सेवा करून श्राद्ध केलें पाहिजे, मृतांकरितां श्राद्ध करून काय उपयोग? हा सर्व प्रकार मतवैचित्र्याचा परिणाम होय. ३. 'दारिद्र्याहुनि मरण बरें' या नियमाला अनुसरून दारिद्र्य फारच असह्य होतें. ४. भीम, अर्जुन, नकुल, सहदेव यांची अरण्यांतली दीनावस्था वर्णन करवितांना मोरोपंतांनीं द्रौपदीकडून म्हणविलें आहे:—'प्रासादीं नगरीं जे वसले ते तरुतळीं दवस्थानीं । झाले विच्छविरविकविपविधरसे बंधु असदवस्थानीं ॥' [काव्यसंग्रह—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—अ० २ गीति ४५.] अशा प्रकारचें भीमादिकांचें दुःख नाहींसें होऊन त्यांना सुख मिळूं लागेल—असा भाव. ५. अशाश्वत. ६. नवरे. ७. 'वैरी' असा अन्य पाठ. ८. मनुस्मृतींत नृपाचे धर्म सांगितले आहेत ते हे:—'अलब्धमिच्छेद्दण्डेन लब्धं रक्षेदवेक्षया । रक्षितं वर्धयेद्वृद्ध्या वृद्धं दानेन निःक्षिपेत् ॥ १०१ ॥ नित्यमुद्यतदंडः स्यान्नित्यं विवृतपौरुषः । नित्यं संवृतसंवार्यो नित्यं छिद्रानुसार्यरेः ॥ १०२ ॥ नित्यमुद्यतदंडस्य कृत्स्नमुद्विजते जगत् । तस्मात् सर्वाणि भूतानि दंडेनैव प्रसाधयेत् ॥ १०३ ॥ [मनुस्मृति—अ० ७.] अलब्ध वस्तु [हत्ती, रथ, घोडे, पायदळ एतद्रूप] दंडानें मिळवावी. मिळालेल्या वस्तूवर देखरेख ठेवून ती रक्षण करावी. रक्षण केलेली वस्तु वाढण्याचे उपाय योजून वाढवावी. वाढलेली वस्तु सत्पात्रीं दान करून ठेवावी ॥ १०१ ॥ सर्वदा दंड (हत्ती, घोडे, पायदळ हे) उद्यत (युद्धादिशिक्षणाभ्यासयुक्त) असावा. नित्य आपल्या पौरुषाचा (पराक्रमाचा) अस्त्रविद्यादिकानें प्रकाश करीत असावें. आपले सर्व अर्थ (मंत्र, आचार, चेष्टा इत्यादिक) सर्वदा गुप्त असावेत. आणि

क्लेश परम । कुटुंबेंसी भोगिसी. ॥ ४२ ॥ आइक आतां इतिहासातें, । वि¹-रोचन पुसे प्रे²ल्हादातें । शांति न पाविजे श्रेयातें । क्रोधें होतसे सुखलाभू. ॥ ४३ ॥ ऐकोनी बोले विचार कुशळ । कार्याकार्य बळाबळ । ओळखूनी

---

शत्रूच्या छिद्रांचें (कोणत्याहि व्यवस्थेमध्यें न्यूनतेचें) अनुसंधान ठेवीत असावें ॥ १०२ ॥ ज्याचा दंड नित्य उद्यत (उद्युक्त) आहे त्या राजाला सर्व जगत् भीत असतें, याकरितां सर्व प्राणी दंडानेंच आपल्या स्वाधीन करावे ॥ १०३ ॥ [मनुस्मृति–अध्याय ७ पृ० १३६ पहा.] ९. आपल्याला व्यर्थ त्रास देणाऱ्या शत्रूला शिक्षा न करितां तो करील तसें पाहत राहिल्यामुळें. हितोपदेशांत म्हटलें आहे:–'क्षमा शत्रौ च मित्रे च यतीनामेव भूषणम् । क्षमा शत्रौ च मित्रे च नृपाणामेव दूषणम् ॥' या नियमाला अनुसरून राजानें शत्रूच्या अपराधांची कधींही क्षमा करूं नये. या नियमाविरुद्ध चालल्यामुळें कुटुंबासह धर्माला परम क्लेश भोगण्याचा प्रसंग आला–हा भाव.

१. मूळांत हा संवाद विरोचनपुत्र बलि व प्रह्लाद यांच्यांत झाला असें लिहिलें आहे:–'अत्राप्यदाहरन्तीममितिहासं पुरातनम् । प्रह्लादस्य च संवादं बलेर्वैरोचनस्य च ॥' [महाभारत–वनपर्व अ० २८] विरोचन हा प्रह्लादाचा पुत्र व बलि हा विरोचनाचा पुत्र. बलि हा महापराक्रमी दैत्य होता. हा देवांचा फार द्वेष करीत असे. इंद्रपद मिळवावें असें याच्या मनांत फार होतें. यानें दैत्यकुलगुरू शुक्राचार्य यांच्या साहाय्यानें विश्वजिन्नामक यज्ञ करून अग्नीपासून युद्धोपयोगी दिव्यरथ, देवेंद्राच्या अश्वासारखे अश्व, सिंहध्वज, धनुष्य, बाण इत्यादि युद्धोपयोगी सामग्री मिळवून इंद्रावर स्वारी केली व त्याचें इंद्रपद घेतलें. इंद्राला पुनः इंद्रपद मिळवून देण्याकरितां विष्णूंनीं कश्यपापासून अदितीच्या पोटीं, दशावतारांपैकीं पांचव्या अवतारीं वामनाचा अवतार घेतला व बटुरूपानें बळीच्या यज्ञशाळेंत प्रवेश केला. बलिनें 'जें जें वांछिसि चित्तीं तें तें निःशंक वित्त मागावें' असें म्हटल्यावर 'मी वांछितसें राया! तुजपासुनि तीन पाउलेंच मही' असें दान मागितलें. बलीनें त्याबद्दल उदक सोडतांच वामनानें उग्र स्वरूप धारण करून एका पावलांत पृथ्वी आणि दुसऱ्या पावलांत आकाश व्यापून तिसरें पाऊल बलीच्या मस्तकीं दिलें व त्यास पाताळीं लोटिलें. विठ्ठलकविकृत **'वामनचरित'** नामक लहानशा काव्यांत या कथानकाचें सुरस वर्णन आहे. २. प्रल्हाद किंवा प्रऱ्हाद हा हिरण्यकशिपु दैत्याचा मुलगा. पद्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, प्रल्हाद हा पूर्वजन्मीं एक विष्णुभक्त ब्राह्मण होता. आईच्या पोटांत असतांच यानें नारदाच्या द्वारें विष्णुभक्तीचा महिमा ऐकिला होता. या दोन कारणांमुळें हा पुढें निःसीम विष्णुभक्त बनला. हिरण्यकशिपु विष्णुद्वेष्टा असल्यामुळें त्यानें 'विष्णुभक्ति सोड' म्हणून प्रल्हादास पुष्कळ सांगितलें. पण त्यानें ऐकिलें नाहीं. पुढें प्रल्हादाला त्याबद्दल अनेक कडक शिक्षा भोगाव्या लागल्या, तरी त्याची विष्णुभक्ति किंचित्ही ढळली नाहीं. शेवटीं स्तंभांतून उद्भवलेल्या नरसिंहानें हिरण्यकशिपूचा वध केला व प्रल्हादास गादीवर बसविलें.

काळवेळ । कार्यसिद्धी जाणतां. ॥ ४४ ॥ व्यवहारीं शांति नये कामा । परमार्थ क्रोध नाशो धर्मा, । जेथें ज्याचाचि महिमा । तें तेथेंची योजावें. ॥ ४५ ॥ प्रपंचीं अवलंबिल्या शांति । जोडिली ते जाय वृत्ती । आपुल्या दारानें संपत्ती । प्राप्त नव्हे आपणिया. ॥ ४६ ॥ शांति पुरुषाची अंगना । हेळूनी मांडी जे पतीच्या वचना । पुत्र होऊनी मेहुणा । चेष्टा करी विनोदें. ॥ ४७ ॥ क्रूरासी सेविती सेवक, । क्रूरासी भीती प्रजालोक । क्रूरास्तव हा महा धाक. । शत्रु वाहती सर्वदा. ॥ ४८ ॥ क्रूर जाणोनी स्वभाव । मर्यादेनें वर्तती सर्व, । क्रूरता भोगी वैभव । सात्विका भिक्षा मिळेना. ॥ ४९ ॥ क्रूर पुरुषातें देखोनी । स्त्रीपुरुषें पारिके जनीं, । न्यायें वर्तती स्वधर्माचरणीं । बुद्धी न करिती विपरीत. ॥ ५० ॥ प्रपंचीं धरितां सात्विकता । तें आपण केलें आपल्या घाता: । सत्वगुण तो परमार्था । शोभा आणी सर्वस्वें. ॥ ५१ ॥ लोहें काय नव्हे कनक । प्रपंच जिणों न शके सात्विक । लोह कनकाशीं नोहे तुके । तेवीं क्रूरता परमार्थी. ॥ ५२ ॥ साधु बोलेती सत्वगुणें । स्त्रिया वोसंडती रजोगुणें। शत्रु दंडावे तमोगुणें । हें जाणणें शहाणियानें. ॥ ५३ ॥ खळा कुटिलाचे

१. काळ आपल्याला अनुकूळ आहे कीं प्रतिकूल आहे हें पाहून. याचा सारांश असा क्ष्यावयाचा कीं योग्य प्रसंग आला असतां (युद्ध करण्याची आपल्या जवळ पुरेशी सामग्री असतां) शत्रूशीं युद्ध करण्यास मागें पुढें पाहूं नये. चाणक्यानें म्हटलें आहे:–'कौर्म संकोचमास्थाय प्रहारानपि मर्षयेत् । प्राप्तकालं तु नीतिज्ञ उत्तिष्ठेत्कृष्णसर्पवत् ॥.' भीम व अर्जुन बरोबर असल्यामुळें धर्माचा हा प्राप्तकालच होता. २. याच अर्थाचें वाक्य पंतानें द्रौपदीच्या तोंडून वदविलें आहे:–'सर्वत्र क्रोध जसा तैशी सर्वत्र न क्षमा साजे. । ते कैसे न वधावे, ताडिति परघातदक्ष मासा जे? ॥' [काव्यसंग्रह–मोरोपंतकृत महाभारत–वनपर्व पृ० २० गीति ५०.] ३. 'नाशी' असाही पाठ आहे. ४. 'म्हणोनी' असाही पाठ आहे. ५. उपजीविकेचें साधन. ६. या ओवीचे शेवटचे दोन चरण सुभाषितरूप आहेत. समानार्थक सुभाषित:– 'नहि सुप्तस्य सिंहस्य प्रविशंति मुखे मृगाः.' ७. धिक्कारून टाकी. क्षमाशील पुरुषाची बायको नवऱ्याचा मान ठेवीत नाहीं–असा भाव. साधुश्रेष्ठ तुकाराम याची स्त्री व ग्रीक तत्वज्ञानी साक्रेतीस याची स्त्री ह्या दोन राक्षसी स्त्रिया प्रल्हादाच्या म्हणण्याची ठळक उदाहरणें होत. ८. 'स्त्रीपुत्र पारखे सेवकजन' असाही पाठ आहे. ९. 'बुद्धी न शके परहस्तीं' असाही पाठ आहे. १०. लोह कार्य; कनक (कार्य) नव्हे–असा अन्वय. जगीं लोखंडाचाच पुष्कळ उपयोग आहे, सोन्याचा नाहीं–असा अर्थ. हा चरण सुभाषितरूप आहे. येथें लोह म्हणजे क्रोध व कनक म्हणजे शांति असें समजावें. ११. सोनें. १२. जिंकूं. 'न जिणवे सात्विकें' असाही पाठ आहे. १३. साम्य. १४. 'तोषती' असाही पाठ आहे. १५. भरलेल्या असतात. १६. या ओवींत 'हिते प्रतिहितं कुर्यात् हिंसिते प्रति हिंसितम् । तत्र दोषं न पश्यामि शठे शाठ्यं समाचरेत् ॥' या न्यायाचा उपदेश केला आहे. १७. कामस्याचे.

ठायीं । शांति धरितां पडणें अपायीं । जैसे [1]कटक मर्दावें पाहीं । तेंवी दुर्जन दंडावे. ॥ ९४ ॥ देखोनियां साधुसंता । भावें चरणीं ठेविजे माथा, । [2]तेथें दावितां क्रूरता । अधःपाता जाइजे. ॥ ९५ ॥ म्हणोनी शांतता [3]क्रूरता । सर्वी सर्वत्र [4]येकैरीत । केलिया [5]व्यवहारीं परमार्था । दोहीं तेही [6]जाणिजे. ॥ ९६ ॥ ऐसें प्रह्लादें [7]पवित्रें । बोलिलें तें [8]पुत्रपौत्रें । स्वीकारुनी आज्ञा [9]मंत्रें । वर्तणूक वर्तला. ॥ ९७ ॥ या लागीं ऐकें [10]धर्ममूर्ती ! । करिशी कौरवांची [11]शांती । तरिच पावशी विश्रांति । [12]येरवीं दुःख [13]अखंड.' ॥ ९८ ॥ ऐकोनि द्रौपदीचें वचन । [14]आवेशला भीमसेन । म्हणे, '[15]चतुर इयेसमान । [16]दुजी नाहीं

---

१. सैन्य. २. साधुसंतांच्या ठायीं. शत्रूशीं क्रूरतेनें वागणें वाईट नाहीं म्हणून साधुसंतांशींही तसेंच वागूं नये—असा भाव. ३. येथें 'क्रूरता' शब्दाचा अर्थ सारासार विचार न करितां सर्व प्राण्यांना त्रास देणें असा न घेतां शत्रूला निर्दयतेनें शिक्षा करणें असा घ्यावा. ४. एकाच न्यायानें, पक्षपात किंवा अन्याय न करितां. म्हणजे ज्याच्याशीं जें योग्य तसें त्याच्याशीं वर्तन ठेवून साधूंवर क्रोध दाखवूं नये व शत्रूवर क्षमा करूं नये—असा मथितार्थ. ५. व्यवहार चालून परमार्थ, इह व पर. ६. 'नाडिजे' असाही पाठ आहे. ७. हरिनामानें पवित्र. प्रल्हाद हरिभक्त असून नेहमीं हरिभजनांत निमग्न असे म्हणून पवित्र म्हटलें आहे. प्रल्हादचरित्रांत विष्णुभक्ताला पवित्र मानव असें म्हटलें आहे व विष्णुभक्तिविरहित पुरुषाला जिवंत शव म्हटलें आहे. ८. 'पुत्रपौत्रें' या शब्दानें प्रल्हादाचा पुत्र विरोचन व विरोचनाचा पुत्र बलि या दोन पुरुषांचा समावेश होतो. परंतु हा शब्द बलि या एकाच पुरुषाचा सूचक आहे असें घेणें चांगलें. कारण—(१) मूळांत प्रल्हादानें आपला जो पौत्र बलि याला राजनीति सांगितली असें लिहिलें आहे; ती विरोचनाला सांगितली असें लिहिलें नाहीं. (२) याच ओंवींत 'वर्तला' हें जें या शब्दाचें क्रियापद आहे तें एकवचनी आहे. म्हणून 'पुत्रपौत्रें' या शब्दानें दोन पुरुषांचा बोध होतो असें न मानितां एकाच पुरुषाचा बोध होतो असें मानणें योग्य दिसतें. 'पुत्रपौत्रें' हा समास पंचम्यंत सोडविल्यास असाच अर्थ निघतो. ९. उपदेशाप्रमाणें. १०. मूर्तिमान् धर्माच्या (यमाच्या) अंशानें उत्पन्न झाल्यामुळें युधिष्ठिराला धर्ममूर्ती असें म्हटलें. युधिष्ठिर स्वधर्मनिरतअसल्यामुळें हें नांव त्याला सार्थक होतें. ११. नाश. १२. पांडवांचा नाश न केल्यास. १३. अखंड म्हणजे ज्याला खंड (अपूर्णत्व) नाहीं असें. संपूर्ण म्हणजे जगावर जितकें म्हणून दुःख असेल तें सर्व. ['समग्रं सकलं पूर्णमखंडं स्यादनूनके' इत्यमरः.] 'न खंडे' असाही पाठ आहे. १४. विकारवश झाला. भीमसेन मल्लयुद्धप्रवीण असल्यामुळें लौकर विकारवश होत असे यांत आश्चर्य नाहीं. आजकालचे पहिलवान लौकरच अरेतुरेवर येतात याचा बहुतेकांना अनुभव असेलच. पहिलवान लोकांत शारीरिक शक्ति विपुल असल्यामुळें आपल्या फाजील शक्तीचा उपयोग करण्याची ते नेहमी संधी पाहत

सर्वथा. ॥ ५९ ॥ इच्या ऐकोनियां वचना । उल्हास[1] वाटे माझिया मना । मज आज्ञापीं कुरुभूषणा![2] । दुर्योधनहननार्थ. ॥ ६० ॥ आणिक विचार[3] करितां कांहीं । बुडूं नको[4] संशयडोहीं;[5] । मुखें प्रेरूनियां[6] पाहीं । रणीं कौतुक बंधूचें.[7] ॥ ६१ ॥ भीष्म, द्रोण, कर्ण, शकुनी । दुर्योधनेशीं बंधुश्रेणी[8] । स्वहस्तकें रणांगणीं । मृत्युसदनीं[9] वसवीन.' ॥ ६२ ॥ धर्म म्हणे, 'बंधुं[10] हो! ऐका । ऐसीचि[11] माझाही आवांका[12] । परी मानसीं एक शंका । वर्तते ती सांगतों. ॥ ६३ ॥ भीष्म, द्रोण, कर्ण, प्रबळ[13] । सर्व विषयीं समर्थ[14] कु-

---

असतात. म्हणूनच ते लौकर विकारवश होतात. मूळांत म्हटलें आहेः—'याज्ञसेन्या वचः श्रुत्वा भीमसेनो ह्यमर्षणः । निश्वसन्नुपसंगम्य क्रुद्धो राजानमब्रवीत् ॥' [वनपर्व—अ० ३३ श्लो० १.] १५. द्रौपदीला चतुर म्हणण्याचें कारण तिनें युधिष्ठिरासारख्या धर्मज्ञालाही राजधर्म सांगितला. १६. दुसरी. द्रौपदीसारखी चतुर स्त्री दुसरी नाहीं—असा अर्थ.

१. आनंद. द्रौपदी दुर्योधनाला मारण्याविषयीं सांगत होती तेव्हां युद्धप्रिय भीमाला आनंद वाटला यांत नवल नाहीं. 'उत्साह' असाही अन्य पाठ आहे. २. धर्मराजा! कुरुवंशाला शोभविणाऱ्या युधिष्ठिरा! कुरु हा सोमवंशोत्पन्न संवरण राजाचा पुत्र. यानें दीर्घ कालपर्यंत घोर तपश्चर्या करून महेंद्राच्या प्रसादानें कुरुक्षेत्र नामक पवित्र स्थल वसविलें. याच्या वंशांत उत्पन्न झाल्यामुळें धर्माला कुरुभूषण म्हटलें आहे. ३. आणिक विचार=एतद्विरुद्धविचार, दुर्योधनहननाच्या विरुद्ध म्हणजे दुर्योधनाला न मारण्याविषयीं निश्चय केल्यास. ४. 'न करीं' असा अन्य पाठ. ५. संशयरूपी डोहांत. डोह=फार खोल आहे असा नदींतला जलप्रदेश. उ० यमुनाडोह. ६. आज्ञापुनियां, युद्धाला जा अशी आज्ञा देऊन. ७. मी जो तुझा बंधू त्याचें. ८. समूह, पंक्ति. ९. यमलोकाला. शकुनी व दुर्योधनादिक शतबंधु यांस मारण्यास भीम समर्थ होता यांत संशय नाहीं. भीष्म, द्रोण व कर्ण यांना मारीन असें भीम म्हणतो ती शुद्ध त्याची गर्वोक्ति होय. कारण अर्जुन व कृष्ण यांस जर्जर करून सोडणारा भीष्म, भीमाच्या हातून पराजित झाला असता असें मुळींच संभवत नाहीं. तसेंच द्रोण हीं भीमाच्या हातून पराजित झाला नसता. भीम भारतयुद्धांत एकदां कर्णाच्या हातून पराजित होऊन पाशबद्ध झाला होता व कुंतीच्या आज्ञेवरून कर्णानें सोडून दिलें नसतें तर हा खास कर्णाच्या हातून मृत झाला असता, मग कर्णाला जिंकण्याची गोष्ट कोणीकडे! १०. स्वस्थ बसल्याबद्दल धर्माला फक्त भीमच टोंचून बोलला, तरी इतर तिघां भावांच्या मनांत तसेंच आहे असें ओळखून धर्म, उत्तर द्यावयाचें तें फक्त भीमाला न देतां सर्व भावांना देत आहे. ११. दुर्योधनाशीं युद्ध करून राज्य परत मिळवावें असा तुमच्याप्रमाणें माझाही विचार आहे—असा भाव. १२. विचार, बेत. १३. बलयुक्त. भारतयुद्धांत हे तिघेही जरी पडले तरी संपूर्ण भारतयुद्धांत या तिघांप्रमाणें शौर्य गाजविणारा चौथा कोणीच झाला नाहीं; यावरून हे ख-

शाळ । यत्न करितां हो विकळ[1] । तरी अपकीर्ति रोकडी[2]. ॥ ६४ ॥ पांडव पवित्र साधु । त्रैलोक्यीं[3] भंगेल[4] शब्दु । राज्य अप्राप्तीचा खेदु । अमरनाथ[5] सोडीना. ॥ ६५ ॥ हृदयीं आठवूनी दुःख । साधु म्हणती[6] काय[7] अटक । वधिले[8] जाती हें निःशंक । केंवी निश्चय मानावा? ॥ ६६ ॥ यालागीं ने-[9]माचिये अंतीं । जे बुद्धि[10] सांगेल कृष्णमूर्ती । तेचि करावी युक्ति । चेंळूं[11] नका विशेषें.' ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां[12] धर्मातें[13] । कृपेनें व्यास पातला तेथें । नमस्कारुनी कुंतीसुतें । मनोभावें पूजियेला. ॥ ६८ ॥ व्यास म्हणे,

---

रोखरच प्रबळ होते असें सिद्ध होतें. १४. याच अर्थाच्या पंतांच्या गीति पहाः—'तुमचे प्रताप जे जे दिग्विजयीं प्रगटले न ते लटिके, । कुरुगुरुपुढें परि न गुरु, यज्ञांत घृतापुढें न तेल टिके. ॥ ८८ ॥ भक्षुनि अन्न न समयीं अंतर देती भले नयज्ञाते. । द्रोण कृप युद्ध यज्ञा वरितील, तसे परा न यज्ञा ते ॥ ८९ ॥ आम्हीं नियम त्यजितां, न चुकेल नदीजही उगाराया. । त्या सर्वज्ञ प्रभुला वा! कोण म्हणेल, 'गा! उगाराया!' ॥ ९० ॥ हे सर्व असोत, जया वीरप्रवरा सुयोध नत सारे । एकचि कर्ण पुरे तो कार्यपति जसा सुयोधन तसा रे ॥ ॥ ९१ ॥ यासी कलि करणें हें न म्हणेल कधीं सुधी नर विहितरे! । धर्मन्याय त्यजितां तेजस्वीही तमीं न रविहितरे. ॥ ९६ ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० २४.]

१. फसलेला, व्यर्थ. 'विफळ' असाही पाठ आहे. २. आपल्या मनांतला राज्य मिळविण्याचा उद्देश सिद्धीस तर जाणार नाहींच; उलट अन्यायानें राज्य मिळविण्यास यत्न केल्याबद्दल लोकांकडून शुद्ध अपकीर्ति सोसावी लागेल—असा भावार्थ. ३. 'हा त्रैलोकीं' असाही पाठ आहे. ४. पांडव पवित्राचरण करणारे व सत्वशील वृत्तीचे आहेत अशी जी आपली कीर्ति आहे ती दूषित होईल—असा भाव. ५. इंद्र. 'जन वरी खंडेना' असा अन्य पाठ. ६. या ओवीचे शेवटचे दोन चरण सुभाषितरूप आहेत. ७. 'म्हणतां परि काय हे अटक' असा अन्य पाठ. ८. वधिले जाती=मारिले जाती, नाहींसे होती. ९. नेम सरल्यानंतर म्हणजे बारा वर्षें अरण्यवास व एक वर्ष अज्ञातवास अशीं तेरा वर्षें संपल्यानंतर. १०. मसलत, उपदेश, राज्य मिळविण्याचा उपाय. ११. गडबड करूं नका, युद्ध करण्याची गोष्ट काढूं नका. १२. बोलल्यानंतर किंवा बोलणें संपल्यावरोबर. १३. येथें द्वितीया विभक्तीचा उपयोग केला आहे. हें बरोबर नाहीं; कारण वरील भाषण धर्माला उद्देशून दुसऱ्यानें केलेलें नव्हे. स्वतः धर्माचेंच आहे. म्हणून येथें द्वितीयेची योजना न करितां कर्तृपदसूचक प्रथमा किंवा तृतीया या विभक्तींची योजना केली पाहिजे. अशा प्रकारचा विभक्तिसंबंधी घोंटाळा मुक्तेश्वराच्या कवितेंत बऱ्याच ठिकाणीं दृग्गोचर होतो. हाच पाठ आमच्यापाशीं असलेल्या तीन चार पोथ्यांत आढळतो.

'विवेकखाणी[1] । कासया विकल्पिसी[2] मनीं । निशा लोटलिया तरणी[3] । उगवे[4] ऐसा

---

१. धर्माला 'विवेकखाणी' हें विशेषण लावून 'तुला शत्रूपासून भिण्याचें कारण नाहीं' असें व्यास सुचवितात. कारण जो 'विवेकखाणी' म्हणजे सुविचारी आहे त्याला संशयांत बुडून विजय मिळेल किंवा नाहीं याबद्दल साशंक होण्याचें कांहीं एक कारण नाहीं. २. संशय आणशी. ३. सूर्य. 'अर्तिसृधृधम्यम्यश्यवितृभ्योऽनिः' या नियमानें 'तॄ' धातूला अनिः हा प्रत्यय लागून तरणिः हा शब्द झाला. हा योगरूढि शब्द आहे. याची व्युत्पत्ति पुष्कळ रीतींनें काढितां येते:—(१) तरत्यनेन संसारमिति तरणिः. सूर्य भक्तांना संसारापासून तारतो म्हणून त्याला 'तरणि' असें नांव आहे. (२) आकाशसमुद्रं तरतीति तरणिः. आकाशरूपी समुद्र तरून जातो म्हणून 'तरणि' असें नांव सूर्याला पडलें. (३) जगदंधकारं तारयतीति तरणिः. जगताला अंधकारापासून तारतो तो 'तरणि'. सूर्यामुळें अंधकार नाश पावून जगताला उजेड मिळतो. हें सर्वांना माहित आहेच. (४) मुमुक्षुभिस्तीर्यते इति तरणिः. मुमुक्षुजन ज्याला तरून जातात तो 'तरणि.' मुक्तीला पोहोंचण्यापूर्वीं सूर्यलोकांतून मुमुक्षूंना जावें लागतें अशी समजूत आहे. या समजुतीला अनुसरून वरील व्युत्पत्ति आहे. या चार व्युत्पत्तींपैकीं सर्वच सयुक्तिक आहेत. इतर कांहीं व्युत्पत्ती आहेत; परंतु त्या महत्त्वाच्या नसल्यामुळें येथें देत नाहीं. असो. 'तरणि' शब्दाचा 'होडी' असाही अर्थ होतो परंतु तो येथें इष्ट नाहीं. ४. 'निशा लोटलिया तरणी उगवे'=रात्र सरल्यावर सूर्य उगवेल. व्यास धर्माला म्हणतात कीं, 'ज्याप्रमाणें रात्र सरून गेल्यावर दिवस उगवेल किंवा नाहीं अशी कोणीही शंका घेत नाहीं, त्याचप्रमाणें अरण्यवास संपल्यानंतर पुनः राज्य मिळेल किंवा नाहीं याबद्दल संशय घ्यावयाला नको. रात्र सरल्यानंतर दिवस उगवणें हा सृष्टीचा स्वाभाविक नियम आहे, तेव्हां तो कधींही चुकावयाचा नाहीं. या सृष्टिनियमाला उद्देशून एका कवीनें म्हटलें आहे:—'अनुरागवती रात्रिः (संध्या) दिवसस्तत्पुरःसरः । अहो दैवगतिश्चित्रा तथापि न समागमः ॥' न चुकतां खातरीनें कोणतीही गोष्ट होणें या अर्थीं 'रात्रीनंतर दिवस उगवणें' अशी इंग्रजींत एक म्हणच पडून गेली आहे:—

"To thine own self be true,
And it must follow, *as the night the day*,
Thou canst not then be false to any man."

*Shakespeare's Hamlet.* Act I.

'निशा लोटलिया तरणी उगवे' या सामान्य सिद्धांतानें 'अरण्यवास सरल्यानंतर यश पावशी' या विशेष सिद्धांताचें समर्थन केल्यामुळें येथें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकार झाला. अर्थांतरन्यासाचें लक्षण:—'विशेषणस्य सामान्येन समर्थनमर्थांतरन्यासः' [काव्यानुशासने वाग्भट.] 'सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते । यत्र सोऽर्थांतरन्यासः साधर्म्येणेतरेण वा. ॥' [काव्यप्रदीप—दशम उल्लास—कारिका २४—काव्यमाला—पृ० ४१३]. 'सामान्यविशेषभावकार्यकारणीभावाभ्यां निर्दिष्टप्रकृतसमर्थनमर्थांतरन्यासः' [अलंकारसर्वस्वे राजानकरुय्यकः—पृ० १०९.] याचीं अन्य उदाहरणें:—(१) 'दुर्बुद्धि आवडे मूढा गाढवा जेंवि गा-

संशय? ॥ ६९ ॥ सत्य सुकृत[1] ज्याचे गांठीं । तेथें ईश्वरकृपा मोठी । ईश्वरकृपेस्तव संतुष्टी[2] । पूर्णकामें सर्वथा. ॥ ७० ॥ करुनी शत्रुकुळाचा नाश । राज्यलोभें[3] पावशी यश । येथें संशयाचा लेश । स्पर्शों नेदी मानसा.' ॥ ७१ ॥ ऐसें बोलोनी गुरु पवित्र । महाविद्याबीजमंत्रें[4] । अर्जुनाशीं[5] उपदेशितां[6] नेत्र । दिव्यज्ञानें उघडले. ॥ ७२ ॥ सर्व सिद्धि[8] कर जोडुनी । उभ्या प्रत्यक्ष देखे नयनीं । पुढती रहस्य बोलोनी मुनी, । 'धर्मा! आईक निर्धारें. ॥ ७३ ॥ हाचि जपतां सर्व काळ । इच्छिलें तें पावशी फळ । ऐसें बोलोनी दीनदयाळ । अदृश्य झाला ते ठायीं ॥ ७४ ॥ अर्जुना! या विद्येकरून । सर्व शत्रूंसी जिंकिसी जाण । यांचें करितां जप ध्यान । प्रसन्न होईल शंकर. ॥ ७५ ॥ मग जपाचे होईल अंतीं । तुज पाशुपतशस्त्राची प्राप्ती.' । ऐसें बोलोनी व्यासमूर्ती । अंतर्धान पावली. ॥ ७६ ॥ धर्म बोले अर्जुनासीं, । 'युद्ध मांडल्या समर्थाशीं । शस्त्रास्त्र सामग्रीशीं । सिद्ध असलें पाहिजे ॥ ७७ ॥ भीष्मद्रोणाच्या[9] संग्रामा । मानवी शस्त्रें न येती कामा । येथें देवाचीं नरेंद्रोत्तमा! । दिव्यं[10] शस्त्रें असावीं. ॥ ७८ ॥ यालागीं जरी पार्थिवा[11] । तपें तोषवीं देवा महादेवा । तो तु-

---

ढवी. ॥ ४४ ॥' (२) 'कीं सत्यधर्म रक्षाया सोडिली सत्वर क्षिती । कीं साधु पुत्र ताताचें सर्वस्वें सत्व रक्षिती. ॥ १५ ॥' [मोरोपंत—अनुष्टुब् रामायण].

१. पुण्य. २. संतोष. ३. 'राज्यलाभें' असा अन्य पाठ. ४. 'योग विद्या महा मंत्र' असें पाठांतर. ५. प्रतिश्रुति नामक विद्या. महाविद्या—या विद्येमुळें पाशुपत इत्यादि दिव्य अस्त्रें मिळालीं. म्हणून हिला 'महाविद्या' म्हटलें आहे. बीज—मंत्राचा मुख्य भाग. बीजाशिवाय मंत्रसिद्धि होत नाहीं. ६. मूळांत व्यासानें अर्जुनाला मंत्र सांगितला असें नाहीं. व्यासानें धर्माला सांगितला व धर्मानें अर्जुनाला सांगितला असें आहे. ७. 'धर्माशीं उपदेशीला स्वतंत्र' असाही पाठ आहे. ८. अणिमादि अष्ट सिद्धि. ९. 'भीष्मद्रोणकृपे कर्णे द्रोणपुत्रे च भारत । धनुर्वेदश्चतुष्पाद एतेष्वद्य प्रतिष्ठितः ॥ ४ ॥ दैवं ब्राह्मं मानुषं च सयलं सचिकित्सितम् । सर्वास्त्राणां प्रयोगं च अभिजानंति कृत्स्नशः. ॥ ५ ॥ ते सर्वे धृतराष्ट्रस्य पुत्रेणापरिसांत्विताः । संविभक्ताश्चतुष्टाश्च गुरुवत्तेषु वर्त्तते ॥ ६ ॥ सर्वयोधेषु चैवास्य सदा प्रीतिरनुत्तमा । आचार्यामानितास्तुष्टाः शांतिं व्यवहरंत्युत ॥ ७ ॥ शक्तिं न हापयिष्यंति ते काले प्रतिपूजिताः । अद्य चेयं मही कृत्स्ना दुर्योधनवशानुगा ॥ ८ ॥ सग्रामनगरा पार्थ ससागरवनाकरा । भवानेकप्रियोऽस्माकं त्वयि भारः समाहितः ॥ ९ ॥ [वनपर्व—अ० ३७.] १०. दिवि भवाः दिव्याः—स्वर्गांत झालेलीं, देवांचीं. ११. पृथ्वीसंबंधी. धर्म अर्जुनाला म्हणतात कीं जरी तूं पृथ्वीसंबंधाचा प्राणी (मानव) आहेस तरी शंकराला प्रसन्न कर म्हणजे तुला दैविक शस्त्रें मिळतील.

ष्टल्या अस्त्रां सर्वां । निवेदील निर्धारें.' ॥ ७९ ॥ ऐकोनी अग्रजाचें वचन । उभा ठेला वीर अर्जुन । घेऊनियां धनुष्यबाण । खड्गचर्मवर्मादि ॥ ८० ॥ नमस्कारिले धौम्यचरणा । वंदिलें धर्मा भीमसेना । पूंशिलें माद्रीच्या नंदना । पांचाळी समवेत. ॥ ८१ ॥ द्रौपदी म्हणे, 'प्रतापमूर्ति! । एक वीर तूं त्रि-जगतीं । करूनी शत्रुकुळाची शांति । विजयलक्ष्मी तुज वरो. ॥ ८२ ॥ सकळ देव, सकळ ऋषी । आगम, निगम, मंत्र राशी । पंचभूतें प्रसन्नेशीं । जय कल्याण तुज देवोतें. ॥ ८३ ॥ घेऊनि ऋषींचें आशीर्वचन । देश प-

१. 'निदेशाद्धर्मराजस्य द्रष्टुकामः पुरंदरम् । धनुर्गांडीवमादाय तथाक्षय्ये महेषुधी ॥ १८ ॥ कवची सतलत्राणो बद्धगोधांगुलित्रवान् । हुत्वाग्निंब्राह्मणान्निष्कैः स्वस्तिवाच्यमहाभुजः ॥ १९ ॥ प्रातिष्ठत महाबाहुः प्रगृहीत शरासनः । वधाय धार्तराष्ट्राणां निःश्वस्योर्ध्वमुदीक्ष्य च ॥ २० ॥' [वनपर्व—अ० ३७.] २. सांगेल, शिकवील, देईल. ३. वडील बंधु धर्मराज याचें. ४. तरवार. ५. ढाल. ६. चिलखत. ७. 'जातों' असें सांगितलें. धौम्य, धर्म व भीम हे अर्जुनापेक्षां वयानें मोठे होते. यास्तव ते अर्जुनाला पितृतुल्य होते. म्हणून तपश्चर्येला जाते वेळीं अर्जुनानें या तिघांना नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला. माद्रीनंदन (नकुळ व सहदेव) अर्जुनापेक्षां वयानें धाकटे होते म्हणून अर्जुनानें प्रयाणसमयीं यांना नमस्कार न करितां फक्त यांची भेट घेतली. पांचाळी ही अर्जुनाची स्त्री. प्रयाणसमयीं भार्येचा निरोप घेणें पतिप्रेमाचें लक्षण असल्यामुळें पार्थानें द्रौपदीचाही निरोप घेतला. ८. राजसूय-यज्ञाच्या पूर्वीं अर्जुनानें बहुतेक राजे पराजित केले होते व खांडवदहनाच्या वेळीं इंद्रासहित सर्व देव याच्या हातून पराजित झाले होते. तेव्हां अर्जुनाला 'एक वीर तूं त्रिजगतीं' असें म्हटल्यास अतिशयोक्तीचा दोष येणार नाहीं. ९. जय अथवा विजय हा स्त्री अशी कल्पना करून त्यांजबद्दल विजयश्री, जयश्री, विजयलक्ष्मी, जयलक्ष्मी अशा स्त्रीलिंगी शब्दांचा प्रयोग करण्याचा कवींचा प्राचीन संप्रदाय फार आढळतो. १०. शास्त्र. ११. वेद, ईश्वर. १२. यांचीं नांवें:— आप, तेज, वायु, आकाश आणि पृथ्वी. १३. 'प्रसन्नतेशीं' असा अन्य पाठ. १४. श्रीभार-विकविकृत **किरातार्जुनीय**नामक प्रख्यात काव्यांत अर्जुनाच्या प्रयाणसमयीं द्रौपदीनें केलेलें भाषण दिलेलें आहे तें फारच रम्य आहे. तें भाषण वीर व करुण या दोन रसांनीं भरलेलें आहे. हें भाषण वरील काव्याच्या तृतीय सर्गांत सांपडेल. हें फारच लांब असल्यामुळें येथें समग्र देतां येत नाहीं. त्यांपैकीं दोन तीन श्लोक मासल्याकरितां येथें देतों. ज्यांना वरील काव्य साध्य असेल त्यांनीं तें समग्र वाचावें अशी आमची शिफारस आहे:—'मग्नां द्विषच्छद्मनि पंकभूते संभावनां भूतिमिवोद्धरिष्यन् । आधिद्विषामा तपसां प्रसिद्धेरस्मद्विना मा भृशमुन्मनीभूः ॥ ३९ ॥' 'दुःशासनामर्षरजोविकीर्णैएभिर्विनाथैरिव भाग्यनाथैः । केशैः कदर्थीकृतवीर्यसारः कच्चित्स एवासि धनंजयस्त्वम् ॥ ४७ ॥' 'स क्षत्रियस्त्राणसहः सतां यस्तत्कार्मुकं कर्मसु यस्य शक्तिः । वहन्द्वयीं यद्यफलेऽर्थजाते करोत्यसंस्कारहतामिवोक्तिम् ॥ ४८ ॥' 'तदाशु कुर्वन्वचनं महर्षेर्मनोरथान्नः सफलीकुरुष्व । प्रत्यागतं त्वास्मि

वेत[1] उपवन । उल्लंघुनी सरिता[2] जीवन[3] । उत्तरदिशेशीं चालिला. ॥ ८४ ॥ तपोवनींचे तपोधन । नमस्कारिले ऋषि ब्राह्मण । महापुरुषांचें दर्शन । सिद्धवनीं लाधला. ॥ ८५ ॥ वोलांडिला हिमाचल[4] । गंधमादन[5]गिरी विशाळ । तेथूनी पुढां रत्नकील[6] । महा पर्वत टाकिला. ॥ ८६ ॥ अनेक वृक्षांचिया दाटी । क्रूर श्वापदांचिया कोटी । उल्लंघूनी[7] किरीटी । इंद्रकीला[8]तें पावलौ[9]. ॥ ८७ ॥ तेथें झाली आकाशवाणी,[10] । 'पार्था ! राहें इये स्थानीं, । पुढें मार्ग चालतां चरणीं[11] । नको[12], आतां स्थिर राहीं.' ॥ ८८ ॥ स्वर्गवाद्यें[13] पडती

कृतार्थमेव स्तनोपपीडं परिरब्धुकामा ॥ ५४ ॥' [निर्णयसागर छापखान्यांतील आवृत्ति–पृष्ठ ५१-५६.]

१. 'वन उपवन' असा अन्य पाठ आहे. २. नदी. ३. पाणी. ४. हिमस्य अचल: हिमाचल:. हिमाचा जो अचल (पर्वत) तो हिमाचल. हिमालय पर्वतावर फारच बर्फ असल्यामुळें त्याला हें नांव पडलें. प्राचीनकाळीं हिमालय किंवा हिमाचल हीं नांवें या संपूर्ण पर्वताला लावित नसत. या नांवाखालीं सांप्रतच्या हिमालयाचा नेपाळ व भूताना यांकडील एकचतुर्थांश भाग मोडत असे. इतर भागांना हिमवत्, हैमवत् इत्यादि अनेक नांवें होतीं. हीं जीं निरनिराळ्या भागाला निरनिराळीं नांवें होतीं तीं सर्व कालांतरानें संपूर्ण पर्वताचीं नांवें बनून समानार्थक झालीं. याचें कारण असें दिसतें कीं पर्वतांत जो हिमाचा अतिशयपणा तो या सर्व नांवांपासून सारखाच व्यक्त होत असल्यामुळें हीं नांवें एकमेकांपासून ओळखण्यास सामान्य जनांस त्रास पडूं लागला व या नांवांच्या उपयोगांत घोटाळा होऊं लागला, व अशा रीतीनें हीं नांवें समानार्थक व संपूर्णपर्वतद्योतक झालीं. ५. हिमालयाच्या मुख्य शिखरांपैकीं हें एक आहे. येथें कुबेराचें रम्य उपवन आहे अशी समजूत आहे. '**कुमारसंभवां**'त म्हटलें आहे:–'यस्य चोपवनं बाह्यं सुगंधिर्गंधमादनम्.' लग्न झालेल्या किंवा प्रेमपाशबद्ध झालेल्या नूतन दंपतीस क्रीडा करण्याकरितां कालिदास गंधमादनावरच बहुतकरून पाठवितो. [विक्रमोर्वशीय–अंक ४, कुमारसंभव–सर्ग ८ पहा.] गंधमादन मेरूच्या पूर्वेस असून याच्या उत्तरेस मानस सरोवर आहे. याचे उत्तरअक्षांश ३० असून पूर्वरेखांश सुमारें ८० आहेत. ६. हिमालयाचें एक शिखर. ७. 'उल्लंघूनियां वीर किरीटी' असें पाठांतर आहे. ८. इंद्रकील हें एक हिमालयाचें शिखर. मंदर नांवाचें हिमालयाचें जें शिखर आहे तें व हें एकच आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. इंद्र व कील (शिव) या पर्वतावर कधीं कधीं विहार करण्याला येतात म्हणून याला इंद्रकील पर्वत असें नांव पडलें अशी एक समजूत आहे. ९. 'बहु योजनें पोंचला' असा अन्य पाठ आहे. १०. अशरीरिणी वाणी. ही वाणी खरोखर आकाशाची नसून कोणत्या तरी एका देवाची असते, परंतु शब्द करणारा देव दिसत नसल्यामुळें त्या वाणीला आकाशवाणी असें म्हणतात. ११. 'धरणी' असा अन्य पाठ. १२. चरणीं पुढें मार्ग चालतां (श्रम) नको–असा अन्वय. पुढें जाऊन पायांना श्रम देण्याचें प्रयोजन नाहीं–

श्रवणीं[1] । वर्षाव [2]कीजे दिव्य [3]सुमनीं । मेघमंडळ [4]स्पर्शली धरणी । दाही दिशा देखत. ॥ ८९ ॥ भोंवतें पाहे [5]नरनायक । तंव [6]तपी ब्राह्मण एक । [7]ब्रह्मवंशी जाणो [8]अर्क । तपोतेजें विराजे. ॥ ९० ॥ तो म्हणे, 'महापुरुषा! । [9]मिरविशी ब्राह्मणाच्या वेषा । शस्त्रें धरिलीं तो [10]मानसा । हेतु कांहीं नेणवे.' ॥ ९१ ॥ **पार्थ** म्हणे, '[11]कार्याकारणें । केलें असे शस्त्रग्रहण, । व्हावया **इंद्र**दर्शन । दुरी [12]ठाया पातलों.' ॥९२॥ संतोषोनी ब्राह्मण म्हणे, । '**दे**वेंद्र [13]तो मी [14]एथें जाण.। [15]इच्छिलें जें तुझेनि मनें । तें मज सांगें सभाग्या!' ॥ ९३ ॥ **अर्जुन** म्हणे '[16]अमरेंद्रातें, । 'दिव्य शस्त्रें द्यावीं मातें । यालागीं होत[17] [18]कष्टी एथें । येणें

---

असा भाव. १३. आपला पुत्र अर्जुन तपश्चर्येला आला व त्याला लौकरच दिव्यास्त्रें मिळतील असें वाटून इंद्राला आनंद झाला व म्हणूनच त्यानें स्वर्गांत वाद्यें वाजविण्याचा हुकूम फर्माविला.

१. कानीं. २. येथें 'कीजे' म्हणजे 'झाला, पडला' असें समजावें. याला '**मो**रेश्वरीय उपयोग' म्हणण्यास हरकत नाहीं. ३. पुष्प. ४. सुमनवर्षाव इतक्या सपाट्यानें पडत होता कीं आकाश व पृथ्वी या दोहोंमध्यें जिकडे तिकडे फुलेंच फुलें झालीं व आकाश कोंणतें व पृथ्वी कोणती हें ओळखतां आलें नाहीं. ५. अर्जुन. ६. 'वृक्षातळीं' असा अन्य पाठ. ७. 'अंगें कृश शरीरीं जैसा अर्क' असाही पाठ आहे. ८. सूर्य. या ओंवीचा उत्तरार्ध **उत्प्रेक्षा** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. उत्प्रेक्षेचें लक्षण:—'अत्यंतसादृश्याद‌सतोऽपि धर्मस्य कल्पनमुत्प्रेक्षा । तां चेवमन्येशंकेध्रुवमित्यादिभिर्द्योतयेत ।' [काव्यानुशासने श्रीमद्वाग्भट:—पृष्ठ ३४] या अलंकाराचीं **मो**रोपंतकृत '**द्रो**णपर्वांतू'न कांहीं उदाहरणें देतों:—(१) 'भीमावरि न गणुनि शरवृष्टीची झडकरी करी लगट । वाटे जनांसि काळचि तो त्याला झडकरी करील गट ॥ ४६ ॥' (२) 'सत्वर निघोनि पळतां धरुनि करें कंठ दे उरीं गुडघे । चोंत्कार करी जाणों पतिला चाटावया म्हणे गुड घे. ॥ ५० ॥' (३) 'बहु भग्न चूर्ण केलें बल त्या भगदत्तसिंधुरागानें । वाटे गज बुडवितसे प्रलयसमयमत्तसिंधु रागानें. ॥ ५७ ॥' [अध्याय २] (४) 'तच्चापलतेशि दुजी दावील श्रीस काय मद नारी । वाटे करितो कौरवसंहार मनुष्यकाय मदनारी ॥ ३६ ॥' (५) 'प्रभुच्या मर्मीं हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा । वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा. ॥ ४९ ॥' ९. धारण करिशी. १०. मनांतला. ११. कार्याकारणें=कांहीं उद्देश सिद्धीस नेण्याकरितां. आपला उद्देश इंद्रदर्शन हाच आहे असें सुचवितो. १२. स्थानीं. १३. ज्याच्या दर्शनाकरितां तूं येथें आलास तो. १४. 'मीच' असा अन्य पाठ. १५. तुझेनि मनें जें इच्छिलें—असा अन्वय. तुझ्या मनानें जें इच्छिलें म्हणजे तुझी जी इच्छा असेल ती. १६. अमरेंद्रातें=अमरांचा जो इंद्र त्यातें. येथें इंद्र शब्दाचा अर्थ मुख्य, नायक, राजा असा घ्यावा. १७. 'बहुत कष्टें' असें पाठांतर आहे. १८. होत कष्टी=कष्टी होऊन, श्रम सोसून.

जालें[1] स्वामिया! ॥ ९४ ॥ हांसोनि[2] बोले पाक[3]शासन, । 'माझें जालें दर्शन,[4] । दिव्य भोग, स्वर्ग सदन । भोगीत राहें मजसंगीं.' ॥ ९५ ॥ अर्जुन बोले करुणा[5] शब्दू, । 'धर्मासहित चौघे बंधू । द्रौपदी ऐशी पवित्र[6] वधू[7] । अरण्यवासीं क-ष्टती.[8] ॥ ९६ ॥ राज्य हिरोनी दुष्ट वैरी । धरा[9] भोगती बळात्कारीं । हेळणा[10] छळणाचिया[11] उतरीं । हृदयवर्मी खोंचती.[12] ॥ ९७ ॥ हें[13] सर्व सोडून मागां[14] ।

१. झालें, जाहलें. प्रासासाठीं कवि कधीं कधीं झच्या स्थानीं एकांशी सवर्ण जो ज त्याचा आदेश करतातः—जसें माझी=माजी, माझें=माजें, माझे=माजे, तुझा=तुजा, इत्यादि. पंतांच्या काव्यांत देखील अशीं स्थळें आढळतातः—(१) दावाया सैरंध्रीप्रति हें मति वरिल केंवि मुख **माजी** (विराटपर्व—३-५३), (२) सेवुनि वांचेल कसी म्हणल्या गुरुस प्रजा गरा **माजी** (उद्योगपर्व—३-७८), (३) तें न स्मरे न तुमच्या वनवासालाहि चित्त मी **माजें** (उद्योगपर्व—१०-५१), (४) होइल कसा स्वपरिभव सांगा साहित्य होय जें **माजें** (भीष्मपर्व—१-७८), (५) मज जिंकिलें नदीजें न चले वळ यापुढें तिळहि **माजें** (उद्योगपर्व—१३-१७८), (६) पुत्री म्हणोनि नारदमुनि कळविति तेंचि चर मला **माजे** (उद्योगपर्व—१३-१९६), (७) चिंता करी वहु म्हणे कोण निवारील शाप हा **माजा** (आदिपर्व—२-५६), (८) होतों ब्राह्मणसुत मी मन्नाम सहस्रपात् सखा **माजा** (आदिपर्व—३-५०), (९) बा! सांगे मज, नेली कोणिकडे राक्षसी प्रिया **माजी** (बालमंत्ररामायण—४-१३), (१०) सीतेला अवलोकुनि, झाली हे दृष्टि निर्मला **माजी** (मंत्ररामायण—५-११९). २. आपला पुत्र फार संकटांत आहे व फार श्रम सोसून आपल्या संनिध आला याबद्दल इंद्राला वाईट वाटायला पाहिजे होतें; परंतु दुःखी न होतां इंद्र हांसतो हें कसें? आपला पुत्र फार शूर असूनही तो दैवगतींत सांपडला व दीन होऊन आपल्या जवळ शस्त्रें मागण्यास आला असें मनांत येऊन विधीचें विचेष्टित विचित्र आहे अशाबद्दल इंद्राला हास्य आलें असेल. ३. पाक नामक राक्षसाला शासन केल्यामुळें इंद्राला पाकशासन असें सार्थक नांव पडलें. ४. माझ्यासारख्या देवांच्या राजाचें दर्शन झाल्यावर तपश्चर्येसारखे श्रम सोसण्याचें किंवा शस्त्रास्त्र मिळवून युद्ध करण्याचें कारण नाहीं, स्वर्गसुख भोगीत स्वस्थ रहा असा इंद्राचा सांगण्याचा भाव. इंद्राच्या सांगण्यावरून इंद्र हांसला होता याचें कारण असें दिसतें कीं आपल्या जवळून शस्त्रें घेऊन शत्रूशीं युद्ध करण्याची अर्जुनाची जी इच्छा ती आपणास (इंद्रास) संमत नाहीं असें अर्जुनाला भासवावें. ५. आपणास पाहिजे असलेलीं अस्त्रें न देतां आपणास नको असें स्वर्गसौख्य भोगण्याबद्दल इंद्र सांगतो याबद्दल फार वाईट वाटून अर्जुन करुणस्वरानें इंद्रास म्हणतो. ६. अग्नींतून निघाल्यामुळें व पंचकन्यांपैकीं एक असल्यामुळें द्रौपदी सदा पवित्रच होती. ७. पत्नी. ८. 'कष्टती' याला कर्ता 'चौघे बंधू (आणि) द्रौपदी.' ९. पृथ्वी, राज्य. १०. थट्टा करून, चिडवून, मानसिक त्रास देऊन. ११. शारीरिक त्रास देऊन. १२. टोंचती. १३. चौघे बंधू व स्त्री यांस शत्रूकडून होत असलेला त्रास. १४. मागें टाकून, दुर्लक्ष करून.

म्यां गुंतिजे स्वर्गसुखभोगा । तरीं [1]अधम पुरुष प्रसंगीं जगा । उपमे योग्य मी एक. ॥ ९८ ॥ यालागीं [2]सर्वार्थसमर्था! । शस्त्रें देईं मज आतां.' । [3]शक्र म्हणे [4]तुझिया हिता । निरूपीन तें आइक. ॥ ९९ ॥ राहोनियां हेचि स्थळीं । तपें तोषवीं [6]चंद्रमौळी । तो भेटलिया तेचि काळीं । पुढती दर्शन म्यां [7]देणें.' ॥ १०० ॥ ते वेळीं शस्त्रें अस्त्रें । इच्छिलीं पावशी सुपवित्रें.' । ऐसें बोलोनि [8]सहस्रनेत्रें । [9]आच्छादिलें आपणातें. ॥ १०१ ॥ अर्जुनें स्थिर करूनि मन ।

---

१. आत्मसौख्याकडेच लक्ष देऊन कर्तव्य न केल्यामुळें, अधम आपल्याच हिताकडे लक्ष देऊन आपल्यावर विश्वास ठेवून तिष्ठत बसलेल्या बंधूस फसविल्यास अर्जुन भर्तृहरीच्या मानवराक्षसांच्या वर्गांत मोडला असता. परंतु अर्जुन कर्तव्याला जागृत असल्यामुळें तो इंद्राच्या म्हणण्याप्रमाणें वागला नाहीं, म्हणून तो अधम नव्हे. २. 'सर्वार्थसमर्था' या विशेषणानें तुला फक्त स्वर्गसौख्यच देण्याचें सामर्थ्य आहे असें नाहीं तर मला शस्त्रास्त्रें देण्याचेंही तुला सामर्थ्य आहे, असें अर्जुन सुचवितो. ३. इंद्र. ४. तुला मी सध्यांच शस्त्रें देत नाहीं असें सांगितल्यास अर्जुनाला वाईट वाटेल असें जाणून आपल्या मनांतली गोष्ट सांगण्यापूर्वी मी जें सांगेन तें तुझ्या हिताकरितांच आहे असें आश्वासन देऊन इंद्र आपली इच्छा अर्जुनाला कळवितो. ५. सांगेन. ६. शिव, त्र्यंबक. चंद्र आहे मौळीं (डोक्यावर) ज्याचा तो चंद्रमौलि (चंद्रमौळी.) भक्षण केलेल्या गरळाच्या योगानें आपल्या देहाचा दाह होऊं नये म्हणून शिवानें शीतल व रम्य चंद्राला शिरोभूषण केलें. म्हणून शिवाला चंद्रमौळी असें नांव पडलें. शिवानें चंद्राला आश्रय दिला याबद्दल एका कवीनें म्हटलें आहे:—'दोषाकरोऽपि कुटिलोऽपि कलंकितोऽपि । मित्रावसानसमये विहितोऽदयोपि ॥ चंद्रस्तथापि हरवल्लभतामुपैति । नैवाश्रितेषु महतां गुणदोषशंका ॥' अर्थः—दोषा=रात्रि तिच्या ठिकाणीं प्रकाशणारा किंवा दोषांचा आकर म्हणजे खाण; कुटिल=वांकडा किंवा कपटी; कलंकित=कलंक ज्याच्यावर आहे असा किंवा दुष्कीर्तिमान् मित्र म्हणजे सूर्य त्याच्या अस्तकालीं उगवणारा किंवा आपल्या मित्राच्या विपत्कालीं उत्कर्ष पावणारा असला चंद्र शंकराच्या प्रीतीस पात्र झाला आहे. तस्मात् एकदा आश्रय दिला म्हणजे त्या आश्रिताच्या गुणदोषांची शंका महात्मे ठेवीत नसतात. ७. देणें करीन, देईन. ८. इंद्राला हजार डोळे असल्यामुळें त्याला हें नांव पडलें. याला हजार डोळे होण्याचें कारण:—गौतमऋषी आश्रमांत नसतांना इंद्र गौतमाच्या रूपानें त्याच्या आश्रमांत आला व त्यानें गौतमपत्नी अहल्या इचें धर्षण केलें. याबद्दल गौतमानें, 'तुझ्या अंगांत हजार भगें होतील' असा इंद्रास शाप दिला. पुढें गौतमाला इंद्राची कींव आल्यामुळें त्यानें 'तुला तुझ्या अंगांत हजार भगें असतीलच परंतु इतरांना ते नेत्रांप्रमाणें दिसतील' असा उश्शाप दिला. तेव्हांपासून इंद्राला हें नांव पडलें. ९. आपणातें आच्छादिलें=अंतर्धान पावला, गुप्त जाहला.

धैर्य बसविलें [1]निर्जरवन । [2]प्रसन्न होय [3]त्रिलोचन । ऐसा यत्न मांडिला.॥१०२॥ माथां मिरवे जटाभार । दर्भांकुरीं वेढिलें [4]चीर । [5]प्रावर्ण [6]व्याघ्रांबर । [7]कृष्णाजिन आसना. ॥ १०३ ॥ प्रथम मासीं तपश्चर्या थोर । [8]तृतीय दिवशीं स्वीकारी आहार; । द्वितीय मासीं परम धीर । [9]षष्ठ [10]दिवशीं फळ भक्षी. ॥ १०४ ॥ तृतीय मासामाजी जाण । [11]पक्षपक्षां फळ [12]जीवन । [13]चतुर्थ मासीं [14]पवन । [15]निराहारी [16]निर्जळी. ॥ १०५ ॥ [17]खंडतर तपश्चर्या [18]निर्गुती । देखोनी सकळ [19]ऋषींच्या पंक्ती । [20]दुश्चित येउनी [21]शंकराप्रती । निवेदिती [22]भयवार्ता. ॥१०६॥ शंकर

१. 'निर्जरवन' याच्या ऐवजीं 'निर्जनवन' असा पाठ असणें चांगलें. २. 'प्रत्यक्ष' असा अन्य पाठ आहे. ३. शिव. (तीन आहेत नयन ज्याला तो=विरूपाक्ष. त्रीणि लोचनानि यस्य सः । त्रिषु कालेषु लोकेषु गुणेषु वेदेषु लोचनं ज्ञानं यस्येति वा ॥ त्रयो वेदा वर्णा अकारोकारमकारा वा लोचनानि यस्मिन् वा ।) ४. वस्त्र. ५. वसन, वस्त्र. ६. वाघाचें कातडें. ७. हरिणाचें कातडें. ८. तीन दिवसांनीं एकदां. ९. दर सहा दिवसांनीं. १०. 'अष्टम दिनीं' असाही पाठ आहे. ११. दर पंधरवड्यास. १२. पाणी. १३. 'चतुर्थ मासीं प्राशी पवन' असा अन्य पाठ. १४. हवा भक्षण करून म्हणजे हवेशिवाय कांहीं एक न खातां. १५. फल वगैरे भक्षण न करितां. १६. पाणी न पितां. तपश्चर्या करण्याची हीच रीति जेथें तेथें दृष्टीस पडते. अगोदर फलाहारानें कांहीं दिवस घालवून नंतर हळूहळू आहार बंद करावयाचा; नंतर कांहीं दिवस फक्त जल पिऊन राहून नंतर वायु भक्षण करावयाचा. पावसाच्या व थंडीच्या दिवसांत पाण्यामध्यें व उन्हाळ्यांत पंचाग्नीमध्यें तपश्चर्या करावयाची. कांहीं दिवस एका पायावर व कांहीं दिवस हात वर करून ईश्वरध्यान करावयाचें ही तपश्चर्येची रीत ठरलेली. ध्रुव, मृकंड, हिरण्यकशिपु इत्यादिकांनीं तपश्चर्या याच रीतीनें केली. 'किरातार्जुनीयां'त अर्जुनाच्या तपश्चर्येचें वर्णन केलेलें आहे; तेंही अशाचप्रकारचें—'अथ वासवस्य वचनेन रुचिरवदनस्त्रिलोचनम् । क्लांतिरहितमभिराधयितुं विधिवत्तपांसि विदधे धनंजयः ॥ १ ॥ अभिरश्मिमालि विमलस्य धृतजयधृतेरनाशुषः । तस्य भुवि बहुतिथास्तिथयः प्रतिजग्मुरेकचरणन्निषीदतः ॥ २ ॥ वपुरिंद्रियोपतपनेषु सततमसुखेषु पांडवः । व्याप नगपतिरिव स्थिरतां महतां हि धैर्यमविभाव्यवैभवम् ॥ ३ ॥ न पपात संनिहितपक्तिसुरभिषु फलेषु मानसम् । तस्य शुचिनि शिशिरे च पयस्यमृतायते हि सुतपः सुकर्मणाम् ॥ ४ ॥' [किरा०—सर्ग १२ पृ०१८८.] १७. कठिण, घोर, उग्र, असह्य. १८. निभ्रांत, निश्चल होऊन, बाह्य सृष्टीकडे न पाहतां ईश्वराकडेच लक्ष लावून तपश्चर्या करीत होता—असा भाव. १९. इंद्रकील पर्वतावर इतर जे ऋषी तपश्चर्या करीत होते ते. २०. दुश्चित्त=खिन्नवदन करून. ऋषींनीं खिन्न वदन करण्याचें कारण येथें स्पष्टपणें सांगितलें नाहीं. अर्जुन तपश्चर्या करीत होता तर त्यापासून इतर ऋषींना त्रास कां व्हावा? याचें कारण असें दिसतें कीं कोणताही मनुष्य घोर तपश्चर्या करूं लागला कीं त्याचें शारीरिक तेज वाढूं लागतें व तें वाढतां वाढतां आसपासच्या मंडळींना फारच असह्य होतें. तपाच्या योगानें अर्जुनाचें तेज किती वाढलें होतें हें पुढील श्लोकांत वर्णिलें

म्हणे, 'ऋषी हो! ऐका, । **पार्थ**संकल्प[1] मज ठाउका, । तुम्हां करावया शंका[2] । कारण कांहीं असेना. ॥१०७॥ वधावया शत्रुकुळातें । शस्त्रें मागे[3] **देवें**द्रानें, । तुम्हीं सर्वी[4] स्वस्थचित्तें । चिंता कांहीं न करावी.' ॥१०८॥ यावरी कौतुकें **व्यो**मकेश[5] । धरिता झाला किरातवेश[6] । म्हणे, 'नावेक[7] चाळवूं[8] वीरेश । पाठीं[9] पुरवूं कामना[10].' ॥१०९॥ सुवर्णवृक्ष[11] सुकोमळ । किंवा सांजे[12] **क**नकाचळ[13] । तेंवी भासे

---

आहे:—'मरुतां पतिः स्विदहिमांशुरुत पृथुशिखः शिखी तपः । तप्तुमसुकरमुपक्रमते न न-नोऽयमित्यवयये स तापसैः ॥ १५ ॥ न ददाह भूरुहवनानि हरितनयधाम दूरगम् । न स्म नयति परिशोषमपः सुसहं बभूव न च सिद्धतापसैः ॥ १६ ॥' [**कि**रातार्जुनीय काव्य—सर्ग १२ पृ० १९१.] अशा रीतीनें **अ**र्जुनाचें तेज असह्य झाल्यामुळें पर्वतावरील इतर ऋषी **शि**वाकडे दाद मागावयाला गेले. २१. शं कल्याणं करोतीति **शं**करः. आपन्निवारण करून लोकांचें नेहमीं कल्याण करतो म्हणून **शि**वाला **शं**कर असें नांव पडलें. ऋषी स्वकल्याणाकरितां शिवाकडे गेले होते म्हणून येथें शंकर हें नांव ऋषींची इच्छा पूर्ण होईल असें दर्शविते; म्हणून हें नांव येथें सार्थक आहे. २२. भयवार्ता कोणती हें येथें सांगितलें नाहीं. मूळांत ऋ-षीनें म्हटलेलें वचन दिलें आहे. 'संतापयति न सर्वानसौ साधु निवार्यतान्' [वनपर्व—अ० ३८ श्लो० ३१.] याच्या पेक्षां **कि**रातार्जुनीयांत ऋषींनीं सांगितलेली 'भयवार्ता' चांगल्या रीतीनें वर्णिलेली आहे:—'तरसैव कोऽपि भुवनैकपुरुष पुरुषस्तपस्यति । ज्योतिरमलवपुषोऽपि रवे-रभिभूय वृत्र इव भीमविग्रहः ॥ २६ ॥ स धनुर्महेषुधि बिभर्ति कवचमसिमुत्तमं जटाः । वल्कल-जिनमिति चित्रमिदं मुनिताविरोधि न च नास्य राजते ॥ २७ ॥ चलनेऽवनिश्चलति तस्य करणनियमे सदिङ्मुखम् । स्तंभमनुभवति शांतमरुद्ग्रहतारकागणयुतं नभस्तलम् ॥ २८ ॥' [किरा०—स० १२ पृ०१९४.]

१. उद्देश, कोणत्या इच्छेनें तपश्चर्या करीत आहे ती. **अ**र्जुनाचा उद्देश पुढच्या ओंवींत सांगितला आहे. २. **अ**र्जुनापासून आपल्याला पीडा होईल अशी भीति किंवा शंका मनांत बाळगूं नका—असा भाव. ३. 'मागे' याला कर्ता '**पार्थ**.' ४. 'असा' असा अन्य पाठ. ५. व्योम (पाणी) आहे केशीं (डोक्यावर) ज्याच्या तो **व्यो**मकेश. **शं**करानें आ-पल्या डोक्यावर गंगा धारण केल्यामुळें त्यास हें नांव पडलें. ६. पारधी. ७. क्षणभर. ८. क्रोधोद्दीपन करूं, चिथवून गम्मत पाहूं. अगोदर **अ**र्जुनाला प्रकोपित करून नंतर त्याची इच्छा पूर्ण करूं असा **शि**वाच्या सांगण्याचा उद्देश. ९. नंतर. १०. मनोरथ. ११. सोन्याचा वृक्ष. पारधीरूपी **शि**व इतका सुंदर दिसत असे—असा भाव. पारधी बहुधा सुंदर नसतात; परंतु हा पारधी केवळ **शि**व असल्यामुळें इतर पारध्यांप्रमाणें कुरूपी न होतां सुंदर बनला—असा भाव. १२. 'सादृश्य' असाही पाठ आहे. पारधीरूपी **शि**व केवळ सुंदर दिसत होता येवढेंच नाहीं तर मेरुपर्वताप्रमाणें अंगानें स्थूल असून धैर्यवान् वी-राप्रमाणें दिसत होता—असा भाव. १३. मेरुपर्वत.

जाश्वनीळ । [1]कामकुरंग पारधी.॥११०॥ भिल्ली[2]वेशें शै[3]लबाळी । रिद्धी[4]सिद्धि-[5]मातृकामेळीं । सहस्र स्त्रियांचे मेळीं । महावनीं विचरत. ॥ १११ ॥ शू[6]क नामा [7]महाअसुर । [8]वराहरूपी महाक्रूर । पृष्ठीं भेदला असतां शर । प्राणघाकें पळतसे. ॥ ११२ ॥ धनुष्यबाण सज्जूनि मुष्टी । किरात लागला दिसे पाठीं। वराह येवोनी पार्थानिकटी । 'रक्षीं' 'रक्षीं' म्हणतसे. ॥ ११३ ॥ [9]येरु [10]मौनें [11]जपासनीं । [12]संकेत दावी [13]उभउनी [14]पाणी, । परी तें नायकोनि [15]कानीं । पारधियें [16]वधिला. ॥ ११४ ॥ पार्थ म्हणे पारधियातें, । 'मातें शरण आलिया एथें । [17]विशेष [18]वारिलिया हातें । वराह कैसा मारिला? ॥ ११५ ॥ नव्हे हा पारधियाचा धर्म; । श्रेष्ठ म्हणती हा अधर्म.' । किरात म्हणे, 'तूं नरेंद्रोत्तम । परी अविवेक [19]जल्पसी. ॥ ११६ ॥ माझिये बाणीं केला [20]स्पर्शु । माझा विभाग [21]अ-

---

१. **शं**कर तपश्चर्या करीत असतां इंद्राच्या सांगण्यावरून **म**दनानें शंकराच्या मनांत पार्वतीविषयीं क्षणभर कामबुद्धि उत्पन्न केली; पण ती लागलीच आवरून **शं**करानें तृतीय नेत्र उघडून क्रोधाग्नि **म**दनावर फेंकतांच तो भस्म झाला. या कथानकावर येथें कविकटाक्ष आहे. २. भिल्लिणीच्या रूपानें. पार्वतीनें भिल्लीण बनण्याचें प्रयोजन नसतांही ती कां बनली, हें समजत नाहीं. ३. हिमालयाची कन्या पार्वती. ४. ही गणपतीची स्त्री आहे अशी सामान्य जनांची समजूत आहे; परंतु ही **कु**बेराची बायको आहे असें पुराणांत लिहिलें आहे. ५. द्वादशादित्यांतील **आ**र्यमा नामक आदित्याची स्त्री. ६. या राक्षसाचें नांव मूळांत **शू**क असें नसून **मू**क असें आहे. [वनपर्व—अ० ३९ श्लो० ७ पहा.] ७. 'दनुकुमार' असा अन्य पाठ. ८. डुकर. ९. इकडे तपश्चर्या करणारा **अर्जुन**. १०. तपश्चर्या करीत असल्यामुळें **अर्जुन** बोलूं शकला नाहीं. ११. 'तपासनी' असाही पाठ आहे. १२. मारूं नको असा. १३. उंच करून, वर करून. १४. हात. १५. 'वाणी' असाही पाठ आहे. १६. 'वधिला' याला कर्म 'वराह.' मूळांत अशी कथा आहे कीं तो कपटी वराह आपणास मारण्यास येत आहे असें वाटून अर्जुनानें त्यावर बाण सोडिला व त्याच संधींत किरातरूपधारी शिवाचाही बाण त्यावर गेला. तेव्हां वराह कोणी मारला याबद्दल त्यांच्यांत बराच वाद झाला व ते युद्धास प्रवृत्त झाले. अशा रीतीनें मूळच्या महाभारतांतील आणि **मु**क्तेश्वराच्या कथानकांत महदंतर दृष्टीस पडतें. यावरून **मु**क्तेश्वराजवळ असलेली **भा**रताची पोथी सध्याच्या पोथीहून भिन्न होती या आमच्या म्हणण्यास बळकटी येते. १७. मारूं नको असें मुद्दाम हात वर करून सांगितलें असतांही. या किरातार्जुनीय युद्धाचें वर्णन अमरचंद्रसूरिरचित **बालभारतां**तही सुरस केलें आहे. [वनपर्व—स० १ श्लो० २०-४४ पृ० १७९-१८१.] १८. 'निरोध केलिया' असा अन्य पाठ आहे. १९. बडबडतोस. २०. माझ्या बाणाच्या स्पर्शानेंच वराह मेला असा किराताच्या सांगण्याचा

रण्यपशु । तो[१] म्यां मारिला म्हणोनी दोषूं[२] । तूं कां मातें ठेविशी? ॥ ११७ ॥ हें वन माझें वसतिस्थान[३].' । पार्थ म्हणे, 'माझा बाण । एकट असतां[४] पावशी मरण; । असंख्य मातें रक्षिती[५]. ॥ ११८ ॥ माझें हेळूनियां[६] वचन । घेतला आरण्य पशूचा प्राण, । यालागीं तुतें यमसदन[७] । दाखवीन तात्काळीं[८].॥ ११९॥ दोघेजणीं वाहिलीं चापें[९] । दोघे खळबळले महाकोपें, । एकमेकांतें सांटोपें[१०] ।

---

भाव. खरोखर वराह किराताच्याच बाणानें मेला होता.२१. अरण्यांत राहणारे जितके पशु त्या सर्वांवर माझा पूर्ण हक्क आहे, त्यांना मारण्याचा मला अधिकार आहे, असें किरात म्हणतो.

१. ज्याला मारण्याचा मला हक्क आहे तो. २. जी गोष्ट करण्याला आपल्याला अधिकार आहे ती केल्यास कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाहीं असें असून त्याबद्दलच तूं मला दोष देतोस हें कसें, असें व्याध म्हणतो. ३. राहण्याचें ठिकाण. व्याधाच्या राहण्याचें ठिकाण अरण्य. हे व्याध, हिंदुस्थानांत आर्य लोक येण्यापूर्वीं येथें राहत असलेले अनार्य लोक असावेत असा विद्वान् लोकांचा तर्क आहे. आर्य लोक या देशांत आल्यावर त्यांनीं अनार्य लोकांची जागा बळकावली; तेव्हां अर्थात् अनार्य लोकांना डोंगरावर व अरण्यांत वास करणें भाग पडलें. अरण्यांत राहत असल्यामुळें यांना मृगयेचा विशेष अभ्यास करावा लागला. यामुळें यांची मृगयेविषयीं प्रख्याति झाली व मृगयेकरितां जाणाऱ्या लोकांना अरण्यांत यांचा फार उपयोग होऊं लागला. एके ठिकाणीं या व्याधांविषयीं म्हटलें आहे:—'निहत निहत तूर्णं धत्त धत्त त्वराभिः मिलत मिलत के के कुत्र कुत्र प्रयांति । इत इत इत एते यांति यांतीत्यरण्यात् अतुलकलकलश्रीः सर्वतः प्रादुरासीत् ॥ १ ॥ मार्गं देहि पदं निधेहि निभृतं तं शब्दमाकर्णय श्वानं वारय कंदलात्कलकलः कोऽयं सखे तावकः । इत्यन्योन्यमनेकधा मृगवधव्यापारपारंगमैः व्याधैः कोऽप्यधिको रसः प्रतिपदं जल्पद्भिरुत्पाद्यते ॥ २ ॥' नेहमीं अरण्यांत राहत असल्यामुळें, अरण्याचे आपण राजे व अरण्यांतल्या पशूंना मारणें हेंच आपलें कर्तव्य असें यांस वाटूं लागलें यांत नवल नाहीं. पारध्यांच्या या समजुतीला अनुसरून शिव हें वन माझें वसतिस्थान 'माझा विभाग अरण्यपशु' असें अर्जुनाला सांगतात. ४. एकट असतां=एकटा असल्यासही, एकाच बाणानें, माझ्या एकाच बाणानें तूं मरशील—असा भाव. ५. असंख्य मातें रक्षिती=अनेक बाण माझें रक्षण करितात, माझ्याजवळ अनेक बाण असल्यामुळें मी आत्मरक्षण करण्यास समर्थ आहें, परंतु मी तुला एका बाणानें मारणार तर आत्मरक्षणाची तयारी कर. हा अर्जुनाच्या म्हणण्याचा भाव. ६. अवमानून, न ऐकतां, धिक्कारून. ७. यमसदन=यमाचें घर, मृत्युपंथ, नरक. यम हा सूर्याचा पुत्र व दक्षिणदिशेचा दिक्पाल. याच्या आज्ञेशिवाय कोणीही मनुष्य मृत होत नाहीं—अशी समजूत आहे. म्हणून यमाच्या सदनीं पाठविणें म्हणजे मारणें असा अर्थ पडला. ८. तात्काळीं=त्याच काळीं. (येथें) याचवेळीं, एकदम. ९. धनुष्यें. १०. सगर्वें.

लक्षूनियां विंधिती.[1] ॥ १२० ॥ अग्नि,[2] पर्जन्य, वात, गिरी, । वज्रें, चक्रें, गदा-प्रहारीं । **पार्थ** तोडितां[3] अंतरीं । **स**दाशिव संतोषे. ॥ १२१ ॥ नाना शस्त्रें सोडितां[4] वेगीं । एकहि न लागे **कि**रीटी[5]आंगीं[6] । जेंवि[7] कां नामस्मरत्यालागीं[8] । दोषें[9] स्पर्श न कीजे. ॥ १२२ ॥ असंख्य बाण विंधितां हातें । रिते पडले अक्षय[10] भाते, । **पार्थ** म्हणे, 'नवल एथें । आजि देखों संग्रामीं ! ॥ १२३ ॥ माझिया बाणांचा अघात[11] । साहों न शकती देव दैत्य, । तें आजि झालें सर्व

---

१. बाणप्रहार करिती. २. येथें अर्जुन व किरात हे अग्नि, पर्जन्य व वात इत्यादिकांनीं युद्ध करीत होते असें लिहिलें आहे. तेथें अग्न्यस्त्र, पर्जन्यास्त्र, वातास्त्र इत्यादिक अस्त्रांनीं युद्ध करीत होते असें समजावें. येथें स्वर्गांत ईश्वराशीं व सैतानाशीं झालेल्या लढाईची आठवण होते. या लढाईबद्दल **सै**तान म्हणतोः—

> "But see! the angry Victor hath recalled
> His ministers of vengeance and pursuit
> Back to the gates of Heaven: the sulphurous hail,
> Shot after us in storm, o'erblown, hath laid
> The fiery surge, that from the precipice
> Of Heaven received us falling; and the thunder,
> Winged with red lightning and impetuous rage,
> Perhaps hath spent his shafts, and ceases now
> To bellow through the vast and boundless deep."
>
> Paradise Lost. Bk. I.

सैतानाच्या लढाईंत आकाशांतला देव सैतानाशीं वैरभावानें युद्ध करीत होता व सांप्रतच्या लढाईंत शंकर अर्जुनाशीं वात्सल्यानें युद्ध करीत आहे. ३. 'ताडितां' असाही पाठ आहे. ४. 'ताडितां वेगें' असा अन्य पाठ. ५. अर्जुन. आपणास हें नांव पडण्याचें कारण अर्जुनच सांगतोः—'पुरा शक्रेण मे बद्धं युध्यतो दानवर्षभैः । किरीटं मूर्ध्नि सूर्याभं तेनाहुर्मां किरीटिनम् ॥' ६. 'अंगें' असा अन्य पाठ. ७. 'जैसें नामस्मरणें भंगे' असा अन्य पाठ. ८. नेहमीं ईश्वरस्मरण करणाऱ्या मनुष्याला. कोणत्याही ईश्वराच्या स्मरणाला नामस्मरण म्हणतां येईल, परंतु हा शब्द बहुतकरून रामनामस्मरणाच्या अर्थीं योजिला जातो. एके ठिकाणीं रामनामस्मरणाचें माहात्म्य असें सांगितलें आहे कीं, 'राम' या शब्दांतील 'रा' हें अक्षर उच्चारल्याबरोबर उच्चारणाऱ्यानें केलेलें सर्व पाप नाहींसें होतें व 'म' हें दुसरें अक्षर उच्चारल्याबरोबर त्या मनुष्याजवळ पाप येण्यास भिऊं लागतें ! नामस्मरण नवविध भक्तींपैकीं एक आहे. या प्रकारच्या भक्तीनें अनेक नर तरले. ९. 'पातकांचा पर्वत' असा अन्य पाठ आहे. १०. ज्यांना कधीं क्षय नाहीं असे. भाते जर अक्षय होते तर ते रिते पडले कसे अशी शंका येण्याचा संभव

व्यर्थ । एक ही न लागे तयातें[1].' ॥ १२४ ॥ मेघवृष्टी होतां प्रबळ[2] । [3]चळे न ढळे जैसा शैल[4] । तेंवी निश्चल [5]जांश्वनीळ । **पार्थ**बाण [6]प्रकटतां. ॥ १२५ ॥ कां [7]निंदेचे घाय तिर्खट । एकही न मनीं ब्रह्मनिष्ठ; । तेंवी [9]निवांत **नीलकंठ** । **अर्जुना**स्त्र लागतां॥ १२६ ॥**पार्थें** मानुनी कौतुक । म्हणे, 'हा होईल[10] **त्रिपुरांतक**। त्यावांचूनि माझे [11]सायक । कोण साहे त्रैलोक्यीं ? ॥ १२७ ॥ वर्षला [12]शिळांचा पाऊस । देखोनी तोषला **व्यो**मकेश, ।'**अर्जुना** नावरे आवेश । [13]बाहुयुद्धा [14]मिसळला. ॥ १२८ ॥ मल्लयुद्धीं आंग [15]कवळी, । [16]वज्रमुष्टी ताडितां [17]बळी, । अधिक तोषोनी [18]**चं**द्रमौळी । 'भला रे! भला' म्हणतसे. ॥ १२९ ॥ [19]किरातराजें तयेकाळीं । **पा**र्था

---

आहे, म्हणून येथें अक्षय शब्दाचा अर्थ 'कधींही न सरणारें' असें न घेतां, 'असंख्य, फार, अतिशय' असा घ्यावा. येथें विरोध किंवा विरोधाभासनामक अलंकार झाला. या अलंकाराचें लक्षण:–'अविरोधेऽपि विरोधप्रतीतिर्विरोधः । साक्षाद्विरोधे तु काव्यत्वासंभवात् ॥' [काव्यानुशासने श्रीमद्वाग्भटः] 'आपाते हि विरुद्धत्वं यत्र वाक्ये न तत्वतः । शब्दार्थकृतमाभाति स **विरोधः** स्मृतो यथा. ॥' (वाग्भटालंकार–४ परिच्छेद १२१). ११. मार.

१. किरातातें. २. प्रचंड, जोरानें. ३. 'न ढळे महा शैल' असाही पाठ आहे. ४. पर्वत, प्रचंड शिळा. या ओंवीच्या प्रथम दोन चरणांत जो अर्थ आहे त्याच अर्थाची गोल्ड स्मिथ कवीच्या Deserted Village काव्याची शेवटची ओळ आहे:—"As rocks resist the billows and the sky." ही ओळ जानसनची आहे असें म्हणतात. ५. सदाशिव. ६. 'झगटतां' असाही पाठ आहे. ७. 'कामनेचे' असाही पाठ आहे. ८. असह्य. ९. शांत, अढळ. १०. होण्याचा संभव आहे, असेल. ११. बाण. १२. दगडांच्या. 'शरांचा' असा अन्य पाठ आहे. १३. मुष्टियुद्ध, मल्लयुद्ध. १४. उद्युक्त झाला, प्रवृत्त झाला. १५. आंगाला आंग लावी, आपलें शरीर शत्रूच्या शरीरावर आपटून शत्रूला दुःख देई. १६. वज्रतुल्य मुष्टी, वज्रघातापासून ज्याप्रमाणें इजा होते त्याच प्रमाणें यांच्या मुष्टिघातानें शत्रूला फार इजा होत असे. १७. अर्जुन. किरात व अर्जुन यांच्या मल्लयुद्धाविषयीं किरातार्जुनीयांत असें लिहिलें आहे:–'प्रववृतेऽथ महाहवमल्लयोः अचलसंचलनाहरणो रणः । करणशृंखलसंकलनागुरुर्गुरुभुजायुधगर्वितयोस्तयोः ॥ ८ ॥ अयमसौ भगवानुत पांडवः स्थितमवाङ्मुनिना शशिमौलिना । समधिरूढमजेन नु जिष्णुना स्विदिति वेगवशान्मुमुहे गणैः ॥ ९ ॥ प्रचलिते चलितं स्थितमास्थिते विनमिते नतमुन्नतमुन्नतौ । वृषकपिध्वजयोरसहिष्णुना मुहुरभावभयादिव भूभृता ॥ १० ॥ करणशृंखलनिःसृतयोस्तयोः कृतभुजध्वनि वल्गु विवल्गतोः । चरणपातनिपातितरोधसः प्रससृपुः सरितः परितः स्थलीः ॥ ११ ॥' [सर्ग १८ पृ० २८५-२८६.] १८. शिवें. १९. पारध्यानें.

कवळितां बाहु[१]जाळीं । मूर्च्छा पावोनी भूतळीं । अ[२]चेतन पडियेला. ॥ १३० ॥
स[३]वेंचि सावध होउनी वेगा, । पूजा मांडिली पा[४]र्थिवलिंगा, । पारधी [५]अंतरा
ठा[६]कोनी उगा । चोजें दृष्टी पाहातसे. ॥ १३१ ॥ पार्थिवलिंगीं पुष्पांजली ।
[८]वोपिली ते किरा[९]तमौळीं । दृष्टी देखोनी चंद्रमौळी । सिद्ध[१०] संकेत[११] लाधला[१२].
॥ १३२ ॥ जाणवलें अं[१३]तर्यामीं । म्हणे, 'हा हो शंकरस्वामी.' । लोटांगण घा[१४]लूनी
[१५]अंतर्यामीं । स्तुती मुखें वदतसे. ॥ १३३ ॥ 'क[१६]पर्दी ! स[१७]र्वदेवेश ! भ[१८]व ! ।

---

१. हाताच्या जाळ्यांत म्हणजे कडकडून आलिंगन देऊन शत्रूचा नाश कसा करितात हें **शि**वाजी व **अ**फजुलखान यांच्या उदाहरणावरून इतिहासज्ञांस माहित आहेच. २. संज्ञारहित, विषयग्रहणाक्षम. किरातानें जोरानें कवळून धरिल्यामुळें अर्जुन मूर्च्छित झाला. ३. तत्क्षणींच, लागलाच. ४. रोज सकाळीं मातीचें लिंग करून त्याची पूजा करितात या विधीला पार्थिवपूजा किंवा पार्थिवलिंगपूजा असें म्हणतात. पार्थिवलिंगपूजेचें फार माहात्म्य सांगितलें आहे. लिंगपुराणांत याविषयीं पुष्कळ अध्याय भरलेले आहेत. लिंगाइत लोकांना पार्थिवपूजा आवडत नाहीं. रोज एक नवीन लिंग न करितां नेहमीं एकच लिंग आपल्या बरोबर ठेवावें असें त्यांचें म्हणणें आहे. तरी ही पार्थिवपूजा तैलंगणांत व महाराष्ट्रांत फार प्रचारांत आहे. पार्थिव=मातीचें. ५. अंतरा ठाकोनी=दूर उभा राहून. ६. 'पाहोनी' असा अन्य पाठ. ७. चमत्कार. 'चोद्य' या संस्कृत शब्दाचा 'चोज' हा मराठींतला अपभ्रंश आहे. ८. अर्पिली. ९. पारध्याच्या मस्तकीं. १०. 'संकल्प साधला' असाही पाठ आहे. ११. **चं**द्रमौळी सिद्ध संकेत लाधला=आधार सांपडला. म्हणजे पार्थिवलिंगावरची पुष्पांजली किराताच्या डोक्यावर दिसत होती यावरून हा (किरात) खातरीनें **शं**कर असावा असें **अ**र्जुनाला वाटूं लागलें; व त्या प्रमाणावरून त्याची खातरीही झाली. १२. समजला. १३. मनांत. मूळांत ही **अ**र्जुनाला **शं**कराची अशीच ओळख पटली असें लिहिलें आहे. परंतु **कि**रातार्जुनीय काव्यांत असें सांगितलें नाहीं. युद्ध करतां करतां किराताचे पाय **अ**र्जुनाच्या हातांत सांपडले व आतां **अ**र्जुन किराताला जमिनीवर पाडणार तोंच किरातानें **अ**र्जुनाला आपलें निज स्वरूप दाखविलें; तेव्हां हा किरात नव्हे, **शं**कर आहे असें **अ**र्जुनास समजलें. १४. 'नमस्कारुनियां भूमी' असाही पाठ आहे. १५. मनांतही **शं**कराची स्तुती करीत होता व तोंडानें मोठ्यानेंही स्तुती करीत होता. **शं**करस्तुतींत तादात्म्य झाला होता—असा भाव. १६. जटा आहेत ज्याला तो. (कपर्द=जटाजूट.) १७. सर्व देवांचा ईश्वर. **शं**कराचें भूतेश्वरत्व व देवेश्वरत्व श्रुतिपुराणप्रसिद्ध आहे. त्याबद्दल येथें कांहीं प्रमाणें दाखवितों:— ईशानः सर्वभूतानामीश्वरः' (तैत्तिरीयोपनिषत्.) 'तमीश्वराणां परमं महेश्वरं तं देवतानां परमं च दैवतम् । पतिं यतीनां परमं पुरस्तात् विदाम देवं भुवनेशमीड्यम् ॥' (श्वेताश्वतर.) एकदां सर्व ईश्वर पशु झाले होते, **शं**कर पशुपति झाले होते. यास्तव ही **शं**कराला देवेश म्हणतां येईल. १८. कधींही विनाश न पावतां सदा सर्व जग व्यापून राहत असल्यामुळें **शं**कराला हें नांव पडलें.

[1]अंगारनेत्र! श्रीशिव!। देवदेव! महादेव!। [2]नीलग्रीव! जटाधारी! ॥१३४॥ तूंची कारण परम। विभू [3]त्र्यंबक! सर्वोत्तम,। देवत्रया विश्राम। [4]आनंदधाम तूं एक. ॥ १३५ ॥ लीले करिशी विश्वजनन। कृपादृष्टी प्रतिपालन। प्रलयीं करूनी सर्व दहन। शेष उरशी तूं एक. ॥ १३६ ॥ शिव म्हणतां वि[5]ष्णु जाण,। विष्णु म्हणतां तूं महेश पूर्ण;। नोळखोनी मूढ श्वान। भेदवादें भुंकती. ॥ १३७ ॥ [6]दक्षयज्ञविनाशना!। हरिहरा! ललाटनयना। कृपा करावी परम दीना। शरण चरणां मी स्वामिया! ॥ १३८ ॥ देहाभिमानें दे[7]हाच्या उर्मी। नकळत मिसळलों जी! संग्रामीं,। [8]तंव तूं पतितपावन नामीं। [9]क्षेमें करीं [10]दासीं या.' ॥ १३९ ॥ ऐसें ऐकोनी स्तवन। संतोषला [11]गिरिजारमण,। परम प्रीती आलिंगन। पार्थालागीं दीधलें. ॥ १४० ॥ म्हणे, 'पूर्वी त्वां स्वधर्मी। [12]नारायणसमागमीं। तपश्चर्या [13]बदरिकाश्रमीं। बहुकाळ त्वां केली.

१. शंकराच्या तिसऱ्या डोळ्यांत अग्नि आहे, अशी समजूत असल्यामुळें त्यास 'अंगारनेत्र' असें म्हणतात. २. नीलकंठ. ग्रीवा=कंठ, मान. ३. शंकर. ['हरः स्मरहरो भर्गस्त्र्यंबकस्त्रिपुरांतकः' इत्यमरः.] या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं महाभारताच्या द्रोणपर्वांत म्हटलें आहे:— 'तिस्रो देव्यो यदा चैनं भजंते भुवनेश्वरम्। द्यौरापः पृथिवी चैव त्र्यंबकस्तु ततः स्मृतः ॥.' या शब्दाच्या आणखी अनेक व्युत्पत्ति आहेत त्यांपैकीं कांहीं येथें सांगतों:—त्रीणि अंबकानि (नयनानि) अस्य इति त्र्यंबकः. ज्याला तीन अंबकें (डोळे) आहेत तो त्र्यंबक. (२) त्रयाणां लोकानां अंबकः पिता इति त्र्यंबकः. तीन लोकांचा जो अंबक (पिता) तो त्र्यंबक. (३) त्रीन् वेदान् अंबते शब्दायते इति त्र्यंबकः. तीन वेद (ऋक्, यजुस् व साम) जो उच्चारितो तो त्र्यंबक. (४) त्रयः अकारोकारमकाराः अंबाः शब्दाः प्रतिपादकाः यस्य इति त्र्यंबकः. अकार, उकार व मकार हे तीन प्रतिपादक आहेत ज्याचे तो त्र्यंबक. ४. आनंदाचें घर. ५. विष्णु व शिव हे भिन्न नाहींत, त्यांच्यांत भेद मानूं नये असें अर्जुन म्हणतो. ६. दक्षयज्ञाचा वीरभद्रानें नाश केला. परंतु वीरभद्राला शिवानेंच पाठविल्यामुळें शिवालाच 'दक्षयज्ञविनाशन' म्हणतात. ७. 'भ्रमाच्या' असा अन्य पाठ आहे. ८. 'तें तूं' असाही पाठ आहे. ९. 'क्षमा' असा अन्य पाठ आहे. १०. दासाच्या ठायीं. ११. पार्वतीपति, शंकर. १२. स्वायंभुव मन्वंतरांत धर्म नामक ऋषीला मूर्ति नामक स्त्रीपासून दोन पुत्र झाले. एकाचें नांव नर व दुसऱ्याचें नांव नारायण. हे दोघेही विष्णूच्या अंशानें जन्मले होते. कित्येकांच्या मतें हे दोघे नसून एकच पुरुष होता असें आहे; परंतु महाभारतादि ग्रंथांत हे दोघे होते असें लिहिलें आहे. यांना, देवौ, पूर्वदेवौ, ऋषी व ऋषिसत्तमौ इतकीं नांवें आहेत. या दोघांनीं बदरिकाश्रमांत घोर तपश्चर्या केली; तिजपासून इंद्राला भीति उत्पन्न झाली व त्यानें यांचा तपोभंग करण्याकरितां रंभा, अप्सरा इत्यादिकांना पाठविलें. त्यांना लाजविण्याकरितां नारायणानें त्या स्त्रियांपेक्षां सुंदर उर्वशी नामक स्त्री आपल्या मांडींतून उत्पन्न केली. पुढें

॥ १४१ ॥ [1]भूभार फेडावया लागीं । [2]अवतरलासी कृष्णसंगीं । [3]निर्मळ भजनें [4]युगानुयुगीं । आराधिलें त्वां मज. ॥ १४२ ॥ भक्तिनें तोषविलें मातें, । कृ[5]पेनें पावलों तुतें, । जें इच्छिजे तुझेनि चित्तें । तें मज माग पवित्रा !'॥१४३॥ कवळूनियां उभय चरणां । अर्जुन म्हणे, '[6]मल्लिकार्जुना ! । पूर्वी कार्तवीर्य अ-

हे नर नारायण अनुक्रमें अर्जुन व कृष्ण होऊन जन्मले. येथें या कथानकाकडे शंकराचें लक्ष आहे. १३. येथें बदरीवृक्ष (बोरीचीं झाडें) फार असल्यामुळें यास बदरिकाश्रम असें असें नांव पडलें. हा आश्रम हिमालयावर आहे.

१. कौरव इत्यादि दुष्टांमुळें भूमीला जो भार झाला आहे तो. २. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥' असें जें कृष्णानें प्रत्येक युगांतलें कर्तव्य सांगितलें त्यांत त्याला (कृष्णाला) सहाय करण्याकरितां तूं जन्मलास—असा शंकराच्या सांगण्याचा भाव. ३. निर्मळ भजनें=निर्मलांतःकरणानें भजनें करून. येथें 'निर्मळ' असें म्हणण्याचें कारण असें कीं कित्येक भक्त ईश्वराचें भजन करितात परंतु ते मनापासून करीत नाहींत. मनांत भलत्याच पदार्थांसंबंधानें विचार चालले असतात व वरून मात्र ईश्वरभजनाचा आव घालतात. अशा प्रकारचा अर्जुन नव्हता. ४. अनेक युगांपासून. नरनारायणावतारापासून अर्जुन व कृष्ण यांच्या जन्मापर्यंत किती युगें गत झालीं हें पाहूं. श्वेतवराहकल्पाच्या स्वायंभुव मन्वंतरांत नरनारायण झाले. हे त्या मन्वंतराच्या कोणत्या चौकडीच्या कोणत्या युगांत झाले हें समजत नाहीं, तरी ते त्या मन्वंतराच्या शेवटच्या चौकडीच्या शेवटच्या युगांत झाले असें समजूं; व कृष्णार्जुन वैवस्वत मन्वंतराच्या अठ्ठाविसाव्या चौकडीच्या द्वापारयुगांत जन्मले होते, हें सर्वप्रसिद्ध आहेच. यास्तव स्वायंभुव मन्वंतराच्या अंतापासून तों वैवस्वत मन्वंतराच्या आरंभापर्यंत स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत आणि चाक्षुष हीं पांच मन्वंतरें गत झालीं. प्रत्येक मन्वंतराच्या ७१ चौकड्या, याप्रमाणें या पांच मन्वंतरांच्या ३५५ चौकड्या झाल्या. प्रत्येक चौकड्याचीं चार युगें, या प्रमाणें एकंदर १४२० युगें झालीं. यांच्यांत वैवस्वत मन्वंतराच्या सत्तावीस चौकड्यांचीं १०८ युगें व अठ्ठाविसाव्या चौकडीचीं कृत व त्रेता हीं दोन युगें मिळविलीं म्हणजे एकंदर १५३० युगें होतात. यावरून नरनारायणांनीं कमींत कमी १५३० युगें शंकराची आराधना केली होती असें सिद्ध होतें. तेव्हां शंकरानें 'युगानुयुगीं' या शब्दाचा उपयोग केला तो किती यथार्थ आहे हें निराळें सांगायला नकोच. ५. प्रसन्न झालों. ६. शंकरा ! मल्लिकावत् (पुष्पविशेषः) योऽर्जुनः (शुभ्रः) स मल्लिकार्जुनः मल्लिकाप्रमाणें (मोगऱ्याप्रमाणें) जो अर्जुन (शुभ्र) तो मल्लिकार्जुन. शंकर पांढरा आहे हें प्रख्यातच आहे. हें शंकराचें जरी एक नांव आहे तरी हें मुख्यत्वेंकरून श्रीशैल नामक पर्वतावरील ज्योतिर्लिंगाला लावित असतात. श्रीशैल पर्वत तेलंगणांत आहे. या पर्वताचें शिखर पाहिल्याबरोबर मनुष्य मुक्त होतो अशी समजूत आहे. या पर्वतावरील ज्योतिर्लिंग व इतर मूर्ति विश्वकर्म्याच्या हातच्या आहेत असें म्हणतात. विश्व-

र्जुना। वधविलें ज्या परी. ॥ १४४ ॥ प्रसन्न झाला श्रीरेणुकासुता[1]। तैसेचि कौरवांच्या घाता[2]। यालागीं मातें कुंमारताता[3]! । साहाय्य झालें पाहिजे. ॥ १४५ ॥ अस्त्र तुझें अत्यद्भुत। ज्यातें म्हणती पाशुपत। तें मज देऊनी सनाथ। स्वामीनें केलें पाहिजे.' ॥ १४६ ॥ वरद हस्त ठेवूनियां माथां। शंकर म्हणे, 'कुंतीसुता! । माझिया कृपें पाशुपता[5]। अस्त्रालागीं देतसें. ॥१४७॥

---

कर्म्यानें अगोदर या पर्वतावर कैलासाची थेट प्रतिमाच काढिली होती. परंतु कैलासांत व या पर्वतावरील देवांत कांहींएक फरक नसल्यामुळें ते सर्व कैलासांत उडून गेले; कारण त्यांना या मृत्युलोकांत राहतां आलें नाहीं. विश्वकर्म्यानें या पर्वतावर पुन्हां मूर्ति वसविल्या व त्या पुन्हा कैलासांत निघून गेल्या. असें तीनवेळां झालें. चौथ्यानदां मूर्ति करितांना विश्वकर्म्यानें सर्व कैलासाप्रमाणेंच व्यवस्था करून मल्लिकार्जुनाचें मंदिर मात्र कैलासाहून जरा निराळ्या प्रकारें वसविलें. यावरून या पर्वतावरील सर्व देव कैलासांत न जातां याच पर्वतावर राहिले; व या पर्वताचें माहात्म्य वाढलें, व मल्लिकार्जुनाचें लिंग द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं एक झालें. हीं बारा लिंगें जेथें आहेत त्या स्थलांचीं व या बारा लिंगांचीं नांवें:—(१) सोरट येथें सोमनाथ, (२) उज्जयनी येथें महाकाल, (३) बदरी येथें केदार, (४) काशी येथें विश्वेश्वर, (५) महेश्वर येथें ओंकारेश्वर, (६) त्र्यंबक येथें त्र्यंबकेश्वर, (७) वेरूळ येथें घृष्णेश्वर, (८) आवंढें येथें नागनाथ, (९) परळी येथें वैजनाथ, (१०) भीमाशंकर येथें भीमाशंकर, (११) श्रीशैलपर्वतावर मल्लिकार्जुन, (१२) सेतुबंध येथें रामेश्वर.

१. रेणुकेच्या मुलाला, परशुरामाला. २. 'इति निगदितवंतं सूनुमुच्चैर्मघोनः प्रणतशिरसमीशः सादरं सांत्वयित्वा। ज्वलदनलपरीतं रौद्रमस्त्रं दधानं धनुरुपपदमस्मै वेदमभ्यादिदेश ॥' [किरातार्जुनीय–सर्ग १८ श्लोक ४४]. ३. सृष्टि उत्पन्न करण्याचें काम ब्रह्माचें, रक्षण्याचें काम विष्णूचें व संहाराचें काम शंकराचें हें प्रसिद्धच आहे. ४. शंकरा! ५. लिंगपुराणांत पाशुपतव्रत नामक एका व्रताचें ९ व्या व १८ व्या अध्यायांत वर्णन आहे. पाशुपतव्रत करण्याची रीत व त्याचें माहात्म्य असें सांगितलें आहे:—'एतद्व्रतं पाशुपतं चरिष्यामि समासतः। अग्निमाधाय विधिवदृग्यजुःसामसंभवैः ॥४६॥ उपोषितः शुचिः स्नातः शुक्लांबरधरः स्वयम्। शुक्लयज्ञोपवीती च शुक्लमाल्यानुलेपनः ॥ ४७ ॥ जुहुयाद्विरजो विद्वान्विरजाश्च भविष्यति। वायवः पंच शुध्यंतां वाङ्मनश्चरणादयः ॥ ४८ ॥ श्रोत्रं जिव्हा ततः प्राणं ततो बुद्धिस्तथैव च। शिरः पाणिस्तथा पार्श्वं पृष्ठोदरमनंतरम् ॥ ४९ ॥ जंघे शिश्नमुपस्थं च पायुमेढ्रं तथैव च। त्वचं मांसं च रुधिरं मेदोऽस्थीनि तथैव च ॥ ५० ॥ शब्दस्पर्शं च रूपं च रसो गंधस्तथैव च। भूतानि चैव शुध्यन्तां देहे मेदादयस्तथा ॥ ५१ ॥ अन्नं प्राणं मनो ज्ञानं शुध्यंतां वै शिवेच्छया। हुत्वाज्येन समिद्भिश्च चरूणा च यथाक्रमम् ॥५२॥ उपसंहृत्य रुद्राग्निं गृहीत्वा भस्म यत्नतः। अग्निरित्यादिना धीमान्विमृज्यांगानि संस्पृशेत् ॥ ५३ ॥ एतत्पाशुपतं दिव्यं व्रतं पाशविमोचनम्। ब्राह्मणानां हितं प्रोक्तं क्षत्रियाणां तथैव च ॥ ५४ ॥ वैश्यानामपि यो-

इंद्र चंद्र यम वरुण। सूर्य कुबेर अथवा वरुण। बहु काळ कष्टतांही जाण। प्राप्ति याची न पावती. ॥ १४८ ॥ ब्रह्मशिरोनामास्त्र। माझें रहस्य परम सार,। प्रळयीं सोडूनी संहार। जेणें करीं विश्वाचा. ॥ १४९ ॥ तें देतसें कृपें करीं। त्वां न घालावें कवणावरी,। परम निर्वाण[1] अवसरीं। स्मरण त्याचें करावें.' ॥ १५० ॥ शुचिर्भूत झालिया पार्थें। श्रीगुरुमौळ[2] स्पर्शी हातें,। मंत्र उपदेशितां तेथें। अत्यद्भुत वर्तलें. ॥ १५१ ॥ निघतां शंकरमुखांतुनी। कोटी सूर्य झळकती गगनीं। जेंवी प्रळयकाळीं प्रळयाग्नी। गगन व्यापूनी कोंदला. ॥ १५२ ॥ कंप जाला भूमंडळा,। भंवडी दाटली कुलाचळां[3]। एकार्णव सिंधुजळा। मेघमाळा उसळती. ॥ १५३ ॥ ते वेळीं नाना ध्वनी वाद्यें। उभय लोकीं लागलीं विविधें,। हर्षें वृंदारकांचीं[4] वृंदें[5]। कनकाब्जें[6] सांडिती. ॥ १५४ ॥ सूर्य सांठवे[7] समुद्रजळीं। तेंवी पार्थाच्या हृदयकमळीं। अस्त्र सामावलें ते काळीं। जयजयकार सुरांतें. ॥ १५५ ॥ प्रेरण[8] आणि[9] निवांरण[10]। लाहोनी[11] उभयविद्याधन[12]। कृतकृत्यता अर्जुन। प्रसन्नपणें[13] मानसीं[14]. ॥ १५६ ॥ यापरी[15] अर्जुनाच्या हृदयीं। शिवप्रसाद पावला ठायीं[16]। सर्व अस्त्रविद्या[17] पायीं।

---

ग्यानां यतीनां तु विशेषतः। वानप्रस्थाश्रमस्थानां गृहस्थानां सतामपि ॥ ५५ ॥' [लिंगपुराण—अ० १८.]

१. निर्वाण=मरण. (येथें) महत्संकट, कष्टकाल. २. शंकराचें मस्तक. ३. कुलपर्वतांला. ४. देवांचीं. ५. समूह. ६. सुवर्णकमलें. ७. संध्याकाळीं सूर्य मावळतो तेव्हां तो आपले किरण समुद्रांत सांठवतो—अशी समजूत आहे. संध्याकाळीं सूर्य समुद्राकडे जातो यावर एका कवीनें आणखी एक कल्पना लढविली आहे:—'जो निजकरीं गुणांना दोषांना दावितो करुनि उघडे। तेजोनिधि रवि तोही पाही स्वमुखा कदापि हें न घडे ॥१॥ प्रातःसायं यास्तव जाय शरण सागरास; मित्रवरा। तो दाविल्याचें मुख;.............. ॥ २ ॥' ८. जोडणें. ९. 'आणि' या शब्दाच्या ऐवजीं 'आवरण' असाही पाठ आहे; परंतु दुसऱ्या चरणांत 'उभयविद्याधन' असें म्हटलें आहे. म्हणून पहिला पाठ दुसऱ्या पाठाहून प्रशस्ततर आहे. १०. आटपणें. ११. मिळवून, संपादून. १२. दोन विद्यारूपी धन, प्रेरण व निवारण या दोन विद्या शिकून. १३. आनंदानें. १४. 'मानिता झाला प्रसन्न मनें' असाही पाठ आहे. १५. याप्रमाणें, आतांपर्यंत वर्णन केल्याप्रमाणें. १६. ठिकाण, जागा, स्थल. १७. अशिवानें सांगितलेली विद्या अर्जुन पूर्णपणें शिकला—असा सांगण्याचा भाव. १७. अर्जुन अस्त्रविद्येविषयीं जितका ख्यात होता तितका मल्लविद्येविषयीं नव्हता.

[1]मूर्तिमंत लोळती[2]. ॥ १५७ ॥ [3]नमस्कारिला त्रैलोक्यगुरु[4], । कृपेनें ठेविला[5] मस्तकीं करु, । [6]वरद वदे [7]गिरिजावरु । अर्जुनातें आवडी. ॥ १५८ ॥ 'करूनी भूमंडळ निःक्षत्री । राज्य पावशी एकछत्री' । [8]वरदाक्षर हृदयमंत्रीं । [9]पार्थभावें रेखिलें[10]. ॥ १५९ ॥ ऐसें बोलोनी [11]तेचि क्षणीं । अदृश्य झाला [12]शूलपाणी. । अर्जुन म्हणे, 'त्रिभुवनीं । धन्य धन्य मी एक.' ॥ १६० ॥ यापरी अस्त्र पाशुपत । शिवापासुनी पावला पार्थ, । [13]यांवरी वर्तलें तें संत । [14]निरूपण परिसोत. ॥ १६१ ॥ इति श्रीमन्महाभारत । लीलाविश्वंभरानुगृहीत । [15]मुक्तेश्वराचे वंचनार्थ । श्रोतीं सादर [16]परिसावे. ॥ १६२ ॥

---

१. प्रत्यक्ष. जणो काय सर्व निराकारी विद्या आकार धारण करून अर्जुनाच्या पायांजवळ लोळतच आहेत असें वाटूं लागलें—हा कवीच्या सांगण्याचा उद्देश. २. पायीं लोळती=दीन होऊन जवळ राहती, पूर्णपणें आज्ञेंत वागती, संपूर्ण हस्तगत होती. ३. नमस्कार केला. हें नमस्कार या नामापासून झालेलें क्रियापद आहे. मूळ नामास किंवा विशेषणास प्रत्यय वगैरे लागून क्रियापदें होतात; व कधीं कधीं प्रत्यय वगैरे न लागतां केवळ त्या नामास किंवा विशेषणासच क्रियापदें मानून त्यांचा तसा उपयोग करितात. यांस प्रातिपदिकांवरून होणारीं क्रियापदें असें म्हणतात. अशा प्रकारच्या क्रियापदांचें हें एक उदाहरण आहे. अशा प्रकारच्या क्रियापदांचीं काळ, लिंग, वचन इत्यादिकांचीं रूपें इतर धातूंच्या रूपांप्रमाणेंच करितात. 'नमस्कारिला' याचा कर्ता 'अर्जुनानें' अध्याहृत आहे असें समजावें. ४. तीन लोकांचा गुरु, शंकर. (अर्जुनानें) त्रैलोक्यगुरु नमस्कारिला—असा अन्वय. हा कर्मणि प्रयोग समजावा. ५. 'ठेविला' याचा कर्ता 'शंकरानें' अध्याहृत आहे असें समजावें. [शंकरानें] कृपेनें [अर्जुनाच्या] मस्तकीं करु ठेविला—असा अन्वय समजावा. अशा प्रकारचा कर्त्यांचा घोंटाळा ह्या ग्रंथांत पुष्कळ जागीं दृष्टीस पडतो. मस्तकीं कर ठेवणें म्हणजे 'मी तुझ्यावर प्रसन्न झालों, तुझें कल्याण असो' असें म्हणण्याचें चिन्ह आहे. ६. 'वरद' हें 'गिरिजावरु' याचें विशेषण केल्यास वरद=वर देणारा. वरं ददातीति वरदः. तैलंगणाकडे कित्येक विष्णुभक्त आहेत ते 'नारायण' किंवा 'राम' या नांवांचा जप करीत नाहींत, तर 'वरद' 'वरद' असा जप करितात. याचें कारण ते असें सांगतात कीं 'वरद' हें नांव विष्णूलाच लावतां येतें; इतरांना लावतां येत नाहीं, व या नांवानें हाक मारल्यास विष्णूला लौकर दया येते व तो लौकर प्रसन्न होतो. ७. शिव. ८. 'वरदवरें सुहृद मंत्री' असा अन्य पाठ आहे. ९. 'पार्था भावें रक्षीं कां' असाही पाठ आहे. १०. रेखून ठेविला, लिहून ठेविला. ११. 'तेचि स्थानीं' असाही पाठ आहे. १२. शूल आहे पाणी (हातीं) ज्याच्या तो, त्रिशूलधारी. १३. यानंतर, पुढें. १४. कथानक. १५. मुक्तेश्वराचे वचनार्थ=मुक्तेश्वराच्या वचनाचा अर्थ म्हणजे मुक्तेश्वरकृत रसभरित ग्रंथ. १६. या कथानकाच्या वर्णनाला मूळांत तीन अध्याय लागले आहेत; व मुक्तेश्वरानें

## अध्याय पांचवा.

शंकर गेलिया [1]स्वस्थाना । [2]आवडी पार्थाचिया दर्शना । [3]लोकपाळ कुरु-भूषणा! । पातले ते परियेसा. ॥ १ ॥ [4]वैडूर्यवर्ण विराजवंत, । दिव्य पुष्पीं सुशोभित, । [5]जळेश्वरगणीं परिवारित । [6]वरुण राजा पातला. ॥ २ ॥ रत्न-किरीट रत्नमाळा, । विमानयानीं भाग्यागळा, । यक्षगणेशीं धरित्रीपाळा! । [7]धनेश्वरु पातला. ॥ ३ ॥ यावरी [8]आदित्याचा तनय । [9]धर्मराज [10]अपरसूर्य । पवित्रां करुणा करी [11]स्वयें । प्रळयानळ दुष्टांतें. ॥ ४ ॥ तो [12]दंडपाणी कृपा-मूर्ती । स्नेहें [13]पावला पार्थानिकटीं, । म्हणे, 'जें इच्छिशी अस्त्र पोटीं । तें देईन

---

हें कथानक १६२ ओव्यांच्या एका अध्यायांत आटपलें. मुक्तेश्वराचें वनपर्व मूळच्या वनपर्वापेक्षां फार लहान झालें याचें कारण हेंच आहे. पुष्कळ ठिकाणीं कथानकें मूळच्यापेक्षां फार थोडक्यांत वर्णिलेलीं आहेत.

१. आपल्या स्थानाला, कैलासाला. २. आवडीनें, प्रीतीनें, ज्याला शिव प्रसन्न झाला त्याला पाहण्याच्या दृढतर इच्छेनें. ३. इंद्रादि दिक्पाळ. ४. वैडुर्य=रत्नविशेष. विदूर नामक पर्वतावर अथवा नगरांत उत्पन्न झालेलें रत्न. याला वैदूर्य, नीलोपल, असितोपल, अशीं दुसरीं नांवें आहेत. यास इंग्रजींत *Lapis lazuli* असें म्हणतात. ५. जळाचा ईश्वर जळेश्वर=वरुण त्याच्या गणीं (परिचारकांनीं) म्हणजे आपल्या लोकांनीं परिवेष्टित. ६. वरुणशब्दाचा मूळचा अर्थ झांकणारा, म्हणून वरुणाला रात्रीचा अधिष्ठित देव म्हणूं लागले. कारण रात्रीं सर्व पदार्थ झांकले जातात. रात्रीप्रमाणें समुद्रही काळा, विस्तीर्ण व गंभीर असल्यामुळें कित्येक दिवसांनीं वैदिक ऋषींनीं यास समुद्राचा व जळाचा स्वामी बनविला. अशा प्रकारें ज्या 'वरुण'शब्दाचा अगोदर 'झांकणारा' असा अर्थ होता त्याच शब्दाचा अर्थ 'जळाचा स्वामी' असा कालांतरानें झाला. [कै० म० मो० कुंटे यांनीं इंग्रजींत लिहिलेला "The Vicissitudes of Aryan Civilization in India" नामक निबंध पहा.] पुढें हा पौराणिक कालांत पूर्णपणें जलपति बनला व पश्चिमदिक्पालही झाला. याची राजधानी मानसोत्तर पर्वतावर निंम्लोचिनी नामक नगरी आहे. याला दोन तीन स्त्रिया आहेत व पुत्रही पुष्कळ आहेत. ७. कुबेर. ८. सूर्याचा. ९. यमधर्म. विवस्वान् नामक आदित्यापासून संज्ञा नामक स्त्रीच्या ठायीं जन्मलेल्या कन्यापुत्रयुग्मापैकीं पुत्र तो. हा दक्षिणदिशेचा दिक्पाल आहे. याच्या नांवावरून त्या दिशेला 'याम्या' असें नांव पडलें. हा पुण्यवानास त्रास देत नाहीं म्हणून यास धर्म म्हणतात; व दुष्टांस दंड करतो म्हणून यास दंडधर, कृतांत, अंतक इत्यादि नांवें पडलीं. कित्येक आधुनिक विद्वानांच्या मतें यमी याची बहीण नसून स्त्री आहे. १०. प्रतिसूर्य. ११. 'वरुणालय' असा अन्य पाठ. १२. पाणीच्या ठायीं दंड आहे ज्याच्या तो दंडपाणि. यमाच्या हातीं दंड असतो अशी प्रसिद्धि आहे. पाणि=हात. १३. आला.

जाण पां.' ॥ ५ ॥ [1]श्वेत [2]कुंजर [3]चतुर्दंत । रत्नभूषणीं [4]धवधवीत । [5]आरुढोनी अमरनाथ । [6]पुत्रमोहें पातला. ॥ ६ ॥ यमें [7]दंडास्त्र दिधलें हातीं, । वरुणें पाश दिधले हातीं, । कुबेरें कुबेरास्त्र प्रीती । [8]शंकरदत्त दीधलें. ॥ ७ ॥ त्रिपुर दंडिला त्रिनेत्रें, । तेची कृपेनें [9]त्र्यंबकमंत्रें । देउनी म्हणे, 'येणें मंत्रें । भार फेडीं महीचा.' ॥ ८ ॥ [10]प्रयोग [11]उपसंहार [12]मंत्रेंशीं । अस्त्रें दीधलीं अर्जुनाशीं । आलिंगूनी सुख संतोषीं । आशीर्वचन दीधलें. ॥ ९ ॥ देवेंद्र म्हणे, 'गा ! नंदना ! । आलें पाहिजे [13]पितृसदना, । तेथें आवडे जें जें मना । तें तें अस्त्र लाधशी.' ॥ १० ॥ ऐसें सांगोनी [14]चौघीजणीं । [15]ऊर्ध्वपंथें निघाले गगनीं । अर्जुनाप्रती तेचि क्षणीं । [16]सूत [17]मातली पावला. ॥ ११ ॥ दाहा सहस्र [18]वारु श्वेत, । [19]शतसहस्र [20]चक्रीं चक्रादित्य, । विजा मीनल्या एक शत ।

---

१. पांढरा. २. हत्ती. ['मतंगजो गजो नागः कुंजरो वारणः करी' इत्यमरः.] इंद्राचा हत्ती ऐरावत. आठ दिग्भागांकडे जे आठ दिग्गज आहेत त्यांपैकीं हा पूर्वेकडील दिग्गज. हा सर्व दिग्गजांचा स्वामी व इंद्राचें वाहन होय. हा समुद्रमंथनसमयीं निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक होय. चौदा रत्नांचीं नांवें पुढील सुप्रसिद्ध श्लोकांत दिलीं आहेतः—'लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चंद्रमा गावो कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवांगनाः । अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधे रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्युः सदा मंगलम् ॥' ३. ऐरावताला चार दांत आहेत. ४. धवधव शब्द करीत. हा अनुकरणवाचक शब्द आहे. ५. चढून. ६. अर्जुनावर असलेल्या प्रीतीमुळें. ७. ज्या दंडानें यम प्राण्यांना दंडन करितो तो. 'प्रस्वापनास्त्रं धनदः प्रचेताः पाशान्ददौ दंडधरश्च दंडम् । जगज्जयाशीभिरुदारवीरसुदीरयंतः स्वयमित्यमुष्मै ॥ ४५ ॥ [अमरचंद्रसूरिविरचित बालभारत—वनपर्व—सर्ग १ श्लो० ४५ पृ० १८१.] ८. शंकरानें दिलेलें. ९. त्र्यंबकानें (शंकरानें) दिलेल्या मंत्रासह. १०. अस्त्र सोडणें. ११. अस्त्र आटपणें. १२. मंत्रासह. १३. पित्याच्या घराला, इंद्राच्या नगरीला, अमरावतीला. १४. इंद्र, कुबेर, वरुण व यम हे चौघेही. १५. ऊर्ध्वपंथें=आकाशमार्गानें. १६. सारथी. १७. हा मातलि प्रख्यात सारथि होय. मानवलोकांतून इंद्रलोकांत मनुष्यांना घेऊन जाण्याकरितां व पुन्हा परत आणण्याकरितां नेहमीं इंद्र यालाच पाठवीत असे. पूरुरवा, दुष्यंत, इत्यादि शूर राजे इंद्राला साहाय्य करण्याकरितां स्वर्गांत जात असत, तेव्हां त्याचा हाच सारथि असे. याच्या स्त्रीचें नांव सुधर्मा. हिच्यापासून याला गोमुख नांवाचा पुत्र व गुणकेशी नांवाची कन्या अशीं दोन अपत्यें झालीं. यानें आपली मुलगी सुमुख नांवाच्या नागास दिली व आपल्या जांवयास इंद्राच्या हातून अमृत देववून अमर केलें—अशी कथा आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—उद्योगपर्व—अ० ८ गी० ४८-७४ पृ० १३०-१३६.] १८. युद्धांत उपयोगी पडतील असे घोडे. १९. शतसहस्र=शंभर हजार, लक्ष, लाख. २०. समूह.

तेंवी पताका झळकती. ॥ १२ ॥ [1]शस्त्रें भरलीं खणोखणीं । ऐसा [2]रहंवरु पा-
तला धरणी, । [3]सारथियें जोडुनीयां [4]पाणी । म्हणे, 'पार्था! [5]वेळधावें. ॥ १३ ॥
[6]स्नेहें पाचारिलें [7]जनकें । [8]पितृआज्ञा चालिजे सुखें, । [9]सर्व भोगांचीं कौतुकें ।
विलोकावीं [10]सभाग्या!' ॥ १४ ॥ [11]आज्ञा [12]वंदूनियां अर्जुन । नमस्कारी [13]तपो-
धन, । [14]सिद्धें वनींचे सिद्ध गण । परम भक्ती नमियेले. ॥ १५ ॥ [15]स्तवनीं

---

१. 'रथो मातलिसंयुक्त आजगाम महाप्रभः ॥२॥ नभो वितिमिरं कुर्वन् जलदान्पाटयन्निव । दिशः संपूरयन्नादैर्महामेघरवोपमैः ॥ ३ ॥ असयः शक्तयो भीमा गदाश्चोग्रप्रदर्शनाः । दिव्यप्रभावाः प्रासाश्च विद्युतश्च महाप्रभाः॥४॥तथैवाशनयश्चैव चक्रयुक्तास्तुला गुडाः। वायुस्फोटाः सनिर्घाता महामेघस्वनास्तथा ॥५॥ तत्र नागा महाकाया ज्वलितास्याः सुदारुणाः। सिताभ्रकूटप्रमिताः संहताश्च तपोवलाः ॥ ६ ॥ दशवाजिसहस्राणि हरिणां वातरंहसाम्। वहंति यं नेत्रमुषं दिव्यं मायामयं रथम् ॥ ७ ॥' असें मूळांत रथाचें वर्णन आहे. २. रथ. ३. मातलिनें. ४. हात. ५. चढावें. ६. प्रीतीनें, मोठ्या प्रेमानें. ७. इंद्रानें. ८. पितृआज्ञा चालिजे म्हणजे बापाच्या आज्ञेप्रमाणें स्वर्गांत, बापाची आज्ञा अमान्य करूं नये म्हणून चल. कदाचित् स्वर्गांत चालण्याचें अर्जुन नाकारील म्हणून मातलीनें असें सांगितलें. ९. सर्व भोगांचीं कौतुकें=सर्व प्रकारच्या स्वर्गसौख्यांचा अनुभव. स्वर्गांतले चमत्कार व भोग्यस्थलें व पदार्थ अमरांत सांगितले आहेत ते येणेंप्रमाणें:—'पुलोमजा शचींद्राणी नगरी त्वमरावती। हय उच्चैःश्रवाः सूतो मातलिर्नंदनं वनम् ॥ स्यात्प्रासादो वैजयंतो जयंतः पाकशासनीः । ऐरावतोऽभ्रमातंगैरावणाभ्रमुवल्लभाः ॥ ह्रादिनी वज्रमस्त्री स्यात्कुलिशं भिदुरं पविः। शतकोटिः स्वरूः शंबो दंभोलिरशनिर्द्वयोः ॥ व्योमयानं विमानोऽस्त्री नारदाद्याः सुरर्षयः। स्यात्सुधर्मा देवसभा पीयूषममृतं सुधा ॥ मंदाकिनी वियद्गंगा स्वर्णदी सुरदीर्घिका। मेरूः सुमेरुर्हेमाद्रीरत्नसानुः सुरालयः ॥ पंचैते देवतरवो मंदारः पारिजातकः। संतानः कल्पवृक्षश्च पुंसि वा हरिचंदनम् ॥ सनत्कुमारो वैधात्रः स्वर्वैद्यावश्विनीसुतौ। नासत्यावश्विनौ दस्रावाश्विनेयौ च तावुभौ । स्त्रियां बहुष्वप्सरसः स्वर्वेश्या उर्वशीमुखाः । हाहा हूहूश्चैवमाद्या गंधर्वास्त्रिदिवौकसाम् ॥' [इत्यमरः–स्वर्गवर्गः.] १०. मूळांतलें मातलीचें भाषण येथच्या भाषणापेक्षां रम्य आहे, म्हणून तें येथें उतरून घेतों:–'भो! भो! शक्रात्मज श्रीमान् शक्रस्त्वां द्रष्टुमिच्छति। आरोहतु भवान् शीघ्रं रथमिंद्रस्य संमतम् ॥ ११ ॥ आह माममरश्रेष्ठः पिता तव शतक्रतुः। कुंतीसुतमिह प्राप्तं पश्यंतु त्रिदशालयाः ॥ १२ ॥ एष शक्रः परिवृतो देवै ऋषिगणैस्तथा । गंधर्वैरप्सरोभिश्च त्वां दिदृक्षुः प्रतीक्षते ॥ १३ ॥अस्माल्लोकाद्देवलोकं पाकशासनशासनात् । आरोह त्वं मया सार्धं लब्धास्त्रः पुनरेष्यसि ॥ १४॥' [महाभारत–वनपर्व–अ० ४२.] ११. इंद्राची किंवा मातलीची; परंतु इंद्राचीच असें घेणें चांगलें. कारण स्वर्गांत रहात असल्यामुळें जरी मातलि अर्जुनापेक्षां श्रेष्ठ होता तरी तो सारथि असल्यामुळें अर्जुनाला आज्ञा करण्याइतकी योग्यता याला आहे असें मानणें जरा धाडसाचें होईल. १२. शिरसामान्य करून, आनंदानें स्वीकारून. १३. तपच आहे धन ज्यांचें अशा (तपोवनांतील इतर) ऋषींना. १४. त्या वनांत सर्वांची कार्यसिद्धि होते व अर्जुनाची

पूजियेला [१]मंदराचळ । कंदमूळ फळ जळ । देऊनियां बहुत काळ । प्रतिपाळिलें [२]धार्मिका. ॥ १६ ॥ [३]आज्ञा मागोनी [४]बैसला रथीं, । मनोवेगें [५]चालिला [६]क्षिती, । चालतां विमानाचिया [७]पंक्ती । चित्रविचित्र [८]देखतु. ॥ १७ ॥ [९]हंसमंडळें [१०]मेघमंडळें । [११]देवगंधर्वांचीं स्थळें, । उल्लंघूनी सुकृतबळें । अमरावती टाकिली. ॥ १८ ॥ [१२]चंद्रसूर्याविण प्रकाश । नेणवे [१३]रजनी अथवा दिवस । [१४]गगन म-

तपोसिद्धि झाली म्हणून याला सिद्धिवन किंवा सिद्धवन म्हटलें आहे. १५. स्तवन किंवा स्तुति करून. अर्जुनानें त्या पर्वताची पूजा केली, कारण त्या पर्वताची पूजा करावयाची दुसरी रीतच नव्हती.

१. इंद्रकील पर्वत. २. धर्मानें चालणाऱ्या अर्जुनाला. ३. वर सांगितलेल्या सर्व मंडळींची; अर्जुन तपश्चर्येला निघण्याच्या वेळीं धर्मादिकांची आज्ञा घेतली व आतां अमरावतीला जा-ण्याकरितां ऋषींची व पर्वताची आज्ञा मागत आहे. यावरून अर्जुन फार कृतज्ञ असून त्याला लोकांशीं मिळून मिसळून राहणें आवडत असे असें व्यक्त होतें. ४. मूळांत एकदम अर्जुन रथांत बसला असें नाहीं; तर मातलीच्या वचनानंतर अर्जुनानें त्यास असें उत्तर दिलें:— 'मातले गच्छ शीघ्रं त्वमारोहस्व रथोत्तमम् । राजसूयाश्वमेधानां शतैरपि सुदुर्लभम् ॥१५॥ पार्थिवैः सुमहाभागैर्यज्वभिर्भूरिदक्षिणैः । दैवतैर्वा समारोढुं दानवैर्वा रथोत्तमम् ॥ १६ ॥ नातप्ततपसा शक्य एष दिव्यो महारथः । द्रष्टुं वाप्यथवा स्प्रष्टुमारोढुं कुत एव च ॥१७॥ त्वयि प्रतिष्ठिते साधो रथस्थे स्थिरवाजिनि । पश्चादहमथारोक्ष्ये सुकृती सत्पथं यथा ॥ १८ ॥' असें अर्जुनानें म्हट-ल्यानंतर मातली रथावर बसला व त्यानंतर अर्जुन रथावर चढला. ५. 'चालिला गगनपंथें' असाही पाठ आहे. ६. क्षितीपासून, पृथ्वीपासून आकाशांत. ७. आकाशांत विमानांवर बसून अनेक देव जात होते त्या विमानांच्या पंक्ति. निरनिराळ्या देवांचीं विमानें निरनिराळ्या प्र-कारचीं होतीं म्हणून तीं चित्रविचित्र दिसत होतीं. ८. 'दीप्ती' असा अन्यपाठ आहे. ९. हंस आकाशांत जितके उंच उडतात तितका उंच प्रदेश. १०. मेघ जितके उंच आहेत तो प्रदेश. पृथ्वी-पासून मेघ सुमारें एक मैल किंवा दीड मैल उंच असतात. त्याच्यावर अर्जुन निघून गेला. 'गगनमंडळें' पाठांतर. ११. अगोदर हंसमंडळ, नंतर मेघमंडळ, नंतर देवगंधर्वांचीं स्थळें लागतात हें प्रसिद्ध आहे. १२. 'चंद्रसूर्यैवीण प्रकाश' असाही पाठ आहे. स्वर्गांत अतिशय प्रकाश होता खरा, परंतु तो प्रकाश सूर्यामुळें किंवा चंद्रामुळें झाला नव्हता, तर स्वयंप्रकाश होता असा सांगण्याचा भाव. भूलोकांत प्रकाशदाता सूर्य; व महिन्यांतून पंधरा दिवसपर्यंत सूर्या-पासून घेतलेला आपला प्रकाश चंद्र पृथ्वीस देतो, म्हणजे भूतलावर प्रकाशाचीं साधनें दोन. या दोहोंच्या अभावीं जिकडे तिकडे भूगोलावर अंधकारच रहावयाचा असें असून स्वर्गांत सूर्यचं-द्राशिवाय फारच प्रकाश पडत होता, तेव्हां स्वर्ग पृथ्वीपेक्षां श्रेष्ठ आहे—हा फलितार्थ. स्वर्गांत नेहमीं प्रकाश असण्याला अनेकांच्या मतें अनेक कारणें आहेत. कित्येक म्हणतात इंद्र देवांचा राजा आहे; त्या अर्थी त्याच्या माहात्म्यानें हा उजेड उत्पन्न झाला असावा. कित्येकांच्या मतें येथें परब्रह्मच प्रकाशरूपानें प्रकाशित आहे. आणखी कित्येक म्हणतात कीं, ज्या अर्थी स्व

रूनि सुवास । दाही दिशा[1] कोंदल्या. ॥ १९ ॥ मनुष्यलोकींहुनी[2] गगनीं । ज्या तारका[3] दिसती नयनीं[4], । तया नक्षत्रांचिया श्रेणी[5] । समीप डोळां देखतु.

---

देवांचीं शरीरें फारच तेजोमय आहेत त्या अर्थीं या सर्वांच्या तेजानें आकाशांत व स्वर्गांत जिकडे तिकडे प्रकाशच प्रकाश झाला असावा. अशा प्रकारचें मत ख्रिस्ती लोकांचेंही आहे:—

"........................But O! how fall'n! how changed,
From him, who, in the happy realms of light,
Cloth'd with transcendent brightness, didst outshine
Myriads though bright!"

*MILTON'S Paradise Lost* Book I. Lines 84–87.

१३. रात्र. रात्र होती कीं दिवस होता हें समजत नसे. वरच्या चरणांत प्रकाश होता असें सांगितलें. तेव्हां तो नेहमीं दिवसच समजला पाहिजे. असें असून दिवस आहे कीं रात्र आहे अशी शंका येण्याचें कारण काय? याचें कारण असें दिसतें कीं प्रकाश जरी चांगला होता तरी तेव्हां आकाशांत **सूर्य** नसल्यामुळें हा दिवस आहे कीं नाहीं अशी शंका येई व **चंद्र** नसल्यामुळें ही रात्र होय किंवा नाहीं अशीही शंका येई. रात्र आणि दिवस हे परस्परावलंबी साक्षेप शब्द आहेत. सूर्य जेथपर्यंत असतो त्या कालाला मानव दिवस किंवा दिन असें म्हणतात. व तद्भिन्न वेळेला रात्र अशी संज्ञा देतात. परंतु स्वर्गांत व आकाशांत मुळीं सूर्य नसल्यामुळें त्या स्थानाला दिवस आणि रात्र हे शब्द लागू होत नव्हते. दिवस होता कीं रात्र होती अशी शंका येण्याचें दुसरें कारण असें दिसतें कीं स्वर्गांत जो प्रकाश होता तो क्वचित् स्थलीं सूर्याच्या प्रखर तेजाप्रमाणें असह्य होई; व क्वचित् स्थलीं इंदूच्या कोमल किरणांप्रमाणें आनंददायक होई, म्हणून दिसतो हा प्रकाश सूर्याचा कीं चंद्राचा याचा कांहींच निवाडा करितां येईना. दिवस व रात्र हे मानुषिक शब्द स्वर्गांतल्या कालमानाला लागू करण्याचा यत्न केल्यामुळें हा घोंटाळा झाला. १४. 'गगनीं भरोनी दिव्य सुवास' असाही पाठ आहे. आकाशांत जिकडे तिकडे परिमलगंध व्यापून गेल्यामुळें. हा सुवास नंदनवन इत्यादि वनांतून आलेल्या पवनामुळें उत्पन्न झाला असावा; किंवा देवादिकांनीं शरीराला लावलेल्या चंदन वगैरे सुवासिक द्रव्यापासून उत्पन्न झाला असावा.

१. कोंडल्या गेल्या; दहा दिशा सुवासानें जणों काय कोंडल्या गेल्या; म्हणजे दहाही दिशा सुवासानें भरून गेल्या, सुवास नाहीं अशी एकही दिशा राहिली नाहीं—असा भाव. २. पृथ्वीवरून. पृथ्वीवर केवळ मनुष्यच राहतो असें नाहीं; इतर अनेक सचेतन प्राणीही राहतात. तेव्हां या लोकाला मनुष्यलोक म्हणण्यापेक्षां प्राणिलोक म्हणणें चांगलें. परंतु या पृथ्वीवर राहणाऱ्या सर्व प्राण्यांपेक्षां मनुष्यच श्रेष्ठ असल्यामुळें याला मनुष्यलोक असें म्हटलें आहे. ३. नक्षत्रें.

"Twinkle, twinkle, little star,
How I wonder what you are!
Up above the world so high!
Like a diamond in the sky!"

४. 'गगनीं' असाही पाठ आहे; परंतु हा लेखकप्रमादानें झाला असावा. ५. पंक्ति.

॥ २० ॥ राजऋषी, देवऋषी, । योगसिद्ध, तपोराशी, । स्वर्गसंपदाविलासी । विमानयानीं क्रीडती. ॥ २१ ॥ युद्धीं समरंगणीं पडिले, । तपें स्वर्गातें जिंतले । ते लोचनीं देखिले । लक्ष कोटी अर्जुनें. ॥ २२ ॥ श्रीरत्नशिखराचा पर्वत । तेंवि देखिला ऐरावत, । चंद्रकिरणीं चतुर्दंत । दानोदकीं जलधरु. ॥ २३ ॥ नंदनवनादि नाना वनें, । सर्वदा देती फळें सुमनें । वसंत कुसुमाकर आ-

---

१. राज+ऋषी=राजर्षी, असें संधिनियमानें झालें पाहिजे होतें परंतु येथें संधीच केला नाहीं. संस्कृतांत दोन स्वर एकत्र आल्यास त्यांचा संधि झाल्याशिवाय रहात नाहीं. या नियमाला अनुसरून येथें संधि केला नाहीं हा प्रमाद आहे. २. योगानें जे सिद्ध झाले आहेत, म्हणजे योगाभ्यासानें जे मुक्तीला पावले आहेत. 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' अशी पतंजलीनें योगाची व्याख्या केली आहे. योगाच्या योगानें चित्तवृत्तींचा निरोध होतो. सर्व इंद्रियें आपल्या ताब्यांत येतात इतकेंच; याच्या योगानें आपल्यास मुक्ति मिळते असें नाहीं असें कित्येकांचें म्हणणें आहे. त्यांचें आणखी म्हणणें असें आहे कीं, चित्तवृत्तिनिरोध झाल्यानंतर ब्रह्मविचार चांगला करतां येतो व त्यामुळें मुक्ति मिळते. म्हणजे ब्रह्मविचार हें मुक्तीचें साधन व योग ब्रह्मविचाराचें साधन. ३. युद्ध होत असलेल्या भूमीवर. 'युद्धीं आपुल्या निश्चयें पडले' असाही पाठ आहे. आमच्या मतें हाच पाठ चांगला आहे. कारण 'युद्धीं समरंगणीं पडले' यांत 'युद्धीं' व 'समरंगणीं' या शब्दांच्या अर्थांत फारसा फरक नाहीं म्हणून 'समरंगणीं' या शब्दाच्या ऐवजीं 'आपुल्या निश्चयें' असेंच असणें चांगलें. ४. असंख्य. ५. 'रत्नशिखराचा' असाही पाठ आहे. रत्न आहे शिखरीं ज्याच्या असा. ऐरावताच्या मस्तकीं रत्न असल्यामुळें त्याला ही उपमा दिली. हा उत्प्रेक्षालंकार झाला. ६. इंद्राचा हत्ती. ['इरा आपः तद्वान् इरावान् समुद्रः तस्मादुत्पन्नः । इरा उदकानि संत्यस्मिन् इरावान् । इरावत्यब्धौ भवः ऐरावतः ॥' असा ऐरावत शब्दाचा मूलार्थ आहे. समुद्रामध्यें उत्पन्न झालेला जो तो ऐरावत.] ७. 'मदोदकीं' असाही पाठ. ८. 'जळधार' असा अन्यपाठ आहे. ९. मेघ. १०. ऋतूंमध्यें वसंत पहिला. 'मधुमाधवौ वसंतः' चैत्र व वैशाख मासांत हा ऋतु असतो. मदनाचा वसंत जिवलग मित्र. कोणत्याही पुरुषाला आपल्या जाळ्यांत ओढावयाचें असेल तर मदन वसंतासह त्याच्याकडे जातो अशी समजूत आहे. शंकराला कामातुर करण्याकरितां जेव्हां मदन गेला होता तेव्हां त्यानें आपल्यास साहाय्य करण्याकरितां येण्यास वसंताची विनंती केली होती असें कुमारसंभवांत सांगितलें आहे. हा ऋतु कामीजनांचा व कवींचा मोठा आवडता आहे. 'ऋतुसंहार' नामक काव्यांत कालिदासानें या ऋतूचें चांगलें वर्णन केलें आहे. पहिल्या श्लोकांत असें वर्णन आहे:—'प्रफुल्लचूताङ्कुरतीक्ष्णसायको द्विरेफमालाविलसद्धनुर्गुणः । मनांसि वेद्धुं सुरतप्रसङ्गिनां वसंतयोद्धा समुपागतः प्रिये! ॥ १ ॥' वसंतकालीं सर्वच पदार्थ सुंदर असतात असें कवि म्हणतो:—'द्रुमाः सपुष्पाः सलिलं सपद्मं स्त्रियः सकामाः पवनः सुगंधिः । सुखाः प्रदोषा दिवसाश्च रम्याः सर्वं प्रिये! चारुतरं वसंते ॥ २ ॥' वसंत कोणाला काय देतो याविषयीं म्हटलें आहे:—'वापीजलानां मणिमेखलानां शशांकभासां प्रमदाजनानाम् ।

पण । माळाकार ते ठायीं. ॥ २४ ॥ जें सेविजे [1]अप्सरागणीं । तें सेविजे तपोधनीं, । [2]युद्धकृपण प्राणदानीं । ते ते स्थानीं वसिन्नले[3]. ॥ २५ ॥ [4]तपें रहित, यज्ञरहित, । [5]युद्धीं पळोनी वांचवी जीवित, । जे [6]व्रत दान, धर्मरहित, । ते [7]तेथें न [8]पावती. ॥ २६ ॥ [9]वेदश्रुतीसन्मार्ग रहित, । [10]पुराणश्रवणरहित[11], । हरिहर [12]प्रतिमार्चनरहित, । तेथें न पावती. ॥ २७ ॥ नाना [13]तीर्थोदकीं जाण । घडलें नाहीं [14]स्नान दान, । [15]सर्वकाळीं [16]नेदिती दान । ते तें [17]स्थान न पावती. ॥ २८ ॥ जे [18]नातळती परपकारा, । श्राद्धीं उपवास पाडिती पितरां । [19]विक्रयवृत्ति भोगिती दारा, । ते [20]शक्रागारा न पावती. ॥ २९ ॥ अपरात्रीं भोजन मद्यपानी । [21]गुरुतल्पग [22]गमनागमनी, । ऐसे दुरात्मे तयेस्थानीं । [23]वाळुनियां दवडिले. ॥ ३० ॥ [24]असो. देव, [25]गंधर्व, [26]परिवारें । सिद्ध, महर्षि, अत्यादरें ।

चूतद्रुमाणां कुसुमान्वितानां ददाति सौभाग्यमयं वसंतः ॥ ३ ॥' ११. कुसुम+आकर=फुल+खाण=फुलांची खाण.

१. 'अमरगणीं' असाही पाठ आहे. २. 'सदा सत्य वदले वाणी' असा अन्य पाठ. ३. पंचवीस व सव्वीस या ओव्यांमध्यें पुढील ओवी आढळते:—'जे धर्मार्थ वंचिले धनी । युद्धीं कृपण प्राणदानीं । अतिथी दवडिले भोजनीं । ते ते स्थानीं वाळिले ॥' ही ओवी अशीही वाचण्याचा पाठ आहे:—'जे धर्म वंचिती धनी । जे कृपण युद्धीं प्राणदानीं । अतिथी दवडिले भोजनीं । ते तयेस्थानीं वाळिले ॥' ४. 'तपरहित' असा पाठ. ५. युद्धांतून जे पळून जातात ते रौरवादि नरकांत पडतात व युद्धांत मृत झालेले वीर स्वर्गांत जातात अशी फार जुन्या काळापासून समजूत आहे. ६. 'व्रत दान' यांच्याबद्दल 'प्रतिदिनीं' असा पाठ आहे. ७. 'तें स्थान' असा अन्यपाठ. ८. जाऊं शकती. ९. 'श्रुतीस्मृतीसन्मार्गरहित' असा पाठ. १०. 'श्रवणस्मरणरहित' असाही पाठ. ११. कित्येक पोथींत हा दुसरा चरण तिसऱ्या चरणाच्या जागीं असून तिसरा चरण दुसऱ्या चरणाच्या जागीं आहे. १२. 'प्रतिमाविरहित' असें पाठांतर. १३. तीर्थांच्या उदकीं, मोठमोठ्या क्षेत्रांतून वाहत जाणाऱ्या नदींत. १४. 'स्नानपान' असेंही पाहण्यांत येतें. १५. 'पर्वकाळीं' असाही पाठ. हाच पाठ बरा आहे, असें आम्हांस वाटतें. १६. न देती. १७. आकाश किंवा स्वर्ग. १८. न स्पर्शती, नाठविती. १९. 'विष्णुवृत्ति' 'विष्णुवृती' असेही पाठ आहेत. २०. शक्राचें (इंद्राचें) अगार (घर), स्वर्ग. २१. गुरुपत्नीशीं संग करणारे. २२. 'मांसाशनी' असा अन्य पाठ. २३. घालवून. २४. स्वर्गांत कोण कोण जातात व कोणकोणाला स्वर्गप्राप्ति होत नाहीं याचीं आतांपर्यंत नांवें सांगून आतां पुढें मूळकथेकडे वळावयाचें आहे म्हणून 'असो' या शब्दाचा उपयोग केला. अप्रधान विषयांतराला सोडून मूळविषयाकडे वळावयाचें असेल तर 'असो' याचा उपयोग करितात. २५. स्वर्गांतील गायक. यांना अर्धदेव म्हणतात. मुलींना चांगला गळा देणारे हेच आहेत अशी समजूत आहे. 'सोमं शौचं ददावासां गंधर्वश्च शुभां गिरम्.' [याज्ञवल्क्य.] २६. परिवारासह. जितके

येउनी पार्थासी सामोरे । पूजिते झाले आवडी.[1] ॥ ३१ ॥ इंद्राज्ञेनें[2] अमरगणीं। विचित्र[3] वाद्यांचा ध्वनी, । राजमार्गें[4] सुरपत्तनीं[5] । जयकारीं मिरवला. ॥ ३२ ॥

गंधर्व होते तितक्यांसह. २७. 'महेश' असाही पाठ. हा पाठ प्रशस्त नाहीं असें आमचें मत आहे. कारण अमरावतींत महेश कशाला येतील? इंद्राजवळ अनेक ऋषी राहतात म्हणून 'महर्षी' हाच पाठ प्रशस्त होय.

१. आवडीनें, आनंदानें, मनापासून. २. 'इंद्रासनीं' असाही पाठ. परंतु हाही पाठ प्रशस्त दिसत नाहीं. कारण कोणालाही आसनावर बसवून मिरवित नाहींत, तर रथांत किंवा पालखींत बसवून मिरवितात. शिवाय इंद्रसभेंत अर्जुन इंद्राच्या आसनीं बसला असें सांगितलें आहे. तेव्हां तो आतांच गादीवर बसला असें मानिल्यास कवीवर पुनरुक्तीचा दोष येणार आहे. म्हणून 'इंद्राज्ञेनें' हाच पाठ बरा. 'इंद्राज्ञेनें' असें म्हणण्याचें कारण असें दिसतें कीं अर्जुन मनुष्य असल्यामुळें त्याला देव मिरवित नेतील असें संभवत नाहीं; परंतु इंद्रानें तशी आज्ञा केल्यामुळें देवांच्याही मनांत अर्जुनाविषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न झाली व त्यांनीं त्याला मिरवित मिरवित नेलें. ३. नानाप्रकारच्या. गंधर्व हे गायकही होते व वाद्येंही वाजविणारे होते; व ते या विद्येंत प्रवीण असल्यामुळें त्यांनीं अनेक वाद्यें वाजविलीं तीं फारच सुश्राव्य होतीं म्हणून त्यांच्या ध्वनीला 'विचित्र' म्हटलें आहे. ४. मोठमोठ्या रस्त्यांनीं, मुख्य मुख्य मार्गांनीं. येथें आम्हांला एका आक्षेपाचें खंडन करावयाचें आहे. कित्येकांचा असा आक्षेप आहे कीं, स्वर्गांतल्या सौख्यांचें वर्णन करितांना पृथ्वीवरीलच सौख्यें स्वर्गांत अधिक प्रमाणानें आहेत असें कविजन दाखवितात, म्हणजे सर्व लोकांवर एक राजा राज्य करितो असें पाहिल्यावरोबर इंद्राला देवांचें स्वामित्व दिलें! इहलोकांत उपवनें फार सौख्याचीं स्थानें असल्यामुळें स्वर्गांतही नंदन नामक उत्तम प्रकारचें उपवन आहे असें वर्णन करितात! राजे लोक हत्तीवर बसतात म्हणून इंद्राकरितां ऐरावत निर्माण केला! वसंतकाल आम्हांला फार प्रिय वाटतो असें जाणून स्वर्गांत नेहमीं वसंतकालच राहतो असें वर्णन केलें! पृथ्वीवर वारयोषिता नृत्य, देहविक्रय इत्यादिकांनीं लोकांना तोषवितात हें जाणून, या वारांगनांना लाजविणाऱ्या रंभा, मेनका, उर्वशी इत्यादि अप्सरा स्वर्गांत देवेंद्राला व इतर देवांना नृत्यगायनादिकेंकरून तोषवितात असें सांगतात! गायक लोकांना फार आनंद देतात यावरून अमरावतींत गंधर्व नामक अप्रतिम गायक आहेत असें वर्णितात! गाडी हाकण्याला एक गाडीवान लागतो म्हणून इंद्राच्या रथाकरितां मातलि नामक सारथी निर्मिला! राजाला राजधानी असते म्हणून इंद्राला अमरावती दिली! राजधानींत मोठमोठे रस्ते असतात असें पाहून अमरावतींत 'राजमार्ग' तयार केले! पुत्राला पाहिल्यावरोबर जनकाला फार आनंद होतो या मानवी स्वभावाकडे लक्ष देऊन अर्जुनाच्या दर्शनानें इंद्राला परम संतोषित केलें! मोठमोठ्या माणसांना रस्त्यांतून मिरवित मिरवित नेतात हें लक्षांत ठेवून देवांच्या हातून अर्जुनाला मिरवित मिरवित नेवविलें! अशा रीतीनें कविजन, देवयोनी मानवयोनीहून भिन्न आहे असें न दाखवितां, देव अत्यंत सुखी मानव आहेत असें दाखवितात! व अशा रीतीनें ईश्वराविषयींची लोकांची पूज्यबुद्धि कमी करितात!

**अमरावतीचिये जनीं[1] । अर्जुन अवलोकितां नयनीं, । म्हणती 'हा होये[2] इं-द्रासनीं । राजा होय आमुतें[3]. ॥ ३३ ॥ विजयी वीर्यवंत[4] सहोदर[5] । पितयाप[6]-रिस प्रतापी थोर, । इंद्रासनीं राज्यधर । राज्यपदीं[7] विभागी[8]. ॥ ३४ ॥ छत्र चामरें विराजवंतु । भद्रासनीं[9] अमरनाथु, । पार्थे सांडुनियां[1] रथु । नमन केलें**

अशाच प्रकारचा आरोप, कित्येक इंग्लिश टीकाकारांनीं **मि**ल्टनच्या '**प्या**राडैस् लॉस्ट्' नामक काव्यावर आणिला होता! त्यांच्या मताप्रमाणें '**प्या**राडैस् लॉस्ट्' काव्यांतला 'ईश्वर' ईश्वर नव्हे, '**स**तान' (**सै**तान) **स**तान नव्हे, 'ॲडाम 'ॲडाम, नव्हे व 'ईव्ह' ईव्ह नव्हे!! अशा प्रकारच्या आक्षेपकांचें मत आम्हाला संमत नाहीं. या आक्षेपकांच्या मतें देवांचीं वर्णनें मनुष्यांच्या वर्णनांहून अगदींच भिन्न असलीं पाहिजेत. अशा प्रकारचें वर्णन मानवी भाषेंत कधींही लिहितां यावयाचें नाहीं. कारण या भूतलावर नाहींत असे पदार्थ स्वर्गांत आहेत अशी कल्पना केली तरी मानवी जगतांत राहणाऱ्या कवीच्या मनांत त्या दिव्य वस्तूंची कल्पना कशी यावी व त्या पदार्थांबद्दल पंचभूतात्मक कवीनें शब्द तरी कोठून आणावे? कवी कल्पनातरंगांत कितीही भराऱ्या मारणारा असला व 'शब्दसृष्टीचा ईश्वर' असला तरी मानवी विचार व मानवी शब्द यांच्या पलीकडे तो कांहीं केल्यानें जाऊं शकणार नाहीं हें कोणीही कबूल करील. शिवाय स्वर्ग, नरक इत्यादिकांची कल्पना काढिली ती मनुष्याच्या मनानेंच. तेव्हां त्या मनाला अगोचर अशा वस्तूंचें कवींनीं वर्णन करावें असें म्हणणें हास्यास्पद होणार नाहीं काय? म्हणून देवादिकांचीं वर्णनें करितांना अतिशयोक्तीनें या जगतांतील लोकांचेंच वर्णन केलें पाहिजे; त्याशिवाय काव्यच होऊं शकणार नाहीं. ५. 'पाटणी' असाही पाठ आहे.

१. जनीं=लोकांनीं **अ**मरावतींत राहणारे जन म्हणजे देव, गंधर्व, अप्सरा इ०. २. 'होय' याबद्दल 'ही' असा पाठ आहे. हाच पाठ बरा. कारण पुढच्याच चरणांत 'होय' हें क्रियापद असल्यामुळें या चरणांत 'होय' या क्रियापदाची फारशी जरूरी नाहीं. ३. 'आमुचा' असाही पाठ. ४. 'जयवंत' असा अन्य पाठ. ५. 'सहोदर' शब्द 'एकाच उदरांतून उत्पन्न झालेला' या अर्थीं भावाला लावतात. परंतु येथें 'सहोदर' म्हणजे सारख्या योग्यतेचे असें समजावें. ६. इंद्रापेक्षां. ७. राज्यपदीं=इंद्रासनीं. ८. विभाग करणारा म्हणजे अर्धा हिस्सा घेणारा. इंद्राच्या अर्धासनीं बसणारा. ९. सिंहासन. भद्रासनाचें लक्षण 'देवीपुराणां'त आहे तें असें:—'हैमं च राजतं ताम्रं क्षीरवृक्षमयं च वा । भद्रासनं प्रकर्तव्यं सार्धहस्तसमुच्छ्रितम् ॥ सपादहस्तमानं च राज्ञो मांडलिकांतरात्॥' याचें लक्षण 'वराहसंहितें'त आहे:—'त्रिविधस्तस्योच्छ्रायो हस्तः पादाधिकोऽर्धयुक्तश्च । मांडलिकान-

१. 'Paradise Lost' (गमाविलेली स्वर्गभूमि) आणि 'Paradise Regained' (पुनः मिळविलेली स्वर्गभूमि) या **मि**ल्टनूप्रणीत दोन काव्यांची इंग्रजी भाषेंत प्रमुखत्वानें गणना आहे.

साष्टांगीं.[1] ॥ ३५ ॥ पित्यानें बाहू[2] पसरोनी मोहें । आलिंगिलें[3] परम स्नेहें, । मूर्ध्नी[4] अवघ्राण[5] लाहें । सिंहासनीं आरूढे.[6] ॥ ३६ ॥ आवडी बैसवूनी अंकीं[7] । प्रीती[8] मुखातें अवलोकी । वारंवार म्हणे 'सुखी कीं ?' । 'पुत्रा! क्षेम असशी कीं ?' ॥ ३७ ॥ कनकताटीं[9] देवांगनीं[10] । ओंवाळिलें रत्नकिरणीं, । दुजा[11] इंद्र ऐसा नयनीं । आभासला[12] जनातें. ॥ ३८ ॥ साध्य विश्वेदेव[13] रुद्रादित्य,[14] । ब्रह्मऋषी[15] असंख्यात, । हे सर्व मिळोनियां तेथें । राजऋषी[16] भेटले. ॥ ३९ ॥ दिलीप[17]प्रमुख राजनृपती, । नारद, तुंबुरु[18] गंधर्वपंक्ती[19] । हाहा,[20] हूहू[21] परमभक्ती ।

---

तरजित्समस्तराज्यार्थिनां शुभदः ॥' [रंगनाथकृत विक्रमोर्वशीयनाटक टीका–पृष्ठ १३९ पहा.] १०. सोडुनियां, उतरून, रथावरून खालीं येऊन.

१. साष्टांग नमस्काराचें लक्षणः—'जानुभ्यां च तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया । शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः ॥.' २. हात. ३. 'आलिंगिलें याला 'अर्जुनाला' हें कर्म आहे असें समजावें. ४. डोकें हुंगणें हें प्रीतीचें लक्षण आहे अशी समजूत आहे. 'शिरस्याघ्राणं गुरुजनस्यापत्येषु वात्सल्यद्योतकम्' [मालतीमाधव–अंक ४ पृ० १०४ टीका 'निर्णयसागरां'तील आवृत्ति.] ५. हुंगणें. ६. 'आरूढे' याचा कर्ता 'अर्जुन' आहे किंवा 'इंद्र' आहे हें येथें बरोबर सांगितलें नाहीं. म्हणून 'अर्जुनासह इंद्र' येवढें पद 'आरूढे' याचा कर्ता आहे असें समजावें. ७. मांडीवर. ८. प्रीतीनें. ९. सोन्याच्या ताटांत. १०. देवांच्या अंगनांनीं, देवस्त्रियांनीं, इंद्राणी इत्यादि सुरस्त्रियांनीं. ११. दुजा इंद्र=दुसरा इंद्र, प्रतिइंद्र. १२. वाटला, भास झाला. १३. 'वैवस्वदेव' असा अन्यपाठ. १४. रुद्र आणि आदित्य. एकादश रुद्रांचीं नांवें:—मृगव्याध, सर्प, निर्ऋति, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, महाद्युति आणि भर्ग. (आदिपर्व–अ० ६५ पहा.) हे सप्तविध देवांतील तिसरे प्रतीचे असून, भूतपिशाचयक्षराक्षसादिकांचे अधिपति होत. यांचीं नांवें अन्यप्रकारेंही आढळतातः—वीरभद्र, शंभु, गिरीश, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली आणि स्थाणु. आदित्य बारा आहेत. हे सर्व चालू मन्वंतरांत कश्यप ऋषीपासून अदितीच्या पोटीं जन्मलेले बारा पुत्र होत. यांचीं नांवें:—(१) धाता, (२) मित्र, (३) अर्यमा, (४) शक्र, (५) वरुण, (६) अंशुमान्, (७) भग, (८) विवस्वान्, पूषा, (१०) सविता, (११) त्वष्टा, (१२) विष्णु. 'रुद्रादित्य' या ठिकाणीं 'मारुत' असाही पाठ आहे. १५. या दुसऱ्या चरणाबद्दल कित्येक पोथींत खालील चरण सांपडतोः—'अश्विनौ वसवरुद्रादित्य.' १६. राजऋषीला, अर्जुनाला. अर्जुनाला ज्या अर्थीं ब्रह्मर्षी येऊन भेटले त्या अर्थीं तो राजर्षी होता यांत संशय नाहीं असें सुचविण्याकरितां कवीनें येथें 'राजऋषी' शब्दाचा उपयोग केला. १७. इक्ष्वाकु कुळांत दिलीप या नांवाचे तीन राजे होऊन गेले असें दिसतें. (१) अंशुमान् नामक राजाचा पुत्र व भगीरथाचा पिता याची गोष्ट वाल्मीकिकृत रामायण–बालकांड अ० ४२ यांत सांगितली आहे. यानें सगरांचा उद्धार करण्यासाठीं भूमीवर गंगा आणावी या उद्देशानें तीस हजार वर्षें घोर तप केलें होतें परंतु कार्यसिद्धि न होतांच हा मृत झाला.

[1]वोळगती पार्थातें. ॥४०॥ [2]घृताची, [3]उर्वशी, [4]मेनका, [5]रंभा, । पूर्वचित्ती स्वयंप्रभा, । मिश्रकेशी, जनवल्लभा, । स्वर्गांगना मुख्यत्वें. ॥ ४१ ॥ दंडगौरी, वरूथिनी, । गोपाळी, सहजन्या, कुंभयोनी, । प्रजागरा, चित्रसेनी, । चित्ररेखा विचित्रा. ॥४२॥ नृत्य, गायन, नाना कळा । दाविती पार्थाचिया डोळां । दे[6]वगंधर्वी दि[7]व्यमाळा । दिव्यगंधीं [8]पूजिला. ॥ ४३ ॥ शक्रें धरूनि पार्थ । [9]स्वयें नेला [10][11]स्व-

---

(२) हा विश्वसह राजाचा पुत्र. याला खट्वांग असें नामांतर होतें. यज्ञ करण्याविषयीं हा फार प्रख्यात होता. याच्या यज्ञांत गंधर्व गान करीत असत. देवांस युद्धांत साह्य करण्यास एकदां हा स्वर्गांत गेला होता. स्वशौर्येंकरून यानें देवांस विजय मिळवून दिला व देवांच्या सांगण्यावरून आपलें आयुष्य फार कमी आहे असें जाणून देवांच्या साहाय्यानें लौकर मुक्ति मिळविली. (३) तिसरा दिलीप हा, प्रख्यात वंशकर्ता रघु याचा पिता. याची स्त्री सुदक्षिणा. पुष्कळ दिवसपर्यंत यांना पुत्र नव्हता. म्हणून भार्येसह दिलीप स्वकुलगुरु वसिष्ठ याकडे गेला व आपल्यास पुत्र होईल असा उपाय विचारता झाला. वसिष्ठानें नंदिनी नामक आपल्या गाईची सेवा करण्यास सांगितलें. वसिष्ठानें सांगितल्याप्रमाणें एकवीस दिवसपर्यंत दिलीपानें नंदिनीची सेवा केली. बाविसाव्या दिवशीं नंदिनी प्रसन्न झाली व तिनें 'तुला पुत्र होईल' असा दिलीपास वर दिला. पुढें दिलीपाला रघु नामक पुत्र झाला. ही कथा कालिदासकृत 'रघुवंशा'च्या पहिल्या व दुसऱ्या सर्गांत फारच सुंदर रीतीनें वर्णिलेली आहे. १८. हा गानप्रवीण एक गंधर्व. हा प्राधेचा पुत्र. रंभा याची स्त्री. हा वैश्रवणाच्या शापानें विराधयोनि पावला होता. हा दंडकारण्यांत विराधरूपानें संचरित असतां रामलक्ष्मणांनीं यावर तीव्र बाण सोडून याचा उद्धार केला. १९. 'गंधर्वपती' असें पाठांतर. २०. कश्यपाला प्राधेच्या ठायीं झालेल्या गंधर्वांपैकीं एक, प्रतिज्येष्ठमासींच्या सूर्याबरोबर हा फिरतो अशी समजूत आहे. २१. गंधर्वविशेष.

१. आलिंगिती. २. प्राधा नामक कश्यप स्त्रीला झालेल्या अप्सरांतील एक. ३. नारायण ऋषीच्या मांडींतून निघालेली स्त्री. ४. मेनका ही प्रख्यात अप्सरांपैकीं एक होय. ही ज्येष्ठमासीं सूर्याबरोबर फिरते अशी समजूत आहे. ५. अप्सराविशेष. रंभेच्या नंतर दिलेलीं अप्सरांचीं नांवें फारशीं महत्वाचीं नसल्यामुळें त्यांच्या विशेष माहिती द्यावयाला नको. ६. देव व गंधर्व यांनीं. ७. 'दिव्यास्त्रें दिधलीं' असा पाठ कित्येक पोथींत दिसतो. ८. 'पूजिला' याला कर्म 'अर्जुन.' ९. 'हात धरूनियां' असें पाठांतर. १०. दोनही पाठ योग्य आहेत. ११. 'शस्त्रगृहांत' असाही पाठ. हा पाठ मूळच्याहून प्रशस्त वाटतो. कारण अर्जुनाला शस्त्रें द्यावयाचीं होतीं म्हणून इंद्र त्याला आपल्या 'शस्त्रगृहांत' घेऊन गेला असें मानणें अधिक सुयुक्तिक होईल. शिवाय स्वर्गांतील सर्व गृहें इंद्राचींच असल्यामुळें तीं सर्व इंद्राचीं स्वगृहेंच होत. म्हणून 'स्वगृहातें' या पदानें इंद्र कोणत्या गृहांत गेला हें बरोबर समजत नाहीं. म्हणून 'स्वगृहांत' या पाठापेक्षां 'शस्त्रगृहांत' हा पाठ प्रशस्त आहे.

गृहांत । वज्रास्त्रादि असंख्यात । दिव्यशस्त्रें दीधलीं. ॥ ४४ ॥ संग्रामी जे, द्रोणाभीष्मा, । जे सामग्री भार्गवरामा । जे कळा नेणें अश्वत्थामा । त्या शस्त्रां मी देईं पुत्रा!' ॥ ४५ ॥ इंद्रगृहीं इंद्रपंक्तीं । पांच वर्षें केली वस्ती, । नाना उपचार संपत्ती । इंद्रातुल्य भोगिल्या. ॥ ४६ ॥ स्त्रीसंयोग करुनी भिन्न । दिव्य भोग भोगिले गहन, । जैसा ब्रह्मनिष्ठ आपण । वासनातीत प्र-

---

१. 'एवं संपूजितो जिष्णुरुवास भवने पितुः । उपशिक्षन्महास्त्राणि ससंहाराणि पांडवः ॥३॥ शक्रस्य हस्ताद्दयितं वज्रमस्त्रं च दुःसहम् । अशनीश्च महानादा मेघबर्हिणलक्षणाः ॥ ४ ॥' [महाभारत–वनपर्व–अ० ४४.] २. स्वर्गांतील शस्त्रें, उत्तम शस्त्रास्त्र. ३. येथें इंद्रानें अर्जुनाला अस्त्रें दिलीं असें सांगितलें आहे; परंतु मुळांत अर्जुन इंद्राजवळून अस्त्रें शिकला असें सांगितलें आहे. ४. युद्धसामग्री, युद्ध करण्याचीं साधनें, शस्त्रास्त्रें. ५. परशुरामाला. ६. युद्धकला, युद्ध करतांना उपयोगी पडणारी विद्या. ७. अश्वत्थामा हा भारतयुद्धांतला प्रख्यात वीर. हा कृपीच्या ठायीं द्रोणाचार्यांना झालेला मुलगा. जन्मल्याबरोबर यानें अश्वासारखा अवाज केला म्हणून यास अश्वत्थामा असें अन्वर्थक नांव पडलें! हा द्रोणाचार्यांचा मुलगा असल्यामुळें याला 'द्रौणि' असेंही म्हणतात. जातीचा ब्राह्मण असल्यामुळें अश्वत्थामा वेद व वेदांग यांत फार प्रवीण होता; पित्यापासून धनुर्वेद शिकून हा त्या विद्येंतही क्षत्रियाप्रमाणें प्रवीण झाला होता. भारतयुद्धांत हा दुर्योधनाच्या बाजूला होता. एकदां पांडवसैन्याचा समूळ नाश करण्याच्या हेतूनें यानें पांडवांवर नारायणास्त्र सोडिलें. त्यावेळीं सर्व सैन्यासह पांडव मरावेच परंतु कृष्णाच्या चातुर्यानें सर्व वांचले. अशाप्रकारचीं अनेक अस्त्रें अश्वत्थाम्यास माहित होतीं. म्हणूनच प्रस्तुतस्थलीं इंद्रानें, मुद्दाम अश्वत्थाम्याचें नांव घेऊन त्यालाही माहित नाहींत अशीं अस्त्रें तुला देतों असें अर्जुनास सांगितलें. यावरून त्याकाळीं अश्वत्थामा नांवाजलेला अस्त्रज्ञ होता असें दिसतें. ८. 'त्या शस्त्रां मी देईं' येवढ्याबद्दल 'तें सुता मी देईं' असा पाठ आहे. दोन्ही पाठ प्रशस्त आहेत. पहिला पाठ घेतल्यास ४५ व्या ओवींतील शब्द इंद्राचे आहेत असें मानून ही ओवी अवतरणचिन्हांनीं बद्ध करावी लागेल. दुसरा पाठ घेतल्यास अवतरणचिन्हांची जरूरी नाहीं. या ओवीच्या शेवटच्या चरणाचें असें आणखी पाठांतर आहेः–'तें इंद्र दे पुत्रातें.' ९. इंद्रगृहीं=इंद्राच्या घरीं; इंद्रपंक्तीं=इंद्राच्या पंक्तींत म्हणजे, इंद्राच्या वाड्यांत राहून व इंद्राच्या पंक्तीला जेवून, मोठ्या आनंदानें–असा भाव. 'इंद्रपंक्तीं'च्या ऐवजीं 'इंद्रप्रीती' असा पाठ आहे. १०. सेवकजनांकडून सेवा. ११. 'इंद्रातुल्य' या स्थळीं 'इंद्रतुल्य' असें पाहिजे. १२. शिवाय, स्त्रीसंयोग शिवाय करून–असा अर्थ. १३. मनुष्यांना अगोचर. १४. वासनाविरहित. वासना म्हणजे या जगांतल्या वस्तूंबद्दल जी आपल्या मनांत इच्छा असते ती. अर्थात् जे परब्रह्मचिंतनीं निमग्न असतात त्यांना अशा प्रकारची वासना असत नाहीं हें उघड आहे. जरी ब्रह्मनिष्ठ प्रपंचांत राहतो तरी तो या प्रपंचासंबंधानें कमलपत्रावरील पाण्याप्रमाणें राहतो. त्याचप्रमाणें अर्जुन जरी शरीरानें स्वर्गसौख्यांत निमग्न होता, तरी आपल्या

पंचीं. ॥ ४७ ॥ पांच वर्षें लोटल्या पूर्ण । स्वर्गभोगीं विटलें[1] मन; । करिता जाला आठवण । **ध**र्मादिकां बंधूंची. ॥ ४८ ॥ **कौ**रवांचे दुष्ट अपराधू । मनीं आठवुनी मानी खेदू, । स्वर्गवासाचा[2] सुस्वादू । विषप्राय[3] अवगमे[4]. ॥ ४९ ॥ **चि**त्रसेन[5]गंधर्वसंगीं । नृत्य गायन कळा रंगीं । निपुण जाला जैसा योगी । सिद्धि पावे अभ्यासें. ॥ ५० ॥ **श**क्र म्हणे **चि**त्रसेनातें, । '**पा**र्थ पावला स्वर्गसुखातें । परंतु उर्वशीअंगसंगातें[6] । अद्यापि नाहीं स्पर्शला. ॥ ५१ ॥ शतयागांचीं[7] शत नाणीं । वेंचोनि पवित्र तपोवनीं[8] । उर्वशीकामसदनीं । सुरतानंदें क्रीडत. ॥ ५२ ॥ पावोनिया[9] दिव्यस्वर्ग । नाहीं उर्वशीसंगभोग[10] । जेंवि भोजनेंवीण व्यंग । सर्वोपचार वाउगे[11]. ॥ ५३ ॥ यालागीं तुवां[12] **चि**त्रसेना ! । बोधूनियां स्वर्गांगना । पाठवीं **अ**र्जुनाचिया सदना[13] । अंगसंगा साक्षेपें. ॥ ५४ ॥ शिष्यासी स्वरूपानंदप्राप्ती[14] । तेणें सुखावे सद्गुरु चित्तीं; ।

---

भावांस व प्रियपत्नीस केव्हां भेटूं असाच विचार नेहमीं त्याच्या मनांत घोळत असे. 'वासनातीत' बद्दल 'वसताती' असा पाठ आहे.

१. कंटाळलें, त्रासून गेलें. २. 'स्वर्गवाससुधास्वादू' असें पाठांतर. ३. विषतुल्य, विषाप्रमाणें. ४. वाटूं लागला. ५. चित्रसेन हा विश्वावसु नामक गंधर्वाचा पुत्र. ब्रह्मर्षींत याची गणना आहे. अर्जुनाला नृत्यगायनकला शिकविण्याविषयीं इंद्रानें या गंधर्वास आज्ञा केली होती व ती विद्या शिकण्याविषयीं अर्जुनालाही सांगितलें:— 'ततः शक्रोऽब्रवीत् पार्थं कृतास्त्रं काल आगते । नृत्यं गीतं च कौंतेय चित्रसेनादवाप्नुहि ॥ ६ ॥ वादित्रं देवविहितं नृलोके यन्न विद्यते । तदर्जयस्व कौंतेय श्रेयो वै ते भविष्यति ॥७॥ सखायं प्रददौ चास्य चित्रसेनं पुरंदरः । स तेन सह संगम्य रेमे पार्थो निरामयः ॥ ८ ॥ गीतवादित्रनृत्यानि भूय एवादिदेश ह । ................................ ॥ ९ ॥ ............................ । गांधर्वमतुलं नृत्यं वादित्रं चोपलब्धवान् ॥१०॥' [महाभारत—वनपर्व—अ० ४४.] ६. उर्वशीचें जें अंग (शरीर) त्याचा संग (स्पर्श किंवा आलिंगन किंवा उपभोग) त्यातें. उर्वशीच्या शरीराच्या उपभोगाला—हा सरलार्थ. ७. शंभर यज्ञांचीं. शंभर यज्ञ जो करितो तो इंद्रपद पावतो अशी समजूत आहे. 'संयोगाचीं शतनाणीं' व 'शतयाग सूत्रामणी' हीं या चरणाचीं पाठांतरें. ८. 'तपोधनी' अन्य पाठ. ९.'पावूनि स्वर्गसुख सांग' पाठांतर. १०. 'उर्वशीचा भोग' अन्यपाठ. ११. व्यर्थ. १२. 'तुवां' बद्दल 'गा!' दुसरा पाठ. १३. 'शयना' असाही पाठ आहे. १४. स्वरूपापासून होणारा आनंद म्हणजे आत्मस्वरूपाची ओळख पटल्यावर मनुष्याला जो आनंद होतो तो. स्वरूपाची ओळख पटली कीं तो जीवन्मुक्त झाला असें समजतात. आत्मस्वरूप कळणें म्हणजे काय याविषयीं मोठमोठ्या योगीजनांत मतभेद आहे; परंतु या विषयावर **शं**कराचार्यांचें जें मत तें सध्यां पुष्कळांना मान्य आहे. **शं**कराचार्यांच्या मतें

तेंवि उर्वशीभोगसुखांतीं । परम लाभ [१]मी मानीं.' ॥ ९९ ॥ देवेंद्रआज्ञेनें उर्वशी । [२]भोगोपचारसामग्रीसी, । आली अर्जुनशय्येपाशीं । निशासमयीं संतोषें. ॥ ९६ ॥ येऊनि बैसतां [३]अंकावरी, । [४]येरू सत्वर [५]ठाकला दुरी, । '[६]त्राहें त्राहें' म्हणोनि [७]करीं । आच्छादिलें [८]नेत्रांतें. ॥ ९७ ॥ '[९]पुरूरव्याची भोग्य

---

स्वरूपानंद म्हणजे यथार्थ वस्तुज्ञानापासून मनुष्याला वाटणारा अवर्णनीय संतोष; सर्व जगत् मायेनें व्याप्त असल्यामुळें, विपरीत भावन, संशयभाव व असद्भावन या त्रिविध भयांनीं जीवाची यथार्थ वस्तुज्ञानशक्ति नष्ट होते व मी परब्रह्माचा अंश आहे हें तो विसरतो. एके ठिकाणीं म्हटलें आहे:—'सत्यज्ञानसुखस्वरूपमहितः सर्वांतरात्मेति यो विख्यातः पुरुषः स तावदसतीं पश्यन्नविद्यामिमाम् । अस्या विभ्रममोहितः प्रमुषितस्वीयप्रभावप्रथो जीवो जीव इति प्रपद्य सुचिरादुन्मत्तवद्भ्राम्यति ॥.' अशाप्रकारचा भ्रम सद्गुरूच्या कृपेनें दूर होतो व 'अहं ब्रह्मास्मि' इत्यादि आत्मस्वरूपज्ञान होतें. असें झालें म्हणजे जो आनंद होतो तो 'स्वरूपानंद.'

१. इंद्र.वर जें गुरुशिष्यांचें उदाहरण दिलें आहे तें येथें लागू केल्यास इंद्र हा सद्गुरु, अर्जुन हा सच्छिष्य व 'उर्वशीभोग' हाच स्वरूपानंद असें ठरतें. २. शिशिरऋतूचें वर्णन करितांना स्त्रिया शय्यागृहांत कोणत्या रीतीनें जातात याविषयीं म्हटलें आहे:—'गृहीततांबूलविलेपनस्रजः सुखासवामोदितवक्रपंकजाः । प्रकामकालागुरुधूपवासितं विशंति शय्यागृहमुत्सुकाः स्त्रियः ॥' [कालिदासकृत ऋतुसंहार—पंचमसर्ग—श्लो० ५]. ३. मांडीवर. पुत्राला व पत्नीला मांडीवर बसवितात. तेव्हां स्त्रीनें मांडीवर बसणें म्हणजे पत्नीत्व स्वीकारणेंच होय. ४. येरू—हा, अर्जुन. ५. गेला. निघून गेला, मंचकावरून उठून दूर उभा राहिला—असा अर्थ. ६. हंत! हंत! ७. हातांनीं. ८. डोळे. अर्जुनानें आपल्या हातांनीं डोळे झांकले असें मूळांत नाहीं. कर्ण झांकिले असें आहे:—'तां तथा ब्रुवतीं श्रुत्वा भृशं लज्जावृतोऽर्जुनः । उवाच कर्णौ हस्ताभ्यां पिधाय त्रिदशालये ॥' [वनपर्व—अ० ४६ श्लो० ३६.] 'माझा उपभोग घे' अशा अर्थाचीं वचनें उर्वशी बोलली असें मूळांत आहे व असलीं वचनें आपण ऐकूं नये म्हणून अर्जुनानें कानावर हात ठेविले असें वर्णन आहे तें योग्यच आहे. उर्वशी कांहींएक न बोलतां चटदिशीं अर्जुनाच्या मांडीवर जाऊन बसली असें मुक्तेश्वरानें सांगितलें आहे. तेव्हां आपल्या मांडीवर उर्वशी बसली आहे हें अर्जुनाला आवडलें नाहीं व त्याबद्दल त्याला फार वाईट वाटलें; म्हणून तो दूर सरला व आपले डोळे झांकूं लागला असें जें पुढें मुक्तेश्वरानें सांगितलें आहे तें त्याच्या कथानकाला अनुसरूनच आहे. ९. पुरूरवा हा बुध व इला यांचा मुलगा. औदार्य, भक्ति, सत्यप्रीति इत्यादि सद्गुणांविषयीं हा राजा फार प्रसिद्ध होता. देहसौंदर्याविषयींही याची ख्याती होती. याची राजधानी प्रयागाजवळ प्रतिष्ठान नामक पुर होतें. कित्येक विद्वानांचें मत प्रतिष्ठान हें नांव प्रयागालाच होतें असें आहे. चंद्रवंशाचा मूळचा पुरुष हाच. मित्र व वरुण यांच्या शापानें उर्वशी भूतलावर फिरत असतां पुरूरव्याच्या दृष्टीस पडली. या दोघांची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर एकमेकांची प्रीति एकमेकांवर जडली. अशा रीतीनें उर्वशी कांहीं दिवसपर्यंत

कांता, । पौरववंशाची तूं माता, । कामसंकल्प धरितां चित्ता । मातृगमन

---

पुरूरवाची पत्नी होऊन राहिली. कांहीं दिवसांनीं पुरूरव्याला उर्वशीच्या पोटीं एक पुत्र झाला. पुत्र झाल्यानंतर उर्वशी शापमुक्त झाली व स्वर्गांत निघून गेली. याबद्दल राजा फार शोक करूं लागला. त्याला शांतविण्याकरितां उर्वशी स्वर्गांतून पांचवेळा त्याच्याकडे आली व हिच्यापासून राजाला आणखी पांच पुत्र झाले. अशाप्रकारें पुरूरव्याला उर्वशीच्या ठायीं सहा पुत्र झाले. त्यांचीं नांवें:–(१) आयु, (२) श्रुतायु, (३) सत्यायु, (४) रय, (५) विजय, (६) जय. यांच्यापासून चंद्रवंशाची वृद्धि झाली. असो. अशा रीतीनें पांचवेळा उर्वशी भेटून गेली तरी राजाची तृप्ति झाली नाहीं. गंधर्वांच्या सांगण्यावरून त्यानें अनेक यज्ञ केले व त्यांच्या सामर्थ्यानें, उर्वशी नेहमीं आपल्याजवळ राहील, असें केलें. शतपथब्राह्मणांत उर्वशी दोन अटींवर पुरूरव्याची बायको झाली होती असें लिहिलें आहे. त्या ह्या:–(१) उर्वशीनें पाळलेलीं दोन मेंढरें नेहमीं तिच्याजवळ असावींत, (२) वस्त्रविरहित पुरूरवा तिच्या दृष्टीस कधीं पडूं नये. या दोन अटी कबूल करून राजानें तिला ठेवून घेतलें होतें. परंतु गंधर्वांनीं तीं मेंढरें चोरून नेल्यामुळें उर्वशी पुरूरव्यापासून गुप्त झाली. कालिदासकृत **'विक्रमोर्वशीयां'**त हीच कथा जरा भिन्न रीतीनें सांगितली आहे. सर्व सुरस्त्रिया, शंकराची सेवा करून, परत इंद्रलोकाप्रत जात असतां मध्येंच केशी नामक दैत्यानें उर्वशीला धरून नेलें. उर्वशी गेल्यामुळें सर्व सुरस्त्रिया रोदन करूं लागल्या. तेव्हां त्यांचें रोदन ऐकून विक्रमाला (पुरूरव्याला) दया आली व त्यानें केशी दैत्याचा पराभव करून उर्वशी त्याच्याहातून सोडविली. त्यावेळीं विक्रमाच्या स्वरूपाला उर्वशी मोहित झाली व तिच्या स्वरूपाला विक्रम मोहित झाला. परंतु उर्वशीला भूमीवर राहतां येत नसल्यामुळें ती मोठ्या कष्टानें स्वर्गांत निघून गेली. पुढें एकदां स्वर्गांत सरस्वतीकृत 'लक्ष्मीस्वयंवर' नामक नाटकाचा प्रयोग झाला, त्यांत उर्वशीनें लक्ष्मीची भूमिका घेतली होती. तेव्हां वारुणीची भूमिका घेतलेल्या मेनकेनें 'आलेल्या सर्व पुरुषांपैकीं तुला कोणता पुरुष आवडतो? असा लक्ष्मीवेषधारी उर्वशीला प्रश्न विचारिला. पुरूरव्याला आपण केव्हां भेटूं याच विचारांत उर्वशी नेहमीं निमग्न असल्यामुळें वरील प्रश्नाला 'मला **पुरुषोत्तम** (विष्णु) आवडतो' असें उत्तर द्यावयाचें विसरून तिनें 'मला **पुरूरवा** आवडतो' असें उत्तर दिलें. त्यावर नाट्यशास्त्रवेत्ता भरतमुनि याला फार राग आला व त्यानें 'तूं मानवावर प्रीति करतेस म्हणून स्वर्गांतून च्युत हो' असा शाप दिला. पुरूरवा नेहमीं इंद्राला साहाय्य करीत होता म्हणून इंद्रानें उर्वशीला असा उच्छाप दिला कीं, 'पुरूरव्याला तुझ्या ठिकाणीं पुत्र होईपर्यंत तुला हा शाप लागू पडेल व तेथपर्यंत तुला स्वर्गांत येतां येणार नाहीं. तदनंतर तूं शापापासून मुक्त होशील.' या शापाप्रमाणें पुरूरव्याला पुत्र होईपर्यंत उर्वशी त्याजवळ राहिली व नंतर स्वर्गांत परत गेली. ही पुरूरवा व उर्वशी यांची कथा ऋक्संहितेंत आहे; परंतु त्यासंबंधानें विद्वानांचें असें मत आहे:–"The dialogues in the Rik-Sanhita between Pûruravas and Urvashi refer to the two pieces of wood. It is the germ of the story of the hero and the heroine of the names of Pûrurovas and Urvashi.

रोकडें. ॥ ५८ ॥ कुंती, माद्री, [१]इंद्रायणी । तयां तुल्य तूं [२]आमुची जननी, । वंशज [३]पुत्र ऐसें मनीं । त्वांही धरिलें पाहिजे.' ॥ ५९ ॥ ऐकोनी अर्जुनाचें वचन । उर्वशी जाली कोपायमान, । म्हणे, 'पुरुषत्व जाउनी हीन । [४]षंढ हो मच्छापें. ॥ ६० ॥ [५]हारपोनी पुरुषवेख[६] । लागेल स्त्रीवेषाचा कलंक, । 'बृहन्नडा' ऐसें सर्व लोक । नाम तूतें ठेविती. ॥ ६१ ॥ [७]कंचुकी [८]नीवी [९]बंधासनीं, । मस्तकीं [१०]पल्लव, पाटी वेणी, । [११]तांटक कर्णीं कर कंकणी । वर्ष [१२]एक वर्तसी. ॥ ६२ ॥ नाटकशाळेचिया नारी । नाचविसी नाना [१३]कुसरी । याहुनी [१४]जघन्यता थोरी । सांग श्रेष्ठा! कोणती?' ॥ ६३ ॥ आपुनी गेलिया उर्वशी । अर्जुन पातला इंद्रसभेसी; । शक्र [१५]जाणोनियां मानसीं । शांतवीत पुत्रातें. ॥ ६४ ॥ 'होणार तैसीच प्राब्धगती । घडे ऐसें जाणोनी [१६]निरुती, । ईश्वर इच्छा मानुनी चित्तीं । विषाद कांहीं न मानावा. ॥ ६५ ॥ [१७]नष्टचर्य येक वरुष । [१८]विराटगृहीं घडेल [१९]यांस, । तेथें धरूनियां [२०]अंगनावेष । [२१]गुप्त असिलें पाहिजे. ॥ ६६ ॥ यालागी ईश्वरें रचिली [२२]युक्ती; । तुवां असावें स्वस्थचित्तीं.' ।

---

In the sacrificial system, the two pieces (aranis) of wood by which fire is produced are called Pûruravas and Urvashi." [The Vicissitudes of Aryan Civilization in India, by M. M. Kunte. Page 46].

१. शची. २. 'सखी' असाही पाठ. ३. 'बालक' असें पाठांतर. ४. नपुंसक. 'तृतीयाप्रकृतिः षंढः क्लीबः पंडो नपुंसके' इत्यमरः. ५. जाऊन, नाहींसा होऊन. ६. वेख=वेष. ७. कंचुकी=चोळी. ८. वस्त्रग्रंथी. ९. 'बंधवसनी' असा अन्य पाठ. १०. पदर. 'वसन' असाही पाठ. ११. कर्णभूषणविशेष. १२. 'एक वर्ष तूं षंढ राहशील; पुढें चांगला होशील' अशा अर्थाचा शाप उर्वशीनें दिला असें मूळांत नाहीं. 'तूं नेहमींकरितां षंढ होशील' असा उर्वशीनें शाप दिला. परंतु 'तो शाप तुला एकच वर्ष लागू पडेल' असा इंद्रानें उच्छाप दिला, अशी मूळांत कथा आहे. १३. कौशल्य. १४. नीचपणा. १५. उर्वशीनें दिलेला शाप जाणून. १६. न चुकतां, निश्चयानें. १७. दुर्दशा, क्लैब्य. १८. 'विराटगेहीं' असें पाठांतर. १९. 'वास' असा दुसरा पाठ. २०. स्त्रीरूप, बृहन्नडेचा वेष. २१. शत्रूला न कळतां. पांडव अज्ञातवासांत असतांना जर त्यांना दुर्योधनादिकांनीं ओळखिलें तर पुन्हा पांडवांनीं बारा वर्षें अरण्यवास व एक वर्ष अज्ञातवास करावा अशी अट होती म्हणूनच इंद्र 'गुप्त असिलें पाहिजे' असें अर्जुनास सांगतो. २२. ही युक्ति कोणती तर एक वर्षपर्यंत बृहन्नडा होण्याबद्दल शाप मिळला तो. या शापाला युक्ति म्हणण्याचें कारण असें कीं बृहन्नडेच्या रूपानें राहिल्यामुळें हा

म्हणोनी आलिंगुनी प्रीती । अर्धासनीं बैसविलें. ॥ ६७ ॥ तंव लोमेश तपस्विराज । शक्रसभेसी पातला सहज; । अर्धासनीं बैसला धर्मानुज । देखोनी बोले इंद्रासी. ॥ ६८ ॥ 'बैसावया नं सकताती मुनी । तेथें हा मानव अर्धासनीं । बैसला हे विचित्र करणी । तुझी देखों सुरेंद्रा!' ॥ ६९ ॥ सुरेश म्हणे, 'मज समान । माझा पुत्र हा अर्जुन, । अर्धशरीरी नारायण । नरावतार जाण पां. ॥ ७० ॥ भूभार फेडावया लागीं । अवतरलासे कृष्णसंगीं, । इंद्रपदाचा विभागी । बैसावया अधिकारी. ॥ ७१ ॥ निवातकवच निर्दाळावया । आणिलासे यया ठायां । मातें न कंठे त्या काया । करूं सके सामर्थ्यें.

---

अर्जुन आहे असें शत्रु ओळखणार नाहींत. म्हणून शत्रूकडून न ओळखिला जाण्याला बृहन्नडा होणें हा एक उत्तम उपाय झाला.

१. अर्धं आसनस्यार्धासनम्=अर्धें आसन. [अर्धासन प्राप्त होणें हें गौरव आणि सन्मान यांचें ज्ञापक आहे. 'हरिच्या अर्धासनीं' या पदानें अर्जुनानें श्रेष्ठत्व सुचवून त्याची इंद्रसमानताही दर्शविली आहे. 'इंद्राचें अर्धासन' अशीं पदें संस्कृतांत वारंवार येतात. रघुवंश—सर्ग ६ श्लो० ७३, शाकुंतल नाटक—अंक ७ इत्यादि पहा. महाभारतांतही हेंच पद योजिलें आहे. (श्लो० ९.) मोरोपंत—वनपर्व—अध्याय ५ गीति ५ यांत हेंच पद योजिलें आहे. २. हा मोठा तपस्वी असून महाज्ञानीही होता. इंद्रादिक देव याचा बराच मान ठेवीत असत. पांडवांबरोबर अरण्यवासांत हा पुष्कळ दिवसपर्यंत राहिला, व पांडवांबरोबर यानें पुष्कळ तीर्थयात्रा केल्या. ३. कोणत्यातरी कामासाठीं आला होता असें नाहीं, तर जातांना इंद्रलोकाला निरिक्षणें आला. ४. धर्माचा धाकटा बंधु, अर्जुन. ५. न शकती, असमर्थ असती. 'न सकताती'' यैवजीबद्दल 'शंकती' असाही पाठ आहे. ६. पाहतों. 'देखों' या क्रियापदाला 'आम्ही' हें पद अध्याहार करणें होय. ७. अर्धशरीरी नारायण=अर्ध्या शरीरानें नारायण. म्हणजे अर्जुन हा पुष्कळ अंशीं नारायण. अर्जुन नारायणाचा जिवलग मित्र असून त्याच्याच प्रमाणें तपश्चर्या करीत होता म्हणून त्यास 'अर्धशरीरी नारायण' असें म्हटलें आहे. ८. 'अवतारमूर्ती जाण पां' असा अन्य पाठ. ९. भूमीचा भार, दुष्ट लोकरूपी भार. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥' हें कृष्णानें म्हणणें खरें करून दाखविण्याकरितां. १०. हक्कदार. ११. निवातकवच=वातापासून संरक्षण करणारें कवच, शत्रूपासून वांचविणारा कवच, संरक्षणारा कवच असा शब्दार्थ. निवातकवच हे प्रल्हादभ्राता संल्हाद याचे तीनकोटि पुत्र. हे समुद्रतीरीं राहत असून महादेवाच्या वरानें उन्मत्त झाले होते. हे इंद्रासही अजिक्य होते. यांचा वध करून अर्जुनानें इंद्रापासून प्राप्त झालेल्या अस्त्रविद्येबद्दल त्याला शत्रुपराभवरूप गुरुदक्षिणा दिली. (वनपर्व—अध्याय १६८-१७३.) १२. मारावया. १४. ठायां=ठाईं, जागीं. स्वर्गी—असा भाव. १५. कंठे=होऊं शके. पार पडणें कंठणें=सहन करणें, मेहनत करणें. १६. स्वसामर्थ्याच्या योगानें, इतरांच्या साहाय्यानें नव्हे—असा भाव.

॥ ७२ ॥ लोमशा ! माझिया आज्ञा[1] । तुवां जावें[2] काम्यकवना, । आदरें कुंतीचिया नंदना । धर्मराजासीं भेटावें.[3] ॥ ७३ ॥ माझा निरोप सांगिजे त्यातें । कीं अर्जुन सुखें असे येथें;[4] । कार्य साधूनियां[5] तूंतें[6] । शीघ्रकाळें[7] भेटेल.' ॥ ७४ ॥ ऐसें होतां आज्ञावचन । भूतळा पातला तपोधन[8] । काम्यकवनीं कुरुनंदन[9] । बंधूंसहित[10] देखिला. ॥ ७५ ॥ जन्मेजय[11] राजा नृपती । म्हणे, 'वैशंपायना ! सुमती । अर्जुन शक्रलोकाप्रती । गेला ऐकोनि कौरव[12] ॥७६॥ काय करिते जाले सकळ । तें मज सांगावें अविकळ.'[13] । वक्ता म्हणे, 'ऐक कुशळ । चक्रवर्ती सुजाणा ! ॥ ७७ ॥ व्यासाज्ञेनें जैमिनी[14] । धृतराष्ट्रातें जा-

---

१. आज्ञेनें. २. 'जावें' बद्दल 'जाऊनि' असाही पाठ आहे. ३. धर्मादिकांना सोडून जाण्याला अर्जुनाला पुष्कळ दिवस झाले होते, तरी अर्जुन परत आला नाहीं, म्हणून धर्मादिक चिंतातुर असतील म्हणून हा निरोप पाठविला, नाहीं तर याची आवश्यकता होती असें नाहीं. ४. स्वर्गांत, इंद्राजवळ. ५. ज्या कामाकरितां गेला तें पूर्ण करून, भीष्मादिकांशीं युद्ध करण्याकरितां दिव्यास्त्रें मिळविण्याचें जें कार्य तें साधून—असा स्पष्टार्थ. ६. 'तूंतें' येथें 'तुम्हांतें' असाही पाठ आहे. ७. लौकरच, थोड्या कालांत. ८. तपच आहे धन ज्याचें. तापसी सर्व धनांचा त्याग करितात याचें कारण येवढेंच कीं त्यांना इतर धनांपेक्षां तपोधन फार महत्वाचें वाटतें. ९. युधिष्ठिर. १०. 'वधूसहित' असा अन्य पाठ. या पाठापेक्षां मूळचाच पाठ बरा. ११. 'जनमेजय राजनृपती' असें पाठांतर. जनमेजय हा परीक्षित् राजाचा मुलगा, यानेंच सर्पसत्र केलें होतें. भारतकथा यालाच वैशंपायनानें सांगितली. तरी येथें मध्येंच याचें नांव आणून यानें पुन्हा विचारिलें असें वर्णन करण्यांत कवीचा काय उद्देश होता तो बरोबर समजत नाहीं. तरी तर्कावरून असें वाटतें कीं, कवीला कथानकाचा ओघ पांडवांकडून कौरवांकडे वळवावयाचा होता, म्हणून जनमेजयाला बोलावयास लावून कवीनें तें आपलें काम साधलें. १२. एका पोथींत हा चौथा चरण 'गेला ऐसें ऐकोनी' असा आहे; व या चरणांतला 'कौरव' शब्द पुढच्या ओंवीच्या आरंभीं घातला आहे. १३. 'पालहाळ' व 'करोनि विह्वळ' असे दोन अन्य पाठ आहेत. १४. हा व्यासाचा शिष्य असून पूर्वमीमांसेचा कर्ता. यानेंही एक भारतग्रंथ लिहिला होता म्हणतात. परंतु तो चांगला नव्हता म्हणून 'अश्वमेध' शिवायकरून व्यासानें सर्व बुडविला ! 'जैमिनी'बद्दल 'संजय मुनी' असें पाठांतर आहे. परंतु मूळांत, अर्जुन इंद्रलोकास गेला ही गोष्ट धृतराष्ट्राला व्यासाज्ञेनें संजयानें किंवा जैमिनीनें सांगितली, असें लिहिलें नाहीं; तर ही गोष्ट स्वतः व्यासांनींच धृतराष्ट्राला सांगितली असें लिहिलें आहे:— 'शक्रलोकगतं पार्थं श्रुत्वा राजांबिकासुतः । द्वैपायनात् ऋपिश्रेष्ठात्·············· ॥' [वनपर्व—अ० ३६ श्लो० २.]

णवी वचनीं, । म्हणे, 'राजा! विचित्र करणी । [1]सुपुत्राची [2]परियेसी. ॥ ७८ ॥ [3]मनुष्यलोकींचा [4]नरनायक । [5]येणे शरीरें स्वर्गसुख । भोगोनी पातला [6]तो एक । अर्जुन नामा [7]ये लोकीं. ॥ ७९ ॥ अर्जुन जाऊन [8]मंदराचळ । त्यागुनी [9]कंदमूळफळ, । [10]प्रसन्न केला [11]शांभवनीळ; । पाशुपत [12]लाधला. ॥ ८० ॥ कृपेनें

---

१. चांगल्या मुलाची, सद्गुणी पुत्राची. लहानपणापासून अर्जुनाला धृतराष्ट्रानेंच पाळिल्यामुळें अर्जुनाला धृतराष्ट्राचा 'सुपुत्र' म्हटलें आहे. २. 'परियसी' असाही पाठ आहे. ३. पृथ्वीवरील. मनुष्यलोकांतला मानव स्वर्गांत शरीरानें जाणें अगदीं असंभव आहे; असें असूनही ज्या अर्थीं अर्जुन शरीरानें स्वर्गांत गेला तेव्हां तो फारच पुण्यवान् व शौर्यवान् होता, असें दाखविण्याकरितां मुद्दाम 'मनुष्यलोकींचा' या पदाची योजना केली आहे. अशा प्रकारची शब्दयोजना मूळांत नसतांही ज्या अर्थीं मुक्तेश्वरानें केली त्या अर्थीं तो शब्दयोजनेंत बराच कुशल होता असें दिसतें. ४. नरश्रेष्ठ, नरकेसरी पुरुषोत्तम. कृष्ण 'नरनायक' किंवा पुरुषोत्तम या नांवांनीं प्रसिद्ध होता हें विश्रुतच आहे; व कृष्णांत आणि अर्जुनांत मुळींच फरक नसल्यामुळें अर्जुनालाही येथें 'नरनायक' म्हटलें आहे. 'वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः' [गीता–अ० १० श्लो० ३७.] या भगवद्गीतेंतल्या वाक्यावर टीका करितांना ज्ञानेश्वर म्हणतात:—'आणि सोमवंशी तुम्हां पांडवां । माजि अर्जुन तो मी जाणावा । म्हणोनि एकमेकांचिया प्रेमभावा । विघड न पडे ॥९३॥' सन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनी नेली माझी भगिनी । तन्ही विकल्प नुपजे मनीं । मीं तूं दोन्ही स्वरूप एक. ॥९४॥' [ज्ञानेश्वरी–अ० १० वा. निर्णयसागरची आवृत्ति पृ० २२८] यावरून कृष्ण आणि अर्जुन हे नांवांनीं जरी भिन्न होते तरी वास्तविक रीतीनें ते दोघेही एकच होते हें उघड आहे. तेव्हां एकाचीं सर्व नांवें दुसऱ्याला लागू करण्याला कांहीं हरकत दिसत नाहीं. म्हणूनच 'जिष्णु' 'नरनायक' इत्यादि नांवें कृष्णाला व अर्जुनालाही लावितात. ५. यानें. ६. तोच एकटा, शरीरानें स्वर्गसुख भोगणारा मानव तोच आहे. दुसरा कोणीही नाहीं—असा भावार्थ. ७. या लोकांत, पृथ्वीवर. पृथ्वीतलावर जो अर्जुन या नांवानें प्रख्यात आहे तो–असा अर्थ. 'ये लोकीं' या ठिकाणीं 'त्रैलोकीं' असाही पाठ क्वचित ठिकाणीं दृष्टीस पडतो. ८. मंदराचळाला, इंद्रकील पर्वतावर. या पुढच्या ओवींत अर्जुनाच्या तपश्चर्येचें थोडक्यांत वर्णन आहे. ९. 'प्रथममासी तपश्चर्या थोर । तृतीय दिवशीं स्वीकारी आहार । द्वितीय मासीं परमधीर । षष्ट दिवशीं फळ भक्षी ॥ १०० ॥ तृतीय मासामाजी जाण । पक्षपक्षां फळ जीवन । चतुर्थमासी पवन । निराहारी निर्जळी ॥ १०१ ॥' [मुक्तेश्वरकृत वनपर्व–अ० ४.] या दोन ओवींचा अर्थ 'त्यागुनी कंदमूळफळ' या एका चरणांत आणिला आहे हें चाणाक्ष वाचकांनीं ओळखिलेंच असेल. १०. या ओवीच्या शेवटच्या दोन चरणांबद्दल असें पाठांतर आढळतें:–'तपश्चर्या फळल्या सकळ । कल्पलतेसारख्या. ॥' कल्पलता ही इंद्राच्या नंदनवनांतील एक लता होय. कल्पवृक्षाप्रमाणेंच ही आपल्या छायेखालीं बसणाऱ्यांची इच्छा पूर्ण करते अशी समजूत आहे. ११. शंकर. १२. मिळाला.

पावला[1] शंभू, । अनुग्रहार्थ[2] दाविला क्षोभू[3], । दिव्य पाशुपताचा लाभू । तया पासाव[4] पावला. ॥ ८१ ॥ इंद्र, वरुण, यम, कुबेर, । दर्शना[5] पातले सत्वर; । अस्त्रें प्रसाद देउनी वर । देते झाले समस्त. ॥ ८२ ॥ मातली पाठवुनी प्रीती । शक्रें नेला[6] स्वस्थळाप्रती; । पांच वर्षें केली वस्ती । स्वर्गभोगवैभवें. ॥ ८३ ॥ वज्र अस्त्रादि दिव्य अस्त्रें । कृपेनें दीधलीं देवें शक्रें, । 'येणें शत्रुकुळाचीं[7] गात्रें । खंड विखंड [8]तूं करिसी. ॥ ८४ ॥ तुझिया दिव्यास्त्र वैश्वानरीं[9] । धृतराष्ट्रपुत्र सहपरिवारी[10] । भस्मतील[11] वरदोत्तरीं.' । शक्र म्हणे पार्थातें. ॥ ८५ ॥ अस्त्रलाभ, स्वर्गसुख, । शक्रसभेसी[12] मान अधिक[13], । तथापि अर्जुनहृदयीं दुःख । अत्यद्भुत[14] नावरे. ॥ ८६ ॥ धृतराष्ट्रसुतविरुद्धकरणी[15] । स्मरतां धडके[16] प्रतिक्षणी, । धुंधुःकार[17] सांडितां पातला फणी[18] । तेंवी क्रोधें धुधुःकारे. ॥ ८७ ॥ वर्णी धर्माचिया शांतवना[19] । कृष्ण पातला काम्यकवना, । द्यूत ऐकोनी धृष्टद्युम्ना । क्रोधें[20] अद्भुत नावरे. ॥ ८८ ॥ शपथ करून गेले सकळ । चतुर्दश वर्षीं कौरवकुळ । निर्मूळ करूनी पृथ्वीतळ । धर्मराजा वोपणें[21]. ॥ ८९ ॥ मज पाहतां कुरुनरेशा! । ऐसेच[22] घडेल चवदा वरुषां; ।

---

१. प्रसन्न झाला. २. अनुग्रह करण्याकरितां, पाशुपतास्त्र देण्याच्या उद्देशानें. ३. युद्ध करून शंकरानें अर्जुनास क्षोभविलें हें त्याच्याच हिताकरितां असें जैमिनी म्हणतो. ४. पासून. ५. अर्जुनाच्या दर्शनाला, पाहण्याच्या उद्देशानें. ६. 'नेला' याला कर्म 'अर्जुन' आहे असें समजावें. ७. 'शत्रूचीं गात्रें' असें पाठांतर. ८. 'तूं करिसी' येवढ्या बद्दल 'करशील' असा पाठ आहे. ९. अग्नींत. १०. परिवारासह, बंधुमित्रसैन्यासहवर्तमान. 'धृतराष्ट्रासह पुत्र परिवारी' असाही पाठ आढळतो. ११. भस्म करतील. दिव्यास्त्रांना वैश्वानर म्हटल्यामुळें ते भस्मतील असें म्हटलें आहे. कारण सर्व पदार्थ भस्म करून टाकणें हा अग्नीचा धर्मच आहे. १२. इंद्रसभेंत. १३. मोठा. मोठमोठ्या ऋषींनांही दुर्लभ अशा इंद्राच्या अर्धासनावर बसण्यास मिळणें सर्वांत मोठा मान होय हें उघड आहे. १४. मोठ्या सौख्यांत असूनही अर्जुन दुःखी होता म्हणून त्याच्या दुःखाला 'अत्यद्भुत' म्हटलें आहे. १५. धृतराष्ट्राच्या शंभर मुलांनीं केलेली धर्मविरुद्ध गोष्ट म्हणजे पांडवांजवळून कपटानें हिसकून राज्य घेणें, द्रौपदीला छळणें, इत्यादि अपराध. 'तव पुत्राची विरोधकरणी' असाही पाठ. १६. दुर्योधनादिकांविषयीं पार्थ मनांत जळत आहे असें सांगून, तुझ्या पुत्रांचा अंत जवळ आला आहे असें जैमिनी धृतराष्ट्राला सुचवितो. 'स्मरोनि भडके प्रतिदिनीं' असें पाठांतर. १७. सर्प ज्याप्रकारचा शब्द काढतो तो. हा अनुकरणवाचक शब्द आहे. 'फुत्कार सांडी पातळ फणी' असा अन्य पाठ. १८. सर्प. १९. सांत्वन करण्याकरितां. २०. धृष्टद्युम्नाला फार राग आला, कृष्ण पांडवांकडे गेला इत्यादि सांगून जैमिनी धृतराष्ट्राची भीति वाढवीत आहे. २१. अर्पण करणें. २२. 'कौरवकुळ निर्मूळ' होईल असें.

यासि परिहार[1] महापुरुषा! । माझे दृष्टी दिसेना.' ॥ ९० ॥ धृतराष्ट्र म्हणे संजयातें । 'हें[2] घडलें दिसे मातें[3] । कैंचीं[4] चौदा वरुषें तेथें[5] । दुःखार्णवीं[6] बुडालों. ॥ ९१ ॥ मातें[7] पातलिया मरण । करणें नलगे देहदहन[8] । आंगींच्या अस्थी जाल्या चूर्ण । चिंतानळें जाण पां.' ॥ ९२ ॥ जन्मेजय म्हणे 'ऋषी[9]! । द्वादश वर्षें वनवासी[10] । असंख्य ऋषि तपोराशी[11] । बंधुपत्नीसमवेत. ॥ ९३ ॥ काय भक्षुनी[12] वांचले वनीं । हें मज सांगा विस्तारें[13] करूनी.' । वक्ता[14] म्हणे,

---

१. टाळण्यास उपाय, असें न घडूं देण्याची युक्ति. २. चौदाव्या वर्षीं दुर्योधनादिकांचा नाश होईल असें जें वर म्हटलें आहे तें. ३. 'आजचि घडे वाटे मातें' व 'आजीच झालें वाटे मातें' असे दोन या चरणाचे अन्यपाठ आहेत. ४. कोणत्या रीतीनें. ५. 'तेथें' बद्दल 'येथें' असा पाठ आहे. ६. दुःखसागरांत, पुत्रमरणाविषयींच्या दुःखांत. ७. मातें मरण पातलिया देह दहन करणें नलगे (कारण) आंगींच्या अस्थीचिंतानळें (आधींच) चूर्ण जाल्या जाण पां—असा अन्वय. धृतराष्ट्र म्हणतो कीं चिंताग्नीनें मी आधींच जळून गेल्यामुळें मी मृत झाल्यावर मला जाळण्याची आवश्यकता नाहीं. 'करणें नलगे देहदहन' याचें कारण 'आंगींच्या अस्थी जाल्या चूर्ण । चिंतानळें...... ॥' हें होय असें समजावें. देहदहनाचें काम चिंताग्नीनें उरकून टाकल्यामुळें मृत झाल्यावर पुन्हा देहदहन नको, असें जें धृतराष्ट्राचें म्हणणें तें लक्षांत ठेवण्यालायक आहे. देहदहनाची क्रिया चिंताग्नीनें उरकली असें म्हणून मी फार चिंतातुर आहें, चिंतेमुळें मला इतर कांहीं सुचत नाहीं असें धृतराष्ट्र सुचवितो. चिंतेला अग्नीची उपमा देतात याचें कारण असें दिसतें कीं अग्नीप्रमाणें चिंता ही मनुष्याला ताप (मनोऽस्वास्थ्य) देते. एका कवीनें चिंता व चिता (मृतशरीर ज्या शय्येवर अग्नीनें जाळतात ती प्रेतशय्या, सरण.) यांची तुलना केली आहे. तो म्हणतो कीं चिंता व चिता यांच्यांत फक्त एका अनुस्वाराचा फरक आहे. बाकी हे दोन्ही पदार्थ जी क्रिया करतात ती एकच. कारण चिंता जिवंत मनुष्याला जाळते व चिता मृताला जाळते. ८. देहदहनाचें वर्णन आदिपर्वांत दिलें आहे. तें वाचकांकरितां येथें उतरून घेतों:—'पाहोनि निर्मळ गंगातट । चिता रचिली प्रचंड नीट । आज्य तैल कनकघट । सहस्रावधि आणिले ॥ ९१ ॥ अगरू चंदन विल्वकाष्टीं । बैसका रचिली तळवटी । बालतृणाचिया थाटी । आस्तरणातें सूदल्या. ॥ ९२ ॥ त्यावरी कुंकुम आणि केशरीं । कर्पूर आंथरिला थरोथरी । सवें पहुडविलीं साजरीं । जेंवीं शेजारीं दंपत्य ॥ ९३ ॥ विधीनें प्रार्थिला हव्यवाट । ज्वाळा पेटल्या धडधडाट । धूप परिमळ तैलघट । अनंतहस्तें ओपिती ॥ ९४ ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वरकृत महाभारत—आदिपर्व—अ० २८ पृ० २५३-२५४.] ९. वैशंपायना! १०. 'अरण्यवासी' असा अन्यपाठ. ११. तपोरूपक धनाचे जे राशीच होत. म्हणजे विपुल तपोसंपन्न. १२. धर्मराजाला सूर्य अक्षय अन्नसामग्रीनें भरलेली स्थाली देऊन गेला, असें मागें सांगितल्यामुळें पुन्हा हा प्रश्न विचारण्याची व त्याला दुसऱ्या तऱ्हेनें उत्तर देण्याची आवश्यकता नव्हती. परंतु ते 'काय भक्षुनि वांचले' हें 'विस्तारें करुनि सांगा' असें ज्या अर्थीं जनमेजय म्हणतो त्या अर्थीं तसें विचारण्यांत त्याचा कांहीं तरी उद्देश असेल

'ऐक श्रवणीं । धैर्य[1] सत्व वडिलांचें.[2] ॥ ९४ ॥ अरण्यफळें[3] नानाविधें । वि[4]-हित पशू आणि श्वापदें[5] । मांसें आणुनी ब्राह्मणवृंदें[6] । द्वादश[7] वर्षें पाळिलीं. ॥ ९५ ॥ तृप्त जालिया सकळ मुनी । पांचा[8] तोषवी भोजनीं, । उरलेंनि शेषें याज्ञसेनी । देह रक्षी आपुलें. ॥ ९६ ॥ अस्त्रप्राप्तीलागीं पार्थ । शक्र-लोकीं राहिला स्वस्थ; । त्याचेनि वियोगें दुःश्चित[9] । भीमसेन विलपे.[10] ॥ ९७ ॥ 'अर्जुना ऐसा बंधु सगुण । केव्हां देखती माझे नयन? । तया न देखतां

---

असें वाटतें. तो उद्देश उघड करून दाखविणें हें कवीचें काम होतें. तें त्यांनीं केलें असतें तर काव्याला अधिक रुचि आली असती. १३. 'विस्तारें करूनी' याबद्दल 'विस्तारूनी' असाही अन्यपाठ आहे. १४. भारतकथेचा वक्ता वैशंपायन.

१. सत्व म्हणजे संकटसमयींही धैर्य न सोडतां सद्धर्मानें चालणें. २. पूर्वजांचें. अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, अभिमन्यूचा मुलगा परीक्षिति, परीक्षितीचा मुलगा जन-मेजय. म्हणून पांडव हे जनमेजयाचे प्रपितामह होते. ३. पांडवांचा भक्षणविधि मूळांत चांगल्या रीतीनें वर्णिलेला आहे:—वानेयं च मृगांश्चैव शुद्धैर्बाणैर्निपातितान् । ब्राह्मणानां निवेद्याग्रमभुंजन्पुरुषर्षभाः ॥ ४ ॥ तांस्तु शूरान्महेष्वासांस्तदा निवसतो वने । अन्वयुर्ब्राह्मणा राजन्साग्नयोऽनग्नयस्तथा ॥५॥ ब्राह्मणानां सहस्राणि स्नातकानां महात्मनाम् । दश-मोक्षविदां तत्र यान्बिभर्ति युधिष्ठिरः ॥ ६ ॥ रुरूङ्कृष्णमृगांश्चैव मेध्यांश्चान्यान्वनेचरान् । बाणै-रुन्मथ्य विविधैर्ब्राह्मणेभ्यो न्यवेदयत् ॥ ७ ॥ न तत्र कश्चिद्दुर्वर्णो व्याधितो वापि दृश्यते । कृशो वा दुर्बलो वापि दीनो भीतोऽपि वा पुनः ॥८॥ पुत्रानिव प्रियान्भ्रातृन् ज्ञातीनिव सहोदरान् । पुपोष कौरवश्रेष्ठो धर्मराजो युधिष्ठिरः ॥९॥ पतींश्च द्रौपदी सर्वान् द्विजातींश्च यशस्विनी । मातृवद्भोज-यित्वाग्रे शिष्टमाहारयत्तदा ॥ १०॥ प्राचीं राजा दक्षिणां भीमसेनो यमौ प्रतीचीमथवाप्युदीचीम् । धनुर्धरा मांसहेतोर्मृगाणां क्षयं चक्रुर्नित्यमेवोपगम्य ॥ ११ ॥' [महाभारत—वनपर्व—अ० ५०.] ४. नेमलेले, नियमित. ५. 'विहित पशूची सुस्वादें' असें पाठांतर आहे. ६. आणलेलें मांस अगोदर ब्राह्मणांस देऊन नंतर पांडव खात असत असें येथें सांगितलें आहे व मूळांतही तसेंच आहे. तेव्हां त्या काळचे ब्राह्मण मांस खात असत असें दिसतें. या विषयावर एक सुंदर निबंध कैलासवासी विद्वन्मुकुटमणि बाबू राजेंद्रलाल मित्र यांनीं Journal of the Asiatic Society of Bengal या पुस्तकाच्या १८७३ च्या पहिल्या अंकांत लिहून प्रसिद्ध केला आहे. या निबंधाचें नांव 'Spirituous Drinks in Ancient India' असें आहे. [पृ० १-२३ पहा.] प्राचीनकाळीं द्विज मद्यमांससेवन कितपत करीत असत याचा निर्णय करण्यास हा निबंध मोठें साधन समजलें पाहिजे. 'मांसें आणुनि विनोदें' असाही पाठ आहे. ७. 'ब्रह्मवृंदें पाळिलीं' असा अन्यपाठ. ८. पंचपांडवांना. 'पांचां' बद्दल 'भ्रतार' असाही पाठ आढळतो. ९. 'दुःखयुक्त' असा अन्यपाठ. १०. 'प्रलापे' असाही पाठ.

प्राण । जावों[1] पाहे तात्काळ.' ॥ ९८ ॥ धर्म म्हणे, 'राहें स्वस्थ; । शीघ्रचि भेटेल विजयी पार्थ, । कष्टकाळ[2] ही समस्त । सरत आला जाण[3] पां. ॥९९॥ करूं शत्रूचा निःपात[4], । पुरती तुमचे[5] मनोरथ.' । ऐसें बोलतां धर्म तेथें । बृहदश्वा[6] पातला. ॥ १०० ॥ नमस्कारुनी ऋषिश्रेष्ठा । आसन वोपिलें[7] प्रतिष्ठा; । मग म्हणे, 'माझिया[8] कष्टा । समान कोणी दिसेनों[9]. ॥ १०१ ॥ राज्यहानी, अरण्यवासू, । बंधुवियोगाचे[10] क्लेशु, । मज समान दुसरा पुरुषु । दुःखी नाहीं त्रिभुवनीं[11].' ॥ १०२ ॥ बृहदश्वा वदे वाचे, । 'दुःख पाहतां मागिलांचें[12] । मेरूपुढें सर्षपाचे[13] । तेंवि तुमचें[14] अवगमे[15]. ॥ १०३ ॥ तुझें अरण्यवासींचें[16] सुख । स्वर्गीं नेणती[17] सुरनायक; । तें तूं[18] दुःख म्हणतां मूर्ख । प्ररम हरिख[19] तव संगीं. ॥ १०४ ॥ संगीं[20] द्रौपदी सारिखी वधू[21] । सेवा करिती चौघे बंधू[22], । ऋषीसंगीं विनोदू[23] । कौतुकें काळ जातसे. ॥ १०५ ॥

---

१. 'जाऊं पाहति' असें पाठांतर. २. अरण्यवासाचा काळ. ३. 'शेवटीं' असा अन्यपाठ. ४. निःपात=खालीं पाडण्याची क्रिया, अधःपतन, पराभव. ५. भीमार्जुन नकुल सहदेव व द्रौपदी यांचे. ६. पांडवांकडे द्वैतवनांत आलेला एक ऋषि. यानें धर्मास अनेक इतिहास ऐकविले आणि अक्षविद्या आणि अश्वहृदयविद्या ह्या सांगितल्या. ७. अर्पिलें, बसावयाला दिलें. ८. 'सांग माझिया कष्टा' असाही पाठ आहे. ९. 'देखिला' असें पाठांतर. १०. अर्जुन जवळ नसल्यामुळें उत्पन्न होणारे. ११. 'ब्रह्मांडीं' असें पाठांतर आहे. १२. याच प्रसंगीं मोरोपंतांनीं धर्माच्या तोंडून जें वदविलें आहे तें करुणरसयुक्त आहे:—'वाटे दुःखी मत्सम मीच, वदा, जरि असेल आढळला। न असा अयशःपद कीं भूपदपदकीं जडोनियां ढळला. ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० ३९ गी० ८.] १३. मोहरी. १४. दुःख. सुवर्णमय मेरूकडे पाहिल्याबरोबर त्यापुढें सर्षपाचें माहात्म्य राहत नाहीं; त्याचप्रमाणें पूर्वजांचीं दुःखें लक्षांत आणिल्यास तुमचें दुःख त्यापुढें फिकें पडतें असा बृहदश्र्याचा म्हणण्याचा भाव. १५. 'वाटतें' असा अन्य पाठ आहे. १६. 'वस्तीचें' पाठांतर. १७. न जाणती. तूं ज्या प्रकारचें सुख भोगतोस त्या प्रकारचें स्वर्गांतल्या देवांनाहीं मिळत नाहीं, म्हणजे तूं देवांपेक्षां अधिक सुख भोगतोस—असा सरलार्थ. १८. 'तुंतें दुःखी म्हणती मूर्ख' असाही पाठ आहे. १९. आनंद. २०. बरोबर, सह. २१. स्त्री. सद्गुणी स्त्रीविषयीं एका कवीनें म्हटलें आहे:—'साध्वी शीलवती दयावसुमती दाक्षिण्यलज्जावती तन्वी व्याजपराङ्मुखी स्मितवती मुग्धा प्रियालापिनी । देवब्राह्मणबंधुसज्जनरता यस्यास्ति भार्या गृहे तस्यार्थागमकाममोक्षफलदां कुर्वंति पुण्यप्रियाः. ॥'. दुसरा एक कवि म्हणतो:—'वृक्षमूलेऽपि दयिता यत्र तिष्ठति तद्गृहम् । प्रासादोऽपि तया हीनो ह्यरण्यसदृशः स्मृतः. ॥'. बृहदश्वा धर्माला म्हणतो कीं द्रौपदीसारखी सद्गुणी स्त्री तुझ्याबरोबर असल्यामुळें तूं सर्वप्रकारें सुखी आहेस. २२. स्त्री कितीही सद्गुणी असली तरी ती अबला असल्यामुळें आपल्या सर्वप्रकारच्या इच्छा पुरविण्यास समर्थ नाहीं अशी युधिष्ठिर शंका

अरण्यवासामाजी जाण। नित्य लक्षद्विजभोजन। तूतें दरिद्री म्हणे कोण? । सत्य जाण कुरुवर्या! ॥ १०६ ॥ आत्मचर्चा[1] ग्रंथश्रवण । साधु पुरुषाचें दर्शन, । पवित्र तीर्थोदेकीं[2] स्नान, । जगीं तें धन्य वनवासी. ॥ १०७ ॥ ऐकें नळराजाचे परम कष्ट । ऐकतां होय हृदयस्फोट; । तितुके भोगुनी वरिष्ठ[3] । चळला[4] नाहीं स्वधर्मी.' ॥ १०८ ॥ आतां बृहदश्वा आपण । निरोपील नलोपाख्यान[5] । तेची कथा करावी श्रवण । मुक्तेश्वर कवि वदे. ॥ १०९ ॥

---

काढील म्हणून ऋषि म्हणतो कीं, तुझ्या सेवेला तुझे चौघे बंधूही तत्पर आहेत. अतएव तूं सुखी आहेस ह्यांत संशय नाहीं. २३. एका कवीनें म्हटलें आहे:—'सविप्रपादोदककर्दमानि सवेदशास्त्रध्वनिगर्जितानि । स्वाहास्वधाकारनिरंतराणि स्वानंदतुल्यानि गृहाणि तानि ॥:'

१. आत्मचर्चेसंबंधानें आचार्य जीवास उपदेश करतात:—'का तव कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः । कस्य त्वं वा कुत आयातस्तत्वं चिंतय तदिहं भ्रातः ॥' २. 'तीर्थोदक सेवन' असाही पाठ. ३. 'पुण्यश्लोकनृपावळींत पहिला' असा श्रेष्ठ नळ. ४. 'ढळला' असें पाठांतर. ५. काव्येतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालेल्या मुक्तेश्वरकृत वनपर्वाच्या शेवटीं 'नलोपाख्यान' बद्दल 'हरिश्चंद्राख्यान' असा अन्य पाठ आहे; व सहाव्या अध्यायापासून हरिश्चंद्राख्यानाला प्रारंभ होऊन तें दहाव्या अध्यायांत संपलें आहे. परंतु वरचा अन्य पाठ आम्हांला संमत नाहीं व वर सांगितलेलें हरिश्चंद्राख्यान आम्हीं मुक्तेश्वरकृत वनपर्वांतून अजिबात काढून टाकिलें आहे. याला आमचीं कारणें अशीं आहेत:—(१) मुंबईस गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिलेल्या व कलकत्त्यास प्रतापचंद्र राय, सी. आय्. ई. यांनीं मुद्रित केलेल्या संस्कृत महाभारताचे पुस्तकांत व आम्हीं पाहिलेल्या एकदोन संस्कृत भारताच्या हस्तलिखित पोथींत वनपर्वांत हरिश्चंद्राख्यान आढळत नाहीं. व कोणत्या तरी संस्कृत भारताच्या पोथींत हरिश्चंद्राख्यान आहे असें अद्यापपर्यंत बाहेर आलें नाहीं. शिवाय मुक्तेश्वराचा जवळपास समकालीन म्हटला तरी चालेल अशा एका आंध्र कवीनें जें वनपर्वाचें तेलगूंत भाषांतर केलें आहे त्याच्यांतही हरिश्चंद्राख्यान दिसत नाहीं. यावरून व्यासकृत महाभारताच्या अरण्यपर्वांत हरिश्चंद्राख्यान नाहीं असें घेऊन चालण्यास कांहींएक हरकत दिसत नाहीं. होईल तितकें करून व्यासकृत भारताला धरून चालण्याचा ज्याचा बाणा आहे, त्या मुक्तेश्वर कवीनें मुळांत कांहीं आधार नसतांना येवढें मोठें हरिश्चंद्राख्यान आपल्या वनपर्वांत सामील केलें असें मानितां येत नाहीं. (२) पहिल्या अध्यायाखेरीज कोणत्याही अध्यायाच्या प्रारंभीं गणपती, सरस्वती इत्यादि देवदेवींची स्तुती नसून ती सहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं मात्र आढळते. यावरून मुक्तेश्वरानें स्वतंत्र हरिश्चंद्राख्यान रचिलें होतें असें दिसतें. कांहीं दिवसांनीं मुक्तेश्वराच्या एकाद्या भक्तानें तें आख्यान वनपर्वांत सामील केलें असावें. (३) काव्येतिहाससंग्रहकारांस मुक्तेश्वराच्या वनपर्वाच्या ज्या पोथ्या मिळाल्या त्यांपैकीं एका पोथींत ह-

# अध्याय सहावा.

बृ[1]हदश्वा म्हणे, 'धर्मा ! । ऐकें[2] न[3]ळाचा सत्वमहिमा । ज्याचेनि स्मरणें दुष्ट

---

रिश्चंद्राख्यान नाहीं. आम्हाला एकंदर चार पोथ्या मिळाल्या, त्यांपैकीं फक्त एक पोथींत 'हरिश्चंद्राख्यान' आहे. पण त्याचे अध्यायाचे आंकडे पहिल्यापासून आहेत. म्हणजे त्या पोथींत जरी 'हरिश्चंद्राख्यान' आहे; तरी त्याचा आणि 'वनपर्वा'चा कांहीं संबंध दिसत नाहीं. यासाठीं हें आख्यान निराळें काढून आम्ही तें स्वतंत्र छापणार आहों.

१. प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभीं किंवा एकादें आख्यान आरंभितांना कोणत्या तरी देवाची स्तुति करावी अशी साधारण चाल आहे, परंतु प्रत्येक अध्यायांत ईशस्तुति करूं लागल्यास मागच्या अध्यायाशीं पुढल्या अध्यायाचा संबंध तुटल्यासारखा होईल. निरनिराळ्या कथानकांचा संबंध वाचकांच्या लक्ष्यांत लौकर येणार नाहीं, म्हणून मोठमोठे ग्रंथ लिहितांना पुष्कळ ठिकाणीं ईशस्तुति गाळतात. फक्त ग्रंथारंभीं व ग्रंथाच्या मोठमोठ्या विभागांना प्रारंभ करितांना मात्र ईशस्तुति करतात. मात्र प्रत्येक अध्यायाच्या व आख्यानाच्या प्रारंभीं शुभाक्षर योजितात. संस्कृतांत प्रत्येक अक्षराला अर्थ आहे, व कोणतीं अक्षरें शुभकारक आहेत व कोणतीं अशुभकारक आहेत याबद्दल कांहीं नियम आहेत. या अध्यायाचें पहिलें अक्षर **बृ** हें **ब्** आणि **ऋ** यांच्या संमेलनानें झालें आहे. **ब्** हें व्यंजन भूमिबीजाक्षर होय. भूमिबीजाक्षर प्रारंभीं असणें फार शुभदायक समजतात. शिवाय **ब्** हें 'राजमातृका'नामक अक्षरांच्या स्त्रीवर्गांत मोडतें. 'कविगजांकुशां'त या 'मातृके'ची अशी स्तुती केली आहे:—'रक्तमाल्यांबरधरां रक्तरत्नविभूषिताम् । रक्ताब्जवासिनीं राजमातृकां पूजयाम्यहम् ॥' [आंध्रशब्दचिंतामणींतून घेतलेला उतारा.] **बृ** यांतला **ऋ** हा स्वर जलबीजाक्षर होय. जलबीजाक्षर प्रारंभीं योजिल्यास कवीला व वाचकांना फार आनंद होतो अशी समजूत आहे. शिवाय **ऋ** स्वर 'विप्रमातृका' या वर्गांत मोडतो; व हा वर्ग वागीश्वरी सरस्वती हिचा होय. तेव्हां अध्यायाच्या प्रारंभीं मंगलाचरण जरी नाहीं तरी **बृ** या अक्षरानें मंगलाचरणाची उणीव पूर्णपणें भरून काढिली असें म्हणण्यास हरकत नाहीं. **बृ** या अक्षरापासून इतका अर्थ निघावा याच उद्देशानें कवीनें मुद्दाम या अक्षराची आरंभीं योजना केली असावी कीं सहज त्याच्या हातून अशी शब्दरचना झाली असावी याविषयीं तर्क करण्यास कांहींच साधनें नाहींत. तेव्हां आपल्यापुढें असलेल्या कवीच्या कृतींतून जितका अर्थ निघत असेल तितका काढणें आपलें कर्तव्य होय. २. 'ऐक' असा अन्य पाठ आहे. ३. नळ हा शब्द शुद्ध संस्कृत व्याकरणरीत्या पाहिलें असतां **ल**कारान्त पाहिजे. कारण हा शब्द संस्कृतांतून घेतला आहे. संस्कृतांत **ळ**कार नाहीं. माहेश्वरसूत्रांत **ळ** नाहीं. परंतु ऋग्वेदांत मात्र कधीं कधीं **ळ** पाहण्यांत येतो. परंतु तो '**ळ**' '**ड**'बद्दल होतो. उ० 'अग्निमीळे पुरोहितम्' [ऋक्संहिता—१-१-१] येथें ईळे=ईडे. **ल**काराचा **ळ**कार झाल्याचें संस्कृतांत उदाहरण नाहीं. संस्कृतांतला **ल** मराठींत **ळ** होतो ही चाल मराठींत कशी आली असावी याचा पूर्णपणें शोध लागला नाहीं. **ल** या दंत्यवर्णाचा **ळ** असा मूर्द्धन्यवर्णासारखा उच्चार होतो, तेव्हां दंतविहीन पुरुषांच्या अपशब्दोच्चारणापासून ही

कर्मा- । पासाव[1] सुटती प्राणिये. ॥ १ ॥ पुण्यश्लोकांमाजी[2] पहिला । सत्यशील[3] सत्वार्थिला । उपमे बोलावया बोला । दुजा नाहीं ब्रह्मांडीं. ॥ २ ॥ नैषधदे[4]-

---

चाल निघाली असावी. दंतहीन वृद्धांच्या भाषणांत ळसारखाच पुष्कळ वेळा आवाज येतो हें प्रसिद्धच आहे. पैशाची भाषेंत मराठींतल्याप्रमाणें लचा ळ होतो. याविषयीं सूत्रः— 'लो ळः पैशाच्याम् । लकारस्य ळ स्यात् । मुकुलस्य मुकुळः । गलस्य गळः । प्रलयस्य प्रळयः ॥' [आंध्रशब्दचिंतामणि ग्रंथांत 'वाल्मीकिसूत्र' या नांवाखालीं घेतलेला उतारा.] यावरून ही ळकाराची रीत पैशाचींतून मराठींत आली असावी असा तर्क होतो. तेलगू भाषेंतही संस्कृतांतल्या लकाराचा पुष्कळदां ळकार होतो. मराठींतला ळ व तेलगूंतला ळ या दोहोंचीं रूपें (आकार, आकृति) हीं बहुतेक सारखीं आहेत. तेव्हां या दोन्ही भाषेंतल्या ळकाराची उत्पत्ति एकाच स्थानापासून झाली असावी असें मानण्यास हरकत नाहीं. संस्कृतांतला ल मराठींत ळ होतो म्हणून असा फायदा झाला आहे कीं अमका मराठी शब्द आहे कीं संस्कृत शब्द आहे हें चट ओळखितां येतें; म्हणून लकाराचा ळकार करणें मराठींत चूक धरूं नये. 'नळाची' असाही पाठ आहे. परंतु 'सत्व' आणि 'महिमा' या दोहोंपैकीं एकही शब्द स्त्रीलिंगी नसल्यामुळें हा अपपाठ असावा असें वाटतें. 'महिमा' शब्द आकारांत असल्यामुळें तो स्त्रीलिंगी आहे असा लेखकाला भास झाला असावा. ४. सत्व शब्दाचे अनेक अर्थ आहेत. सत्व म्हणजे अस्तित्व; पुढें सत्वशब्दाचा, अस्तित्वाकरितां लागणारे शुद्ध पदार्थ, असा अर्थ होऊं लागला. पुढें या शब्दाचा अर्थ मनुष्यांत वसणारे स्वाभाविक गुण असा झाला म्हणजे पदार्थद्योतक शब्द गुणद्योतक झाला. पुढें, मनुष्याचे सद्गुण असा या शब्दाचा अर्थ झाला. येथें सत्व शब्द, सद्वर्तन करण्याचा निश्चय व तसें आचरण या अर्थीं योजिला आहे. सत्व म्हणजे ईश्वरभक्ति असाही अर्थ होतो व या अर्थांत हा महाराष्ट्र कवीचा फार आवडता शब्द होय. भक्तांची सत्वपरीक्षा करण्याकरितां ईश्वर पुष्कळवेळां निरनिराळ्या रूपांनीं भूतलावर येतो, अशा अर्थाचीं वर्णनें पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतात.

१. पासून. २. पवित्र आहे श्लोक (कीर्ति) ज्यांचा ते पुण्यश्लोक त्यांच्यांत नळ पहिला होय. पुण्यश्लोकांच्या यादींत नळाचें नांव पहिलें आहे:—'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' रघुनाथपंडितानें म्हटलें आहे:— 'पुण्यश्लोकनृपावळींत पहिला होवोनि जो राहिला तो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला । व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गायिला जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥' [नलदमयंतिस्वयंवराख्यान.] ३. 'सत्वशील' असाही पाठ आहे. ४. ''नैषध' हें देशाचें नांव नसून एका देशांतील लोकांचें किंवा राजाचें नांव आहे. देशाचें नांव निषधदेश; परंतु मुक्तेश्वरानें 'नैषध' शब्द पुष्कळ वेळां निषधदेश याच अर्थीं योजिलेला आहे. 'निषधदेश' कोठें होता, केव्हां उदयास आला, किती दिवसपर्यंत उन्नतावस्थेंत होता, या देशांत कोणकोणते राजे होऊन गेले व हा देश केव्हां व कसा ल-

शींचा नृपवर। वीरसेन नामें राजेश्वर। नळ नामा त्याचा कुमर। जो अव-[१]

यास गेला याविषयीं फारच थोडी माहिती मिळते. नळासारखा पुण्यश्लोकाग्रणी ज्या देशांत होऊन गेला त्या देशाविषयीं इतकी कमी माहिती मिळावी ही शोचनीय गोष्ट होय. या देशाविषयीं अनेक विद्वानांचीं अनेक मतें आहेत; व या मतांपैकीं कोणतें ग्राह्य व कोणतें अग्राह्य हें ठरविणें बरेंच कठिण आहे. कै० प्रिन्सि० वामन शिवराम आपटे यांचें असें म्हणणें आहे कीं वायव्येकडील प्रांतांत गंगेच्या ईशान्येस सांप्रत कुमोन म्हणून जो उपप्रांत आहे तोच पूर्वींचा निषधदेश असावा. अलका ही निषधाची राजधानी व अलकानंदा नामक नदी त्या देशांतून वाहत होती. निषधदेशांतून घरघर नांवाचा नद वाहतो व त्या देशांत भतूर नांवाचें मोठें शहर आहे असें 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश' या ग्रंथाच्या कर्त्यांचें म्हणणें आहे. ही घरघर किंवा घरघरा नदी म्हणजे गंगेला मिळणारी गोग्रा नदी होय असें प्रो० लॉसन साहेबानें आपल्या 'Indian Antiquities' नामक ग्रंथांत सिद्ध केलें आहे. गोग्रा नदी कुमोन प्रांतांतूनच वाहत जाते. तेव्हां 'अर्वाचीन कोश'कारांच्या मतें ही निषधदेश हिंदुस्थान देशाच्या उत्तरेस होता असें ठरतें. मि० ग्यारेट म्हणतात कीं, विदर्भराजाची मुलगी दमयंती ही निषधदेशाचा राजा नळ याची स्त्री होती म्हणून निषध विदर्भाला लागूनच कोठें तरी असला पाहिजे. परंतु आपल्या राज्याजवळच्याच राजांच्या मुलींशीं विवाह करण्याची राजेलोकांत चाल होती असें सिद्ध झाल्याशिवाय मि० ग्यारेट साहेबांचें म्हणणें खरें मानितां येत नाहीं; व अशी चाल असल्याबद्दल कोठेंच प्रमाण नाहीं. उलट दमयंतीच्या स्वयंवराला छप्पन्न देशांहून राजपुत्र आले होते, अशा अर्थाचा ग्रंथांतच उल्लेख आहे. म्हणून निषध विदर्भाजवळच असला पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. कित्येक विद्वानांच्या मतें निषधदेश विंध्यपर्वताजवळ असावा असें ठरतें; व हें मत कांहींसें ग्राह्य आहे असें वाटतें. कारण याला महाभारतांतच कांहीं प्रमाण आहे. तीन दिवसपर्यंत उपोषण करून मायावी पक्ष्यांना धरण्याचा यत्न झाल्यानंतर दमयंतीला जवळचा पर्वत व नदी दाखवून नळ म्हणतोः—'एष विंध्यो महाशैलः पयोष्णी च समुद्रगा' [महाभारत—वनपर्व—अ० ६० श्लो० २२.] पायांनीं चालत जाण्याची नळ व दमयंती यांना मुळींच संवय नसल्यामुळें आणि ते दोघेही बुभुक्षित व दुःखित असल्यामुळें तीन दिवसांत ते राजधानीपासून फार लांब गेले असतील असें नाहीं. तेव्हां विंध्यपर्वत व पयोष्णी नदीही निषध देशांतच किंवा त्या देशाच्या सीमेवर होतीं असें मानण्यास हरकत नाहीं. यावरून निषधदेश विंध्यपर्वताजवळ व पयोष्णी (सांप्रतची नर्मदा किंवा पूर्णा) नदीच्या कांठीं होता असें दिसतें.

१. राजे अष्टदिक्पालकांच्या अंशानें उत्पन्न होतात अशी समजूत आहे. 'अष्टानां लोकपालानां वपुर्धारयते नृपः.' सोम, अग्नि, सूर्य, वायु, इंद्र, कुबेर, वरुण आणि यम या आठ लोकपालांचें वपु (तेजाचा अंश) राजा धारण करितो ॥ (मनुस्मृति—अ० ५ श्लो० ९६). 'रक्षार्थमस्य सर्वस्य राजा तमसृजत्प्रभुः । इंद्रानिलयमार्काणामग्नेश्च वरुणस्य च । चंद्रवित्तेशयो-

तार अग्नीचा. ॥ ३ ॥ सुरमंडळीं [1]सहस्रनयन । ग्रहमंडळीं [2]सहस्रकिरण । पाताळभुवनीं [3]सहस्रवदन । तेंवी तो मान्य [4]भूतळीं. ॥ ४ ॥ [5]अक्षय्य तारुण्य

श्चैव मात्रा निहृत्य शाश्वतीः ॥' [मनुस्मृति—अ० ७ श्लो० ३-४] हें सर्व जगत् अराजक (राजरहित) असतां [बलवंतांपासून निर्बलांस भय प्राप्त होऊन] सर्वत्र हाहाकार झाला, त्याकालीं प्रभूनें (ब्रह्मदेवानें) या सर्व जगताच्या रक्षणाविषयीं राजा उत्पन्न केला आहे, यास्तव त्यानें रक्षण करावें. इंद्र, वायु, सूर्य, अग्नि, वरुण, चंद्र आणि कुबेर यांचें सारभूत अंश घेऊन त्यापासून राजा उत्पन्न केला आहे. [मनुस्मृतिः] नळाच्या ठायीं वरील आठ देवांचे अंश होतेच, परंतु त्यांत अग्नीचा अंश फार होता म्हणून नळ हा अनळाचा (अग्नीचा) अवतार असें म्हटलें आहे. कोणकोणत्या देवांच्या अंशानें राजांत कोणकोणते गुण येतात याविषयीं सांगतांना अग्नीच्या अंशासंबंधानें म्हटलें आहेः—'प्रतापयुक्तस्तेजस्वी नित्यं स्यात् पापकर्मसु । दुष्टसामंतहिंस्रश्च एतदग्नेर्व्रतं स्मृतम् ॥' पापकर्म करणाऱ्यांविषयीं सर्वदा दंड करणारा, प्रतापयुक्त, व तेजस्वी असून दुष्ट मंत्र्यांचा नाश करीत असावें, हें अग्नीचें व्रत म्हटलें आहे. [मनुस्मृति—अ० ९ श्लो० ३१०.]

१. इंद्र. २. सूर्य. ३. शेष. याला सहस्रफणा असल्यामुळें 'सहस्रवदन' असें नांव पडलें. कद्रूपासून कश्यपाला झालेल्या नागांपैकीं हा प्रमुख होय. हा नेहमीं पाताळांत राहतो व पृथ्वीला आपल्या सहस्र शिरांचा आधार देऊन सांभाळतो. याची एक कला क्षीरसमुद्रांत असते व तिच्यावर कलावतारानें विष्णु वास करितो. याला 'अनंत' असेंही नांव आहे. ४. या ओवींत कवीनें शब्दालंकार व अर्थालंकार मोठ्या खुबीनें साधले आहेत. पहिल्या तीनही चरणांत 'सहस्र'शब्द आणून यमक साधलें आहे. 'सहस्रनयन' 'सहस्रकिरण' 'सहस्रवदन' या उपमांनीं कथेचा नायक जो नळ त्याचे अप्रतिम सद्गुण ध्वनित केले ते असेः—इंद्राला सहस्र नेत्र असल्यामुळें सर्व दिशांकडे एकदम पाहून कोठें काय चाललें आहे हें त्याला एकसमयावच्छेदेंकरून जाणतां येत असे. त्याचप्रमाणें आपल्या राज्यांत कोठें कोठें काय काय चाललें आहे हें एकाच वेळीं जाणण्याचें नळांत सामर्थ्य होतें; म्हणजे नळ राज्यकारभार करण्यांत फार कुशळ होता असें पहिल्या उपमेनें सुचविलें. सहस्रकिरणांमुळें सूर्य फार तेजस्वी दिसतो; तद्वत् राजतेजानें नळही फार तेजस्वी दिसत होता, असा दुसऱ्या उपमेचा भाव दिसतो. सहस्रवदनत्वामुळें शेषाचें वाक्प्रावीण्य व्यक्त होतें. व याची नळाला उपमा दिल्यामुळें नळ वाग्मी होता असें व्यक्त होतें. किंवा, सहस्रवदनांनीं शेष ईश्वराची एकसारखी स्तुति करीत असतो अशी समजूत आहे. तेव्हां सहस्रवदनाची उपमा देऊन नळ ईश्वराचा परम भक्त होता असें सुचविलें असेंही मानितां येईल. नळासंबंधानें एका कवीनें म्हटलें आहेः—'लागतसे जो हरिभजनाला.' वरील तीनही उपमांनीं, न्यायानें प्रजापालन करण्याचें नळाचें सामर्थ्य, त्याचें अप्रतिम राजतेज, त्याची अप्रतिम विद्वत्ता व त्याची ईश्वराविषयींची दृढ भक्ति इतके सद्गुण ध्वनित होतात. अशा रीतीनें शब्दचमत्कार करूनही कवीनें थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणला या 'बह्वर्थजनमनोहरस्वल्पाक्षरत्वा'बद्दल मुक्तेश्वराची कोण तारीफ करणार नाहीं ? ५. 'साक्षात् तारुण्यरूप आगळा' असा अन्य पाठ आहे.

रसाळा । कोटीकंदर्पसौंदर्यपुतळा । चतुर्दश विद्या चौसष्ट कळा । विश्रा-मल्या त्या देहीं. ॥ ५ ॥ अशिष्ठ द्रढिष्ठ बळिष्ठ । चक्रवर्तीमाजी श्रेष्ठ । ज्याचे आज्ञेचा अखंडपट । वेष्टुनी मिरवे मेदिनी.॥६॥अक्षहृदय अश्वहृदय । जाणे वीरसेनतनय । जगीं सर्वज्ञतेचा सूर्य । प्रतापकळीं प्रकाशे. ॥ ७ ॥ न्यायें प्रजांचें

१. मदन. २. चौदा विद्या येणेंप्रमाणें:–४ वेद+६ अंगें (छंद, सूत्र, ज्योतिष, निरुक्त, शिक्षा व व्याकरण)+अठरा पुराणें (ब्राह्म, पाद्म, वैष्णव, शैव, लैंग, गारुड, नारदीय, भागवत, आग्नेय, स्कांद, भविष्य, ब्रह्मवैवर्त, मार्कंडेय, वामन, वाराह, मात्स्य, कौर्म, ब्रह्मांड)+न्याय-शास्त्र+पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा+धर्मशास्त्र (गृह्यसूत्रें व मन्वादि स्मृति) १४ विद्या. ३. चौसष्ट कलांचीं नांवें:—१ अभिधान कोश, २ अक्षरमुष्टिकाकथन, ३ आकारज्ञान, ४ आकर्षकक्रीडा, ५ आलेख्य, ६ उत्साहन, ७ उदकघात, ८ उदकवाद्य, ९ इंद्रजाल, १० काव्यसमस्यापूरण, ११ कर्णपत्रभंग, १२ केशमार्जनकौशल, १३ क्रियाविकल्प, १४ कौंचमारणयोग, १५ गंधयुक्ति, १६ गीत, १७ चित्रयोग, १८ चित्रशाकापूपभक्ष्यविकार-क्रिया, १९ छंदोज्ञान, २० छलितयोग, २१ तंदुलकुसुमबलिप्रकार, २२ तर्ककर्म, २३ तक्षण, २४ दशनवसनांगराग, २५ दुर्वेचकयोग, २६ देशभाषाज्ञान, २७ धूतविशेष, २८ धातुवाद, २९ नाटकाख्यायिकादर्शन, ३० नाट्य, ३१ नृत्य, ३२ नेपथ्ययोग, ३३ पट्टिकावेत्रवाणवि-कल्प, ३४ पानकरसरागासवयोजना, ३५ पुष्पवाटिकानिमित्तज्ञान, ३६ पुष्पास्तरण, ३७ पु-स्तकवाचन, ३८ प्रतिमाला, ३९ प्रहेलिकाकूटवाणीज्ञान, ४० बालक्रीडन, ४१ भूषणयोग, ४२ मणिभूमिकाकर्म, ४३ मणिरागज्ञान, ४४ मानसीकाव्यक्रिया, ४५ माल्यग्रथनविकल्प, ४६ मेषकुक्कुटलावकयुद्धविधि, ४७ म्लेंच्छितकाविकल्प, ४८ यंत्रमातृकाधारणमातृकासंवाच्य, ४९ रौप्यरत्नपरीक्षा, ५० वस्त्रगोपन, ५१ वाद्य, ५२ वास्तु, ५३ विशेषकच्छेद्य, ५४ वीणाड-मरुकवाद्य, ५५ वृक्षायुर्वेदयोग, ५६ वैजयिकविद्याज्ञान, ५७ वैतालिकविद्याज्ञान, ५८ वैनायि-कविद्याज्ञान, ५९ शयनरचना, ६० शुकसारिकाप्रलापन, ६१ शेखरापीडयोजना, ६२ सूची-वानकर्म, ६३ सूत्रक्रीडा, ६४ हस्तलाघव. [श्रीवात्स्यायनप्रणीत कामसूत्र—साधारण अधि-करण—अध्याय ३ पृ० ३२-३४.] ४. विश्रांति घेऊं लागल्या, वास करूं लागल्या. ५. 'ता-याच्या' असा अन्य पाठ. ६. 'विष्णुसेवे दृढ' असा अन्य पाठ आहे. ७. 'अक्षय' असें पाठांतर. ८. 'वेढुनी' असाही पाठ आहे. ९. पृथ्वी. १०. फांसे खेळण्याची विद्या शिकणें. ही विद्या शिकणें म्हणजे द्यूतखेलन शिकणेंच होय. हिंदुस्थानांत ही अक्षविद्या फार प्राचीन काळापासून आहे, हें नळ व पांडव यांच्या गोष्टींवरून सिद्ध होतें. पृथ्वींतील अतिप्राचीन ग्रंथ जो ऋग्वेद त्याच्या १० व्या मंडलाच्या ३४व्या सूक्तांत या व्यसनाच्या दुष्परिणामाचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. यावरून ऋग्वेदाच्या कालापासूनच या व्यसनाचा आमच्यावर पगडा बसला होता असें दिसतें. ११. अश्वविद्याकौशल. १२. 'चातुर्य' असाही पाठ आहे. १३. नळ किती न्यायानें राज्य करीत असे याविषयीं म्हटलें आहे:–'पदैश्चतुर्भिः सुकृते स्थिरीकृते कृतेऽमुना के न तपः प्रपेदिरे । भुवं यदेकांघ्रिकनिष्ठया स्पृशन्दधावधर्मोऽपि कृशस्तपस्विताम् ॥' [नै-

पालन[1] । प्रतापें शत्रुकुळाचें दमन[2] । विनयें साधूंचें संरक्षण । शील वर्तनें[3] सर्वदा. ॥ ८ ॥ विदर्भदेशीं[4] राजा भीम । धरुनि संततीचा काम । दमननामा ऋषिसत्तम । आराधिला सद्भावें. ॥९॥ संतोषोनी परमऋषी । वर वोपिला स्त्रीपुरुषीं[5] । एक कन्या लावण्यराशी । पुत्रत्रय[6] प्रसवली[7]. ॥ १० ॥ दमयंती कन्यारत्न । दम दांत आणि दमन[8] । चारी अपत्यें[9] देखोन । विदर्भराजा संतोषे. ॥ ११ ॥ दमयंती[10] समसमान[11] । भुवनत्रयीं आन रत्न[12] । नाहीं नाहीं ऐशी

पद्यकाव्य—सर्ग १ श्लो० ६—निर्णयसागर आवृत्ति पृ० ८.] नलाच्या निःपक्षपातित्वाविषयीं 'नलोदयां'त सांगितलें आहे:—'अपि यो दायादायक्षयप्रदोंहसि सतां सदायादायः । करमादायादायाश्रियोब्धिरधिराजमसिगदायादायः ॥' [सर्ग १ श्लो० ७].

१. 'प्रतिपालन' असाही पाठ आहे. २. नळ शत्रुनाश करण्यांत कुशळ होता याविषयीं म्हटलें आहे:—'यः सेनानावारिप्रकरनदीः शरमयं धुनानावारि । अतरन्नानावारि व्यसनैर्यद्भुवि वनं च नानावारि ॥' [नलोदय—स० १ श्लो० ६.] मोरोपंत म्हणतात:—'तो पुण्यश्लोक रणीं करितां रिपुवीरहानि वासवसा । तत्कीर्ति म्हणे, 'गा! श्री धी हो! या, योग्य हा निवास, वसा. ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—पंतकृत महाभारत—वनपर्व अ० ४ गी० १३.] ३. 'वर्तन' असाही पाठ आहे. ४. विदर्भ म्हणजे सांप्रतचा वऱ्हाडप्रांत होय. हा देश कुंतलदेशाच्या उत्तरेस व कृष्णा व नर्मदा या नद्यांच्या मध्यें होता. याची राजधानी कुंडिनपुर. या राजधानीला विदर्भ असेंही म्हणत असत. ही राजधानी सांप्रतचें वींदर शहर असावें असा कित्येक विद्वानांचा तर्क आहे. ५. 'स्त्रीपुरुषासीं' असें पाठांतर आहे. ६. 'कुमरत्रयें' असा अन्य पाठ आहे. ७. 'प्रसवली' याची कर्त्री 'भीमराजाची स्त्री' गुप्त आहे असें समजावें. ८. या ओंवीवरून दमयंती सर्वांत वयानें मोठी होती व बाकीचे तिघे तिचे धाकटे भाऊ होते असा भ्रम होण्याचा संभव आहे. परंतु वास्तविक अशी गोष्ट नाहीं. दमयंती सर्वांत धाकटी होती. 'ब्रह्मर्षिवरें दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा । झाले तीन सुत, सुता चवथी, गाती गुणौघ संत तिचा ॥ ठेवी दम, दांत, दमन, दमयंती हीं अशीं तयां नांवें ।' [काव्यसंग्रहग्रंथमाला—पंतकृत महाभारत—वनपर्व—अ० ४ गी० १६-१७.] ९. अपत्य=न पतंति पितरोऽनेन इति अपत्यम्. ज्याच्यामुळें पितर पतन पावत नाहींत तें अपत्य. यास्काचार्यांनीं या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारची दिली आहे:—(१) अपत्यं कस्माद् अपततं भवति पितुः सकाशादेत्य पृथगिव ततं भवति (२) अनेन जातेन सता पिता नरके न पततीति वा. १०. दमयंती असें नांव पडण्याचें कारण नैषधांत दिलें आहे:—'भुवनत्रयसुभ्रुवामसौ दमयंती कमनीयतामदम् । उदियाय यतस्तनुश्रिया दमयंतीति ततोऽभिधां दधौ ॥' [सर्ग २ श्लो० १८; निर्णयसागर आवृत्ति पृ० ६९.] अर्थः—ही (वरप्रसादानें प्राप्त झालेली भीमाची कन्या) स्वशरीरसौंदर्यानें त्रैलोक्यसुंदरींचा सौंदर्यगर्व नाहींसा करीत असे). दमयंती=अस्ताला नेणारी, नाहींसें करणारी); म्हणून हिला दमयंती असें नांव पडलें. ११. 'समान' म्हणजे

आण[1] । सरस्वती[2] वाहतसे. ॥ १२ ॥ दमयंतीची अपर[3] प्रतिमा । करूं भा[4]-
वितां कमळजन्मा[5] । निर्मू न शके जितें[6] ब्रह्मा । दुजें[7] रूप न करवे. ॥ १३ ॥
पतिव्रता सुशीळ सुंदरा । दमयंतीतुल्य नरेश्वरा[8] । 'नाहीं नाहीं' या उत्तरा ।
प्रत्युत्तर असेना[9]. ॥ १४ ॥ उपजत भाळीं रत्नमणी । अमृतश्रवा[10] पवित्र वाणी ।

---

बरोबरीची (स्त्री); या 'समान'शब्दाला मागें 'सम' जोडिल्यामुळें वरील अर्थाला आणखी विशेष जोर आला. समसमान=पूर्णपणें बरोबरी करणारी, अगदीं एकसारखी. 'समसमान' म्हणजे पुष्कळ अंशीं बरोबरी करणारी परंतु पूर्णपणें बरोबरी करणारी नव्हे, असाही अर्थ होतो. संस्कृतांत 'ईषदून्य' या अर्थीं 'कल्पप्' प्रत्यय लागून शब्दाचा जो अर्थ होतो तशाच प्रकारचा येथें 'समसमान' शब्दाचा अर्थ जाणावा. पहिल्या अर्थापेक्षां हा दुसराच अर्थ विशेष प्रशस्त दिसतो. कारण दुसरा अर्थ घेतल्यास, दमयंतीची पूर्णपणें बरोबरी करणारी स्त्री सांपडणें तर नाहींच, परंतु तिची जवळपास बरोबरी करणारी स्त्रीही सांपडत नाहीं असें सरस्वती म्हणते असा या ओवींचा अर्थ होतो, व हाच अर्थ खुबीदार आहे. १२. 'अंगनारत्न' असाही पाठ आहे.

१. आण वाहणें=प्रतिज्ञेनें सांगणें, आपण सांगितलेली गोष्ट अक्षरशः खरी आहे अशी ऐकणाऱ्यांची खातरी करण्याकरितां आणा शपथा वाहण्याची चाल आहे हें प्रसिद्धच आहे. २. लक्ष्मी किंवा पार्वती आण वाहतसे असें न सांगतां सरस्वती आण वाहतसे असें सांगण्याचें कारण असें कीं सरस्वती ही ज्ञानाची व विद्येची देवता होय. तेव्हां कशाही संबंधानें निवाडा करावयाचा असला तर सरस्वतीनें दिलेला अभिप्राय इतरांच्या अभिप्रायापेक्षां अधिक महत्वाचा व तस्मात् सत्य होईल हें साहजिक आहे. शिवाय तिच्याच घरीं (ब्रह्मदेवाच्या हातानें) सर्व शरीरें बनत असल्यामुळें कोणतें शरीर अत्यंत सौंदर्यवान् झालें हें इतरांपेक्षां तिला जास्त समजण्याचा संभव आहे. म्हणून परीक्षणाचें काम सरस्वतीकडे दिलें आहे. ३. दुसरी. ४. भाविणें=संकल्प करणें, इच्छिणें, उद्युक्त होणें. ५. कमलापासून झालेला. (ब्रह्मा.) ६. अपरप्रतिमेतें. ७. 'दुसरें स्वरूप' असें पाठांतर आहे. ८. हा शब्द 'नरेश्वर'शब्दाचें संबोधन नव्हे; तर त्याच शब्दाच्या स्त्रीलिंगाचें एक वचन होय. नरेश्वरा=नरांची ईश्वरा=मनुष्यांची मालकीण=राज्य करणारी राणी. दमयंती नरेश्वराची (राजाची) बायको होती येवढ्याचवरून तिला 'नरेश्वरा' असें म्हणतां येत नाहीं. कारण डाक्टराची बायको आहे एवढ्याचवरून एका स्त्रीला डाक्टरीण अशी पदवी कधींही देतां येणार नाहीं. डाक्टरीण किताब मिळवायला परीक्षेंत उत्तीर्ण झालीच पाहिजे. तसेंच अभिषिक्त राज्ञी असल्याशिवाय तिला नरेश्वरा म्हणतां येणार नाहीं. ९. 'असेचिना' असाही पाठ आहे. १०. अमृताप्रमाणें स्रवणारी, अमृततुल्य, अत्यंत माधुर्ययुक्त. 'अमृतश्रवती पवित्र पाणी' असाही पाठ आहे.

[1]नित्य नूतन लक्षणी । जाति [2]पद्मिनी [3]सुमध्या. ॥ १९ ॥ [4]अहल्या [5]द्रौपदी [6]सीता [7]तारा । पांचवी [8]मंदोदरी [9]चतुरा । त्यांचे महिमेचा [10]दांडोरा । भुवनत्रयीं न

---

१. नित्य नूतन लक्षणी=दररोज जिच्यांत नवीन लक्षणें दिसत होतीं अशी, ती ज्याप्रमाणें वृद्धिंगत होऊं लागली त्याप्रमाणें तिच्यांत नवीन सद्गुण दिसूं लागले असा कविहृद्गतार्थ. २. पद्मिनीचें लक्षण **कल्याणमल्ल**कृत ‘**अ**नंगरंगा’त असें दिलें आहे:—‘प्रांतारक्तकुरंगशावनयना पूर्णेंदुतुल्यानना पीनोत्तुंगकुचा शिरीषमृदुला स्वल्पाशना दक्षिणा । फुल्लांभोजसुगंधिकामसलिला लज्जावती मानिनी श्यामा कापि सुवर्णपंकजनिभा देवादिपूजारता ॥ १ ॥ उन्निद्रांबुजकोशतुल्यमदनच्छत्रा मरालस्वना तन्वी हंसवधूगतिः सुललितं वेषं सदा बिभ्रती । मध्यं चापि वलित्रयांकितमसौ शुक्लांबराकांक्षिणी सुग्रीवा शुभनासिकेति गदिता नार्युत्तमा ‘**प**द्मिणी ॥ २ ॥.’ ‘**र**तिमंजरी’कारानें ‘पद्मिनी’चें असें लक्षण दिलें आहे:–‘भवति कमलनेत्रा नासिका क्षुद्ररंध्रा अविरलकुचयुग्मा चारुकेशी कृशांगी । मृदुवचनसुशीला गीतवाद्यानुरक्ता सकलतनुसुवेशा ‘**प**द्मिनी’ पद्मगंधा. ॥.’ ‘**र**तिरहस्यां’त पद्मिनीचें वर्णन असें आहे:–‘कमलमुकुलमृद्वी फुल्लराजीवगंधा सुरतपयसि यस्याः सौरभं दिव्यमंगे । चकितमृगदृगाभे प्रांतरक्ते च नेत्रे स्तनयुगुलमनर्घ्यश्रीफलश्रीविडंबि. ॥ १० ॥ तिलकुसुमसमानां बिभ्रती नासिकां या द्विजगुरुसुरपूजां श्रद्धधाना सदैव । कुवलदलकांतिः कापि चांपेयगौरी विकचकमलकोशाकारकामातपत्रा ॥ ११ ॥ व्रजति मृदुसलीलं राजहंसीव तन्वी, त्रिवलिवलितमध्या हंसवाणी सुवेशा । मृदु शुचि लघु भुंक्ते मानिनी गाढलज्जा धवलकुसुमवासो वल्लभा ‘**पद्मिनी**’ स्यात् ॥ १२ ॥’’ [कुक्कोकक्कृत रतिरहस्य–प्रथम परिच्छेद.] कामशास्त्रकारांनीं स्त्रियांचे पद्मिनी, शंखिनी, हस्तिनी आणि चित्रिणी असे चार प्रकार सांगितले आहेत. ३. चारुकटी, ‘सुमध्यमा’ असा अन्य पाठ आहे. ४. **ब्र**ह्मदेवाच्या मानसकन्यांपैकीं एक. ही **गो**तमऋषीची भार्या. एकदां **इं**द्र रात्र असतांच, प्रातःकाळीं कोंबडे ओरडतात त्याप्रमाणें गोतमाच्या आश्रमाजवळ ओरडला. प्रातःसमय झाला असें समजून गोतम नदीवर स्नानाला गेला. ही संधि साधून **गो**तमरूपानें **इं**द्र आश्रमांत शिरला व त्यानें **अ**हल्येचें धर्षण केलें. हें **गो**तमाला समजलें व त्यानें **इं**द्राला शाप देऊन, ‘तूं शिला होशील’ असा **अ**हल्येला शाप दिला. परंतु तिच्या विनंतीवरून, ‘**दा**शरथी **रा**माच्या पादरजःकणानें तूं पूर्ववत् होशील’ असा तिला उःशाप दिला. त्याचप्रमाणें हिचा **रा**मावतारांत उद्धार झाला. हिनें न कळतां व्यभिचार केल्यामुळें हिच्या पातिव्रत्याचा भंग झाला नाहीं असें समजून हिला पंचकन्येंत आद्यस्थान दिलें आहे. ५. **पां**डवांची स्त्री. मी ही कथा **पां**डवांनाच सांगत आहें हें **बृ**हदश्वा विसरला असें दिसतें. कारण तसें नसतें तर त्यानें **द्रौ**पदीच्या पातिव्रत्याबद्दल पांडवांपुढेंच शंका प्रदर्शित केली नसती. असल्या दोषांनीं काव्याला न्यूनत्व येतें. तरी अशा प्रकारच्या दोषांबद्दल **मु**क्तेश्वरासारख्या मोठ्या कवीला फारसें दूषण देतां येत नाहीं. ६. **दा**शरथी **रा**माची स्त्री व **ज**नकाची कन्या. **रा**वणानें हिला चोरून नेल्यामुळें त्याच्याशीं व रामाशीं तुमुल युद्ध होऊन **रा**वणाचा पराभव झाला व रामानें सीता

समाये. ॥ १६ ॥ पतिव्रता ज्या शिरोमणी । त्यांची विचित्र[1] काहाणी । ते विस्तारें वदोनी वाणी । दोषी[2] करणें कासया? ॥ १७ ॥ रंभा उर्वशी[3] तिलोत्तमा । सौंदर्यसुवर्णरसाच्या प्रतिमा । दमयंतीची पवित्र महिमा । लोकत्रयीं[4] आगळी. ॥ १८ ॥ रति[5] माधवी[6] सुलोचना[7] । उखा[8] कामशास्त्रीं[9] निपुणा ।

---

परत आणिली. ७. या नांवाच्या पुराणांतरीं तीन स्त्रिया प्रख्यात आहेत. (१) बृहस्पतीच्या दोन स्त्रियांतील दुसरी. (२) सुषेण वानराची कन्या व वालीची स्त्री. (३) सूर्यवंशीय हरिश्चंद्रराजाची स्त्री. येथें हरिश्चंद्राची स्त्री तारा किंवा तारामती हीच घेतली पाहिजे. कारण ही फार पतिव्रता असून हिनें नवऱ्याबरोबर अनेक दुःखें भोगिलीं. ८. रावणाची स्त्री. ही रावणाला शंकरापासून मिळाली असें 'शिवलीलामृतां'त सांगितलें आहे. ९. 'सुंदरा' असाही पाठ आहे. १०. प्रसिद्धी, डंका. 'डांगोरा' असाही पाठ आहे.

१. विचित्र कहाणी=चमत्कारिक गोष्टी, यांच्या पातिव्रत्याबद्दल शंका येईल अशा गोष्टी. २. कवीच्या म्हणण्याचा उद्देश असा कीं वर सांगितलेल्या पंचकन्या अत्यंत पतिव्रता होत्या अशी त्यांची जगतांत प्रसिद्धि आहे; परंतु त्यांच्याविषयींच्या इतक्या कथा आहेत कीं त्या ऐकल्या असतां या पंचकन्या खरोखर पतिव्रता नव्हत्या असें वाटूं लागेल. परंतु तसें करून आपली लेखणी विटाळण्याची कवीची इच्छा नाहीं. ३. उर्वशी—नरनारायणमुनींच्या ऊरुसमीपस्थ भागापासून (मांड्यांपासून) उत्पन्न झाली म्हणून या स्ववेंश्येस 'उर्वशी' असें नांव इंद्रानें ठेविलें. हिची कथा पुराणांत वर्णिली आहे तीः—बदरिकाश्रमीं राहून तप करणाऱ्या नरनारायणांचें इंद्रास भय पडलें. तेव्हां त्यांस विघ्न करण्यासाठीं इंद्रानें वसंत, काम आणि देवांगना यांस नित्याप्रमाणें पाठविलें. इंद्राच्या आज्ञेप्रमाणें अप्सरांनीं त्या ऋषींला भुलवून टाकण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु ते काष्ठलोष्ठाप्रमाणें अगदीं निर्विकार होते. ह्याप्रमाणें त्या सर्वांचे प्रयत्न निष्फळ झाले. तेथील स्त्रियांचें लावण्य पाहून काम आणि अप्सरा यांस लाज वाटली. तेव्हां त्यांनीं परत स्वर्गास जाण्याचा बेत केला. हें जाणून नरनारायणांनीं 'इंद्रासाठीं आश्रमांतील स्त्रियांपैकीं एकीस घेऊन जा,' असें सुचविलें. तेव्हां त्यांनीं ऊरुसमीपस्थ स्त्री पाहिजे अशी इच्छा दर्शविली, ती नरनारायणांनीं आपल्या तपःप्रभावानें पूर्ण करून उर्वशीला त्यांजबरोबर पाठविलें. (भागवत—स्कंध ११ अध्याय ४ पहा.) ४. अधिक, त्रिजगतांत मावून कांहीं जास्त. ५. मदनाची स्त्री. ग्रीक लोकांची सौंदर्यदेवता ही मदनाची माता समजतात व तिला व्हीनस म्हणतात. ६. ययाति राजाची कन्या. ययातीनें गालवनामक विश्वामित्रशिष्यास अश्वदानार्थ दिली होती. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—उद्योगपर्व—अध्याय ८ गीति ८०-१०५ पृ० १३९-१४६.] ७. रावणपुत्र इंद्रजित् याची स्त्री. ८. बाणासुराची कन्या. ९. 'कोकशास्त्रीं' असा अन्य पाठ. कामशास्त्रावरील श्रीवात्स्यायनप्रणीत **'कामसूत्र'** हा ग्रंथ आतां छापून प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध करून सर्व शोधकजनांस सुलभ करून देण्याचें श्रेय कै० महामहोपाध्याय पंडित दुर्गाप्रसाद (काव्यमालेचे संपादक) यांस आहे. 'कामसूत्र' हा ग्रंथ शोधकांनीं अवश्य वाचण्यासारखा आहे. या

एक एका अवयवाची तुलना । दमयंतीच्या न पावती. ॥ १९ ॥ गंगा [1]पवित्र पतिव्रता । म्हणोनी शंकरें वाहिली माथां । [2]अभागी मानुनी निजभर्ता । [3]रत्नाकरा अनुसरली. ॥२०॥ शिवें इच्छितां चुंबन । कदां नेदी [4]उपेक्षून । [5]सहस्र [6]ओघें करून वदन । [7]सागरातें [8]सेवितसे. ॥ २१ ॥ म्हणोनी स्त्रियांची [9]प्रकृती । धनिक देखुनी उपजे प्रीती । दरिद्री [10]भ्रतार [11]अव्हेरिती । [12]हेळुनियां सर्वस्वें. ॥२२॥

---

शास्त्राच्या अध्ययनानें तत्त्वज्ञ पुरुष जितेंद्रिय होतो असें वर्णिलें आहे. 'रक्षन् धर्मार्थकामानां स्थितिं स्वां लोकवर्तिनीम् । अस्य शास्त्रस्य तत्त्वज्ञो भवत्येव जितेंद्रियः ॥' [कामसूत्र—पृ० ३७१.]

१. गंगा फार पवित्र आहे व ती पाप्यांना पापापासून मुक्त करिते अशी समजूत आहे:—'जगद्गुरू महेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें, जिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें । प्रजा हरिहरा अशा यदुदरीं अनेकाकवी, भिवोन म्हणतील कां जशि सुधा तशी काकवी ॥' [मोरोपंतकृत केकावलि—केका १०९.] २. 'अभाग्य' असाही पाठ आहे. ३. समुद्रा. ४. दुर्लक्ष करून. ५. 'सहस्रमुखें चुंबन' असाही पाठ आहे. ६. समुद्राला मिळण्यापूर्वी गंगानदीला अनेक फांटे फुटले हें प्रसिद्धच आहे. अशा प्रकारच्या शाखा गंगेलाच आहेत असें नाहीं. बहुतकरून प्रत्येक नदीला मुखाजवळ अशा शाखा फुटतात. याचें कारण असें कीं, मुखाजवळच्या सपाटीवर आल्याबरोबर नदीच्या प्रवाहाचा वेग बराच कमी होतो. कारण तेथील जमीनीचा भाग फार कमी उतरता असतो. यामुळें डोंगरांवरून व उंच प्रदेशांतून वाहत येत असतां नदीबरोबर जी माती व वाळू येते, ती सर्व समुद्रांत न पडतां कांहीं तिच्या पात्रांतच राहते; व अशा रीतीनें नदीची खोली कमी होत जाते. आणि शेवटीं आजूबाजूंचा प्रदेश आणि नदीपात्र हीं बहुतेक एकाच सपाटीवर येतात. असें झालें म्हणजे नदी एकाच पात्रांतून न वाहतां चोहोंकडे तिच्या अनेक शाखा फांकतात. या स्वाभाविक नियमाला अनुसरूनच गंगा सहस्रमुखांनीं सागराला चुंबन देते. ७. समुद्राला. येथें सागर म्हणजे बंगालचा उपसागर जाणावा. शिवाला सोडून गंगा सागराकडे चालली असतां तिला काशीक्षेत्रीं शंकर आडवा आला या अर्थाचा एका आधुनिक कवीचा एक श्लोक आहे:—'गंगा सोडुनि आपणास पळते भेटावया सागरा ऐसें पाहुनि शंभु तो मग निघे, क्रोधें करोनी त्वरा । श्रीविश्वेश्वर होइं, गांठि तिजला काशीपुरीं शीघ्र तो जाई आड तिला म्हणे, 'पळसि तूं आतां कुठें पाहतों. ॥' ८. 'चुंबितसे' असाही पाठ आहे. ९. स्वभाव, स्वाभाविक मनाचा कल. १०. 'भर्ता' असाही पाठ आहे. ११. 'हेळसूनी अव्हेरिती' असें पाठांतर आहे. १२. हेळणा करून, तिरस्कारून. कवीचें म्हणणें असें कीं स्त्रीजात तेवढी पाजी. श्रीमंत पुरुषांवर त्यांची प्रीति जडावयाची. आपल्या नवऱ्यावर आपली प्रीति आहे असें त्या बाहेरून मात्र दाखवितील, परंतु आंतून त्यांची नजर धनिकांवरच. एकादी चांगली स्त्री निघालीच तर ती या नियमाला अपवाद होय असें समजावें. स्त्रियांविषयीं म्हटलें आहे:—'गोड शब्द वदनें वदतील प्रेमपूर्ण नयनें हसतील । चिंतितील हृदयीं भलत्यातें स्त्रीचरित्र न कळे कवणातें! ॥' [मोहविलसित नाटक—अंक १]. अशा रीतीनें स्त्रिया अविवेकी, कपटी, साहसी व मायावी अ-

पार्वती पर्वताची कुमारी। असुर संहारिले समरीं। सुकुमारता तियेमाझारी। तिलप्राय असेना. ॥२३॥ वामन देखोनी बळीच्या द्वारीं। लक्ष्मी निघाली असुरांचे घरीं। चंचलपण अद्यापवरी। स्थिर कोठें न राहे. ॥ २४ ॥ पित्यानें अभिलाषिली कन्या। ते सरस्वती विश्वमान्या। निर्दोष सर्वगुणी धन्या। हे वैदर्भी निर्धारें. ॥ २५ ॥ म्हणोनि दमयंतीसमान। भुवनत्रयीं नाहीं अं-

---

सतात असा भयंकर आरोप पुष्कळ ग्रंथकारांनीं स्त्रियांवर केला. हा आरोप, स्त्रियांवर, योग्य रीतीनें लादला गेला किंवा नाहीं याविषयीं पुष्कळ वादविवाद झाले आहेत व हा आरोप अतिशयोक्तीनें भरला आहे असें कित्येक आधुनिक कवींचें मत आहे, व आमचेंही तसेंच मत आहे.

१. पर्वतस्य अपत्यं स्त्री पार्वती=पर्वताची मुलगी पार्वती. २. हिमवान् पर्वताची. दक्षयज्ञांत सतीनें देहत्याग केल्यावर ती पार्वती या नांवानें हिमालय पर्वताच्या उदरीं जन्मली. येथें पर्वताची कन्या पार्वती असें सांगण्याचें कारण हें कीं, ती पर्वतापासून उत्पन्न झाल्यामुळें तिचें शरीरही पर्वताप्रमाणें कठिण होतें—दमयंतीच्या शरीराप्रमाणें कोमल नव्हतें—हें वाचकांच्या लक्षांत यावें. ३. महिषासुर व त्याचे अनुयायी यांना, अष्टादश भुजांनीं युक्त पार्वती हिनें मारिलें. तेव्हांपासून हिला 'महिषासुरमर्दिनी' असें प्रख्यात नांव पडलें. कवीनें पार्वतीनें असुर मारिले असें येथें मुद्दाम सांगितलें याचें कारण असें दिसतें कीं जी असुरांबरोबर युद्ध करीत होती ती ओबडधोबड शरीराची असली पाहिजे, तिच्या देहांत सकुमारता असण्याचा संभव नाहीं अशी वाचकांची समजूत व्हावी. परंतु युद्ध करितांनाही ती फार सुंदर दिसत होती हें कवीच्या लक्षांत नव्हतें असें दिसतें. युद्धांत ती इतकी सुंदर दिसत होती कीं, तिच्या रूपानें महिषासुर देखील मोहित झाला व 'मला मोहित हो' इ० भाषण करूं लागला! तेव्हां 'सुकुमारता तिये माझारी तिलप्राय असेना' असें कसें म्हणतां येईल? परंतु आपली नायिका सर्व स्त्रियांपेक्षां श्रेष्ठ आहे असें दाखविण्याचा कवींचा धर्मच होऊन गेल्यामुळें याबद्दल आमच्या कवीला विशेष दूषण देतां येणार नाहीं. ४. विष्णूचा पांचवा अवतार. ५. लक्ष्मी असुरांचे घरीं गेली याचें कारण भिक्षा मागणारा वामन तिला आवडला नाहीं. व 'धनिक देखुनी उपजे प्रीती' या न्यायानें वामनाला दान देणारे अर्थात् वामनापेक्षा अधिक श्रीमंत जे असुर ते तिला आवडावे हें साहजिक आहे. ६. 'उपभोगिली' असाही पाठ आहे. एकदां हरिणीरूपानें असलेल्या सरस्वतीला पाहून ब्रह्मा मोहित झाला व मृगरूपानें तिच्या मागें लागला. तेव्हां शंकरानें मृगरूपी ब्रह्मयाला बाणानें मारिलें हें पुढील श्लोकावरून दिसून येईल:—'प्रजानाथंनाथ प्रसभमभिकं स्वां दुहितरं गतं रोहिद्भूतां रिरयिषुमृष्यस्य वपुषा। धनुष्पाणेर्यातं दिवमपि सपत्रीकृतममुं त्रसंतं तेऽद्यापि त्यजति न मृगव्याधरभसः॥' [महिम्नस्तोत्र—श्लोक २२] याचें भाषांतर:—'प्रजानाथें कन्या विषयसुखबुद्धी निरखितां, तदा रोही झाली म्हणुनि मृगमायेसि धरितां। धनुर्हस्ता तूतें निरखुनि भयें देवभुवनीं, पळाला अद्यापि त्रसित मृगव्याधासि अवनीं॥.' [किंकरकविकृत—महिम्नस्तोत्रसमश्लोकी.] ७. 'पवित्र नाहीं' असाही पाठ आहे.

गना आन । '[1]नव्हे' म्हणावया वदन । कोणाचें ही सरेना. ॥ २६ ॥ अनेक भूपाळांच्या कुमरी । नळें परिशिल्या [2]श्रवणद्वारीं । [3]सत्कीर्ति वरिजे सदाचारी । तेंवी दमयंती मानिली. ॥ २७ ॥ [4]नवांमाजी तृतीय भक्ती । [5]आवडी स्वीकारिजे महतीं । तेंवी नळाचे [6]हृदयभिंती । चित्ररूपा [7]वैदर्भी. ॥ २८ ॥ परिमळांमाजी कस्तुरिका । पुष्पांमाजी नवमल्लिका । तेंवी दमयंती नरनायका । आवडली [8]हृदयपद्मीं. ॥ २९ ॥ [9]बहुसाल राजयांचे कुमर । दमयंतीनें परिशिले [10]सांचार । [11]सुर सांडूनियां श्रीशंकर । जेंवी [12]गौरीनें वरियेला. ॥ ३० ॥

---

१. खोटें. दमयंतीसमान अंगना भुवनत्रयीं नाहीं हें म्हणणें खोटें आहे असें म्हणण्यास कोणीही धजत नाहीं—असा सरलार्थ. २. 'कर्णद्वारीं' असाही पाठ आहे. ३. (जेंवी) सदाचारी सत्कीर्ति वरिजे तेंवी (नळें) दमयंती मानिली—असा अन्वय. अर्थ:—ज्याप्रमाणें सद्वर्तनशील गृहस्थाला कीर्तिच प्राप्त होते—अपकीर्ति प्राप्त होत नाहीं—त्याप्रमाणें नळासारख्या पुरुषानें दमयंतीसारख्या स्त्रीरत्नालाच पसंत केलें—दुसऱ्या अयोग्य स्त्रीला वरिलें नाहीं; तेव्हां हें फार योग्य जोडपें झालें—असा भाव. येथें दमयंतीला जी कीर्तीची उपमा दिली आहे ती फार खुबीदार आहे. ४. या नवविधा भक्ति येणेंप्रमाणें:—'तेव्हां प्रऱ्हाद म्हणे श्रीहरिचें (१) श्रवण, (२) कीर्तन, (३) स्मरण, (४) स्वार्पण, (५) सख्य, (६) समर्चन, (७) पदसेवन, (८) दासता, (९) नमस्करण. ॥५०॥ [मोरोपंत—मंत्रभागवत—स्कंध ७ गीति ५०.] कोणकोणत्या भक्तीनें कोणकोण तरले याविषयीं तुकोबानें म्हटलें आहे:—'परिक्षितीराया श्रवणीं आसक्ती । तेणें त्यासि मुक्ति दिधली देवें ॥ १ ॥ कीर्तनाचे रंगीं रंगला नारद । त्रिभुवनीं वंद्य झाला तेणें ॥ २ ॥ नारायण नामें प्रऱ्हाद प्रसिद्ध । हांकेसी गोविंद उभा सदा ॥ ३ ॥ पादसेवन करी रमा सदोदित । तयासि अनंत हृदयीं वाहो ॥ ४ ॥ अंबऋषी करी अर्चन देवाचें । न धरि भावाचें भय कांहीं ॥ ५ ॥ वंदनाची भक्ती अक्रूरा लाधली । विश्वरूप दिधली भेट तया ॥ ६ ॥ दास्यत्व मारुती प्रसिद्ध या लोकीं । रामनाम मुखीं गर्जे सदा ॥ ७ ॥ सख्यत्व तें जाण अर्जुना कारणें । गीता नारायणें उपदेशिली ॥ ८ ॥ बळीरायें केला देह समर्पण । तयाचें वामन द्वार राखी. ॥ ९ ॥' ५. 'आदरें अंगीकारिजे' असाही पाठ आहे. ६. भिंतीवर चित्र काढण्याची चाल हिंदुस्थानांत फार प्राचीनकाळापासून प्रचारांत आहे. ७. 'विदर्भी' असें पाठांतर आहे. ८. 'हृत्पद्मीं' असाही पाठ आहे. ९. पुष्कळ. १०. 'चतुर' असा अन्य पाठ आहे. ११. हिमालयाच्या मनांतून पार्वती शंकराला द्यावयाची नव्हती. शंकराशिवाय करून इतर कोणत्या तरी देवाला द्यावयाची होती. परंतु शंकराशिवाय इतरांना वरावयाचें नाहीं असा पार्वतीचा कृतनिश्चय झाल्यामुळें हिमालयाला आपली इच्छा सोडून द्यावी लागली—या कथानकाकडे येथें कविकटाक्ष आहे. १२. अगोदर पार्वती श्यामवर्णाची होती. एकदां महादेवानें थट्टेनें तिला 'काली' असें म्हटलें. याबद्दल तिला वाईट वाटलें व तिनें तपें करून गौरवर्ण प्राप्त करून घेतला. तेव्हांपासून पार्वतीला 'गौरी' असें नांव पडलें.

तेंवी दमयंती नागपद्मिनी[1] । भूपवृक्षांतें अव्हेरुनी । नैषधराजहरिचंदनीं[2] । वेंटाळिली मानसें. ॥ ३१ ॥ यावरी राजा नळनृपती । पातला शृंगारवनाप्रती । तंव राजहंसांचिया पंक्ती । मनोहरा देखियेल्या. ॥ ३२ ॥ चंद्रकिरणीं धवळिलीं[3] आंगें । आरक्त चरणनयनयुगें[4] । पक्ष झळकती सुवर्णरंगें । मुक्ताफळें[5] आननीं. ॥ ३३ ॥ त्यांमाजी एक धरिला[6] यत्नें[7] । तो[8] म्हणे, 'राजया! वांचवीं प्राणें । माझेनी हस्तें[9] कार्य घेणें[10] । जें कां अटक[11] सुरनरां[12].' ॥ ३४ ॥ राजा म्हणे, 'मी नरेश्वरू, । तूं पक्षी अरण्यचरू । माझें कार्य तुझेनी थोरू । केंवी करवे सांग पां[13]'. ॥३५॥ हंस म्हणे, 'ऐक राया!। दमयंती तुज[14] जाया । होय

---

१. उत्तम नागीण. २. स्वर्गांतल्या पांच वृक्षांपैकीं एक. 'पंचैते देवतरवो मंदारः पारिजातकः । संतानः कल्पवृक्षश्च पुंसि वा हरिचंदनम् ॥' [अमरकोश.] चंदनाच्या झाडाभोंवतीं प्रचंड नाग वेष्टून राहतात हें प्रसिद्ध आहे. यालाच 'गोशीर्ष' असें म्हणतात. [**हरिचंदनः**–(इंद्रस्य विष्णोर्वा प्रियं चंदनं) 'घृष्टं च तुलसीकाष्ठं कर्पूरागुरुयोगतः । अथवा केशरैर्योज्यं **हरिचंदन**मुच्यते॥' (पद्मपुराण). '**हरिचंदन**मस्त्री स्यात्त्रिदशानां महीरुहे । नपुंसकं तु गोशीर्षे ज्योत्स्नाकुंकुमयोरपि ॥' इति मेदिनी. 'हरि कपिलं तद्वर्णत्वात् । हरेरिंद्रस्य वा चंदनं **हरिचंदनम्**' इति रायमुकुट्याम् । स्तुतिकुसुमांजलि–स्तोत्र ८ पृष्ठ ९५ श्लो० ४ टीका.] ३. धवळ झालीं, पांढरीं झालीं. राजहंस शुभ्रवर्णाचे असतात. ४. चरणनयनयुगें=पायांची जोडी व डोळ्यांची जोडी. म्हणजे राजहंसांचें सर्व शरीर शुभ्र होतें; फक्त दोन चरण व दोन डोळे मात्र आरक्त होते. ५. मोतीं. ६. या प्रसंगाचें रघुनाथपंडितानें फार चांगल्या रीतीनें वर्णन केलें आहे:—'टाकी उपानहपदें अतिमंद ठेवी, केली विजार वरि डौरहि मौन सेवी । हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं, भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥.' [नलोपाख्यान–श्लो० ४२.] नैषधांतही असेंच वर्णन आहे:–'विधाय मूर्तिं कपटेन वामनीं स्वयंवलिध्वंसिविडंबिनीमयम् । उपेतपार्श्वश्चरणेन मौनिना नृपः पतंगं समधत्त पाणिना ॥.' [सर्ग १ श्लो० १२४.] निर्णयसागर आवृत्ति (नैषधीयचरित) पृ० ५५.] थोडक्यांत कथानक आटपण्याची मुक्तेश्वराला फार हौस असल्यामुळें, या ठिकाणीं केल्याप्रमाणें पुष्कळ मजकूर दोनचार शब्दांत आणावा लागतो. ७. 'येणें' असाही पाठ आहे. ८. नळानें धरलेला राजहंस. ९. 'हातें' असाही पाठ आहे. १०. माझ्या हातून काम करून व्यावयाचें असेल तर– असा अर्थ. ११. अटक=प्रतिबंध. या मूळ अर्थावरून पुढें अटक म्हणजे ज्या कार्यांत फार विघ्नें येतात तें कार्य, असें झालें. येथें हाच अर्थ लागू पडतो. 'जें कां अटक सुरनरां'=ज्या कार्यांत सुरनरांना फार विघ्नें येतील तें कार्य; जें कार्य मनुष्यांना व देवांनाही करितां यावयाचें नाहीं तें. १२. 'सुरवरां' असा अन्य पाठ. १३. राजाच्या या म्हणण्याला उत्तरादाखल म्हणून रघुनाथानें हंसाकडून म्हणविलें आहे:–'हें पांखरूं मजसि येइल काय कामा, ऐसें नृपा न वद पूरितलोककामा । मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं, छाया करी, तपनदीप्तिसही निवारी! ॥ [नलोपाख्यान–श्लो० ६३.] १४. 'तुतें' असाही पाठ आहे.

एशिया उपाया । मी करीन निर्धारें.' ॥ ३६ ॥ वचनें तोषला नरेश । कृपेनें सोडिला राजहंस । म्हणे, 'बोलिला बोल उत्तम पुरुष । चळों सहसा नेदिती.'[1] ॥ ३७ ॥ मराळ[2] मुक्त करितां हातीं[3] । गेला विदर्भदेशाप्रती । लावण्यसरोवर[4] दमयंती । समीप आला कौतुकें. ॥ ३८ ॥ वैदर्भी, 'म्हणे गा! मराळा! । क्षीर नीर निवडीशी[5][6] कुशळा[7]! । राजकुमर[8] मेदिनीपाळ[9] । कोण कोण देखिले?' ॥ ३९ ॥ हंस म्हणे, 'चातुर्यखाणी! । कासया तारागण[10] गगनीं । एकचि[11] चंद्र पूर्णनयनीं । विलोकावा निवाडें. ॥ ४० ॥ यत्नें साधिजे एक परिस[12] । व्यर्थ पाषाणीं वाउगा सोस । वाचेनें वंदावा[13] व्योमकेश[14] । लोकवर्णन[15] कासया? ॥ ४१ ॥ अवलोकितां पृथ्वीतळ । गुणीं अपुरे सर्व नृपाळ । गुणसंपन्न राजा नळ । श्रीकृष्णरामासारिखा[16]. ॥ ४२ ॥ करितां पार्थिवांची गणना । एकही न[17] मने माझिया मना । आइक[18] नळाच्या सद्गुणा । समान कोणी न देखों. ॥ ४३ ॥ नो[19] तरी स्त्रियांमाजी[20] स्त्रीरत्न । नरवैडूर्य[21] नळनिधान । उभययोग घडे तें धन्य । पुण्य प्रारब्ध दोहींचें[22]. ॥ ४४ ॥

---

१. हे शेवटले दोन चरण सुभाषितरूप आहेत. अशाच अर्थाचें एका कवीचें म्हणणें आहे:—'उदयति यदि भानुः पश्चिमे दिग्विभागे प्रचलति यदि मेरुः शीततां याति वन्हिः । विकसति यदि पद्मं पर्वताग्रे शिलायां न भवति पुनरुक्तं भाषितं सज्जनानाम् ॥.' २. हंस. ३. हातांतून. ४. राजहंसांची आवडती जागा म्हटली म्हणजे मानससरोवर. परंतु आतां राजहंस सरोवराकडे न जातां दमयंतीकडे गेला; म्हणून दमयंतीला सरोवर म्हटलें आहे. ५. 'क्षीर नीर निवडिशी' असें म्हणून मला कोणता राजपुत्र योग्य वर होणार नाहीं व कोणता होईल हें तूं पूर्णपणें जाणतोस असें दमयंतीनें हंसास सुचविलें. ६. 'विवेककुशळा' असें पाठांतर. ७. 'तूं हिंडशी महीतळा' असाही पाठ आहे. ८. राज्यावर न बसलेले राजपुत्र. ९. राज्य करीत असलेले राजे. १०. 'तारा गणाव्या गगनीं' असा दुसरा पाठ आहे. ११. एका कवीनें म्हटलें आहे:—'एकश्चंद्रस्तमो हंति न च तारागणोऽपि च.' १२. लोखंडाचें सुवर्ण करणारा एक कल्पित पाषाण. १३. 'वर्णावा' असाही पाठ आहे. १४. शिव. १५. अनुरूपोक्ति—हरिविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अळंकारी मिरवत ॥ १ ॥ देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांड रंजवण सभेसि गा! ॥ २ ॥ आचार करणें देवाविण जो गा! । सर्पाचिया अंगीं मृदुपण ॥ ३ ॥ तुका म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं. ॥ ४ ॥' [तुकारामाची गाथा.] १६. 'राया' असाही पाठ आहे. १७. 'न ये' असाही पाठ आहे. १८. 'एक नळाच्या' असें पाठांतर आहे. १९. 'स्त्रियांमाजी तूं स्त्रीरत्न' असा अन्य पाठ. २०. मोरोपंताची अशाच अर्थाची एक गीति आहे:—'नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न, उदंड आडनांवाचीं; । न बुडविति न वा तारिति चित्रें बरवींहि आडनांवाचीं. ॥' [मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—अ० ४ गी० ३५.] २१. रत्नविशेष. २२. 'पाहिजे' असाही पाठ आहे.

एक[1] एकाच्या पडीपाडा[2] । समसमान जोडे जोडा । तैं भवानी[3] चंद्रचूडा[4] । योग्य उपमा त्रैलोक्यीं.' ॥ ४५ ॥ अर्पुनी मुक्ताफळांचे घोंसे[5] । वैदर्भीनें बोळविला राजहंस[6] । म्हणे, 'नैषध जोडे पुरुष । ऐसें करीं अंडजा[7]! ॥ ४६ ॥ परिसोनी नळाचें लावण्य । दमयंतीस लागलें ध्यान । ध्यानामाजी पंचबाण[8] । विरहानळ माजला.[9] ॥ ४७ ॥ त्यागिला क्षुधेतृषेचा संग । हृदयमर्मीं उदेला रोग । औषध[10] नैषधसंयोग । आन परिहार[11] असेना. ॥ ४८ ॥ कंदर्पसर्पाच्या[12] दर्शनें[13] । दमयंती अजा[14] तटस्थ[15] मौनें[16] । निद्रा[17] पळाली म्हणोन । नयनपातीं[18] लवूं[19] विसरली. ॥ ४९ ॥ अंतरीं पेटला हुताशन[20] । म्हणोन श्वासो-

१. 'एकमेकांच्या' असाही पाठ आहे. २. पडीपाडा=सारखेपणा, रूपगुणसादृश्य. हा शब्द याच अर्थीं तुकारामानें पुष्कळ ठिकाणीं योजिला आहे. ३. पार्वती. ४. शंकराला. ५. माला, मोत्यांची माळ. (राजहंस मोतीं खातात अशी समजूत आहे.) ६. 'विदर्भी बोळावी राजहंस' असें पाठांतर आहे. ७. हे हंसा! ८. मदन. याचे पंचबाणः—अरविंदमशोकं च शिरीषं चूतमुत्पलम् । पंचैतानि प्रकीर्त्यंते पंचबाणस्य सायकाः ॥' ९. 'चित्तकुरंग विंधिला' असाही पाठ आहे. १०. 'औषध एक नैषधसंग' असें पाठांतर. ११. उपशमन करण्याची युक्ति. १२. मदनरूपी सर्प, मदन हाच कोणी सर्प. १३. 'व्याघ्राच्या दर्शनें' असाही पाठ आहे व हाच पाठ विशेष प्रशस्त दिसतो, कारण पुढें दमयंतीला शेळीची उपमा दिली आहे; तेव्हां मदनाला व्याघ्राची उपमा दिल्यास उपमेला विशेष शोभा येईल. १४. 'रसना' असाही पाठ आहे. १५. शेळी. १६. 'तटस्थ' शब्दाचा मूळचा अर्थ तटावर (समुद्राच्या, सरोवराच्या किंवा नदीच्या कांठावर) उभा असलेला, असा आहे. पुढें त्या शब्दाचा, पाण्यांत कोणी मनुष्य बुडत आहे असें पाहून त्याला वांचविण्याची कांहींएक युक्ति न सुचल्यामुळें गोंधळून तटावर स्वस्थ पाहत उभा राहिलेला मनुष्य, असा झाला. शेवटीं, कांहींएक न सुचल्यामुळें स्वस्थ—उदासीन—बसलेला मनुष्य असा या शब्दाचा अर्थ झाला. येथें याच अर्थीं हा शब्द योजिला आहे. या शब्दाचा इतिहास भाषाशास्त्रज्ञांनीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. १७. अशाच अर्थानें एक विरहिणी म्हणतेः—'नंदनवनपवन तनुस ताप देतसे । कुसुमशयनिं झोंप मला येत मुळिं नसे ॥.' विरहिणी स्त्रीला झोंप येत नाहीं याचें कारण तिच्या मनांत तिच्या पतीविषयीं नेहमीं विचार घोळत असतात. अस्वस्थ मनुष्याला झोंप लागत नाहीं हा साधारण अनुभवच आहे. १८. डोळ्यांच्या पापणी. 'नयन—पाती' हा समास कदाचित् व्याकरणाला संमत होणार नाहीं. कारण या समासापैकीं पहिला शब्द संस्कृत आहे व दुसरा शुद्ध मराठी शब्द आहे; परंतु कवि निरंकुश असल्यामुळें व्याकरणनियमाकडे लक्ष न दिल्याबद्दल कवीला दोष लावतां येणार नाहीं. १९. 'ढळों' असा दुसरा पाठ आहे. २०. अग्नि. मदन अग्नि होऊन विरहिणीला जाळतो अशा अर्थाचीं वर्णनें पुष्कळ आहेतः—'हृदयमाश्रयसे यदि मामकं ज्वलयसीत्थमनंग तदेति कम् । स्वयमपि क्षणदग्धनिजेंधनः क भवितासि हताश हुताशवत्? ॥.'

च्छ्वास उष्ण । अश्रुधारा उभय नयन । [1]शांतविती सिंचनें. ॥ ९० ॥ [2]चंडांशु तैसें चंद्रकिरण । [3]वज्रधारा [4]मलयपवन । [5]सूचिकाअग्रें तैसे तीक्ष्ण । चंपक-[6]जातीबकुळादि. ॥ ९१ ॥ [7]कर्पूरकदलीचंदनलेपु । [8]स्फुलिंगप्राय [9]लागती [10]वपु । प्राणभार जाला सर्पु । हार वाटे कंठींचा. ॥ ९२ ॥ बाळा प्रौढा [11]विचक्षणा । विरहज्वराची [12]स्वैर भावना । जाणोनी वैद्य निपुण । यत्न करिती साक्षेपें. ॥ ९३ ॥ [13]निपजलीं नसतां मुक्ताफळें । [14]उकलुनियां [15]शुक्तिदळें । तया माजिल्या शीतळ

---

१. 'अंतरीं' पेटलेला 'हुताशन' विझविण्याकरितां डोळ्यांतून पाण्याची धारच वाहत आहे कीं काय अशी कवी उत्प्रेक्षा करितो. येथें 'उत्प्रेक्षालंकार' जाणावा. तल्लक्षणः—'अत्यंतसादृश्यादसतोऽपि धर्मस्य कल्पनमुत्प्रेक्षा' [काव्यानुशासने वाग्भटः—पृ० ३४ काव्यमाला—४३.] अग्नि शांतविण्याचा पाण्याचा जो धर्म तो अश्रुधारांना लागू पडतो असें वाटतें; परंतु तो धर्म अश्रुधारांना लावतां यावयाचा नाहीं असें असून तो त्यांच्या ठायीं लागू केला म्हणून हा उत्प्रेक्षालंकार. या अलंकाराचें वरील लक्षण दिल्यानंतर काव्यानुशासनकार म्हणतात:—'तां (उत्प्रेक्षां) चेवमन्येशंकेध्रुवमित्यादिभिर्द्योतयेत् ।' या नियमाला अनुसरून मराठींत, हा अलंकार पूर्ण होण्याला, 'जणों' 'जणों काय' 'कीं' 'वाटे' इत्यादि शब्दांपैकीं एक तरी वाक्यांत पाहिजे. परंतु 'अश्रुधारा ···शांतविती सिंचनें' या आपल्या वाक्यांत वरील शब्दांपैकीं एकही शब्द नाहीं. तेव्हां हा उत्प्रेक्षालंकार नव्हे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु साहित्यदर्पणकारानें 'उत्प्रेक्षे'चे दोन भेद केले आहेत. त्यांचीं लक्षणें:—'वाच्ये वादिप्रयोगे स्यादप्रयोगे परा पुनः ।' या नियमाप्रमाणें सांप्रतचा 'प्रतीयमानउत्प्रेक्षालंकार' झाला. २. सूर्य. ३. इंद्रायुधप्रहार. पर्वत देखील वज्रप्रहार साहूं शकले नाहींत तेव्हां ते फार असह्य होत हें उघड आहे. ४. 'मलय' नांवाचे हिंदुस्थानांत दोन पर्वत आहेत. एक नीलमलय,. दुसरा सुगंधमलय. याला फक्त मलयही म्हणतात. कर्नाटक प्रांतांत उत्तरदक्षिणपर्वताची जी ओळ आहे तिच्या कांहीं भागाला नीलमलय असें नांव आहे. या पर्वताचे उत्तर अक्षांश १५° १६° असून, पूर्वरेखांश सुमारें ८०° आहेत असें प्रो० लॅसन यांचें म्हणणें आहे. या पर्वतावर नीळ पिकण्याचा विशेष प्रकार आहे म्हणून याला नीलमलय असें नांव पडलें. दुसरा मलय सप्तकुलपर्वतांपैकीं एक आहे. ते सप्त पर्वत येणें प्रमाणें:—महेंद्र, मलय, सह्याद्रि, भक्तिमान्, ऋक्षवान्, मेरू, विंध्य. हा पर्वत पश्चिमघाटांवर मलयदेशांत आहे. या पर्वतावर चंदनवृक्ष फार आहेत, व यामुळें या पर्वतावरून वाहणारा वारा फार सुगंधिक असतो. यामुळें 'मलयपवन' हा शब्द अत्यंत सुगंधिक वायूचा द्योतक झाला आहे. इंद्राच्या नंदनवनालाही 'मलय' असें नांव आहे. सांप्रतस्थळीं हाच मलय घेतला पाहिजे. कारण पहिला मलय सुगंधाविषयीं प्रख्यात नाहीं. ५. सुईच्या टोकाप्रमाणें. ६. जाई. ७. 'कस्तूरी' असाही पाठ आहे. ८. ठिणग्यांप्रमाणें. ९. 'मानीवपु' असें पाठांतर आहे. १०. शरीराला. ११. कुशल. १२. 'ज्वर भावना' असाही पाठ आहे. १३. निपजलीं नसतां=पूर्णपणें तयार होण्यापूर्वींच. १४. 'कवळूनि शूक्तिकावळें' असाही पाठ आहे. १५. शिंपा (समुद्रांतल्या).

जळें । हस्तपाद मर्दिती. ॥ ५४ ॥ कर्पूरकर्दळीचें अंतर । नखीं चिरूनी [1]काढिती सार । [2]तेलें शिंपतां [3]वैश्वानर । [4]अधिक आंगीं पाजळे. ॥ ५५ ॥ [5]सोमकांताच्या [6]भाजनीं । शिंपिती चंद्रकिरणींचें पाणी । म्हणे, 'हें तप्त तैल नाणीं । दृष्टीपुढें सर्वथा.' ॥ ५६ ॥ ऐशी देखोनी दमयंती, । चतुर सखिया [7]निकटवर्ती । तिहीं वृत्तांत [8]रायाप्रती । जाणविला [9]संकेतें. ॥ ५७ ॥ '[10]कुमारी तापें बहु दुश्चित्ता । [11]चिंता व्यथा मनोगता,' । [12]हृदयीं आणोनी न विचारितां । [13]बहुतां प्रकारें विचारा. ॥ ५८ ॥ जनका जाला [14]संकेतबोधू । म्हणे, 'चढला [15]तारुण्यसिंधू । भ्रतारकामनेचा इंदू । संकल्प[16]व्योमीं [17]उगवला. ॥ ५९ ॥ मंत्रियां आज्ञापी उत्तरीं । 'कीर्ति[18]घोषें [19]विजयभेरी । पिटुनियां स्वयंवरीं । [20]पृथ्वीपाळ पाचारा.' ॥ ६० ॥ दूत प्रेरितांची सहजें । [21]न पाचारित आले राजे । [22]चतुरंग समुद्र गाजे । [23]पंचवाद्यें सुनादें. ॥ ६१ ॥ पातले तयांतें सन्मानें । भीमें [24]वोपिलीं विश्रांतिसदनें । कन्या[25]मदन[26]मालतीपवनें । भूप केले [27]षट्पद. ॥ ६२ ॥ कीं दमयंतीरूप अमोघ । तेंचि भावोनी [28]रत्नसारंग । पार्थिव होउनी पतंग । [29]झेंपावले दश दिशा ॥ ६३ ॥

---

१. 'सांडिती' असाही पाठ आहे. २. 'तें वोपितां' असें पाठांतर. ३. अग्नि. येथें 'मदनाग्नि' असा अर्थ घ्यावा. ४. 'अधिकाधिक' असा दुसरा पाठ आहे. ५. चंद्रकांत नांवाचा एक दगड. चंद्राच्या किरणांनीं यांत पाणी उत्पन्न होतें व तें फार थंड असतें अशी समजूत आहे. ६. भाजन=पात्र. ७. जवळ राहणाऱ्या, बरोबर हिंडणाऱ्या. ८. दमयंतीचा पिता भीम याला. ९. संकेतानें, थोडीशी सूचना करून. सखीजनांना राजाजवळ 'दमयंती कामविकारानें पीडित झाली' असें स्पष्टपणें सांगतां येईना, म्हणून त्यांनीं संकेतानें राजाला तसें कळविलें. १०. 'कुमारी असे बहु दुःखित' 'कुमरी देखोनि निडुचित' असे अन्य पाठ आहेत. ११. 'चित्त' असाही पाठ आहे. १२. 'हृदयीं जाणोनी त्वरित' असाही पाठ आहे. १३. 'सुखोपाय विचारा' असा अन्य पाठ. १४. सखीजनांनीं संकेतानें कळविलेली गोष्ट राजाला समजली. १५. तारुण्यरूपी समुद्र. १६. आकाशांत. १७. पतिरूपी चंद्र विचाररूपी आकाशांत उगवला म्हणजे दमयंतीच्या मनांत नवऱ्यासंबंधी विचार येऊं लागले. हा रूपकालंकार झाला. याचें लक्षण:—'सादृश्याद्भेदेनारोपो रूपकम्'[काव्यानुशासने वाग्भट:—पृ० ३५ काव्यमाला—४३] १८. राजाची कीर्ति वाढविण्याकरितां जिकडे तिकडे त्याची स्तुति करणें. १९. राजाला जय मिळाला म्हणजे वाजविण्याची नौबत. २०. राजे. २१. 'न पाचारित आले राजे' असें म्हणून दमयंती मिळविण्याविषयीं राजांना फार उत्सुकता होती असें दर्शविलें. २२. घोडे, हत्ती, रथ, पदाती. २३. तालज, तत, मुरजालिक, धमन, वेणु. २४. दिधलीं, राहण्यास समर्पिलीं. २५. मदन (वृक्ष)=धोतऱ्याचें झाड. 'उन्मत्तः कितवो धूर्तो धत्तुरः कनकाह्वयः । मातुलो मदन·················· ॥' इत्यमरः. २६. कस्तुरमोगरा. मधुमाधवी असेंही याला नांव आहे. २७. भ्रमर. २८. उजेड. २९. झोंबले, सर्व दिशांनीं येऊन जमा झाले.

[1]तंव नारदतुंबरु [2]उभय [3]मूर्ती । पातले [4]अमरसभेप्रती । शक्रें सन्मानुनी हातीं । [5]मुख्यासनीं बैसविले. ॥ ६४ ॥ म्हणे, 'अवलोकितां [6]सृष्टि । कांहीं अपूर्व पडलें दृष्टी । तेणें कौतुकामृतें [7]वृष्टी । कर्णीं केली पाहिजे.' ॥ ६५ ॥ नारद म्हणे, '[8]सुरेंद्रोत्तमा ! । विदर्भदेशीं [9]राजा भीम । त्याची कन्या उत्तमोत्तमा । दमयंती या नामें. ॥ ६६ ॥ स्वर्गमृत्युपाताळभुवनीं । तियेसमान लावण्यखाणी । नाहीं नाहीं आपुल्या नयनीं । [10]देखिली हें जाणिजे. ॥ ६७ ॥ उदईक तिचें [11]स्वयंवर । [12]मीनले असंख्य राजेश्वर । कवणा सभाग्या [13]ईश्वर । [14]कृपा करील तें

---

१. वर सांगितल्याप्रमाणें कुंडिनपुरांत स्वयंवराकरितां देशदेशचे राजे जमले होते तेव्हां. 'जेव्हां,' 'तेव्हां' या शब्दांबद्दल अनुक्रमें 'जंव,' 'तंव' या शब्दांचा उपयोग करतात. 'जेव्हां'बद्दल 'जंव' फारसा प्रचारांत नाहीं परंतु 'तेव्हां'बद्दल 'तंव' बहुधा पाहण्यांत येतो. २. दोघे, दोघेही मिळून. ३. व्यक्ति, पुरुष. हिंदीभाषेंत या शब्दाचा हाच अर्थ कायम राहिला आहे, व हा शब्द बैराग्यांच्या बोलण्यांत पुष्कळ वेळां येतो. उ० 'हम् चार मूर्ति हैं. आटा चावल लावो' इ०. ४. इंद्रसभा. इंद्रसभेचें वर्णन पंतांनीं असें केलें आहे:—'शक्रसभा सार्धशतकयोजनदीर्घा तशीच विस्तीर्णा । शतयोजनें, तदाश्रितजनतां ती सर्वदुःखनिस्तीर्णा ॥ २३ ॥ वाल्मीकिमुनि पराशर दुर्वासा याज्ञवल्क्य मूर्तमख । तेथें शुक्र बृहस्पति जलद हरिश्चंद्र सर्व वायुसख ॥ २४ ॥ तीमाजि अप्सरोजन नाचे, गंधर्ववृंद आलापी । या सुरसा सुरसा जन सुकृती आतृप्ति तेथ आलापी. ॥२५॥ कोट्यब्द तपश्चर्या करितां तनु रात्रदिवस भागावी, । क्षणमात्र ती पहावी अशि सुखदा, फार किति सभा गावी ?॥२६॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला-मोरोपंतकृत महाभारत—सभापर्व—अ० १ गीति ४३-२६ पृ० ३-४]. ५. श्रेष्ठ आसनावर. ६. त्रिभुवन. नेहमीं त्रिभुवनांत हिंडत राहून कांहीं चमत्कार दृष्टीस पडल्यास तो देवादिकांना कळविणें हा नारदाचा स्वेच्छास्वीकृत धर्म होता. ७. कौतुकरूपी अमृताचा पाऊस. ८. सुरांमध्यें (देवांत) जे इंद्र (श्रेष्ठ, उत्तम) तो सुरेंद्र. सुरेंद्रांत जो उत्तम तो सुरेंद्रोत्तम. हा समास 'मयूरव्यंसकादयश्च' [अष्टाध्यायीसूत्रपाठ २।१।७२] या पाणिनिप्रणीत सूत्राच्या आधारानें उत्तम सुरेंद्रः सुरेंद्रोत्तमः असा सोडवावा. किंवा सुरेंद्रश्चासौ उत्तमश्च सुरेंद्रोत्तमः असा विशेष्यपूर्वपदकर्मधारय करावा. परंतु आम्हीं अगोदर सोडविला तसाच येथें समास सोडविणें चांगलें; तसा समास सोडविल्यास इंद्राचें महत्व वाढतें. कारण मग इंद्र फक्त सुरांतच श्रेष्ठ ठरत नसून, सुरांत जे श्रेष्ठ त्या श्रेष्ठांपैकीं श्रेष्ठ ठरतो. ९. 'राजा भीमा' असा ही पाठ आढळतो. 'सुरेंद्रोत्तमा' या शब्दाशीं यमक जुळविण्याकरितां लेखकानें असा पाठ कल्पिला असावा. १०. 'देखिजे तिहीं जाणिजे' असाही पाठ आहे. ११. ही स्वयंवराची चाल आर्य देशांत केव्हांपासून पडली, किती दिवसपर्यंत प्रचारांत होती व केव्हां बंद झाली यासंबंधानें विद्वानांस पूर्ण माहिती मिळाली नाहीं. ही चाल केवळ क्षत्रियांतच होती असें दिसतें. कारण ब्राह्मण वैश्य शूद्र कन्यकांच्या स्वयंवराचें वर्णन कोठेंही आढळण्यांत येत नाहीं. ही स्वयंवराची

कळेना. ॥ ६८ ॥ [1]जेणें जन्मजन्मांतरीं । पूजिली असेल [2]मंगळागौरी । तरीच दमयंती सुंदरी । माळ घालील [3]सदैवा.' ॥ ६९ ॥ ऐकोनी [4]चंचळ जाले देव । विमानीं आरूढले सर्व । भूतळा आले तंव [5]पार्थिव । [6]नैषध मार्गी देखिला. ॥ ७० ॥ अवलोकितां तया चतुरा । परम आश्चर्य [7]अमरेश्वरा । म्हणती, '[8]मानवीं [9]असुरां । माजी ऐसा न देखों. ॥ ७१ ॥ याचिये [10]सौंदर्यसमुद्र[11]आंपीं । [12]मांझिये [13]सहस्रनयनांच्या मापीं । [14]उमानिता मन संकल्पीं । [15]प्रमाण न्हे सर्वथा. ॥ ७२ ॥ [16]रतिपति आणि [17]रोहिणीपती । [18]अश्विनौदेव दि[19]व्यमूर्ती । याचिया बरवेपणाची ख्याती । भुवनत्रयीं न समाये. ॥ ७३ ॥ पाहतां

---

चाल वैदिक कालापासून पौराणिक कालापर्यंत होती असें मि० दत्त यांचें मत आहे. कित्येक विद्वानांच्या मतें ही चाल फारच कालपर्यंत होती, असें आहे. परंतु हें त्यांचें म्हणणें रास्त दिसत नाहीं. कारण स्वयंवरांचा रामायणांत उल्लेख आहे, महाभारतांत आहे व मुसलमान हिंदुस्थानांत येईपर्यंत ही चाल होती असें, पृथ्वीराज चव्हाण यानें कनौजच्या राजाची मुलगी स्वयंवरांतून पळवून नेली, या गोष्टीवरून सिद्ध होतें. १२. मिळालें. १३. 'सत्वर' असें पाठांतर आहे. १४. 'गांठ घालील' 'माळ घालील' असेही पाठ आहेत.

१. ज्या पुरुषानें. २. मंगलप्रद गौरी, शुभ फल देणारी देवी. ३. भाग्यशील, नशीबवान. दमयंतीचें विशेषण. ४. दमयंती मिळविण्याविषयीं आतुर. ५. पृथ्वीचा राजा. ६. नल दमयंतीच्या स्वयंवराची वार्ता ऐकून स्वयंवराकरितां नल कुंडिननगराला चालला होता. तो रस्त्यांत देवांना भेटला असें समजावें. ७. 'सुरवरां' असाही पाठ आहे. 'अमरेश्वर' या शब्दानें फक्त इंद्र न घेतां इंद्र, अग्नि, वरुण व यम इतके दिक्पाल घ्यावे. ८. मनुष्यांत. ९. 'मानव असुरसुरां' असा अन्य पाठ. १०. येथें सुरेख उपमालंकार साधला आहे. सौंदर्याला समुद्राची उपमा देऊन त्याचें (नलाच्या सौंदर्याचें) सुविशालत्व, प्राचंड्य व अनुपमेयत्व व्यक्त केलें आहे. ११. पाणी. १२. चौघांच्या भाषणांपैकीं हें इंद्राचें भाषण आहे असें समजावें. १३. हजार डोळ्यांच्या मापानें. साधारण मनुष्याचें सौंदर्य मोजण्याला दोन डोळ्यांचें माप पुरे असतें. परंतु नळाचें सौंदर्य अद्वितीय असल्यामुळें तें मोजण्याकरितां इंद्रानें आपल्या हजार डोळ्यांचें माप केलें होतें, तरी त्याला नळाचें संपूर्ण सौंदर्य पाहतां आलें नाहीं—असा स्पष्टार्थ. १४. 'मोजणें' याच अर्थीं हा शब्द ज्ञानेश्वरींत योजलेला आहे. १५. वर जें माप सांगितलें तें नळाच्या सौंदर्यापुढें तृणप्राय ठरलें—असा भाव. १६. मदन. १७. चंद्र. चंद्राला 'रोहिणीपती' 'रोहिणीप्रिय' इत्यादि नांवें पडायाचें कारण रा. रा. शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत 'ज्योतिर्विलास' नामक पुस्तकांत इष्ट तर पहावें. १८. अश्विनीकुमार. १९. 'रतिपति आणि रोहिणीपती । अश्विनौदेव दिव्यमूर्ति' या दोन चरणांचा संबंध कोणीकडे लावावा याविषयीं घोंटाळा होण्याचा संभव आहे. कारण त्यांत क्रियापद नाहीं व यांशीं संबंध जडेल असें क्रियापद पुढें किंवा मागें कोठेंही नाहीं. म्हणून या ओवीचा असा अन्वय लावावा:—रतिपति आणि रोहिणीपती

याच्या रूपाकडे । जेंवी खद्योत[1] सूर्यापुढें । मनुष्यव्यक्तींमाजी एवढें । स्वरूप नाहीं देखिलें[2]. ॥ ७४ ॥ देखोनी नळाचें लावण्य । चमत्कारला[3] सहस्रनयन[4], । म्हणे, 'ऐसा सुलक्षण[5] । उभय[6] लोकीं न देखों.' ॥ ७५ ॥ विमान उतरोनियां क्षिती । अत्यादरें धरिला[7] हातीं, । म्हणे[8], 'पवित्रा ! गुणैकमूर्ती[9] । कवण कोठिल कवणाचा[10] ? ॥ ७६ ॥ काय तुझें नामाभिधान ?' । तो म्हणे, 'नैषधराजा जाण । वीरसेनाचा नंदन । पुण्यश्लोक[11] नळनामा. ॥ ७७ ॥ जाणें दमयंतीस्वयंवरा, । यालागीं असे मार्गी[12] त्वरा.' । शक्र म्हणे, 'चतुरा[13] ! । विज्ञापना परियेसीं. ॥ ७८ ॥ धरूनी दमयंतीची आर्ती[14] । आम्हीं पातलों भूतळाप्रती । तुवां जाउनी नाना युक्ती । प्रबोधिली[15] पाहिजे.' ॥ ७९ ॥ नळ पुसे, 'हो ! तुम्ही कोण ?' । शक्र

---

अश्विनौदेव दिव्यमूर्ति (यांची बरवेपणाची ख्याती भुवनत्रयीं समाये. परंतु) याचिया (नळाच्या) बरवेपणाची ख्याती भुवनत्रयीं न समाये.

१. काजवा. सूर्याच्या प्रचंड तेजापुढें ज्याप्रमाणें काजव्याचा उजेड अगदीं निस्तेज होतो, त्याच प्रमाणें नळाच्या तेजापुढें मी (इंद्र) निस्तेज होतों,—असा इंद्राच्या म्हणण्याचा भाव. २. नैषधकाव्यांत अशाच प्रकारचें वर्णन आहे:—'कामनीयकमधःकृतकामं काममक्षिभिरवेक्ष्य तदीयम् । कौशिकः स्वमखिलं परिपश्यन्मन्यते स्म खलु कौशिकमेव ॥' [नैषधीयचरित—सर्ग ५ श्लो० ६४ निर्णयसागर आवृत्ति पृ० २१७.] ३. येथें आपल्या कवीनें 'चमत्कारणें' असा मराठींत नवीन अकर्मक धातु उत्पन्न केला आहे असें दिसतें. 'चमत्कार' या नामावरून हा धातु साधला आहे. या प्रमाणें कधीं कधीं स्वेच्छेनें कवि नवीन शब्द साधित असतात. अशा शब्दसाधनानेंच भाषेस प्रौढता येते असें कै० दादोबा यांचें मत आहे. ४. इंद्र. ५. चांगल्या लक्षणाचा, रूप व गुण या दोहोंनीं श्रेष्ठ. ६. 'भुवनत्रयीं' असें पाठांतर. ७. अत्यादरें हातीं (नळ) धरिला—असा अन्वय करावा. ८. 'म्हणती' असाही पाठ आहे. ९. सर्वगुणसंपन्न. १०. कवणाचा=कोणाचा मुलगा. ११. एथें नळ आपणाला 'पुण्यश्लोक' म्हणतो म्हणून त्यानें आत्मस्तुति केली असें वाटण्याचा संभव आहे. परंतु तसें समजूं नये. कारण नळ 'पुण्यश्लोक' या नांवानें त्रिभुवनांत प्रख्यात होता. म्हणून 'पुण्यश्लोक' याच नांवानें सर्व लोक त्याला ओळखीत असत. तेव्हां आपण 'पुण्यश्लोक' आहों असें सांगितल्याशिवाय आपणाला इंद्रादिक ओळखणार नाहींत असें वाटून नळानें तसें सांगितलें असावें. आमचे आधुनिक पदवीधर आपल्या नांवापुढें आपल्याच हातानें बी. ए., एम्. ए. इत्यादि पदवी जोडतात. याबद्दल त्यांना कोणी दूषण देत नाहीं. त्याप्रमाणेंच हेंही समजावें. १२. मार्ग क्रमण्यांत. १३. 'चतुरा' असें म्हणून तूं आमचें काम करण्यास समर्थ आहेस, असें सुचविलें. १४. आवड, प्रीति. १५. तूं दमयंतीकडे जाऊन तिला नाना तऱ्हेनें उपदेशून तिनें आम्हांपैकीं एकाला वरावें असें कर—असा इंद्राच्या म्हणण्याचा भाव. कृष्णानंदविरचित 'सहृदयानंद' काव्यांत या प्रसंगाचें वर्णन फार सुरस आहे. 'भीमात्मजायाः सविधे तथा त्वमस्मा-

म्हणे, 'मी ¹पाकशासन, । ²यम, ³पावक चौथा ⁴वरुण। ⁵स्वामी आम्हीं जगाचे.'

नुपश्लोकय लोकवीर । अलंकरोति त्रिदिवं यथेयमेकस्य नः कस्यचिदेत्यहस्तम् ॥ ४३ ॥ तदर्थमर्थी विदितोऽसि यत्स विस्रंभभूमिस्तदपि त्वमेव । निजार्थसिद्धिष्वपि निर्व्यपेक्षाः श्रेयः परेषां घटयंति संतः ॥ ४४ ॥ प्रतिश्रुतं चेद्भवता तदेवमसंशयं सेत्स्यति वांछितं नः । संपाद्यमानं हि महानुभावैः स्पृशंति न प्रार्थितमंतरायाः ॥ ४५ ॥ विधेर्वशात्कार्यविपर्ययेऽपि न तेऽपराधः परिशंकनीयः । प्रभुर्नियोगापनये नियोक्तुराशास्यसिद्धेः प्रतिभूर्न दूतः ॥ ४६ ॥' [काव्यमाला ३२—सहृदयानंद—सर्ग ५ पृ० २९-३०.] **मो**रोपंतानें **इं**द्रादिकांचें भाषण यापेक्षां अधिक सुंदर भाषेंत घातलें आहे:—'........................ । ................, 'आम्हीं **भै**म्यर्थ पातलों अवघे. ॥ **भै**मी स्वयें वरू या आम्हां चवघाजणांत अन्यतमा, । हें कार्य, दूत होगा! जा गा! बा! तिजकडेचि धन्यतमा! ॥' [**का**व्यसंग्रहग्रंथमाला—**मो**रोपंतकृत महाभारत—वनपर्व—गी० ४६-४७ पृष्ठ ४३.] **र**घुनाथपंडितानें या प्रसंगीं **इं**द्राच्या तोंडीं घातलेलें भाषणही पाहण्यालायक आहे:—'बोले सुराधिप नराधिपतीस 'राया! **भै**मी जसी मज वरील तसें कराया । बोलावयास तिजशीं तिचिया घरीं जा, तूं बोलका चतुर केवळ काय राजा. ॥' [**न**लोपाख्यान—श्लो० १७१.] या प्रसंगाचें वर्णन **त्रि**विक्रमभट्टविरचित **'दमयंतीकथा'** नामक ग्रंथांत फार सुरस केलें आहे. [दमयंतीकथा—पंचम उच्छ्वास—पृ० १८१-१८१ निर्णयसागर आवृत्ति.] **मु**क्तेश्वरानें 'प्रबोधिली पाहिजे' या शब्दांत वरील दोनही उताऱ्यांचा सारांश आणिला आहे.

१. इंद्र. 'पाकनाशन' असाही पाठ आहे. २. नरकाचा स्वामी. 'धर्मराजः पितृपतिः समवर्ती परेतराट् । कृतांतो यमुनाभ्राता शमनो यमराड्यमः ॥' इत्यमरः. कोणता मनुष्य पुण्यवान् आहे व कोणता मनुष्य पापी आहे याची चौकशी करणें व अपराध्यांना दंड करणें हीं दोन्हीं कामें **य**माकडेच आहेत. ३. अग्नि. 'अग्निर्वैश्वानरो वन्हिर्वीतिहोत्रो धनंजयः । कृपीटयोनिर्ज्वलनो जातवेदास्तनूनपात् । बर्हिःशुष्मा कृष्णवर्त्मा शोचिष्केश उषर्बुधः । आश्रयाशो बृहद्भानुः कृशानुः पावकोऽनलः ॥' [**अ**मरसिंहकृत नामलिंगानुशासन.] प्राचीन आर्यांच्या देवांपैकीं अग्नि मुख्य होय. आर्यांनीं यज्ञयागादिक क्रियांना फार महत्व दिल्यामुळें त्यांना अग्नीला श्रेष्ठस्थान द्यावें लागलें. अग्निकुंडाजवळ स्वदेशभक्तवीरांची स्तुति होऊन त्यांना पदव्या मिळत असत. अग्निकुंडाजवळ मोठमोठ्या विद्वानांचे गहनविषयांवर जंगी वादविवाद होत असत. अग्निकुंडाजवळ सर्व लोक आपआपल्या पापांबद्दल ईश्वराची क्षमा मागत असत. याप्रमाणें रोज अग्निशिवाय चालेनासें झालें व अग्नीचें महत्व वाढलें. आर्यांचा अतिपुरातन व पहिला धर्मग्रंथ जो **ऋग्वेद** त्याच्या प्रारंभींच अग्नीची स्तुती केली आहे. 'अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ॥' **तैतिरीय**संहितेंत 'अग्निर्वै देवानां होता' [२-५-९] असें म्हटलें आहे. **ऐतरेय** ब्राह्मणांत अग्नि देवांचें मुख आहे असें म्हटलें आहे:—'अग्निर्मुखं प्रथमो देवतानाम्' [ऐ० ब्रा० १-१] येथें दिलेल्या उताऱ्यांवरून प्राचीनकाळीं अग्नीला फार मान असे असें स्पष्ट होतें. पौराणिककाळीं याला आग्नेय दिशेचें स्वामित्व मिळालें व हा अष्टदिक्पालकांपैकीं एक झाला. ४. जलाधिष्ठितदेव. हा द्वादशा-

॥८०॥ नैषध म्हणे, 'ऐका वचन । असत्य न बोलें गेलिया[1] प्राण । सत्य रक्षितां साध्य[2] साधन[3] । साधेल[4] तें होतसे. ॥ ८१ ॥ आणि राणिवसां[5] राजकुमरी । रक्षपाळ[6] सावध द्वारीं । माझा प्रवेश कवणे[7] परी । होय तेंही नेणवे.[8]' ॥ ८२ ॥ देव बोलती वरदवाणी,[9] । 'तुतें कोणी न देखती नयनीं[10] । दमयंती ते प्रबोधोनी । आमुतें वरी तें[11] कीजे. ॥ ८३ ॥ तूं परोपकारी पुण्यवंत । ऐकोनि[12] जाणों यथार्थ । आपुला सांडुनी स्वार्थ । कार्य करीं दुजियांचें[13]. ॥ ८४ ॥ आमुचे आवडीचेनि[14] काजें[15] । निर्लोभ[16] दूतत्व त्वां कीजे । येणें पूर्णकाम[17] सहजें ।

दिशांतील व अष्टदिक्पालकांतील एक होय. ५. 'स्वामी आम्ही जगाचे' असें जरी इंद्रानें सांगितलें तरी खरोखर या चौघांकडे फक्त चार दिशांचेंच स्वामित्व होतें. या चौघांविषयीं अशी माहिती सांपडते:—

| दिशा | दिक्पाळ | त्यांच्या स्त्रिया | त्यांचें पुर | त्यांचीं आयुधें | दिग्ग्रह | दिग्गज | दिग्गज-स्त्रिया |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पूर्वा | इंद्र | शची | अमरावती | वज्र | सूर्य | ऐरावत | अभ्रमु |
| आग्नेयी | अग्नि | स्वाहा | तेजोवती | शक्ति | शुक्र | पुंडरीक | कपिला |
| दक्षिणा | यम | शामला | संयमिनी | दंड | मंगळ | वामन | पिंगला |
| पश्चिमा | वरुण | ज्येष्ठा | श्रद्धावती | पाश | शनि | अंजन | ताम्रकर्णी |

[शुद्धांभ्रनिरोष्ठ्यनिर्वचन नैषध पहा.]

१. 'जीवितेनाप्यतः सत्यं भुवि रक्षंति साधवः' असें रामायणांत सांगितलें आहे. २. जी वस्तु मिळावयाची ती. ३. वस्तु मिळविण्याकरितां योजावयाचीं कारणें. ४. 'साधेल तें' म्हणजे ज्याविषयीं यत्न करावा तें. म्हणजे प्रत्येक कामांत यशच येईल—असा भावार्थ. ५. राणी (राजाची स्त्री) वास करण्याच्या जागेला 'राणिवास' हें नांव पडलें असावें व 'राणिवस' हा 'राणिवास' शब्दाचा अपभ्रंश असावा असें वाटतें. ६. द्वारपाळ, अंतःपुरद्वाररक्षण करणारे कंचुकी वगैरे. ७. कोणत्या रीतीनें. ८. माहित नाहीं, जाणत नाहीं. रघुनाथपंडितानें याच प्रसंगीं नळाकडून वदविलें आहे:—'ज्याशिं जेथें सामर्थ्य नसे त्यातें, कसें तें कार्य तुम्हीं सांगिजेतें । बाळ तान्हें उचलील काय जातें, बोलणाराचें मोल फोल जातें ॥ १७८ ॥ सात वंकांही पलीकडे हो! ते राजकन्येची भेट कशी होते त्यजुनि राज्यत्व दूतता कशी ते धरावी म्यां हृदयासि जे कशीते ॥ १७९ ॥' [नलोपाख्यान.] ९. वर देणारी वाणी; वर देती—असा भावार्थ. १०. 'बोले सुरेंद्रनृप सौधसुखें फिराया । आकारगुप्तवर देइन देवराया ॥.' [नलोपाख्यान.] ११. तसें. वरील असें. १२. नारदतुंबुर इत्यादिकांकडून. १३. दुसऱ्यांचें. १४. आवडीच्या, दमयंती मिळविण्याच्या (कामांत). १५. कामाकरितां. १६. लोभ सोडून. दमयंतीची आशा सोडून—असा भाव.

तूं होशील पवित्रा! ॥ ८५ ॥ आपुला सांडुनियां स्वार्थ । यत्नें पुरवीं[1] आमचें [2]आर्त । तोची ईश्वर मूर्तिमंत । सत्य सत्य[3] जाण पां. ॥ ८६ ॥ यत्नें साधिलें[4] निधान[5] । तेणें परांची कामना पूर्ण । करी त्या हरि[6]हर[7]कमळासन । सेवक होउनी सेविती[8]. ॥ ८७ ॥ या लागीं तूं पवित्र[9] राया! । प्रबोधूनी वैदर्भतनया[10] । ते आमुतें [11]वरी जाया । ऐशी कीर्ती तूं करी.' ॥ ८८ ॥ 'अवश्य' म्हणोनी

---

१७. 'पूर्णकाम' म्हणजे ज्याची इच्छा पूर्ण झाली आहे असा. येथें असा प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे कीं नळाची मुख्य इच्छा म्हटली म्हणजे दमयंतीची प्राप्ति होय. ही आपली इच्छा सोडून दे व दमयंती आमच्याकरितां मिळीव असें इंद्र नळास सांगतो. व पुन्हा, असें केल्यास 'तुझी इच्छा पूर्ण होईल' असें म्हणतो. हें कसें? 'पूर्णकाम' यांतल्या 'काम' शब्दानें दमयंतीसंबंधीं इच्छा शिवाय करून इतर एकादी इच्छा घ्यावी असें मानण्यास नळास इतर एकादी इच्छा होती अशासंबंधी कोठेंच उल्लेख नाहीं. यावरून दमयंती आपणाला मिळेलच अशाबद्दल इंद्रादिकांना खात्री नव्हती असें दिसतें. कारण नळ व दमयंती यांची एकमेकांवर प्रीती जडली होती हें त्यांना माहीत होतें. व ते भविष्यज्ञ असल्यामुळें दमयंती नळालाच वरील हेंही त्यांना माहित होतें. म्हणून त्यांनीं नळाला 'पूर्णकाम' होशील असा आशीर्वाद दिला. मनुष्यांप्रमाणेंच देवांनाही आशा असल्यामुळें दमयंती मिळविण्याचा यत्न केला येवढेंच.

१. 'परांचें' असाही पाठ आहे. २. कामना, इच्छा, हेतु. ३. 'सत्य' शब्दाची द्विरुक्ति निश्चयद्योतक होय. ४. मिळविलें. ५. धनराशि, धनसंचय. ६. 'हरि' शब्दाचा व्यासानें असा अर्थ दिला आहे:—'हराम्यघं हि स्मर्तॄणां हविर्भागं क्रतुष्वहम् । वर्णश्च मे हरि श्रेष्ठस्तस्माद्धरिरहं स्मृतः ॥.' ७. ब्रह्मा. ८. 'वर्तती' असाही पाठ आहे. ९. इंद्रादिकांनीं नळाची याचकांप्रमाणें खूब स्तुति केली हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. श्रीहर्षकृत नैषध, रघुनाथकृत नलोपाख्यान इत्यादि संस्कृतप्राकृत काव्यांत नळानें दूत होण्याचें नाकबूल केल्यानंतर इंद्रादिकांनीं त्याची निर्भर्त्सना केली आहे, तें बरोबर नाहीं. कारण इंद्रादिक नळाकडे मालक या नात्यानें गेले नव्हते, याचक या नात्यानें गेले. यजमानानें कोणतीही गोष्ट नाकबूल केल्यास त्याची निर्भर्त्सना करण्याचा याचकांना मुळींच हक्क नाहीं व ते तसें करीतही नसतात. यजमानाचें मन वळविण्याचें स्तुतीशिवाय त्यांचे जवळ दुसरें साधन नसल्यामुळें ते यजमानाची खूब स्तुति करीत असतात. या व्यवहारांतल्या रीतीला अनुसरूनच मुक्तेश्वरानें इंद्रादिकांच्या मुखीं नळाची किंचित्ही निंदा न घालतां खूब स्तुति घातली आहे. यावरून कवीला आवश्यक जें पूर्णव्यवहारावलोकन त्यांत आपला कवि इतरांपेक्षां श्रेष्ठ होता असें म्हणावें लागतें. १०. 'विदेहतनया' असाही पाठ आहे, परंतु हा अपपाठ असावा असें वाटतें. कारण विदर्भ व विदेह हे दोन निराळे देश होत. दमयंती विदर्भाधिपतीची मुलगी होती. विदेहाधिपतीची मुलगी नव्हती. ११. 'होय' असाही पाठ आहे.

राजनृपती[1] । पातला कुंडिनपुराप्रती[2] । अदृश्य सिद्धीचीये गती । राजालयीं प्रवेशे. ॥ ८९ ॥ दमयंती[3] मंचकासनीं । लावण्यलतिका[4] जेंवी सुमनीं । षट्पद[5]-प्राय नैषधगुणी । झुंकारला सुशब्दें. ॥ ९० ॥ रिद्धिसिद्धिमाजी रमा[6] । मा[7]-तृकामंडळीं जैसी उमा । तैसी सखियांमाजी प्रतिमा । दमयंतीची देखिली. ॥ ९१ ॥ नळातें अवलोकितां नयनीं । मूर्ति बिंबली[8] हृदयभुवनीं । पातीं लवों विसरलीं दोन्ही । देहभावीं[9] तटस्थ ॥ ९२ ॥ अनुमान[10] कल्पना भावी पोटीं । ऐसा सुंदर नाहीं सृष्टीं । हाचि नळ ऐशी गोष्टी । असत्य नव्हे बोलतां. ॥ ९३ ॥ मग म्हणे, 'कनकाचिया[11] द्रुमा ! । अमृतफळीं[12] सफळ सुगमा ! । तुझे

---

१. 'नळनृपती' असाही पाठ आहे. २. विदर्भदेशाची राजधानी. हें उत्तर अक्षांश २१° व पूर्व रेखांश ७८° यांवर होतें. सध्याचें बीदर शहर व पूर्वींचें कुंडिनपुर एकच असावींत असें कित्येक विद्वानांचें म्हणणें आहे. ३. 'तंव दमयंती' असाही पाठ आहे. ४. लावण्याची वेल, सौंदर्यवल्ली. ५. भ्रमर. ६. 'रिद्धिसिद्धिमाजी जैसी रमा' असाही पाठ आहे. ७. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही इत्यादि सात मातृकांच्या मंडळींत. [मातृका—या शिवाची किंवा स्कंदाची सेवा करणाऱ्या देवता होत. कित्येकांच्या मतें या सात किंवा आठ आहेत. त्यांचीं नांवें:—'ब्राह्मी माहेश्वरी चंडी वाराही वैष्णवी तथा । कौमारी चैव चामुंडा चर्चिकेत्यष्ट मातरः ॥' किंवा 'ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा । माहेंद्री चैव वाराही चामुंडा सप्त मातरः ॥' कित्येक यांची संख्या सोळापर्यंत वाढवितातः—गौरी, पद्मा, शची, मेधा, सावित्री, विजया, जया, देवसेना, स्वधा, स्वाहा, मातरा, लोकमातरा, धृति, पुष्टि, तुष्टी व कुलदेवता.] ८. 'बैसली' असें पाठांतर आहे. ९. 'अष्टभावीं तटस्थ' असा अन्य पाठ आहे. १०. 'अन्य भावना न भावूनि पोटीं' असें पाठांतर आहे. हाच नळ आहे अशाबद्दल दमयंतीजवळ प्रत्यक्षप्रमाण नसल्यामुळें ती त्याच्या सौंदर्यावरून अनुमानानें हाच नळ असावा असें समजूं लागली. ११. सोन्याच्या वृक्षा! नळाची शारीरिक शोभा सोन्याच्या कांतीप्रमाणें असल्यामुळें त्याला दमयंतीनें 'सोन्याच्या वृक्षा' अशा नांवानें हाक मारिली. मनुष्याच्या देहाला वृक्षाची उपमा दिल्याचीं संस्कृतांत बरींच उदाहरणें सांपडतील. मनुष्याला उलटा उभा राहिलेला वृक्ष असें म्हणतात. कारण मनुष्याचे डोक्यावरील केस वृक्षाच्या मुळांप्रमाणें भासतात व मनुष्याचे हातपाय वृक्षाच्या फांद्यांप्रमाणें दिसतात. हीच कल्पना भगवद्गीतेंत दृष्टीस पडतेः—'ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥ याचा भावार्थः—प्रपंच हा एक अश्वत्थवृक्ष आहे । पुराणपुरुष हें त्याचें मूळ, हें वर आहे । आणि चराचरांचा विस्तार या त्याच्या खांद्या, या खालीं लोंबत आहेत । वेद हींच त्याला छाया देणारीं पानें । याप्रमाणें हा जो 'अश्वत्थ' म्हणजे अशाश्वत पदार्थ, याला कोणी शाश्वत पदार्थ म्हणतात । पण याला जो खरेपणानें जाणतो, तोच वेदजाणता होय ॥ [श्रीमद्भगवद्गीता—अ० १५ श्लो० १.] 'सादृश्यादसतोऽपि धर्मस्य कल्पनमुत्प्रेक्षा' या 'काव्यानुशासनां'तल्या नियमाप्रमाणें येथें उत्प्रेक्षालंकार झाला. १२. (अमृतफळीं) अमृतासारख्या फळानें (सफळ) सफल झालेला किंवा प्राप्त

अमृतप्राय नामा । कर्णीं परिसवीं मातें.' ॥ ९४ ॥ नरेंद्र बोले सत्य [1]निर्धुत, । 'नैषधनामा मी यथार्थ । [2]परंतु [3]लोकपाळांचा दूत । होउनी आलों [4]तुजप्रती. ॥ ९५ ॥ मृत्युलोकींचे [5]मानविणी ! । अमरपाळ तुझे गुणीं । वेधोनी पातले हे करणी । [6]सुकृताची विचित्र. ॥ ९६ ॥ त्यांचा करूनियां अंगीकार । मातें देईं [7]निश्चयोत्तर । तें ऐकोनी [8]सुरेश्वर । धन्य दूत मज म्हणती.' ॥ ९७ ॥ [9]दमयंती म्हणे, 'ऐक । नळ असेल तो [10]ग्राहक । त्यावीण नव्हे आणिक । या शरीरा जाण पां. ॥९८॥ नळावेगळा पुरुष [11]आन । तो मज [12]भीमकासमान । हें सत्य असेल तरी [13]भगवान । सफळ करो [14]कामना. ॥९९॥ इंद्रादिकांचिया

---

झालेला (सुगमा) व म्हणूनच मिळविण्यास सुलभ असा येथें शब्दाचा घोंटाळा झालेला आहे. दमयंतीच्या म्हणण्याचा भाव असा कीं नळाचें आगमन तिला अमृततुल्य फळवत् होय.

१. न कांपतां. 'निर्धुत' या शब्दानें नळाचें निस्पृहत्व दर्शविलें आहे. कारण इतर एकादा पुरुष असता तर, दमयंती आपल्या हातून जाईल अशाबद्दल आपणच प्रयत्न करीत आहों, असें वाटून त्याला फार वाईट वाटलें असतें. व तो अडखळत व कांपत बोलला असता. परंतु नळ फार निस्पृह असल्यामुळें इतरांप्रमाणें कांपला नाहीं. २. 'परंतु' शब्दानें मी निषध देशाचा राजा या नात्यानें तुझ्याकडे आलों नाहीं असें सुचविलें. ३. दिक्पालकांचा. ४. 'तुजपाशीं' असा अन्यपाठ आहे. ५. 'मानव' शब्दाचें स्त्रीलिंग. ६. तूं (दमयंतीनें) केलेल्या सत्कृत्याची. दमयंती पार्थिवस्त्री असूनही तिला वरण्याकरितां इंद्रादिक देव आले हा तिनें केलेल्या पुण्याचाच परिणाम होय–असा भाव. ७. निश्चयोत्तर=खातरीचा जबाब. ८. इंद्र, अग्नि, यम, वरुण. ९. कित्येक हस्तलिखित पोथींत ही ओंवी अशी आहे:–'दमयंती म्हणे ऐक । तूं हो अथवा आणिक । नळ असे तोचि ग्राहक । या शरीरीं जाण पां॥'. १०. ग्रहण करणारा. येथें नवऱ्याला 'ग्राहक' म्हटलें आहे. याचें कारण असें कीं ज्याप्रमाणें विकत घेतलेल्या मालावर विकत घेणाऱ्याचा पूर्णपणें हक्क असतो त्याचप्रमाणें स्वस्त्रीवर पतीचा सर्वप्रकारचा हक्क आहे. ज्याप्रमाणें एका ग्राहकानें एक पदार्थ विकत घेतल्यावर त्यावर दुसऱ्याचा मुळींच हक्क राहत नाहीं, त्याचप्रमाणें एका स्त्रीनें एक पुरुष निवडल्यावर तिच्यावर दुसऱ्याचा मुळींच हक्क राहत नाहीं. ११. अन्य, दुसरा. १२. 'विदर्भासमान' असाही पाठ आहे. पितृतुल्य–असा भाव. ज्याप्रमाणें बापानें मुलीच्या समागमाविषयीं मनांत कल्पनाही आणूं नये, त्याप्रमाणें इंद्रादिकांनीं माझ्या प्राप्तीची इच्छा करूं नये–असा उद्देश. १३. 'भगवान्' शब्दाची व्याख्या आढळते ती:—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' म्हणजे,–सर्व स्थावरजंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. १४. नळाची पत्नी होण्याबद्दलची इच्छा.

चरणीं । सहस्रवार माझी मूर्ध्नी[1] । मज दीनातें दया करूनी । नळ भ्रतार मज द्यावा.' ॥ १०० ॥ नळ म्हणे, 'विवेक ठेवीं, । दूतत्व देउनी धाडिलें देवीं[2] । तें म्यां अंगीकारितां[3] जीवीं[4] । श्रेष्ठ म्हणती दुरात्मा[5].' ॥ १०१ ॥ ऐकोनि बोले विचारकुशळ[6], । 'सहज[7] स्वयंवरा येती सकळ । त्यांमाजी तुझ्या कंठीं माळ । मी घालीन निर्धारें[8]. ॥ १०२ ॥ इतक्यानें कवणा विपाद कांहीं। नये ऐसेंची[9] देवां सांग जाई.' । नळ[10] संतुष्ट हृदयीं । देवांप्रती पातला.॥१०३॥ 'तुमचे आज्ञेनें सुरपती! । भैमी[11] भेटली एकांतीं । प्रबोधिली परि मनोवृत्ती । माझ्या ठायीं धरिलीसे. ॥ १०४ ॥ ते परिहारितां युक्तिजाळीं । ते म्हणे, 'स्वयंवरा यावें सकळीं । तेथें जें घडे तये काळीं । तेंचि मान्य सर्वांतें.॥१०५॥ ईश्वरें प्रेरिलें प्रारब्धातें । प्रारब्धें[12] प्रेरिलें मनातें । यास्तव घडेल तेंचि निरुतें[13] । ब्रह्मसूत्र[14] जाणावें.' ॥ १०६ ॥ देव म्हणती, 'मानलें[15] आम्हां । स्वयंवरीं[16] निर्जरांचा महिमा । देखतां मानवाची प्रतिमा । केंवी वरील कळेना.' ॥ १०७ ॥ यावरी वैदर्भरायें देखा । शृंगारिली रंगभूमिका[17] । जीतें लाजोनी स्वर्गमुखा ।

---

१. मूळचा शब्द मूर्धा. मूर्धा म्हणजे शिर. ['उत्तमांगं शिरः शीर्षं मूर्धा ना मस्तकोऽस्त्रियाम्' इत्यमरः.] इंद्रादिकांना हजारों शिरसाष्टांग नमस्कार करितें—असा ध्वनितार्थ. २. देवांनीं. ३. 'येथ वर्ततां कुभावीं' असाही पाठ आहे. ४. जीवीं=जीवाकरितां, स्वतःकरितां. नळाच्या म्हणण्याचा असा उद्देश कीं देवांनीं दिलेल्या दूतत्वाचा मी आपल्या हिताकडे (स्वतःकरितां दमयंती मिळविण्यास) उपयोग केला तर उत्तम पुरुष माझ्यावर विश्वासघाताचा आरोप करून मला दूषण देतील. ५. 'दुरुक्त' असें पाठांतर. ६. नळावर येणाऱ्या आरोपाच्या निवारणार्थ दमयंतीनें लागलीच युक्ति सुचविली म्हणून तिला 'विचारकुशळ' म्हटलें आहे. ७. स्वाभाविक रीतीनें. ८. स्वयंवराकरितां आलेल्या राजांपैकीं जो आवडेल त्याच्या गळ्यांत राजपुत्रीनें माळ घालावी असा स्वयंवराचा नियम आहे. व या नियमाप्रमाणें दमयंतीनें नळास वरिल्यावर नळाला कोणीही दूषण देणार नाहीं हें उघड आहे. ९. 'ऐसें देवां सांगें जाईं' असाही पाठ आहे. १०. 'नळ असंतुष्ट हृदयीं' असाही पाठ आहे, व हा पाठ मूळपाठापेक्षां विशेष प्रशस्त आहे. कारण नळ फार निस्पृह अभिमानी असल्यामुळें इंद्रादिकांकरितां दमयंती मिळवून देण्याचें आपण हातीं घेतलेलें काम पूर्ण झालें नाहीं म्हणून त्याला वाईटच वाटलें असेल. ११. 'भैमीस भेटलों एकांतीं' असें पाठांतर. १२. 'प्रारब्ध प्रेरील ज्या कार्यातें' असाही पाठ आहे. १३. खरोखर, निश्चयें करून. १४. ब्रह्मदेवानें नेमलेला संबंध. १५. मान्य झालें. १६. देवांचा. १७. वैवाहिक मंडप.

आच्छादित [1]अंबरें. ॥ १०८ ॥ [2]छप्पन्न देशींचे राजेश्वर। [3]शाण्णव कुळींचे [4]रॉजकुमर। [5]शृंगारिले मनोहर। वस्त्राभरणीं साजिरे. ॥ १०९ ॥ [6]रंगभूमिका

१. आकाशानें. ['अंबरं वाससि व्योम्नि कार्पासे च सुगंधके' इति विश्वः.] २. पूर्वी हिंदुस्थानांत एकंदर छप्पन्न देश (प्रांत) होते अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे. हे छप्पन्न देश एकाच काळीं होते कीं एकाच देशाला निरनिराळ्या तोंडीं मिळालेल्या नांवांच्या समाहारानें छप्पन्न देश बनले याचा पूर्ण शोध लागला नाहीं. छप्पन्न देशांचीं नांवें:—१ काश्मीर, २ नेपाळ, ३ कांभोज, ४ घोटक, ५ पांचाल, ६ कोसल, ७ पांड्य, ८ शकद, ९ बर्भराट, १० विदेह, ११ बंगाल, १२ कुंतल, १३ महाराष्ट्र, १४ बाह्लीक, १५ मगध, १६ कामरूप, १७ सौराष्ट्र, १८ केकय, १९ सौवर्ण, २० गूर्जर, २१ सामुद्र, २२ कर्णाट, २३ साळव, २४ निषध, २५ द्रविड, २६ आंध्र, २७ वत्स, २८ विदर्भ, २९ बोट, ३० लाट, ३१ माळव, ३२ केरळ, ३३ मलय, ३४ मिथिल, ३५ कोसल, ३६ अंग, ३७ वंग, ३८ कुरू, ३९ पुलिंद, ४० मत्स्य, ४१ करहाट, ४२ टेंकण, ४३ मरू, ४४ कलिंग, ४५ कोंकण, ४६ भीर, ४७ पौंड्रक, ४८ कुकुर, ४९ चोल, ५० चेदि, ५१ वैराट, ५२ कर्बर, ५३ सिंधु, ५४ चेदि, ५५ अवंति, ५६ यवन. मुक्तेश्वर—सभापर्व—अ० २ ओंवी १०२ हींत असाच उल्लेख आहे. ३. एकंदर क्षत्रियांचे ९६ वंश होते अशी सामान्य जनांची समजूत आहे. क्षत्रियांचे सूर्यवंश व चंद्रवंश असे जे दोन मुख्य भेद आहेत त्यांचे हे ९६ पोटभेद होत. सांप्रतचे राजेरजवाडे आपण या ९६ कुळांपैकीं एका कुळांतले आहोंत व अस्सल क्षत्रिय आहों असें दाखविण्याचा नेहमीं यत्न करितात. उ० 'जाधव' आडनांवाचे गृहस्थ आपण 'यादव' या पवित्र कुळांतले आहों असें प्रतिपादितात. 'पवार' आडनांवाची मंडळी आपण 'प्रमार' वंशांतले आहों असें म्हणतात. या राजांचीं नांवें सह्याद्रिखंडांत दिलीं आहेत तीं:—अनुज, देवक, पृथु, ऋतुपर्ण, जय, सुश्रीम, सौवाम, सुमंत, कौंडिण, मंडुक, कुशीक, मार्तंड, कामपतीचे पुत्र सोमवंशी—पद्म, शाम, पृथु, श्रीधर, ब्रह्मश, चंपक, शार्दूल, नोल, विद्युत्पति, सुरब्रह्म, रघु, माधव, शैल, मान, श्रीपति, शल, नकुल, शैल, भूरथ, यदु, पौंड्रीक, जघव, मन्मथ, पार्थिव, रंधक, प्रधोष, शशी, दान, सारंग, वज्रदंष्ट्र, देव, मंत्रोद्भव, श्रीपाल, मयुरण्य, सुरसेन, नरहरी, मंडुक, भार्गव, सुग्रीव, सप्तसंधर, चैत्र, धर्म, रिपु, शाश्वत, दान, शाल्मली, जायव, विदर्भ, प्राणताथ, वैजयंत, पार्थिव, भूरिसेन, पृषद, वासुकी, कीर्तिमान, सुवर, गोत्रज, अतिवार, सुदेष्ण, रुक्मरथ, सुरथ, महाराज, अरिमर्दन, प्रीतिनाम, सहस्रजित्, चित्ररथ, सीम, आदि, गज, असीमहीधर, श्वेत, सुक्षेत्र, महाविद्वान्, सुविद्वान्, कामद, श्रीधर, प्रजापाल, देववार, ध्रुववंश, स्वायंभूमनूचा रघुवंश, वैवस्वत मनूचा जनकवंश, पुरूचा कुरुवंश, यदुवंश, सूर्यवंशशिवराज. ४. राजपुत्र. द्रौपदीच्या स्वयंवराचे वेळींही असेंच वर्णन केलें आहे:—'नवखंड आणि सप्तद्वीप। छप्पन्न देशींचे महाभूप। ऐश्र्वर्येसी पातले रूप। पांचाळीचें परिसोनी ॥' [मुक्तेश्वरकृत महाभारत—आदिपर्व—अ० ४१ ओं० ११.] ५. 'शृंगारूनी' असाही पाठ आहे. शृंगारिले=शृंगारिलेले, सुशोभित झालेले. ६. रंगभूमि म्हणजे कोणतेंही कार्य करण्यासाठीं मुद्दाम तयार केलेली जागा. म्हणून 'रंगभूमि' हा

चक्राकृती,[1] । उभ्या ठेल्या भूपाळपंक्ती । त्यांमाजी प्रवेशे दमयंती । माळ हस्तीं पवित्रा. ॥ ११० ॥ वैदर्भीच्या अवलोकनें । सोज्ज्वळ[2] जालीं नृपाळव-दनें । कीं[3] त्या मुखचंद्राचीं[4] किरणें । नेत्रकुमुदें[5] तयांचीं. ॥ १११ ॥ उपाधि[6] सांडुनी परती । चैतन्य एक लक्षिजे चित्तीं[7] । तेंवी नृपांतें त्यजुनी सती । अ-वलोकीत नळातें. ॥ ११२ ॥ 'देवीं[8] माव[9] केली तेथें । नळची भासे सभों-वतें । मुख्यस्वरूप[10] कोण निरुतें । तें तत्वतां नेणवे.' ॥ ११३ ॥ ते[11] वेळीं उभय जोडोनी पाणी । म्हणे, 'स्वामी हो ! ऐका श्रवणीं । काया[12] वाचा आणि मनीं ।

---

शब्द फार व्यापक आहे. साधारण, या शब्दानें युद्धभूमि व नाटक करावयाची जागा यांचा बोध होतो. येथें 'रंगभूमि' किंवा 'रंगभूमिका' या शब्दानें स्वयंवराकरितां सुशोभित केलेली जागा जाणावी.

१. चक्राच्या आकाराची, वर्तुलाकार. २. शोभायमान. ३. 'कीं त्या मुखचंद्राच्या किरणें । नेत्रकुमुदें विकाशलीं ॥' असें पाठांतर. ४. मुखाला व विशेषतः स्त्रीच्या मुखाला चंद्राची उपमा देणें व त्यावर अनेक कोटिक्रम लढविणें संस्कृत कवींना फार आवडतें. स्त्रीचें वर्णन करितांना तिच्या मुखाला चंद्राची उपमा दिल्याशिवाय कवीच्यानें रहावणार नाहीं. यावरून ही आद्य व नित्य उपमा म्हणण्यास हरकत नाहीं. ५. राजांच्या नेत्रांला कुमुदांची उपमा दिली आहे. दमयंतीच्या मुखाला चंद्र म्हटल्यामुळें राजांच्या नेत्रांला 'कुमुदें' म्हटलें आहे. 'कुमुदें' म्हणजे चंद्राच्या किरणांनीं विकास पावणारीं शुभ्र कमळें. सूर्याच्या किरणांनीं हीं कुमुदें कोमजून जातातः—'नोच्छ्वसिति तपनकिरणैश्चंद्रस्यैवांशुभिः कुमुदम्' [कालिदासकृत विक्रमोर्वशीयनाटक—अंक ३ श्लो० १६—निर्णयसागर आवृत्ति—पृ० ७९.] 'कुमुदमपि गतेऽस्तं लीयते चंद्रबिम्बे हसितमिव वधूनां प्रोषितेषु प्रियेषु' [कालिदासकृत ऋतुसंहार—सर्ग ३ श्लो० २३—निर्णयसागर आवृत्ति—पृ० ४५.] ६. 'उपाधि सांडुनि परती । चैतन्य एक लक्षिजे चित्तीं ॥' या वाक्यांत वेदांतशास्त्राचें संपूर्ण सार आणून ठेविलें आहे. 'उपाधि' म्हणजे काय व 'चैतन्य' म्हणजे काय हें समजल्यास जीव मुक्तीला पात्र होतो असें त्या शास्त्राचें मत आहे. चैतन्य एक आहे व तें नित्य आहे. तें उपाधिभेदानें अनेकरूपी दिसतें. ज्याप्रमाणें सूर्य एक असूनही गंगाजलांत व चांडालघटांत निरनिराळा भासतो, तद्वत् चैतन्य एक असूनही, ब्राह्मण, क्षत्रिय, शूद्र, अश्व, श्वान इत्यादि उपाधिभेदेंकरून तें भिन्नभिन्न अनेकरूपी आहे असा भास होतो. मुमुक्षुजन उपाधिकडे दुर्लक्ष करून चैतन्याचेंच नेहमीं चिंतन करीत असतात; व दमयंतीनें उपाधिप्रमाणें निरुपयोगी अशा राजांना सोडून चैतन्याप्रमाणें आनंद देणारा नळ याचाच अंगीकार केला—असा मथितार्थ. ७. 'संतीं' असाही पाठ आहे. ८. देवांनीं, इंद्रादिकांनीं. ९. माया, कपट. १०. मुख्यस्वरूप=खरा नळ. ११. 'ते वेळीं जोडोनी उभय पाणी' असाही पाठ आहे. १२. विचार, उच्चार आणि आचार या तिहींमध्यें—असा भाव.

**न**ळचि वसे माझिया. ॥ ११४ ॥ हें जरी असेल सत्य भावें । तरी [1]येणें सत्य साहाय्य व्हावें । **न**ळस्वरूप दाखवावें । [2]प्रकट दृष्टी माझिया. ॥ ११५ ॥ सत्य [3]ब्रह्म [4]**ई**श्वर सत्य । **वे**द **व**न्ही **सू**र्य सत्य । शुद्ध स्वधर्म माझा सत्य । तरी **न**ळ प्रकटो माझ्या [5]हृदयीं. ॥ ११६ ॥ **द**मयंती आपुली कुमरी । ऐसें भावोनी सकळ [6]सुरीं । मातें [7]आपुलेनी करीं । **न**ळाहातीं [8]वोपणें.’ ॥ ११७ ॥ ऐशी परिसोनी विनंती । कृपेनें द्रवल्या देवमूर्ती । म्हणती, ‘पवित्र परमसती । छळूं नये सर्वथा.’ ॥ ११८ ॥ काढूनियां मायापटला । उघड दृष्टी दाखविलें **न**ळा । जैसें तुटलिया [9]आभाळा । सूर्य अंबरीं जेंवी दिसे. ॥ ११९ ॥ [10]विबुध ओळखिले [11]चिन्हीं । [12]अनिमिषनयनीं । [13]पाय स्पर्शले नाहीं धरणी । [14]तेजें तरणी प्रकाशे. ॥ १२० ॥ [15]दिव्यें वस्त्रें, दिव्य आभरणें, । दिव्य गंध, दिव्य सुमनें, । [16]द्रुम छायातीत [17]ऋणें । [18]जरा विकार असेना. ॥ १२१ ॥ हातीं दाविती **न**-

१. या कारणामुळें. २. उघड करून, स्पष्ट. ३. ‘सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म’ अशी ‘ब्रह्म’शब्दाची व्याख्या आहे. ४. ईश्वराची **प**तंजलीनें अशी व्याख्या सांगितली आहे:—‘क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषण ईश्वरः’. अर्थः—क्लेश म्हणजे अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश हे पांच; आणि कर्में—शुक्ल, कृष्ण, शुक्लकृष्ण, आणि अशुक्लाकृष्ण अशीं चार. विपाक म्हणजे कर्मफलें आणि आशय म्हणजे संस्कार. हे क्लेशादिक ज्याला कालत्रयीं स्पर्श करीत नाहींत असा जो पुरुषविशेष, आणि पुरि म्हणजे माया तीमध्यें शयन करणारा तो ईश्वर होय. ५. ‘दृष्टी’ असाही पाठ आहे. ६. सुरांनीं. ‘सुर’शब्दाच्या तृतीयेचें अनेकवचन. ७. आपल्या हातांनीं. मला पुत्रीत्वें स्वीकारून आपल्या हातांनीं **न**ळाच्या स्वाधीन करा—असा भावार्थ. ८. अर्पणें. ९. ढग. १०. देव. येथें इंद्र, वरुण, अग्नि आणि यम समजावे. ११. पुढें सांगितलेल्या चिन्हांनीं. १२. पापण्या न हालणें. ‘निमिषोन्मेषरहित’ असाही पाठ आहे. नास्ति निमेषे वृत्तिः येषां तानि अनिमेषानि. अनिमेषानि नयनानि अनिमेषनयनानि. देवांच्या पापण्या हालत नाहींत अशी समजूत आहे. म्हणूनच देवांना व मत्स्यांना ‘अनिमिष’ असें नांव आहे. [‘सुरमत्स्यावनिमिषौ’ इत्यमरः.] १३. देवांचे पाय भूमीला लागत नसतात अशी समजूत आहे. देवांच्या या विशिष्ट गुणामुळें देवांनीं स्वस्वरूप प्रगट करण्यापूर्वींच दमयंतीनें पांच नळांपैकीं खरा नळ शोधून काढिला असेंही सांगण्यांत येतें. १४. (तेजें) इंद्रादिकांच्या तेजानें (तरणी) सूर्य (प्रकाशे) प्रकाशित झाला; म्हणजे देवांच्या प्रकाशानें सूर्यच उगवला आहे कीं काय असा भास होऊं लागला. १५. स्वर्गांतील. १६. ‘धरणीवरी दिसत तरुणें’ व ‘पृथ्वीवरी नित्य तरुणें’ ‘धर्मछायांतील तरुणें’ असे पाठभेद आहेत. १७. या चरणाचीं चार पाठांतरें होण्यास याचा संदिग्धार्थबोध कारण होय. ‘द्रुम छायातीत ऋणें’ हा अपपाठ असावा असें वाटतें. कारण यापासून पूर्णपणें कांहींच अर्थबोध होत नाहीं. मागच्या पुढच्या वाक्याशीं त्याचा संबंध जुळत नाहीं. १८. वार्द्धक्य.

ळातें । म्हणती, 'माळ घालीं यातें । आम्ही प्रसन्न होउनी तूतें । **न**ळ भ्रतार दीधला.' ॥ १२२ ॥ नमस्कार करुनी [1]चरणां । पुढां [2]चामके चंद्रवदना । वराया [3]मधुसूदना । [4]सिंधुतनया ज्यापरी. ॥ १२३ ॥ [5]ऐकवट मिळाले [6]कंदर्प ।

१. देवांच्या पायांला. २. जाई. ३. मधुसूदन=मधु नामक दैत्यास मारणारा. मधु=जीवांचें शुभाशुभकर्म=जीवांचें बरें वाईट कर्म या कर्मांचें सूदन करणारा किंवा नाश करणारा. ४. समुद्रमंथनाच्या वेळीं लक्ष्मी समुद्रांतून निघाल्यामुळें तिला 'सिंधुतनया' म्हणतात. येथें लक्ष्मी-स्वयंवराकडे कवीचें लक्ष आहे. ५. 'एकवट मिळाले **कंदर्पकोटी** । तेंवी नैषध देखिला दृष्टीं' या वाक्यांत उपमालंकारमिश्रित अतिशयोक्ति नामक अलंकार झाला आहे. उपमालंकाराची व्याख्या निरनिराळ्या साहित्यग्रंथकारांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें दिली आहे. तरी त्यांच्यांत फार भेद आहे असें नाहीं:—(१) 'चमत्कारि सहृदयहृदयहारि उपमानोपमेययोः साम्यमुपमा' [वाग्भटः], (२) 'साम्यं वाच्यमवैधर्म्यं वाक्यैको उपमा द्वयोः ।' [विश्वनाथकविः], (३) 'उपमितिक्रियानिष्पत्तिमत्साद्दृश्यवर्णनमदृष्टमव्यंग्यमुपमालंकारः' 'स्वनिषेधापर्यवसायि साद्दृश्यवर्णनं वा तथाभूतं तथा' [श्रीमदप्पय्यदीक्षितः], (४) 'उपमा यत्र साद्दृश्यलक्ष्मीरुल्लसति द्वयोः ।' [जयदेवः], (५) 'साद्दृश्यं सुंदरं वाक्यार्थोपस्कारकमुपमालंकृतिः' [पंडितराजश्रीजगन्नाथः]. या सर्व लक्षणांवरून उपमालंकारांत दोन पदार्थांचें साद्दृश्य हें मुख्यांग होय, असें सिद्ध होतें. प्रस्तुतस्थलीं 'कंदर्पकोटी' व 'नैषध' यांच्यांतलें साद्दृश्य वर्णिल्यामुळें हा उपमालंकार झाला. नैषधाला 'कंदर्पकोटी'ची उपमा देऊन कवीनें अतिशयोक्तीची कमाल केली आहे. कारण कंदर्प (मदन) हा सौंदर्याचा पुतळा; किंवा मूर्तिमान् सौंदर्य म्हणजेच कंदर्प. म्हणूनच भवनेत्राग्नीनें भस्मावशेष झालेल्या मदनाकरितां शोक करितांना त्याला उद्देशून रति म्हणते:—'उपमानमभूद्विलासिनां करणं यत्तव कांतिमत्तया' [कुमारसंभव—स० ४ श्लो०५ पृ० ६४—निर्णयसागर आवृत्ति.] म्हणून मदनापेक्षां अधिक सुंदर मूर्ति कल्पिल्यास अतिशयोक्ति होईल, हें निर्विवाद आहे. आतां, 'कंदर्पकोटी' एककोटी मदन. म्हणजे मदनापेक्षां कोटिपट सौंदर्यवान्; अर्थात् येथें अतिशयोक्तीची कमाल झाली असें म्हणावें लागतें, म्हणूनच हा उपमालंकार-मिश्रित अतिशयोक्त्यलंकार होय. किंवा दंडीनें जे उपमेचे अनेक भेद केले आहेत त्यांतला हा अतिशयोपमालंकार होय असें समजावें. अतिशयोक्ति शिवाय कोणताच अलंकार होऊं शकत नाहीं असें कित्येक अलंकारशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे:—'प्रस्तुतोत्कर्षरूपाया अस्या (अतिशयोक्त्याः) एव वैचित्र्यरूपत्वात् सर्वत्राव्यभिचारित्वाच्चालंकारांतराणामुपजीव्यत्वम् । एतदभावेन वैचित्र्याभावेन विद्यमानानामप्युपमादीनां नालंकारत्वम्. एवं सर्वत्रैवातिशयोक्तिसद्भावेऽपि वैचित्र्यांतरेणालंकारांतरव्यपदेशः । वैचित्र्यांतराभावे त्वतिशयो व्यपदेश इति बोद्धव्यम् ।' [काव्यादर्श—मालिन्यप्रोंछिनी, पृ० २१३.] ग्रंथकारांच्या म्हणण्याचा आशय असा कीं सर्व अलंकारांत चमत्कृतीचें बीज अतिशयोक्ति होय. ज्यांत प्रत्यक्ष अतिशयोक्ति किंवा त्याचें एकादें रूपांतर नाहीं तो अलंकारच नव्हे. अतिशयोक्तींत किंचित् दुसऱ्या प्रकारच्या अर्थाचें मिश्रण करूनच इतर सर्व अलंकार साधिले आहेत. जेथें तसें मिश्रण नसतें म्हणजे

कोटी । तेंवी नैषध देखिला दृष्टी । परम आल्हादें गोरटी । लज्जायुक्त जवळिकें. ॥ १२४ ॥ उभय हस्तें घेऊनी माळा । आवडी घातली नैषधगळां । हाहाकार पृथ्वीपाळां । थोर झाला अपमान. ॥ १२५ ॥ ऋषि गर्जती आशी-

---

वैचित्र्यांतराचा अभाव असतो तेथें अतिशयोक्ति हीच स्वातंत्र्यानें अलंकाररूप होते. अलंकारशास्त्रज्ञाच्या म्हणण्याला, मुक्तेश्वराचें 'एकवट मिळाले कंदर्पकोटी । तेंवी नैषध देखिला दृष्टी' हें वाक्य उदाहरणादाखल शोभतें. ६. (कं सुखं तस्मै तत्र वा दृप्यतीति कंदर्पः) हा स्त्रीपुरुषप्रेमाचा व सौंदर्याचा अधिपति होय. याचें असें वर्णन सांपडतें:–'कामदेवस्तु कर्तव्यः शंखपद्मविभूषणः । चापबाणकरश्चैव मदाकुंचितलोचनः ॥ रतिप्रीतिस्तथा शक्तिर्भार्याश्चैतास्तथोज्वलाः । चतस्रस्तस्य कर्तव्याः पत्न्यो रूपमनोहराः ॥ चत्वारश्च करास्तस्य कार्या भार्यास्तनोपगाः । केतुश्च मकरः कार्यः पंचबाणमुखो महान् ॥' [प्रो० तर्कवाचस्पतिकृत वाचस्पत्य.] हा ब्रह्ममानसपुत्रांपैकीं एक असून याच्या स्त्रीचें नांव रति होय. ऋषि व मुनि यांचा तपोभंग करण्यास इंद्राला मदनापासून पुष्कळ साहाय्य होत असे. इंद्राच्या आज्ञेवरून एकदां हा शंकराचा तपोभंग करण्याकरितां व शंकराच्या मनांत पार्वतीविषयीं प्रेम उत्पन्न करण्याकरितां, तपश्चर्येंत निमग्न असलेल्या शंकराजवळ गेला व त्यावर पुष्पायुध सोडूं लागला. मदनाच्या बाणानें तपश्चर्येचा भंग झाल्याबद्दल शंकराला फार राग आला व त्यानें आपल्या तृतीय नेत्रानें मदनाला भस्मावशेष करून सोडिला. तेव्हांपासून याला 'अनंग' असें नांव पडलें. ग्रीक लोकांत हा कामदेव Cupid या नावानें प्रख्यात होता. याचें असें वर्णन केलेलें आहे:—'A eelebrated deity among the ancients, God of love and love itself........Cupid is represented as a winged infant, naked, armed with a bow and a quiver full of arrows.' असो. येथें नळाच्या सौंदर्याचें वर्णन करावयाचें होतें म्हणून सौंदर्याविषयीं अत्यंत प्रख्यात जो मदन त्याची उपमा दिलेली आहे.

१. गोरटी=गोरटी स्त्री. गौरवर्णाची स्त्री; सुंदर स्त्री–असा भाव. येथें विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग केला आहे. ही रीत संस्कृतापासून उचलली असावी असें वाटतें. ही रीत इंग्रेजी भाषेंतही बरीच प्रचारांत आहे. २. 'दुभऊनि' असाही पाठ आहे. ३. 'सूद्‌ली' असाही पाठ आहे. सूदणें=ठेवणें; घालणें. संस्कृतांत 'सूद' धातूचा ठार करणें असा अर्थ आहे. तो सांप्रत ठिकाणीं लागू पडत नाहीं. येथें 'सूद' हा स्वतंत्र प्राकृत धातू आहे असें समजावें. ज्ञानदेव, तुकाराम, मोरोपंत इत्यादि कवींनींही 'घालणें' याच अर्थी हा धातु योजिलेला आहे. ४. 'ततो हाहेति सहसा मुक्तः शब्दो नराधिपैः । देवैर्महर्षिभिस्तत्र साधुसाध्विति भारत ॥' [महाभारत–वनपर्व–अ० ५७ श्लो० २९.] पृथ्वीपाळ (राजे) हाहाकार करूं लागले याचें कारण हें कीं दमयंती आपणाला न वरितां नळाला वरिती झाली याबद्दल त्यांना दुःख झालें. ५. 'अवमानें' असें पाठांतर. ६. द्रौपदीच्या स्वयंवराच्या प्रसंगींही असेंच वर्णन केलें आहे:–'गंधर्वदत्तविद्यावरें । यंत्र भेदितां धनुर्धरें । सात्विक भाव भिन्नाकारें । सकळां देहीं

र्वादें । जयजयकार केला विबुधें । दिव्य पुष्पकीं[1] देववृंदें । दिव्य सुमनें[2] वर्षती. ॥ १२६ ॥ दिव्य दुंदुभी[3] मंगळ तुरें । उभय लोकीं लागलीं गजरें । लोकपाळ अत्यादरें । निकट आले आवडी. ॥ १२७ ॥ चौघे श्रेष्ठ सुरेश्वर । देते जाले अष्ट वर । मस्तकीं ठेवूनियां अभय कर । दोनी दोनी एकैकें. ॥१२८॥ 'प्रत्यक्ष अग्नीचें दर्शन । इच्छिल्या ठायीं[5] शीघ्र गमन । हो कां' ऐसें सहस्रनयन ।

---

उदेले ॥ ७४ ॥ अष्टौभावें अद्भुत प्रेमा । ऋषींच्या अंगीं उदेल्या रोमा । निर्जरांच्या नेत्रसद्मा । पातीं लावों विसरलीं. ॥ ७५ ॥ दिव्यदुंदुभींच्या गजरीं । पुष्पवर्षाव मांडिला सुरीं । टाळी वाजवुनि ऋषेश्वरीं । आशीर्वादें गर्जती. ॥ ७६ ॥ हर्षनिर्भर राजवाळा । आवडीचा भरू आगळा । हातीं घेउनी पुष्पमाळा । घालीं गळां पार्थाच्या ॥ ७७ ॥ वाजों लागलीं मंगळतुरें । जन गर्जे जयजयकारें । ................. । ............... ॥ ७८ ॥' [मुक्तेश्वरकृत महाभारत—आदिपर्व—अ० ४१.]

१. पुष्पक हें कुबेराचें इच्छागामि विमान. हें कुबेराला तपश्चर्या केल्यामुळें प्राप्त झालें. पुढें कुबेरापासून रावणानें हें विमान बलात्कारानें घेतलें. रावणाचा वध केल्यानंतर हें रामाला मिळालें. अशी पुष्पक विमानाची हकीकत आहे. तरी प्रस्तुतस्थळीं 'पुष्पक' हा शब्द 'विमान' या अर्थीं योजिलेला आहे असें लक्षणेनें जाणावें. सर्वदेववृंदावनामध्यें कुबेरही पुष्पक विमानावर आरूढ होऊन आला व त्याचें विमान सर्वोत्कृष्ट असल्यामुळें कवीनें विमानांबद्दल पुष्पकाचाच उपयोग केला आहे. किंवा सर्व विमानांतून पुष्पांची एकसारखी वृष्टि झाल्यामुळें, उत्प्रेक्षा करून कवीनें सर्व विमानांना 'पुष्पक' म्हटलें आहे असेंही मानितां येईल. २. पुष्पें. ['स्त्रियः सुमनसः पुष्पं प्रसूनं कुसुमं समम्' इत्यमरः, 'सुमनाः पुष्पमाल्ययोः स्त्रियाम्' इति मेदिनी]. कित्येक ग्रंथकारांच्या मतें 'सुमनस्' हा शब्द नेहमीं अनेकवचनांतच असतो. 'आपः सुमनसो वर्षा अप्सरः सिकताः समाः । एते स्त्रियां बहुत्वे स्युः.............. ॥' ३. दुंदु शब्देन भाति इति दुंदुभिः=भेरी. ४. वाजंत्रीं. ५. तुला प्रत्यक्ष अग्नीचें दर्शन होईल अशा अर्थाचा वर देण्याला काय अधिकार होता हें समजत नाहीं. शिवाय अशा प्रकारच्या वराची आवश्यकताही नव्हती. कारण प्रत्यक्ष अग्नि नलापुढें उभा असतां, तुला अग्नीचें दर्शन होईल असें म्हणणें वेडेपणाचें होईल. मूळभारतांतही इंद्रानें अशा प्रकारचा वर दिल्याचा उल्लेख नाहीं. 'प्रत्यक्षदर्शनं यज्ञे गतिं चानुत्तमाशुभाम् । नैषधाय ददौ शक्रः प्रीतमाणः शचीपतिः ॥' [वनपर्व १७-३६] 'प्रत्यक्षदर्शन मखीं, सुगति असे वर नलासि वासव दे ।' [मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—अ० ४ गी० ७८] असें मोरोपंतानेंही म्हटलेलें आहे. 'इच्छिल्या ठाईं शीघ्र गमन' हा जो इंद्राचा द्वितीयवर त्याचाही मूळभारतांत व पंतांच्या भारतांत उल्लेख नाहीं हें वरील उताऱ्यावरून समजून येईलच. हा दुसरा वर हिशोबांत धरिल्यास एकंदर, इंद्रानें तीन वर दिले असें होईल. (१३०वी ओंवी उत्तरार्ध पहा) व 'दोनीं दोनीं एकैकें' (एक एक लोकपाळानें दोन दोन वर दिले) या वचनाला बाध येईल म्हणून 'प्रत्यक्ष अग्नीचें दर्शन। इच्छिल्या ठाईं शीघ्र गमन' हे दोन

वरदोत्तरीं गौरवी. ॥ १२९ ॥ शेखीं[1] यावें उत्तम गती । ऐसें बोलतां **अ**मर-पती । **पा**वक[2] म्हणे, 'राजनृपती! । वरप्रदान घे माझें. ॥ १३० ॥ इच्छिशील जे अवसरीं[3] । अनळ प्रसवेल[4] तुझ्या घरीं । प्रकाश पडोनी[5] अंधकारीं । दिव्य ज्योतीसारिखा[6]. ॥ १३१ ॥ अन्नें स्वादुतर होती[8] । निपजलीं अन्नें इच्छिलें देती[9].' । 'धर्मी असो सदा रती[10]' । **ध**र्मराज[7] म्हणतसे. ॥ १३२ ॥ 'इच्छितांची पवित्र पाणी । प्रवाहें लोटेल मंदाकिनी[12] । माळा[13] अम्लान[14] दिव्य सुमनी' । **व**-रुणें कंठीं सूदली. ॥ १३३ ॥ ऐसे देउनीयां वर । स्वर्गभुवना गेले सुरेश्वर । निरुत्साहें राजेश्वर[15] । सर्व गेले स्वस्थाना. ॥ १३४ ॥ स्वदेशाप्रती गेलिया राया । **भी**मकें मांडिलें विवाहकार्या । आप्त सुहृद् सोयरियां । पाचारुनी सं-भ्रमें[16]. ॥ १३५ ॥ आसनीं वसनीं[17] धनीं दानी । याचक गौरविले बहुमानीं । हस्ती वाजी[18] हेमाभरणीं[19] । अपार द्रव्यें अर्पिलीं[20]. ॥ १३६ ॥ स्वल्प[21] काळ क-रुनी वस्ती । आज्ञा मागोनी **वि**दर्भाप्रति । **द**मयंतीशीं **न**ळनृपती । आत्म न-गरा पातला. ॥ १३७ ॥ अंगनारत्न पावोनी क्षिती । **पु**ण्यश्लोक चक्रवर्ती[22] ।

---

चरण अपपाठ असावेत असें वाटतें. 'प्रत्यक्ष अग्नीचें दर्शन' याबद्दल 'प्रत्यक्ष यज्ञीं दर्शन' असा शुद्ध पाठ असावा. ६. 'काळीं' असाही पाठ आहे.

१. 'शेवटीं पावें' असाही पाठ आहे. २. अग्नि. यानें नळाला दिलेले वर येणेंप्रमाणें:—'अ-ग्निरात्मभवं प्रादाद्यत्र वांछति नैषधः । लोकानात्मप्रभांश्चैव ददौ तस्मै हुताशनः॥' [महाभारत—वनपर्व—अ० ५७ श्लो० ३७.] ३. काळीं, वेळीं. ४. प्रसवेल=निपजेल, उत्पन्न होईल, प्रग-टेल. 'प्रवेशेल तुझ्या करीं' असाही एक पाठ आहे. ५. 'पडेल' असाही पाठ आहे. ६. सूर्य. [अग्नौ दिवाकरे च ज्योतिःपुंसि' इति हैमः] 'ज्योतिस्' शब्दाचे 'सूर्य' व 'अग्नि' असे जरी दोन अर्थ होतात तरी येथें पहिलाच अर्थ ग्राह्य आहे. कारण प्रस्तुतस्थलीं 'अनळ' (अग्नि) हा उपमेय असून 'ज्योती' उपमान आहे. 'ज्योती' चा 'अग्नि' अर्थ घेतल्यास उपमेय व उपमान यांच्यांत भेद राहणार नाहीं व कवीवर व्यर्थ खटाटोपाचा आरोप येईल. ७. हा वर **ध**र्मानें दिला असें मूळांत सांगितलें आहे. 'यमस्त्वन्नरसं प्रादात्' (मूळ) 'पाकीं पटुत्व, धर्मी स्थिति,' हे वर दोन **ध**र्म दे त्यातें.' [मोरोपंतकृत महाभारत.] ८. 'अन्नें निपजती हातीं' असाही पाठ आहे. ९. 'आणि इच्छिलीं येती' असाही अन्य पाठ आहे. १०. प्रीति. ११. वय. १२. भागीरथी. १३. ज्या फुलाला नळ हात लावील त्याला म्लानता येणार नाहीं असा वरुणानें वर दिला. १४. न कोमेजलेली. १५. नळाशिवाय जितके स्वयंवराला आले होते तितके. १६. सन्मानानें. १७. वस्त्रांनीं. १८. घोडे. १९. सुवर्णालंकारांनीं. २०. 'अमूल्य वस्त्रें अर्पिलीं' व 'पारिवर्ह अर्पिलें' असे अन्य पाठ आहेत. २१. 'स्वेच्छाकाळ' असाही पाठ आहे. २२. चक्रवर्ती पुरुषाचें लक्षण सामुद्रिक ग्रंथांत आहे तें:—'अतिरक्तः करो यस्य प्रथितांगुलिको

शचीसंगें अमरपती । तेंवी शोभला भूतळीं. ॥ १३८ ॥ शृंगारवनीं रमणी-यवनीं । नाना पर्वत गंगापुलिनीं । दमयंतीशीं नैषध गुणी । स्वेच्छानंदें क्रीडत. ॥ १३९ ॥ ययाती नहुषातुल्य सांग । केले अश्वमेध याग । दीनोदर्की

---

मृदुः । चापांकुशांकितः सोऽपि चक्रवर्ती भवेद्ध्रुवम् ॥' (राघवभट्टकृत 'अर्थद्योतनिका' नामक अभिज्ञानशाकुंतलटीका—अंक ७ श्लोक १६ पृष्ठ २४३ निर्णयसागर आवृत्ति. द्वितीय संस्करण.) चक्रवर्ती=चक्रे भूमंडले राजमंडले वा वर्तयितुं शीलमस्य । यद्वा चक्रं सैन्यं वर्तयितुं शीलमस्य । अवश्यं वा चक्रं वर्तयति । असे या शब्दाचे विग्रह आढलतात.

१. शचीच्या सादृश्यानें दमयंतीचें वैभवातिशय सुचविलें. २. यालाच प्रमदवन असें म्हणतात. राजवाड्याला जोडूनच, राजा व राजपत्नी यांच्या विहाराकरितां, जो बाग मुद्दाम तयार केलेला असतो त्याला शृंगारवन किंवा प्रमदवन म्हणतात. अशा प्रकारच्या वनांतील वसंतशोभेचें वर्णन करितांना कालिदासानें पुरूरव्याकडून म्हणविलें आहे:—'अग्रे स्त्रीनख-पाटलं कुरवकं श्यामं द्वयोर्भागयोः बालाशोकमुपोढरागसुभगं भेदोन्मुखं तिष्ठति । ईषद्बद्धर-जःकणाग्रकपिशा चूते नवा मंजरी मुग्धत्वस्य च यौवनस्य च सखे मध्ये मधुश्रीः स्थिता ॥' [विक्रमोर्वशीयम्—अंक २ श्लोक ७ पृ० ३६ निर्णयसागर आवृत्ति.] ३. गंगेच्या (वालुकामय) तटावर. गंगेच्या कांठीं न येणाऱ्या मानवांचा धिक्कार करून कविराज जगन्नाथपंडित म्हणतातः—'नरान्मूढांस्तत्तज्जनपदसमासक्तमनसो, हसंतः सोल्लासं विकचकुसुमव्रातमिषतः । पुनानाः सौरभ्यैः सततमलिनो नित्यमलिनान् सखायो नः संतु त्रिदशतटिनीतीरतरवः ॥' [गंगालहरी—४३.] अर्थः—(हे गंगे!) आपण ज्या ज्या देशांत राहतों त्याच देशांत निरंतर राहण्याविषयीं ज्यांचें अंतःकरण अगदीं आसक्त झालें आहे अशा आम्हां सारासारविचारशून्य पुरुषांना, आपल्या प्रफुल्लित झालेल्या पुष्पांच्या मिषानें (जणूं काय) हसणारे व आपल्या पुष्पांच्या सुगंधानें जन्मतः मलिन अशा पामरांना पवित्र करणारे तुझ्या तीरावरील वृक्ष मित्रतुल्य असोत. ४. नवयुवतीसह कांहीं दिवसपर्यंत पर्वतावर व नदीच्या कांठीं संचार करण्याची पूर्वी राजेलोकांत चाल होती असें दिसतें. उर्वशीसह पुरूरव्यानें गंधमादनीं व मंदाकिनीतटावर विहार केल्याबद्दल विक्रमोर्वशीयांत उल्लेख आहे. सांप्रत पाश्चात्य लोकांत 'honeymoon' (आनंदमास) या नांवानें जो विधि प्रख्यात आहे तसल्याच प्रकारचा हा क्रीडनविधि असावा. ५. हा चंद्रवंशांतील एक प्रख्यात राजा. याची वंशावळी अशीः—चंद्राचा पुत्र बुध; बुधाचा पुत्र पुरूरवस्; पुरूरवसाचा पुत्र आयुराजा; आयुराजाचा ज्येष्ठ पुत्र नहुष. सुस्वधा पितरांच्या विरजा नांवाच्या कन्येबरोबर याचा विवाह झाला होता. तिजपासून याला यति, ययाति, संयाति, अयति, वियति आणि कृति असे सहा पुत्र झाले. वृत्रासुराच्या भीतीनें स्वस्थानापासून च्युत होऊन जेव्हां इंद्र पाण्यांत लपून बसला तेव्हां सर्व देवांनीं ऋषींच्या संमतीनें, यज्ञाविषयीं, सद्गुणांविषयीं व पराक्रमाविषयीं प्रख्यात अशा या नहुष राजाला इंद्रपदाचा अधिकारी केलें. इंद्रपद उपभोगित असतां, इंद्राणीचाही आपणास उपभोग घेतां यावा अशी एकदां याच्या मनांत इच्छा उत्पन्न

सर्व जग । अभिषेकिलें पवित्रें. ॥ १४० ॥ धरा[1]मंडळीं[2] प्रताप[3]तरणी । प्रस-

झाली. त्यानें त्याप्रमाणें इंद्राणीकडे बातमी पाठविली. परंतु शतक्रतु केलेल्या मनुष्याशिवाय इतरांना इंद्राणीचा उपभोग घेण्याचा अधिकार नसल्यामुळें इंद्राणी घोंटाळ्यांत पडली. शेवटीं बृहस्पतीच्या सांगण्यावरून तिनें नहुषास असा निरोप पाठविला कीं, 'तुम्हीं अपूर्व वाहनावर बसून मजकडे याल तर मी तुमच्या सेवेस हजर राहीन.' अपूर्ववाहन म्हणजे काय याविषयीं विचार करून सप्तर्षींना कोणीही वाहनास न लावल्यामुळें तेंच अपूर्ववाहन असें वाटून नहुषानें सप्तर्षींना वाहनास लाविलें व त्यांत बसून तो इंद्राणीकडे जाऊं लागला. लौकर तिजकडे जाण्याची उत्कंठा प्रबल झाल्यामुळें नहुष ऋषींच्या मस्तकांवर पाय ठेवून 'सर्प सर्प' (लौकर चला, लौकर चला) असें बोलला. याबद्दल अगस्त्य ऋषीला राग आला व त्यानें 'तूंच सर्प होऊन भूतलावर पडशील' असा नहुषास शाप दिला. या शापानें नहुष अजगर होऊन यामुनपर्वतावरील सरोवरांत पडला व द्वापारांत भीमास ग्रासिल्यावरून युधिष्ठिराशीं झालेल्या वादविवादानें मुक्त झाला. [भारत—वनपर्व व भागवत ६ स्कंध पहा.] ६. संपूर्ण, कांहीं एक न्यूनता न ठेवतां. ७. अश्वमेधयाग सर्व यागांत श्रेष्ठ आहे असें मनूचें म्हणणें आहे. '...अश्वमेधः क्रतुराट् सर्वपापापनोदनम्' [मनुसंहिता—अ० ११ श्लो० २६१] अश्वमेध हा एक धार्मिक व राजकीय विधि होय. वेदादि धर्मपुस्तकांत सांगितला आहे म्हणून धार्मिक व सर्व राजांना जिंकून सार्वभौमत्व संपादण्यासाठीं हा याग केला जातो म्हणून हा राजकीय याग होय. सार्वभौमराजांशिवाय इतरांनीं अश्वमेध करूं नये असा नियम आहे. 'राजा सार्वभौमोऽश्वमेधेन यजेत, नाप्यसार्वभौमः' [आपस्तंब.] यावरून नलराजा सार्वभौम होता व आपलें सार्वभौमत्व कायम करण्याकरितां त्यानें अश्वमेध याग केले असें दिसतें. अगोदर अश्वमेधाची चाल निघाली तेव्हां यज्ञांत अश्वाला मारीत नसत व अश्व मारण्याची चाल मागून निघाली असें कित्येक विद्वानांचें म्हणणें आहे. स्वामी दयानंदादि आधुनिक विद्वानांनीं 'अश्वमेध' या शब्दांतल्या 'अश्व' शब्दाचा 'अन्न' असा अर्थ केला आहे. ८. अनुरूप श्लोकः—'स विश्वजितमाजह्रे यज्ञं सर्वस्वदक्षिणम् । आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव ॥' [रघुवंश—स० ४ श्लो० ८६.] अर्थः—'आचरूनि विश्वजित् तो रघु देई सर्व वित्त विप्रांला । सज्जन धन सांठविती मेघांसम सर्व दान करण्याला. ॥'

१. या व याच्या पुढच्या दोन ओंव्यांत उत्तम रूपकालंकार आहे. या ओंवींतील रूपक अशा रीतीनें आणखी स्पष्ट करतां येईल. [नळरूपी] प्रतापतरणी (तेजस्वी सूर्य) धरामंडळीं (पृथ्वीरूपी आकाशीं) [प्रकाशत असल्यामुळें] [राज्यरूपी सरोवरांतील] प्रजानलिनी (प्रजारूपी कमलिनी) प्रसन्नवदना (संतुष्टमुखी) [झाली] [व त्या सरोवरांत] धर्मसंपदा हीं दोन्हीं चक्रवाकें एकत्र [वसती.] २. 'मंडपीं' असा अन्य पाठ आहे. ३. सूर्याच्या किरणांनीं कमलिनी प्रफुल्लित होते हें प्रसिद्धच आहे व यावरूनच सूर्याला 'कमलमित्र' असें नांव पडलें आहे. सूर्याचें सादृश्य नलाला दिल्यामुळें 'प्रतापी' हें विशेषण नलालाही लागू पडतें. दुष्टांना दंडन करून न्यायानें राज्य चालविल्यामुळें 'प्रतापी' हें नळाचें सार्थक विशेषण होय.

त्नवदना [1]प्रजानलिनी। [2]धर्म संपदा हीं दोन्ही । [3]चक्रवाकें एकत्र. ॥ १४१ ॥
[4]दारिद्र्य दोषाची हो [5]राती । [6]नाहींच केली सर्व जगती । [7]दुर्जन[8]तारकाची वस्ती ।
पाहतां कोठेंही दिसेना. ॥ १४२ ॥ [9]पाषंड[10]उलूकांचे घुंगाट । नाहीं कुतर्क
[11]तस्करवाट । हंसें[12] कोकिल साधुश्रेष्ठ। [13]**विष्णु**स्मरणें [14]गुंजती.॥१४३॥ [15]वसुधा पा-
ळिली बहुत काळ । कीर्तीनें भरला [16]ब्रह्मगोल । '[17]पुण्यश्लोक राजा **नळ** । [18]स्मरणें
नासती [19]अघें तीं.' ॥ १४४ ॥ [20]यांपरी भोगिली ऐश्वर्यदशा । पुढें पातली घोर

---

सूर्याच्या किरणानें ज्याप्रमाणें कमलिनी प्रफुल्लित होतात, त्याप्रमाणें **न**ळाच्या न्यायी वर्तनानें प्रजाजन आनंदमग्न होता—असा भावार्थ.

१. प्रजारूपी कमलिनी. २. 'धर्मसंप्रदायें दोन्हीं' असा अन्य पाठ आहे. ३. काल्पनिक प्राणी. यांच्याविषयीं अशी समजूत आहे कीं चक्रवाक व चक्रवाकी यांचा जोडा दिवसभर एकत्र सुखानें असतो व रात्र झाल्याबरोबर त्यांची तुटातूट होते व रात्रभर तो विरहानें पीडित असतो व प्रातःकाळीं पुनः भेटतो. 'चक्रवाकें' म्हणजे चक्रवाक व चक्रवाकी यांची जोडी असें समजावें. ज्यांना चक्रवाकांची उपमा दिली आहे अशा 'धर्म संपदा' या दोन शब्दांपैकीं पहिला पुल्लिंगी व दुसरा स्त्रीलिंगी आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे व यामुळें रूपकाला विशेष शोभा आलेली आहे. आकाशांत सूर्य असेपर्यंत चक्रवाकांचा वियोग होत नाहीं, तसेंच **न**ळ राज्यावर असे तोंपर्यंत धर्म व संपदा यांची तुटातूट झाली नाहीं म्हणजे सर्व प्रजा धनसंपन्न असून धर्मानें चालत होती—असा या ओंवीचा ध्वनितार्थ. ही ओंवी प्रथमदर्शनीं फारशी महत्वाची व रसवंत दिसणार नाहीं; परंतु ही ओंवी जसजशी चाखावी तसतसा रस अधिक सुटून तिचा खमंगपणा वाढत जातो. म्हणून ही ओंवी नारिकेलपाकाचें उत्तम उदाहरण होय. ४. या व याच्या पुढच्या ओंवींत राज्याला सुंदरवन कल्पून रूपकानें त्याचें वर्णन केलें आहे. ५. रात्र. रात्रीमुळें अनेक अन्याय घडतात व दारिद्र्यामुळेंही अनेक दोष घडतात म्हणून दोघांचें साम्य. ६. नाहींशी केली. ७. 'दुर्जन तस्करांची वस्ती' असाही पाठ आहे. ८. रात्र सरून दिवस उगवल्यानंतर तारका दिसत नाहींत हें प्रसिद्धच आहे. ९. पाखांडी. १०. घुवड. दिवसा घुवड बाहेर पडत नाहींत. सूर्यतेजाला भिऊन दडून बसतात हें सुप्रसिद्ध आहे. ११. चोरांचा रस्ता. वाटसरूंच्या रस्त्यावर बसून त्यांना लुटणाऱ्या चोरांचा अभाव होता—असा भाव. १२. 'पक्षिविशेष. ['**हंसो** विहंगभेदे स्यादर्के विष्णौ हयांतरे । योगिमंत्रादिभेदेषु परमात्मनि मत्सरे ॥' इति विश्वः. 'खगयोगिभिदो**हंसो** निर्लोभनृपसूर्ययोः । विष्णौ प्राणे चात्मनि च' इति मङ्खः.] १३. साधुश्रेष्ठांना हंस व कोकिल म्हटल्यामुळें त्यांनीं उच्चारिलेलें विष्णुस्मरण फार मधुर होतें असें ध्वनित केलें. १४. 'रुंजती' असाही पाठ आहे. १५. पृथ्वी. १६. ब्रह्मांड. १७. पवित्र आहे कीर्ति (श्लोक) ज्याची असा. १८. नळाचें स्मरण केल्यास. १९. पापें. २०. याप्रमाणें.

अवदशा । तुम्हां[1] ऐशी कुरुनरेशा[2]! । तेही श्रवणीं पैरियेशीं[3].' ॥ १४५ ॥ इति 'श्रीभारत वनपर्व' । पवित्र आख्यान अति अपूर्व[4] । श्रवणें नाशी दोष सर्व । मुक्तेश्वर कवि वदे[5]. ॥ १४६ ॥

---

## अध्याय सातवा.

बृहदश्वा म्हणे, 'नृपती! । नळा लाधली[6] दमयंती । हर्ष मानुनी अपरमिती । देवँ[7] जाते जाले स्वस्थाना. ॥ १ ॥ मार्गी कली द्वापर दोघे । येतां देखिले लगबगें[8]; । शक्र म्हणे, 'कारण सांगें । कार्य कवण केउतें[9]?' ॥ २ ॥ कली म्हणे, 'त्रिदशेश्वरा[10]! । जाणें दमयंतीस्वयंवरा । ते आमुतें होय दारा । ऐसें करूं बहु यत्नीं.' ॥ ३ ॥ इंद्र म्हणे, 'निवडले सकळ । दमयंतीनें वरिला नळ । आतां तुमचा प्रयत्न विफळ[11] । वांज वृक्षासारिखा.' ॥ ४ ॥ कली[12] बोले प्रत्युत्तर, ।

---

१. तुम्हाला जशी अवदशा प्राप्त झाली तशी. २. युधिष्ठिरा! युधिष्ठिराप्रत. बृहदश्वाचें हें संबोधन आहे. ३. ऐक. ४. पूर्वीं कोणीही ऐकिलें नाहीं असें. ५. या अध्यायाला 'नलोपाख्यान' असें नांव आहे. ६. प्राप्त झाली. ७. इंद्र, वरुण, यम व अग्नि. ८. फार त्वरेनें. ९. कोठें. १०. हे इंद्रा! ११. 'निष्फळ' असाही पाठ आढळतो. १२. चार युगांतील जें चौथें त्याची मूर्तिमान् देवता. ['कलिः स्त्री कलिकायां ना शूराजकलहे युगे' इति मेदिनी. 'कलिर्बिभीतके शूरे विवादेऽन्त्ययुगे युधि' इति हैमः.] याची वर्षसंख्या देवमानानें १२०० वर्षें असून मनुष्यमानानें ४३२००० वर्षें आहे. मघानक्षत्रीं चंद्र आला म्हणजे कलियुगास प्रारंभ होतो असें भागवतकारांचें म्हणणें आहे. असत्य, लोभ, चौर्य, दौर्जन्य, दुराचार, माया, कलह, कपट, कलुषालक्ष्म्यादिकांचें कारण कलीच होय. परीक्षिति राजाच्या राज्यांत शूद्राच्या रूपानें कलि प्रवेशून वृषभरूपी धर्माला लाथा मारूं लागला. हें पाहून परीक्षिति राजाला फार राग आला व तो कलीला दंडण्यास प्रवृत्त झाला. इतक्यांत त्याला कली शरण आला व 'माझें रक्षण करा' असें विनवूं लागला; व तोंड पसरून दीन वदनानें लपण्यासाठीं जागा मागूं लागला. म्हणून त्याला राहण्याकरितां परीक्षितीनें जुवा खेळण्याचीं घरें, दारू विकण्याचीं घरें, वेश्यांचीं घरें, जेथें जुगार, मद्यपान, वेश्यासंग आणि हिंसा असा चतुर्विध अधर्म होतो अशा जागा दिल्या. नळराजा कृतयुगांत होऊन गेला. कृतयुगांतल्या मनुष्यांस त्रास देण्यास कलि उद्युक्त होतो ही आश्चर्याचीच गोष्ट म्हणावयाची. वास्तविक रीतीनें कलियुगांतल्याच मनुष्यांवर कलीचा अधिकार चालला पाहिजे. परंतु नलदमयंतीच्या हृदयद्रावक इतिहासावरून कलि कलियुगांतच लोकांना पीडितो असें नाहीं, तर प्रत्येक युगांत तो लोकांना त्रास देत असतो.

‘[1]प्रत्यक्ष सोडुनी [2]सुरेश्वर । दमयंतीनें वरिला नळ [3]नर । हा [4]अन्याय मज वाटे. ॥ ५ ॥ [5]अनुचित देखतां [6]विशेषें । [7]दंडन केलें नाहीं [8]कैसें?’। शक्र [9]म्हणे, ‘म्यां संतोषें । [10]हें घडविलें [11]आवडी. ॥ ६ ॥ दमयंती पातली [12]शरण, । [13]म्यां होउनी सुप्रसन्न । कृपेनें देउनी [14]दान । हें [15]सुलग्न लाविलें. ॥ ७ ॥ [16]यथायोग्य [17]पुण्य-वंता । [18]हृदयशुद्धशरणागता । इच्छिलें फळ तें न देतां । [19]ईश्वरत्व केउतें? ॥८॥

---

१. स्वयंवराच्या वेळीं हजर असतांही. कलीच्या म्हणण्याचा भाव असा कीं, देवेंद्राच्या सौंदर्याची व संपत्तीची कीर्ति दूतांकडून किंवा इतर साधनांनीं ऐकून जर दमयंतीनें सुरेश्वराला वरिलें नसतें तर ती फारशी दोषी ठरली नसती. परंतु प्रत्यक्ष सुरेश्वर स्वयंवराला आल्यावर तिनें त्याला वरिलें नाहीं हा तिनें मोठा प्रमाद केला. २. इंद्र. आपण जाईपर्यंत न थांबतां दमयंतीनें नळास वरिलें अशाबद्दल कलीस राग आला होता. परंतु तसें दाखविल्यास आपल्याला इंद्रादिक तुच्छ समजतील असें जाणून कलि म्हणतो कीं ‘मला राग आला याचें कारण दमयंतीनें इंद्राचा अपमान केला हें होय.’ अशा रीतीनें कलि आपल्या रागाचें खरें कारण लपवून ठेवितो. ३. ‘नळ नर’ असें मुद्दाम म्हणण्याचें कारण सुरेश्वरापेक्षां नळ फार कमी योग्यतेचा आहे असें भासविणें हें होय. ४. प्रमाद. ५. अयोग्य. दमयंतीनें देवांचा अपमान केला हें अधार्मिक कृत्य असा उद्देश. ६. प्रत्यक्ष, धडधडीत. ७. इंद्र हा सर्व देवांचा अर्थात् सर्व मानवांचाही राजा असल्यामुळें व ‘त्रिलोकनाथ’ या नांवानें प्रख्यात असल्यामुळें त्रैलोक्यांत पाहिजे त्या अपराध्याला दंड करण्याचा इंद्राला हक्क पोहोंचतो. कलीच्या मताप्रमाणें नलदमयंती अपराधी होतें. तेव्हां त्यांना दंड करणें इंद्राचें कर्तव्य असून तें त्यानें कां बजाविलें नाहीं असा कलीचा प्रश्न आहे. ८. या प्रसंगीं मोरोपंतानें कलीच्या तोंडीं घातलेलें भाषण मुक्तेश्वरानें कलीच्या तोंडी घातलेल्या भाषणासारखेंच असून वाचनाई आहे:—‘……कैंवि तुम्ही प्रभुनींहि स्वाभिमान मोकलिला? । नल गुरू काय तुम्हांहुनि? सोसे न स्वापमान तो कलिला. ॥ ८४ ॥ देवां समक्ष कैसा दमयंतीनें मनुष्य हा वरिला?। दंड्या ती, दंड्याहीं उठला प्रभुनीं न हात आवरिला’ ॥ ८५ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत महाभारत—वनपर्व—पृ० ४७.] ९. कलीच्या म्हणण्याचें इंद्र खंडन करितो. १०. नलदमयंतीविवाह. ११. आवडीनें. १२. दमयंती मला शरण आली होती असें सांगून इंद्र तिचें निरपराधत्व सिद्ध करितो. १३. ‘मी’ शब्दाचें तृतीयेचें एकवचन. चतुर्थ चरणांतील ‘लाविलें’ या क्रियापदाचा कर्ता. १४. नलरूपी दान. ‘वरदान’ असा अन्य पाठ. १५. योग्य वधूवरांची जोडी जमल्यामुळें याला ‘सुलग्न’ म्हटलें आहे. १६. योग्यमनतिक्रम्य यथायोग्यम्. १७. ‘पुण्यवंत’ शब्दाची द्वितीया. १८. ‘हृदयशुद्धशरणागता’ हें विशेषण फार मार्मिक आहे. शरणागत आलेला मनुष्य शुद्ध मनाचा नसेल तर तो अनुग्रहास पात्र ठरत नाहीं. कारण कामापुरता तो आपल्याशीं गोड बोलेल परंतु तदनंतर तो नम्र राहणार नाहीं. असो. या विशेषणानें नल व दमयंती या दोघांची एकमेकांवर अप्रतिम प्रीति होती व तीं अनन्यभावानें इंद्रादिकांस शरणागत आलीं

नित्य स्मरे त्याचें योगक्षेम[1] । जरी न वाहे पुरुषोत्तम[2] । शरणागताचा न दवडी[3] श्रम । तरि तो देव कासया[4] ? ॥ ९ ॥ न करूं दीनाचें रक्षण[7] । तरी आमुतें देव म्हणे कोणी[5] ? । हा भाव[6] नेणती अज्ञान । तुजसारिखे कलिपुरुषा !' ॥१०॥ अत्यंत कोपा चढला कली । म्हणे, 'कौतुक पाहिजे[8] नेत्रकमळीं । नैषधराजा मिळे धुळी । ऐसें करीन क्षणार्धें[9]. ॥ ११ ॥ न लभे दमयंतीचा भोग । पाडीन चिरकाल वियोग । राज्यभ्रंश[10] दारिद्र्ययोग[11] । भोगवीन बहु काळ.' ॥ १२ ॥ देवेंद्र म्हणे, 'रे ! कुबुद्धि ! । परम पवित्र सत्यवादी । त्यातें तुझें अरिष्ट बाधी । हें अघटित[12] सर्वदा. ॥ १३ ॥ स्वल्प काळ देउनी[13] क्लेश । पुढती कृपा क-

---

व म्हणून तीं शिक्षेस पात्र न होतां कृपेस पात्र झालीं असें इंद्र सुचवितो. १९. स्वामित्व. इंद्राच्या म्हणण्याचा भाव असा कीं लोकांना मारणें, संकटांत पाडणें, इत्यादि दुःखें देण्यांतच स्वामित्व असतें असें नाहीं, तर शरणागतांचें रक्षण केल्यापासूनच खरें स्वामित्व प्राप्त होतें.

१. योग=प्राप्ति, क्षेम=प्राप्त वस्तूचें रक्षण. २. सकल पुरुषांमध्यें श्रेष्ठ असा. ['पुरुषांमध्यें उत्तम, उत्तम किंवा क्षराक्षराहून । तो पुरुषोत्तम जाणा व्हा धन्य तयास चित्त वाहून.' ॥ २४ ॥ नामार्थदीपिका–पृ० ३.] ३. दवडणें=घालविणें, नाहींसा करणें. ४. कशाकरितां. भक्तियुक्त मानवांची इच्छा पूर्ण न करणाऱ्या देवाची आवश्यकता नाहीं, तो असून नसून सारखाच–असा इंद्राच्या म्हणण्याचा भाव. ५. देवत्वाची ही उदात्त कल्पना फारच विचार करण्यासारखी आहे. ही कल्पना इंद्राच्या तोंडीं घातल्यामुळें त्याची योग्यता प्रस्तुतस्थलीं वरीच वाढून वाचकांच्या मनांत त्याविषयीं फारच पूज्यबुद्धि उत्पन्न होते. मूळांत इंद्राच्या भाषणांत ही कल्पना नाहीं व इतर कविकृत कोणत्या प्राकृत भारतांत ही नाहीं. तेव्हां या कल्पनेचें सर्व श्रेय मुक्तेश्वरालाच दिलें पाहिजे हें निर्विवाद आहे. असल्या नूतन उदात्त विचारांमुळें मुक्तेश्वराच्या काव्याला विशेष शोभा आलेली आहे. व शब्दचमत्कारापेक्षां अर्थमाधुर्याकडे लक्ष देणाऱ्या सर्व विद्वानांना मुक्तेश्वराचीं काव्यें विशेष आवडतील यांत संशय नाहीं. ६. कोणीही म्हणणार नाहीं असा भाव. ७. दीनरक्षणांतच ईश्वरत्व आहे हें तत्व. ८. येथें 'पाहिजे' शब्दानें आवश्यकता दर्शविली जात नाहीं. 'पाहिजे' हें 'पाह' धातूचें विध्यर्थी वर्तमानकाळाचें रूप होय, 'पाहिजे' या शब्दाचा 'पाहावें' किंवा 'पाहावयास योग्य' हा जो मूळचा अर्थ तोच येथें समजावा. ९. अर्ध क्षणांत. १०. 'भ्रंशयिष्यामि तं राज्यान्न भैम्या सह रंस्यते' [महाभारत–वनपर्व–अ० ५८ श्लो० १५.] ११. दारिद्र्याची संगती. १२. कधींही न घडणारें. मूळांतलें वर्णन वाचण्यासारखें आहे:–'योऽधीते चतुरो वेदान्सर्वानाख्यानपंचमान् । नित्यं तृप्ता गृहे यस्य देवा यज्ञेषु धर्मतः ॥ ९ ॥ अहिंसानिरतो यश्च सत्यवादी दृढव्रतः । यस्मिन्सत्यं धृतिर्ज्ञानं तपः शौचं दमः शमः ॥ १० ॥ ध्रुवाणि पुरुषव्याघ्रे लोकपालसमे नृपे । एवंरूपं नलं यो वै कामयेच्छपितुं कले ! ॥ ११ ॥ आत्मानं स शपेन्मूढो हन्यादात्मानमात्मना । एवंगुणं नलं यो वै कामयेच्छपितुं कले !॥१२ ॥ कृच्छ्रे स नरके मज्जेदगाधे विपुले ह्रदे ॥' [महाभारत–वनपर्व–अ० ५९.] १३. 'देउनी' असें पाठांतर.

रीळ ईश । सत्वनिष्ठातें जगदीश । पदोपदीं रक्षितसे[1]. ॥ १४ ॥ सभाग्य[2] साधुनी जाय निधी[3] । अभाग्य[4] मागें मृत्तिका[5] शोधी । दमयंतीचा[6] अभिलाप[7] आधीं । पीडूं म्हणसी नळातें. ॥ १५ ॥ परतोनी जाईं आपुल्या ठाया[8], । प्रवर्तू[9] नको यया कार्या.' । नायकोनी दोघे[10] राया[11]! । नैषधनगरा[12] पातले. ॥ १६ ॥ दायाद[13] तो सहज[14] शत्रु[15] । पुष्पकर नळाचा पितृव्यपुत्र[16] । त्यातें बोलिलें[17] कुडा[18] मंत्रु[19] । कली आणि द्वापर. ॥ १७ ॥ म्हणती, 'जिंकोनी[20] नैषधातें । राज्यभ्रष्ट करूं त्यातें, । त्याचें ऐश्वर्य लाधे तूतें । ऐसें करूं तात्काळ[21]. ॥ १८ ॥ अक्षविद्या अवगत आम्हां । तुवां खेळावें करुनी नेमा[22], । त्याचें ऐश्वर्य भाग्योत्तमा! । अनायासें पावशी.' ॥ १९ ॥ द्वापर[23] निघाला कपट[24]पाशीं[25], । ते फांसे दिधले पुष्करासी, ।

---

१. 'सांभाळी' असा पाठभेद. २. भाग्यवान्. ३. ठेवा. ४. भाग्यहीन. अनुरूप पद्य:—'दे सत्व सात्विका सुख सज्ञानें, तमचि तामसा चकवी.' [मोरोपंतकृत महारत—वनपर्व—अ० ४ गी० ८६ उत्तरार्ध पृ० ४७.] ५. मातीं. ६. 'दमयंतीचे अभिलापबुद्धि' असाही पाठ आहे. ७. सुरांचा अपमान झाला म्हणून मी नलदमयंतीला पीडणार असें जें कलि बोलला तें खरें नसून दमयंतीनें आपणाला वरिलें नाहीं म्हणून तो तिला व नलाला पीडण्यास उद्युक्त झाला व म्हणूनच तो निंदार्ह होय—असा इंद्राच्या म्हणण्याचा भाव. ८. स्वलोकाप्रत. ९. उद्युक्त होऊं नकोस, हें कार्य करूं नकोस—असा भाव. १०. कलि व द्वापर. ११. हें बृहदश्वाचें धर्मरायाला किंवा वैशंपायनाचें जनमेजयाला संबोधन. १२. निषधदेशाच्या राजधानीला. १३. भाऊबंद. १४. स्वाभाविक. १५. 'दायाद तो सहज शत्रु' हा स्वाभाविक नियम असावा हें आश्चर्य आहे. कारण भाऊबंद हे एका कुळांतले असल्यामुळें यांच्यांत स्वाभाविक प्रेम असलें पाहिजे, वैर असूं नये. परंतु जगतांत याच्या विरुद्ध गोष्ट सांपडते याला नाइलाज आहे. यासंबंधानें 'भाऊबंदांत कलह कां होतात इ०' विषयावर 'निर्णयसागरां'त छापलेला निबंध वाचावा. १६. पितृव्य=चुलता. १७. 'बोलिला' या एकवचनी क्रियापदाला 'कली' व 'द्वापर' हे दोन कर्ते आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १८. कपटी. १९. मसलत. २०. 'जिंकीं' असाही पाठ आहे. द्यूतांत जिंकून असा भाव. २१. शीघ्र. २२. नेम करून, पण लावून. सहज मनोरंजन होण्याकरितां पणाशिवाय अक्ष खेळण्याची चाल आहे. परंतु तसें खेळण्यापासून पुष्कराला ऐश्वर्य मिळणार नाहीं व नळ राज्यभ्रष्ट होणार नाहीं, म्हणून पण लावून खेळ असा पुष्कराला कलि उपदेश करितो. २३. चार युगांतील तिसरें व त्याची मूर्तिमान् देवता. द्वापराचा काळ देवमानानें २४०० वर्षांचा आहे व मनुष्यमानानें ८६४००० वर्षें आहे. याचा संधि व संध्यंशकाळ आदिअंतीं मिळून देवमानानें ४०० म्हणजे मनुष्यमानानें १४४००० वर्षें आहेत. या युगांत यज्ञांना विशेष मान असे. २४. 'कपटकपटाशीं' असाही पाठ आहे. परंतु याचा प्रस्तुत स्थळीं

कली तिष्ठत[1] अहर्निशी[2] । नळशरीरीं[3] रिघावया[4]. ॥ २० ॥ वृषभरूप[5] होउनी कली । पुष्करगोधनांचे[6] मेळीं । प्रवेशोनी नळराउळीं[7] । छिद्र पाहे रिघावया. ॥ २१ ॥ द्वादश वर्षें होतां कष्टी[8] । निषिद्धाचरण[9] न दिसे दृष्टी । जैसें विष्णुस्मरत्या[10] निकटीं । पाप वावरों[11] न शके. ॥ २२ ॥ प्रवेशावया[12] सायासें । जपत ठेला[13] बारा वर्षें । एके दिवशीं देहआळसें । सायंकाळीं सत्वर[14]. ॥ २३ ॥ करुनी मूत्रविसर्जन । न करितां पादप्रक्षालन[15] । संध्या[16] साधितां[17] दुर्जन । संधि

कांहीं अर्थ लागत नसल्यामुळें हा अपपाठ असावा असें वाटतें. २५. मायावी फांसे, आपल्या इच्छेप्रमाणें पडतील असे मुद्दाम तयार केलेले फांसे.

१. संधि पाहत राहिला—असा भाव. २. रात्रंदिवस. ३. कोणाच्याही शरीरांत शिरल्याशिवाय त्या मनुष्याला कलि संकटांत पाडूं शकत नाहीं असें दिसतें. ४. प्रवेशण्याकरितां. ५. बैलाचा वेष. 'कलिश्चैव वृषो भूत्वा गवां पुष्करमभ्यगात्' [महाभारत]. ६. या ओंवींत कवीनें मूळांतला अर्थ न सोडतां रूपक केलें आहे हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. ७. राउळ=राजकुल=राजवाडा. ८. बारा वर्षें राहूनही कार्यसिद्धि झाली नाहीं म्हणून कलीला फार वाईट वाटत होतें. म्हणूनच त्याला 'कष्टी' म्हटलें आहे. ९. ऋषींनीं किंवा धर्मग्रंथांनीं ज्या गोष्टी न करण्यास सांगितल्या त्या; अधार्मिक—असा भाव. यावरून नल अतिशय धार्मिक होता हें उघड होतें. १०. विष्णुस्मरण करणाऱ्या पुरुषाच्या. ११. 'वावरणें' हें क्रियापद 'व्यापार करणें' याअर्थी ज्ञानेश्वरींत योजलेलें आहे. येथें वावरणें=वास करणें. १२. नळाच्या देहांत प्रवेश करण्याकरितां. १३. 'ठेला'चा कर्ता 'कलि' आहे असें समजावें. १४. 'सत्वर' शब्द येथें पादपूरणार्थ योजिलेला आहे; व त्याचा येथें कांहींच अर्थ घेऊं नये; कारण आळसानें कोणतेंही काम 'सत्वर' होत नाहीं. १५. पाय धुतल्याशिवाय. 'कृत्वा मूत्रमुपस्पृश्य संध्यामन्वास्त नैषधः । अकृत्वा पादयोः शौचं तत्रैनं कलिराविशत् ॥' [महाभारतम्.] कित्येकांच्या तोंडून असें ऐकण्यांत येतें कीं, नलराजा पादप्रक्षालन करूनच संध्यावंदनाला बसला परंतु पाय धुतांना त्याच्या पायाचा थोडासा भाग पाण्यानें भिजल्याशिवाय राहिला व तेवढ्याशा भागांतून कलि नळाच्या अंगांत शिरला. नलाविषयींची अशी गोष्ट कित्येक आंध्रनलचरित्रांतही आढळते व नळाच्या धार्मिकत्वाकडे लक्ष दिल्यासही दुसरी कथाच विशेष प्रशस्त दिसते. कारण पुण्यश्लोकाग्रणी नळ आळसानें कितीही पीडित असला तरी मूत्रविसर्जनानंतर पदप्रक्षालन केल्याशिवाय संध्या करण्यासारखें महत्पातक त्याच्या हातून होईल असें मानणें म्हणजे त्याच्या धार्मिकत्वाविषयीं शंका घेणेंच होय. परंतु पादप्रक्षालनाशिवाय संध्या केली असें मूळांतच सांगितल्यामुळें त्याबद्दल भाषांतरकारांना विशेष दोष देतां येत नाहीं. १६. प्रातःकाळीं उषःकालापासून सूर्योदयापर्यंत व सायंकाळीं सूर्यास्तापासून नक्षत्रदर्शनापर्यंत जो काळ जातो त्याला संध्या म्हणतात. (सम्यक् ध्यायंत्यस्यामिति संध्या.) विष्णुपुराणांत असें सांगितलें आहे कीं, रात्रीला उशस् म्हणतात व दिवसाला व्युष्टा असें नांव आहे. उशस् व व्युष्टा यांमधला जो काळ त्याला संध्याकाळ म्हणतात. या काळीं मंदेह या नांवाचे साडे-

काळ [1]लाधला. ॥ २४ ॥ प्रवेशला तये संधी । तत्काळ पालटली [2]बुद्धी । [3]सत्यव्यसनवासनानदीं । [4]विकारपूर [5]साजला. ॥ २५ ॥ विवेक, विचार, भक्ति-ज्ञान, । दया, [6]स्वधर्म झाला शून्य । [7]काम, क्रोध, मत्सर, जाण । [8]तस्कर देहीं उदेले. ॥ २६ ॥ साधुसज्जनीं अभक्ति । दुर्जनसंगीं वाढली [9]रती । म्हणोनी बोले पुष्करप्रती, । 'वेळ मातें [10]क्रमेना. ॥ २७ ॥ मांडीं [11]सारीपाटखेळ । सुख-

---

तीन कोटी राक्षस सूर्याचा ग्रास करण्याकरितां उत्पन्न होत असतात. सूर्याला या राक्षसांपासून सोडविण्याकरितां ब्राह्मण गायत्रीचा जप करून सूर्याला अर्घ्य सोडतात. हें अर्घ्याचें पाणी वज्ररूप होऊन त्या राक्षसांचा नाश करितें. या गायत्रीजपाला व अर्घ्याला 'संध्यावंदन' किंवा फक्त 'संध्या'च म्हणतात. हा संध्यावंदनविधि फार प्राचीनकालापासून चालत आलेला असून ज्यांचें ज्यांचें म्हणून उपनयन झालें आहे त्यांना हिचा अधिकार आहे. वैदिककाळीं हा विधि फार लांब नव्हता असें दिसतें. शतपथब्राह्मणांत एके ठिकाणीं 'सूर्योदयसमयीं व सूर्यास्तसमयीं जो ब्राह्मण सूर्याकडे तोंड करून जप करितो तो सौख्य पावतो' असें सांगितलें आहे. आश्वलायनानें हा विधि जरा सुधारिला. तो म्हणतो:—यज्ञोपवीत धारण करून नित्यकर्म आचरणाऱ्यांनीं ऐहिकविषयासंबंधानें कांहींएक न बोलतां मुकाट्यानें संध्या आचरावी. सायंकाळीं सूर्य अर्धा क्षितिजावर व अर्धा क्षितिजाखालीं असतो तेव्हांपासून नक्षत्रदर्शन होईपर्यंत पश्चिमेकडे तोंड करून गायत्रीचा जप करावा; सकाळीं पूर्वेकडे तोंड करून जप करावा.' [आश्वलायन सूत्र अध्याय ३ खंडिका ७ सूत्र ३-७ पहा.] बौद्धायनानीं संध्यावंदनाचा विधि फारच लांब केला. पुढें पुराणकर्त्यांनीं संध्यावंदनांत संकल्प इत्यादि मिळवून तो अतिशय लांब बनविला! कूर्मपुराणांत संध्येचा जो विधि दिलेला आहे तोच सांप्रत चालू आहे. १७. करितां, आचरितां.

१. 'साधला' असाही पाठ आहे. २. नळाची मति. ३. सत्याचे आसक्तीच्या वासनारूप नदींत. ४. येथें मजेदार रूपक साधलें आहे. ज्याप्रमाणें एकादी नदी संथ चालत असावी व त्यांत बाहेरचें पाणी आल्यामुळें ती एकदम फुगून भयंकर प्रवाहानें वाहत सुटावी त्याचप्रमाणें सत्यप्रिय व विचारशील नळाच्या अंगांत कलि शिरल्याबरोबर तो शांत राजा विचार सोडून विकारवश झाला—असा विशदार्थ. 'विकारपूर' या शब्दानें आतां नळ कांहीं तरी अविचाराचें कृत्य करील असें वाटूं लागतें. ५. 'माजला' असा अन्य पाठ. ६. आपला धर्म, राजधर्म, प्रजापालन इ० जो क्षत्रियाचा धर्म सुटला व द्यूतखेलन इ० परधर्म प्राप्त झाला—असा भाव. व 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या गीतावाक्याप्रमाणें परधर्म नळाला भयावह झाला यांत नवल नाहीं. ७. 'काम क्रोध मद मत्सर मान' असा अन्य पाठ. ८. एके ठिकाणीं म्हटलें आहे:—'कामः क्रोधश्च लोभश्च देहे तिष्ठंति तस्कराः । ज्ञानवित्तापहारार्थं तस्माज्जागृहि जागृहि ॥' 'तत्काळ' असें पाठांतर. ९. प्रेम. 'वृत्ती' असा अन्य पाठ आहे. १०. 'गमेना' व 'करमेना' असाही पाठ आहे. ११. सोंगट्या व पट.

संतोषें क्रमेल काळ.' । पुष्कर म्हणे, 'तूं राजा सबळ[1] । हारीं[2] जयीं सारिखा'. ॥ २८ ॥ पाश देखतांची हे[3] डोळां[4] । बुद्धिभ्रंश राया नळा । लुब्ध जाला द्यूतखेळा[5] । जेंवी कामुक[6] स्त्रियेतें. ॥ २९ ॥ कपाटें[7] देऊनियां[8] हातें । आज्ञा करी द्वारपाळातें, । 'खेळ सरे तंव कवणातें । न सोडावें ममाज्ञा.' ॥ ३० ॥ जंव[9] जंव हारीं पडे डाव । तंव तंव हांवे[10] पडे[11] राव; । म्हणे, 'माझें सर्वस्व जावें[12] । परी हा खेळ न सांडी[13].' ॥ ३१ ॥ पणा घालुनी राज्य सकळ । रायें मांडला द्यूतखेळ । हें ऐकुनी अति विव्हळ । प्रजा दुःखें विलपती[14]. ॥ ३२ ॥ शोक करिती हाहाकारें । एक पिटिती हृदय करें । प्रधान म्हणे, 'निर्धारें । विनाशकाळ[15] पातला.' ॥ ३३ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । समस्त पातले राजद्वारा । म्हणती, 'कृपेनें राजेश्वरा ! । दर्शन दिधलें पाहिजे. ॥ ३४ ॥ करीं आमचें[16] प्रतिपालन । न घालीं राजपदाचा[17] पण । सांडीं द्यूतपापव्यसन[18] । दुःखदायक स-

---

१. महाप्रतापवान् व संपत्तिमान्. 'सर्व कुशल' असा अन्य पाठ. २. असें बोलून पुष्कर नळाला पण लावण्याविषयीं सुचवितो. ३. 'हे'बद्दल 'ते' असाही पाठ आहे व हाच पाठ विशेष प्रशस्त आहे. कारण 'ते पाश' म्हणजे द्वापरानें पुष्कराला दिलेले फांसे असा अर्थ निघतो व 'हे पाश' याचा येथें बरोबर अर्थ होत नाहीं. ४. 'नळा' असा अन्य पाठ. ५. 'कुबुद्धि भ्रंशला तात्काळ' असा अन्य पाठ. ६. ही उपमा फारच सुरेख आहे. कारण ज्याप्रमाणें परदारकामी परस्त्रियेच्या संगमानें स्ववित्तनाश, स्वयशोनाश व स्वसुखनाश करून घेतो त्याचप्रमाणें द्यूतसंगमापासून नळराजा स्वराज्याला व स्वयशाला मुकला असा या उपमेपासून ध्वनितार्थ निघतो. ७. दाराच्या फळ्या. ८. बंद करून. ९. जेव्हां जेव्हां. १०. आणखी पण लावण्याविषयीं उत्कट इच्छा उत्पन्न होई. ११. 'चढे' असाही पाठ आहे. १२. गेलें तरी. माझें सर्वस्व गेलें तरी मी द्यूत सोडणार नाहीं असें नळ म्हणतो. यावरून त्यावेळीं तो किती विकारवश होता हें उघड होतें. १३. सोडीं, त्यागीं. १४. 'विलपती' याला कर्ता 'प्रजा' हें समुदायवाचक नाम असून हा दोन्हीवचनांत योजितात. 'प्रजा रडते' व 'प्रजा रडतात' हे दोनही प्रयोग शुद्ध आहेत. १५. 'विनाशकाले विपरीतबुद्धिः' या न्यायानें. १६. 'आमुतें' असाही पाठ आहे. १७. राज्यपदाचा पण लाविल्यास पुष्कर राज्य घेईल व नळाला आपल्यावर राज्य करितां येणार असें सांगितल्यास वाईट वाटून नळ द्यूत सोडून देईल असें प्रजेला वाटलें होतें. परंतु नळ विकारवश झाल्यामुळें त्यानें प्रजेच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं. 'राज्यपदाचा' व 'राज्यलक्ष्मीचा' असे दोन पाठ आहेत. 'राज्यलक्ष्मीचा' हा पाठ सर्वांत प्रशस्त व प्रसंगाला उचित होय. राज्याला लक्ष्मी म्हटल्यामुळें राज्य घालविल्यास तुझा सर्वस्व नाश होईल असें ध्वनित होतें. १८. अगोदर प्रजाजनांनीं राजाला दया उत्पन्न होईल या उद्देशानें आमचें रक्षण करण्याकरितां तरी द्यूत खेळूं नको असें म्हटलें; परंतु त्याचा राजावर कांहीं परिणाम झाला नाहीं असें पाहून राजपदाचा पण

वार्ते.' ॥ ३५ ॥ दमयंती म्हणे, 'स्वामी! । प्रजा पाळिल्या [1]स्वधर्मी । तयां पा-
चारुनी [2]तुम्हीं । [3]आश्वासिलें पाहिजे.' ॥ ३६ ॥ राजा [4]द्यूतव्यसनकोडें । [5]उत्तर
कांहीं न बोले तोंडें । दमयंती म्हणे, '[6]पुढें । बरवें कांहीं दिसेना[7].' ॥ ३७ ॥
[8]नायके कवणाचें ही वचन । दमयंती [9]करी रुदन । पाचारुनी मग प्रधान ।
[10]रथसारथी आणवी. ॥ ३८ ॥ वार्ष्णेय नामा नळसारथी । त्यातें आज्ञापी दम-
यंती, । 'पुत्र कन्या [11]वाहुनी रथीं । [12]विदर्भाप्रती [13]त्वां जावें. ॥ ३९ ॥ [14]जनका
[15]वोपीं हीं बालकें । नळाची वार्ता जाणवीं मुखें । [16]प्रारब्ध घडवी तरी सुखें ।

---

घालूं नकोस नाहीं तर सर्व राज्याला मुकून दुःखी होशील अशी भीती घातली; तरी राजा ऐकत नाहीं असें पाहून, द्यूत व्यसन आहे व द्यूत खेळणारा महत्पापी होय म्हणून तूं अनीतिकारक व अधार्मिक वर्तन करितोस असे नळाला लज्जा वाटण्यासारखे शब्द बोलूं लागले. अगोदर दीनत्वें नंतर भीती घालून व तदनंतर टोंचून प्रजाजनांनीं केलेलें भाषण लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. जुगार खेळणें हें व्यसन फार प्राचीन आहे. ऋग्वेदाच्या सूक्तावरून (१०-३४) फार प्राचीन काळीं जुगाराचा प्रकार चालू होता असें दिसतें. [रा० शं० बा० दीक्षितकृत धर्ममीमांसा—भौतिक धर्माचें विवेचन—पृ० ४६-४८.]

१. स्वधर्मानें, राजधर्मानें. २. 'धामीं' असा अन्य पाठ. ३. सांत्वन केलें पाहिजे. दमयंतीच्या म्हणण्याचा भाव असा कीं तुम्हीं सर्व प्रजाजनांना मोठ्या प्रीतीनें पाळिल्यामुळें ते तुम्हांला पुत्रतुल्य आहेत; तस्मात् त्यांच्या दुःखाचें निवारण करणें हें तुमचें कर्तव्य आहे. म्हणून द्यूत सोडून यांकडे पहा. ४. 'द्यूतव्यसनकोडें' या समासांत 'द्यूत' आणि 'व्यसन' हे दोन संस्कृत शब्द आहेत व 'कोडें' हा मात्र प्राकृत शब्द आहे. कोडें=कौतुकानें. ५. उत्तर न देण्याचें, मूळांत, असें कारण सांगितलें आहे:—'तां तथा रुचिरापांगीं विलपंतीं तथाविधाम् । आविष्टः कलिना राजा नाभ्यभाषत किंचन ॥' [महाभारत—वनपर्व—अ० ५९ श्लो० १७] ६. हें दमयंतीचें निराशेचें भाषण होय. ७. 'न दिसे सर्वथा' असाही पाठ आहे. ८. 'नायके' याचा कर्ता 'नळ' समजावा. ९. 'करितसे घोररूदन' असाही अन्यपाठ आहे. १०. येथें रथाचा जो सारथि तो रथसारथि असा षष्ठीतत्पुरुष करण्यापेक्षां रथ आणि सारथि रथसारथि असा द्वंद्वसमास करणें चांगलें. कारण मुलांना रथांत पाठवावयाचें होतें. ११. बैसवून. १२. 'विदर्भदेशाप्रती' असा अन्य पाठ. १३. 'त्यां नेणें' असाही पाठ आहे. १४. भीमराजाला. १५. समर्पी. १६. सुदैव. दमयंतीच्या म्हणण्याचा भाव असा:—आतां तर दुर्दैवानें आम्हांला गांठिलें आहे व म्हणून आतां आईबापांची भेट होणें दुर्लभच, पण पुढेंमागें आम्हीं दुर्दैवापासून मुक्त झालों तर आमची भेट होईल. आतां बहुतेक आमची भेट होणार नाहीं—असा मथितार्थ.

भेटी गोष्टी होतसे. ॥ ४० ॥ रथ ठेउनी कुंडिनपुरीं । त्वां वसावें [1]अयोध्यापुरीं । [2]सूतवृत्ती राजयामंदिरीं । सारथी होउनी असावें. ॥ ४१ ॥ [3]जंव अवदशेनें वरिजे नळ । तंववरी तेथें क्रमिजे काळ । पुढां [4]ईश्वरइच्छा खेळ । मांडेल तेंची विलोकीं.' ॥ ४२ ॥ सारथी वंदूनियां [5]आज्ञा । [6]धात्री नामें बृहत्सेना । [7]इंद्रसेना राजकन्या । [8]इंद्रसेन बालक. ॥ ४३ ॥ तिघे वाहुनीयां [9]रथीं । [10]पांतला वैदर्भनगरीप्रती । वार्ता पुसोनियां भीमनृपती । [11]दुःखार्णवीं निमग्न.

१. हें फार प्राचीन शहर आहे. पुराणांतरीं अयोध्याप्रांतास उत्तरकोसल असें नांव आहे. अयोध्या ही नगरी वैवस्वत मनूनें प्रथम आपणाकरितां स्थापिली. वैवस्वतानें इ० स० पूर्वीं १३६६ वर्षीं ही नगरी बांधली होती व या नगराइतकें प्राचीन शहर दुसरें नाहीं असें विद्वानांनीं ठरविलें आहे. दशरथाच्या वेळीं ही नगरी बारा योजनें लांब व तीन योजनें रुंद होती असें रामायणांत सांगितलें आहे. रामानें इजमध्यें ११००० वर्षें राज्य केलें. निजधामास जाण्याच्या वेळीं आपल्या बरोबर लोकांसही तो घेऊन गेला. नंतर ही नगरी पुष्कळ दिवस उजाड पडली होती. पुढें सूर्यवंशीय ऋषभ नांवाच्या राजानें हिजमध्यें पुनः वसविली. फैजाबाद म्हणून जें अयोध्येजवळ प्रसिद्ध शहर आहे तेथील घरें प्राचीन अयोध्येच्या विटा वगैरे सामानांनीं बांधलीं अशी माहिती मिळते. अयोध्या दोनतीनवेळां उध्वस्त झाली होती. अलीकडची अयोध्या विक्रमादित्य राजानें इ० स० पूर्वीं ५७ सालीं बांधिली असें म्हणतात. प्रख्यात **'अयनीअकबरी'** ग्रंथामध्यें प्राचीनकाळीं ही नगरी १४८ कोस लांब व ३६ कोस रुंद होती असें लिहिलें आहे. २. 'ऋतुपर्ण' असाही पाठ आहे. ३. जोंपर्यंत. 'जंव' 'तंव' इ० शब्द फक्त कवितेंत मात्र योजितात. ४. ईश्वराची जी इच्छा ती ईश्वरेच्छा. ईश्वरेच्छारूपी खेळ असा अर्थ. 'ईश्वर इच्छा' हा सामासिक शब्द व्याकरणाच्या नियमाप्रमाणें शुद्ध नाहीं. 'ईश्वरेच्छा' असा शब्द पाहिजे होता. वृत्ताकरितां प्राकृत कवी कधीं कधीं संधिनियम पाळीत नाहींत. ५. 'घेऊनी' असाही पाठ आहे. ६. दाई. ७. 'इंद्रसेना' हें 'इंद्रसेन' या शब्दाचें स्त्रीलिंग होय. आपल्या मुलाला व मुलीला एकच नांव ठेवण्याची पूर्वीं चाल होती असें दिसतें. उ० यम, यमी; कृप, कृपी; रुक्मी, रुक्मिणी इ० ८. इंद्रसेनाविषयीं महाभारतांत आणखी कांहीं माहिती मिळत नाहीं. ब्रह्मोत्तरखंडांत याचा मुलगा जो चित्रांगद त्याचा संपूर्ण इतिहास दिलेला आहे; व शिवलीलामृतकारांनींही चित्रांगदाची व त्याची पत्नी सीमंतिनी यांची संपूर्ण गोष्ट दिलेली आहे. चित्रसेन यमुनेंत बुडाल्यानंतरचा इतिहास सांगतांना श्रीधरानें म्हटलें आहेः—'इंद्रसेन लावण्यवती । शोकें संतप्त नगरा जाती । तव दायाद येउनी पापमती । राज्य सर्व घेतलें ॥ १ ॥ मग इंद्रसेन लावण्यवती । देशांतरा पळून जाती । तेथूनीही शत्रू धरूनी आणिती । बंदी घालिति मग तेव्हां ॥ २ ॥' [शिवलीलामृत—अध्याय ६ ओंव्या ९८-९९.] पुढें चित्रसेन सुखरूप नदींतून बाहेर निघाल्यावर त्यावर 'समस्त राजभार समर्पून । तपासीं गेला इंद्रसेन । तेथें करूनियां शिवार्चन । शिवपदासीं पावला. ॥' [ओंवी ९२.] ९. 'दिव्यरथीं' असा अन्य पाठ. १०. या क्रियापदाचा कर्ता 'वार्ष्णेय' होय. ११. दुःखसमुद्रांत.

॥ ४४ ॥ तेथेंची ठेउनी र[1]हंवरा । वार्ष्णेय पातला अयोध्यापुरा । सूतवृत्ती
[2]राजेश्वरा । आराधीत राहिला. ॥ ४५ ॥ [3]येरी इकडे खेळुनी द्यूत । राज्य
हारविलें समस्त । नैषध जाला दै[4]वेंहत । दीन केला पुष्करें. ॥ ४६ ॥ [5]मुकुट,
[6]कुंडलें, [7]पदकमाळा, । [8]मुद्रिका, [9]कंकणें, [10]कटिमेखळा । [11]प्रथम डावीं [12]कुरुनृपा!।
हारविलें नरेंद्रें. ॥ ४७ ॥ हस्ती, [13]वाजी, [14]पदाति, [15]रथ । दास दासी असंख्यात ।
[16]महिषी, धेनु, वृषभ तेथ । [17]अजादिक अपारें. ॥ ४८ ॥ [18]उष्ट्र, वाजी, खेचर
[19]वडवा । [20]संख्येरहित भाग्यार्णवा । [21]प्राशन केलें नरपार्थिवा ! । अभाग्यकाळें
[22]कुंभजें. ॥४९॥ [23]देश, [24]दुर्ग, [25]गड, पर्वत, । [26]नगरें, पुरें, [27]पत्तनें बहुत, । [28]ग्रामपाली,

---

१. रथ. २. ऋतुपर्ण राजाजवळ. ३. दुसरीकडे नळराजा. ४. दैवाकडून हत झालेला, दुर्दैवी. 'ऐश्वर्यहत' असाही पाठ आहे. ५. राजाचें डोक्यावरील भूषण. ६. कानांत घालण्याचें भूषण. ['कुंडलं कर्णभूषणम्' इत्यमरः.] ७. कंठभूषण. ८. अंगठी. ९. कांकणें. ['कंकणं करभूषणम्' इत्यमरः.] १०. कमरेंतील कमरपट्टा. ११. पहिल्या डावांत. १२. धर्माला बृहदश्वाचें किंवा जनमेजयाला वैशंपायनाचें संबोधन. १३. घोडे. ['वाजिवाहार्वगंधर्वहयसैंधवसप्तयः' इत्यमरः.] १४. पायदळ. १५. हत्ती, घोडे, पदाती व रथ हें चतुरंग सैन्य होय. १६. म्हैशी. 'महिषी' शब्दानें येथें घोंटाळा होण्याचा संभव आहे. कारण 'महिषी' शब्दाचा 'राणी' असाही अर्थ होतो. म्हणून नळानें दमयंतीला पणास लाविलें असा भ्रम होण्याचा संभव आहे. म्हणून वाचतांना अर्थाचा घोंटाळा न होण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. १७. शेळ्या वगैरे. १८. उंट. ['उष्ट्रे क्रमेलकमयमहांगाः' इत्यमरः.] १९. घोडी. २०. असंख्य. येथें कवीनें 'संख्या' आणि 'रहित' यांचा समास करितांना चमत्कारिक संधि करून 'संख्येरहित' असा शब्द बनविला आहे. २१. 'प्रसन्न' असाही पाठ आहे. २२. अगस्ति ऋषीनें. याची उत्पत्ति घटापासून असल्यामुळें यास 'घटज' असें अन्य नांव दिलें आहे. २३. नळराजा सार्वभौम असल्यामुळें त्याच्या ताब्यांत अनेक देश होते व एक एक देश तो पणांत हरला असें समजावें. २४. किल्ला. २५. डोंगरावर बांधलेला किल्ला. [दुर्गं किल्लेति विज्ञेयं गिरिदुर्गं गडः स्मृतः' इति राज्यव्यवहारकोशः.] २६. नगर, पुर व पत्तन हे तिन्ही शब्द बहुतेक समानार्थकच आहेत असें म्हटल्यास चालेल. ['पूः स्त्री पुरीनगर्यौ वा पत्तनं पुटभेदनम् । स्थानीयं निगमोऽन्यस्तु यन्मूलनगरात्पुरम् ॥' इत्यमरः.] तरी यांच्यांत कांहीं भेद सांगितलेला आहे:—'यत्रानेकशिल्पिनोऽनेकवणिगादिव्यवहारस्तत्पुरादिसंज्ञम् । यत्र राजा तदनुचराश्च संति तत्पुरं पत्तनादिसंज्ञम् । यत्प्राकारादिवेष्टितं विस्तीर्णं पुरंतत्स्थानीयादिनामकम् ॥' [महेश्वरकृतामरविवेकाख्यटीका.] २७. 'पाटणें' व 'पट्टणें' असेही पाठभेद आहेत. २८. ग्रामपंक्ति. पालि अथवा पाली=श्रेणि, पंक्ति. ['पालिः स्त्र्यंकपंक्तिषु' इत्यमरः, 'पालिः कर्णलतायां स्यात्प्रदेशे पंक्तिचिह्नयोः' इत्यजयः, 'समश्रुयुवती पालिः पंक्तिः कर्णलतापि चेत्' इति त्रिकांडशेषः, 'पालिः कर्णलताग्रेऽश्रौ पंक्तावंकप्रभेदयोः। छात्रादिदेये स्त्री पाली यूकासश्मश्रुयोपितोः॥' इति मे-

खेटकयुक्त[1] । आगर[2] वनें उपवनें[3]. ॥ ९० ॥ कनकरत्नांचीं[4] भांडारें[5] । शस्त्रास्त्रांचीं अगारें[6] । हारविलीं[7], मग पुष्करें । हास्य केलें अद्भुत[8]. ॥ ९१ ॥ म्हणे, 'राया ! नियमवंता[9] ! । एकं[10] दमयंती उरली आतां । ते ही पणा घालुनी[11] कांता[12] । होय माझी तें करीं.' ॥ ९२ ॥ ऐकोनी धडकला[13] क्रोधाग्नी[14] । वन्ही उसळों[15] पाहे नयनीं । उभा ठेला[16] एकवसनी[17] । अरण्यवासा[18] जावया. ॥ ९३ ॥ एक-

---

दिनी.] 'पाली' बद्दल 'पल्ली' असा दुसरा पाठ आहे. हा एक तर अपपाठ असावा किंवा तेलंगी 'भाषेंत 'खेडें' या अर्थी 'पल्ले' म्हणून जो शब्द आहे त्यापासून या पाठाची उत्पत्ति असावी.

१. खेडें. २. आगर=लागवडीची जागा, मळा. 'वसाहत' या अर्थी हा शब्द कधीं कधीं योजला जातो. हा शब्द 'आगर,' 'अगार,' 'आगार,' 'आगारी,' 'अगारी' इत्यादि अनक रूपांनीं महाराष्ट्र भाषेंत व विशेषत: जुन्या कवींच्या ग्रंथांत आढळतो. 'आगरें' असाही अन्य पाठ आहे. ३. बाग. ४. सोनें आणि रत्नें यांचीं. ५. खजिने. ६. घरें. ['निशांतपस्त्यसदनं भवनागारमंदिरम्' इत्यमर:.] हा शब्द 'आगार' या रूपानेंही प्रचारांत आहे. ['विद्यादगारमागारमपगामापगामपि' इति द्विरूपकोश:.] 'अगार' शब्द संस्कृत समजल्यास त्याचा अर्थ 'घर' असा होतो व तोच प्राकृत शब्द आहे असें मानिल्यास त्याचा 'मळा' असा अर्थ होतो हें शब्दज्ञानलोलुपांनीं लक्षांत ठेवावें व प्राकृत ग्रंथ वाचण्यांत 'अगार' शब्द जेथें जेथें येईल तेथें तेथें त्याचा कोणता अर्थ घ्यावा याचा त्यांनीं नीट विचार करावा. ७. 'हारविलीं' याचा कर्ता ४७ व्या ओंवींतलें 'नरेंद्रें' हें तृतीयांत नाम होय. ८. 'अपार' व 'अत्यद्भुत' असे अन्य पाठ. ९. नियमानें चालणाऱ्या राजा. एकदां केलेला नियम किंवा वेत कधींही न फिरविणाऱ्या राजा. हें पुष्कराचें मर्मभेदक वचन होय. 'नियमवंता' या नांवानें हाक मारून, तूं दृढ नियमाचा असल्यामुळें तुजजवळचें सर्व धन संपल्याशिवाय द्यूत बंद करणें तुला योग्य नाहीं. सर्व राज्य हारलास तरी तुजजवळ स्त्रीधन आहे तें हारल्याशिवाय द्यूत सोडूं नको असें पुष्करानें सुचविलें. १०. 'एकटी' 'एकलीच' असेही अन्यपाठ आहेत. या शब्दानें तूं अगदीं भिकार झालास असें सुचविलें. ११. ते (ती) कांता (तुझी स्त्री दमयंती) ही (सुद्धां) पणा घालुनी माझी होय (माझी होईल; मीं जिंकिल्यामुळें मला वश होईल) तें करीं (असें कर)—असा अन्वय करावा. पुष्कराच्या म्हणण्याचा भाव असा कीं सर्व राज्य ज्याप्रमाणें हारलास त्याचप्रमाणें दमयंतीलाही पणाला लाव व ती मला प्राप्त होईल असें कर. १२. 'वनिता' असा अन्यपाठ. १३. पेटला. १४. 'कोपाग्नी' असाही पाठ आहे. १५. उसळणें म्हणजे वर उडणें. येथें उत्पन्न होणें या अर्थी योजिलेला आहे. हा उत्प्रेक्षालंकार होय. १६. राहिला. १७. एक वस्त्र परिधान केलें आहे ज्यानें असा. १८. कोणताही राजा स्वराज्यच्युत झाला म्हणजे तो अरण्यांत जाऊन वास करीत असे. याचें मुख्य कारण असें दिसतें कीं वनांत मुनि, ऋषि इ० सज्जन राहत असल्यामुळें त्यांच्या सहवासानें तरी आपल्या दु:खित मनाला शांतता मिळेल असें पदच्युत झालेल्या राजांस वाटत असे. शिवाय पूर्वी प्रजा आपला जितका मान ठेवीत होती तितका इत:पर ठेवणार नाहीं. किंबहुना आपणास

वस्त्रा महासती । पाठीशीं चालली दमयंती । प्रजा मागां पुढां [1]बहुती । शोक करिती आक्रोशें. ॥ ५४ ॥ विवेकें[2] [3]दवडूनियां वनीं । अविवेक बैसे सिंहासनीं । तेंवी पुष्कर सिंहासनीं[4] । महोत्सवें[5] मिरवला. ॥ ५५ ॥ वनवासा चालिला नळ । लोक रुदन करिती सकळ[6] । तिघे करिती गैंदारोळ[7] । कली, द्वापर, पुष्कर. ॥ ५६ ॥ धेंडे[8] पिटोनियां नगरीं । पुष्कर शब्द[9] जाणवी पुरीं, । 'नळमित्र तो माझा वैरी । शिर छेदीन तयाचें. ॥ ५७ ॥ जो जाईल नळाचे संगीं । शूळ[10] भेदीन तयाचे अंगीं । यंत्रमुखीं[11] घालून आगीं । चूर्ण करीन कुंजरें[12].' ॥ ५८ ॥ कोणीं न ठाकती[13] निकटीं । [14]कोणी करूं न शकती गोष्टी । असो. नगर सांडुनी कष्टी । अरण्यमार्गें चालिला[15]. ॥ ५९ ॥ तीन दिवस निराहार[16] । प्राशनालागीं[17] न मिळे नीर[18] । चतुर्थ दिवशीं राजेश्वर । मार्गीं जातां स्त्रियेशीं. ॥ ६० ॥ सुवर्णपक्षांचे पक्षी । चरतां देखिले हो! वनकक्षीं[19] । राजा उभा राहोनी वृक्षीं । विचार करी आहारार्थ. ॥ ६१ ॥

---

कोणीही पुसणार नाहीं व विजयी झालेला नवीन राजा आपणास त्रास देईल ही भीति त्यांना होतीच.

१. 'बघती' असा अन्य पाठ आढळतो. २. विचार. ३. हारवून, गमावून. (येथें) घालवून असा अर्थ केल्यास बरें. ४. 'राजासनीं' व 'भद्रासनीं' असे अन्य पाठ आहेत. ५. मोठ्या समारंभानें. ६. 'तळमळ' 'हळहळ' असे अन्य पाठ आहेत. ७. मोठी आरोळी. हा शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी आहे. ८. दवंडी, डांगोरा. ९. मूळांतले पुष्कराचे शब्द असे आहेतः— 'नले यः स म्यगातिष्ठेत् स गच्छेद्वध्यतां मम.' १०. शूळ आंगांत भोंसकून मनुष्याला मारण्याची रीति हिंदू राजांच्या काळीं फार होती असें दिसतें; व हें मांडव्य ऋषीच्या शूलारोपणावरून सिद्ध होतें. निर्दयरीतीनें मारण्याची ही चाल पुढें लौकरच बंद झाली असावी असें दिसतें. कारण याचा फारसा कोठेंही उल्लेख केलेला आढळत नाहीं. ११. यंत्रमुखीं=तोफेच्या तोंडीं (देईन). तोफेच्या तोंडीं देणें, जाळणें, हत्तीच्या पायीं बांधून मारणें इत्यादि मनुष्यवधाच्या अत्युग्र रीती मुसलमानांच्या राज्यांत प्रचारांत होत्या. त्या रीती पाहूनच मुक्तेश्वरानें 'यंत्रमुखीं' 'चूर्ण करीन कुंजरें' इ० वाक्यें लिहिलीं असावीं. १२. हत्ती. १३. येती, येण्यास धजती. ठाकणें=राहणें, प्राप्त होणें, जवळ येणें. १४. 'कोणी शब्द करीना गोष्टी' असाही पाठ आहे. १५. 'चालती' 'निघाले' असेही पाठ आहेत. १६. अन्नाशिवाय. या प्रसंगाचें मोरोपंतानें मोठें हृदयद्रावक वर्णन केलें आहेः—'पुष्करभयें न पुसती कोणीही आप्त त्या नळाला हो! । हिंडे वनोवनीं तो अन्नावांचूनि बहु गळाला हो ॥ यत्पादतलमृदुत्वें लाजावें कामधेनु नवनीतें । वर मिथुन पादचारें हिंडे, पावे फळेंही न वनीं तें ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० ५०.] १७. पिण्याकरितां. १८. पाणी. १९. कक्षीं=मध्यभागीं, 'वनकुक्षीं' असा अन्य पाठ. कुक्षीं=पोटांत. जंगलाच्या पोटांत म्हणजे जंगलाच्या मध्यभागीं. दोनही पाठांतरांचा

'यांचेनि[1] मांसें क्षुधाहरण[2] । पक्षीं[3] विकलिया[4] येईल धन' । ऐसें भावूनियां महा यत्न । करिता झाला धरावया. ॥ ६२ ॥ पक्षीपारधियाचे[5] खेळ । पहिलेचि[6] जाणे राजा नळ । पाश[7] मांडूनी विहंगममेळ[8] । नाना युक्ती धरियेला. ॥ ६३ ॥ पीतांबराच्या पुढिले पदरीं[9] । कवळुनी पल्लव धरिला करीं । पक्षीं सत्वर फंडफडा[10] करी । नखें रोवुनी[11] वस्त्रातें. ॥ ६४ ॥ उडोनी गेले गगना[12] आंत[13] । राजा नग्न वस्त्ररहित[14] । हें देखोनी खेदयुक्त[15] । वैदर्भी[16] झाली मानसीं. ॥ ६५ ॥ हांसोनी[17] बोलती पक्षिगण,[18] । 'कपटपाश[19] ते आम्ही जाण । तुझें हिरोनियां वसन[20] । उडोनी[21] गेलों अंबरा.[22]' ॥ ६६ ॥ अर्ध[23] वस्त्रें[24] झांकिली काया ।

---

अर्थ एकच. २०. झाडावर खाण्यास कांहीं पदार्थ मिळेल तर पहावा या उद्देशानें चोहोंकडे पाहत असतां, नळाच्या दृष्टीस वरील पक्षी दिसले असा सांगण्याचा उद्देश. 'कक्षीं' असा अन्य पाठ आहे.

१. यांनीं, यांच्यांनीं, यांच्या योगानें. २. 'क्षुधाशमन' असाही पाठ आहे. ३. पर, पंख. ४. त्या पांखरांचे सोन्याचे पंख विकल्यास कांहीं पैसा मिळेल. पक्ष्यांच्या मांसानें क्षुधा शांत होईल व सोन्याच्या पंखानें पैसे मिळतील असा नलहृद्गतार्थ. ५. पक्ष्यांची पारध करण्याची रीत. नल क्षत्रिय व राजा असल्यामुळें मृगया करण्याच्या सर्व रीती त्याला माहीत असाव्या हें साहजिक आहे. ६. अगोदरच, पूर्वींच. ही अवदशा प्राप्त होण्याच्या पूर्वींच म्हणजे राज्य करीत असतांनाच—असा स्पष्टार्थ. ७. जाळें. ८. पक्ष्यांचा समुदाय. ९. 'पदर' असाही पाठ आहे. १०. 'पडत्कारी' व 'फणत्कारी' अशीं पाठांतरें आहेत. ११. 'गोंवुनि' असाही पाठ आहे. गोंवणें=गुंतागुंत करणें, अडकविणें. १२. आकाशाच्या. १३. आकाशाचा आकार छत्रीच्या आकाराप्रमाणें आहे अशी सामान्य समजूत असल्यामुळें पक्षी आकाशाच्या आंत गेले असें येथें म्हटलें आहे. १४. 'वस्त्रविरहित' असाही पाठ आहे. एका पोथींत 'वस्त्रासहित' असा पाठ आहे; परंतु हा अपपाठ आहे हें सांगायला नकोच. तो पाठ कदाचित् 'वस्त्रारहित' असा असला पाहिजे होता. १५. 'खेद अद्भुत,' 'खेद अत्यद्भुत,' 'शोकयुक्त' असेही पाठ आहेत. लेखकांच्या निष्काळजीपणानें इतके पाठ झाले असें वाटतें. १६. 'वैदर्भींया आपुले' असें पाठांतर आहे. १७. नळ नग्न असल्यामुळें पक्ष्यांना हासूं आलें. १८. 'पक्षिगण' म्हटलें आहे तरी दोन पक्षी असें समजावें. १९. फांसे. ज्या फांशांनीं नल व पुष्कर द्यूत खेळले ते. कलीनें अक्षांना सुवर्णपक्षाचें रूप देऊन पाठविलें होतें; व त्यांच्याकडून कलीनें, नळाजवळ जें एक वस्त्र होतें तेंही हिरावून घेतलें! २०. वस्त्र. २१. 'उडवुनि नेलों अंवरीं,' 'घेउनि गेलों आकाशीं' असे अन्य पाठ आहेत. २२. आकाशांत. २३. नळाजवळ नेसण्याकरितां वस्त्र नसल्यामुळें दमयंतीनें आपल्या वस्त्राच्या अर्ध्या भागानें नळाची काया झांकिली. 'साध्वीनें स्वपटार्धें स्वतनू तसि झांकिली स्वपतितनु ती; । वेदहि अशा सतीची करिति सदा, परि न पळहि पतित, नुती. ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० ५१.] २४. 'वसनें' असाही पाठ आहे.

पुढें[1] वनीं चालतां राया । अस्तमान झाला सूर्या । भयानक काननीं[2]. ॥ ६७ ॥ निराहार[3] निरुदक[4] । [5]दोघां मिळून वस्त्र एक । नळाहृदयीं नावरे शोक । पुढती धैर्य सांवरी[6]. ॥ ६८ ॥ निशा[7] प्रवर्तली[8] प्रबळ[9] । निद्रे लागीं न दिसे स्थळ । [10]शीतनिवारण अल्प[11]माळ । आश्रयो पाहे काननीं. ॥ ६९ ॥ [12]जीर्ण [13]पर्णकुटी तेथ । देखता झाला नळ वनांत । तृण[14]शय्ये भार्यासहित । खेदभूत बैसला. ॥ ७० ॥ दोघीं वेढिलें एक वसन । तळीं शय्या[15] ना[16] प्रावर्ण[17] । पंच

१. 'अन्यवनीं चालला राया' असें पाठांतर आहे. २. अरण्यांत. ३. कांहीं खाण्याला न मिळाल्यामुळें उपाशीं. ४. पिण्याला पाणी न मिळाल्यामुळें तान्हेले. ५. नळ व दमयंती या दोघांनीं एकच वस्त्र परिधान केलें होतें हें मागें सांगितलेंच आहे. येथें इतकें सांगितलें पाहिजे कीं एका वस्त्राचे दोन भाग करून दोघांनीं अलग अलग परिधान केलें असें नाहीं तर एकच वस्त्र, न फाडतां दोघांनीं, परिधान केलें व यामुळें ते एकमेकांला सोडून जाऊं शकत नव्हते. ६. 'आवरी' असाही पाठ आहे. ७. रात्र. ८. प्राप्त झाली. प्रवर्तणें=वागणें, चालणें, परंतु येथें हा शब्द 'येऊन ठेपणें' याअर्थीं योजिलेला आहे. 'परिवर्तली' असाही पाठ आहे. परिवर्तणें=परत येणें, स्वस्थानीं प्राप्त होणें. सूर्याच्या प्रखर तेजानें नाहींशी झालेली रात्र सूर्य गेल्याबरोबर स्वस्थानीं परत आली असा या द्वितीय पाठावरून अर्थबोध होतो. ९. महाबलवान्, अत्युग्र. प्रस्तुतस्थळीं निशेला 'प्रबळ' म्हणण्याला दोन तीन कारणें आहेतः—(१) कामी व दुःखी जनांला रात्रीमुळें फार त्रास सोसावा लागतो. त्यांतून विशेषतः दुःखी जनांला मुळींच झोंप येत नसल्यामुळें त्यांना रात्र फारच कंटाळवाणी व असह्य व 'प्रबळ' वाटते. आपला नायक व नायिका अत्यंत दुःखी असल्यामुळें त्यांच्या संबंधानें ती रात्र फारच प्रबळ होती असें म्हणावें लागतें. (२) अरण्य दिवसाच भयंकर असतें. रात्रीं सिंह, व्याघ्र, भल्लूक इत्यादि प्राण्यांच्या निःशंक विहारानें तें अत्युग्र होतें. म्हणून अरण्यांतल्या रात्रीला 'प्रबल' हें विशेषण अन्वर्थक होय. (३) या रात्रीं नल व दमयंती यांच्या वियोगाचा घोर प्रसंग येणार आहे असें सुचविण्याकरितां कवीनें 'प्रबळ' या विशेषणाची योजना केली आहे. १०. थंडीचा प्रध्वंसाभाव. थंडीपासून आत्मरक्षण करण्याकरितां स्थळ पाहत होता—असा विस्तृतार्थ. ११. किंचित्. १२. पडायला टेंकलेली, जुनी झालेली. १३. पर्णशाला, पानांनीं बांधिलेली झोंपडी. अरण्यांत राहणारे ऋषि आत्मरक्षणाकरितां पानांच्या किंवा गवताच्या झोंपड्या बांधीत असत; त्यांपैकीं एक झोंपडी नळाला दिसली. मूळांत या झोंपड्याला 'पर्णकुटी' किंवा 'पर्णशाला' असें न म्हणतां 'सभा' असें म्हटलें आहे. १४. गवताच्या बिछान्यावर. 'शष्पशय्येवर' असाही पाठ आहे. 'शष्प=बालतृण. ['शष्पं बालतृणं घासः' इत्यमरः.] १५. पलंग. १६. देहलीदीपन्यायानें 'ना'चा संबंध 'शय्या' व 'प्रावर्ण' या दोहोंकडे आहे. १७. लेप, उशी इत्यादि पलंगावरील सामान.

रात्र उपोषण । तेणें प्राण[1] जाकळती[2]. ॥ ७१ ॥ राजा विचारी मानसीं, । 'गुह्य[3] न वदावें स्त्रियेसी । खरतर[4] दुःखाच्या हुताशीं । देह भस्मेल[5] दोघांचा[6]. ॥ ७२ ॥ सुंदर[7] सुकुमार पवित्र गुणी । चरण चाली चाले[8] वनीं, । आहारावीण उपोषणीं । प्राण त्यागील तत्वतां. ॥ ७३ ॥ दृष्टीवेगळे[9] होत[10] कां कष्ट । यालागीं वांटे[11] वियोग श्रेष्ठ । इतें[12] देखोनी हृदयस्फोट[13] । क्षणक्षणीं होतसे. ॥ ७४ ॥ मज[14] वेगळें हो कां भलतें । यालागीं त्यागुनी जाईन इतें' । ऐसा निश्चय करुनी चित्तें । संकेत[15] शब्दें शांतवी. ॥ ७५ ॥ म्हणे, 'प्राणवल्लभे! एथें । घालुनी हृदयकवचातें[16] । तुतें रक्षावें हा हेत । वांत[17] स्पर्श तो ही न द्यावा. ॥ ७६ ॥ पाहें माझी क्लेशावस्था । सहज[18] बोलणें तुझिया हिता । देशीं[19]

१. प्राण पांच असल्यामुळें 'जाकळती' हें क्रियापद अनेकवचनांत आहे. पंचप्राणांचीं नांवें:– प्राण, अपान, समान, उदान, व्यान. या प्राणांचीं स्थानें:–'हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिमंडले । उदानः कंददेशे स्यात् व्यानः सर्वशरीरगः ॥.' २. व्याप्त होती. ३. गुप्त गोष्ट. दमयंतीला वनांत सोडून आपण निघून जाऊं ही गुप्त गोष्ट. ४. खडतर. 'बवयोर्डलयोरैक्यम्' व 'रलयोर्न भेदः' या दोन नियमांनीं 'खडतर' या शब्दांतल्या डकाराचा रकार होऊन 'खरतर' असा शब्द झाला. ५. भस्म होईल. भस्मणें=भस्म होणें असा कवीनें नवीन धातु कल्पिलेला आहे. ६. 'दोहींचा' असाही पाठ आहे. ७. 'सुंदर,' 'सुकुमार,' 'पवित्र,' 'गुणी' हीं दमयंतीचीं विशेषणें होत व हीं फार खुबीनें योजिलेलीं आहेत. दमयंती स्वरूपानें, स्वभावानें, सद्गुणानें व बुद्धीनें अत्यंत श्रेष्ठ होती असें या विशेषणांवरून ध्वनित होतें व अशा साध्वीला असलीं संकटें सोसावीं लागलीं याबद्दल मनाला फार वाईट वाटूं लागतें. ८. चरण चाली चाले=पायांच्या गतीनें चालते; पायांनीं चालते–असा स्पष्टार्थ. ९. डोळ्यांच्या आड. नल म्हणतो कीं आपण पाहत नसतां दमयंती कितीही संकटें भोगील तर हरकत नाहीं, परंतु ती आपल्या डोळ्यांपुढें असतां तिचे किंचितही हाल पाहवत नाहीं. १०. होत कां?=होईनात, झाल्यास हरकत नाहीं–असा भाव. ११. 'यालागीं त्यागावी हें श्रेष्ठ' असाही पाठ आहे. १२. हिला. कष्ट सोशीत असलेल्या दमयंतीला. १३. फुटणें. १४. मज वेगळें=मी नसतांना. १५. आपला वियोग झाला पाहिजे असें स्पष्टपणें नळ दमयंतीला सांगूं शकला नाहीं; म्हणून नळ 'संकेत' शब्दांनीं (म्हणजे ज्या शब्दांपासून अप्रत्यक्ष रीतीनें नळाचा उद्देश दमयंतीला समजेल अशा शब्दांनीं) दमयंतीला आपला उद्देश कळवूं लागला असा विशदार्थ 'सखेद शब्दें' असाही पाठ आहे. १६. चिलखत. १७. वारा देखील तुला शिवणार नाहीं अशा रीतीनें तुझें रक्षण करण्याचा माझा विचार आहे. १८. मी सांगेन त्याप्रमाणें झालेंच पाहिजे असें नाहीं; तुझ्या इच्छेविरुद्ध असल्यास तसें करूं नको असें '**सहज** बोलणें' या शब्दांनीं सुचविलें. १९. प्रदेश, आसपासची जागा.

अवलोकीं सभोंवता । सर्व येथुनी दिसताहे. ॥ ७७ ॥ हा [1]पंथ जातसे दक्षिणे । पवित्र [2]सरिता [3]पवित्र [4]जीवनें । [5]अवंती लंघुनी वि[6]चक्षणे! । [7]रेवा [8]ता-

१. रस्ता. 'एते गच्छंति बहवः पंथानो दक्षिणापथम् । अवंतीं ऋक्षवंतं च समतिक्रम्य पर्वतम् ॥' [मूळ—वन०—अ० ६१.] २. नद्या. ['नदी सरित्' इत्यमरः.] ३. 'पर्वतवनें' असाही पाठ आहे. ४. उदकें. ५. उज्जनी. 'सुगमदेश गंगा विपिनें' असा अन्य पाठ आहे. ही नगरी कोठें आहे याविषयीं भास्कराचार्यानें लिहिलें आहे:—'निरक्षदेशात् क्षितिषोडशांशे भवेदवंती गणितेन यस्मात् । तदंतरं षोडशसंगुणं स्यात् भूमानमस्मात् बहु किं तदुक्तम् ॥' अर्थः— लंकेपासून पृथ्वीच्या परिधीच्या सोळाव्या भागावर अवंती आहे. म्हणून भूमान या अंतराच्या सोळापट आहे असें समजावें. यावरून या नगरीचे उत्तर अक्षांश २२॥ आहेत असें सिद्ध होतें. हल्लींच्या नकाशांत ही नगरी २३ उत्तरअक्षांशावर आढळते. याम्योत्तर रेषा याच नगरीवरून गेली आहे. हल्लींच्या उज्जयिनीपासून दक्षिणेस एका मैलावर पूर्वींची उज्जयिनी (अवंती) होती असें सिद्ध झालें आहे. या स्थलीं खणिलें असतां पूर्वींच्या इमारतींचे खांब वगैरे अद्यापपर्यंत आढळतात. प्रख्यात बौद्ध प्रवासी ह्यूएन त्संग सहाव्या शतकांत हिंदुस्थानांत आला होता; तेव्हां त्याला हें शहर मार्गांत लागलें होतें. त्या वेळीं या शहराचा घेर २॥ कोस होता. हल्लींच्या उज्जयिनीचा घेर २॥ कोसांपेक्षां किंचित् जास्त आहे. ह्यूएन लिहितोः—'मी पाहिलें तेव्हां उज्जयिनीच्या आसपास सर्व बौद्धधर्माचे राजे असून, उज्जयिनी माळव्याच्या ताब्यांत होती. उज्जयिनींत बौद्धमठ अनेक आहेत असें जरी मीं ऐकिलें होतें तरी तीनच मठ माझ्या दृष्टीस पडले. ब्राह्मणांचीं अनेक देउळें आढळलीं. वेदविद्येंत ब्राह्मण निपुण होते. इ०' या नगरींत महाकाळेश्वर नांवाचें ज्योतिर्लिंग आहे. प्रख्यात शककर्ता विक्रमादित्य त्याची ही राजधानी होय हें प्रख्यातच आहे. येथें विक्रमादित्याचा संगमरवरी दगडाचा पुतळा स्थापिला होता. परंतु तो मुसलमानांनीं फोडून टाकिला असें तत्रस्थजन सांगतात. ६. हे विदुषी! हें नलाचें दमयंतीला संबोधन. 'विचक्षणे' या विशेषणानें तूं विद्याविभूषित असल्यामुळें माझ्या म्हणण्याचा नीट विचार करशीलच असा नलानें दमयंतीला आपला आशय दर्शविला. ७. नर्मदानदी. ['रेवा तु नर्मदा सोमोद्भवा मेकलकन्यका' इत्यमरः.] या नदीची उत्पत्ति सोमकुलोत्पन्न पुरूरवा यापासून झाली अशी कथा आहे. भृगुऋषीचे पुत्र जे मानस नामक लोकांत सोमप पितर या नांवानें राहतात त्यांची नर्मदा ही मानसकन्या होय. यावरूनच नर्मदेला 'सोमोद्भवा' असें नांव पडलें. ही नदी मध्यप्रदेशांतील मंडला जिल्ह्यांत अमरकंटक पर्वतापासून निघून पश्चिमदिशेनें जबलपूर, नरसिंगपूर, हुशंगाबाद व निमाड जिल्ह्यांतून होळकराचा प्रांत व मुंबई इलाखा ओलांडून खंबायतच्या अखातांस मिळते. या नदीच्या उगमाजवळ कपिलधारा व दूधधारा या नांवांचे प्रचंड धबधबे आहेत. हिच्या कांठीं ओंकार, मंडलेश्वर, महेश्वर, भडोच इत्यादि क्षेत्रें व शहरें आहेत. हिला लहान लहान अनेक नद्या मिळाल्या आहेत. ८. ही नदी देखील मध्यप्रदेशांतलीच आहे. हिचा उगम बैतूल जिल्ह्यांत मुलताई तहसिली जवळ आहे. ही खंबायतच्या अखातांतच पडली आहे. पूर्णा व गीर्णा या नद्या हिला मिळतात.

पती, गौतमी[1]. ॥ ७८ ॥ पैलें[2] तो विंध्याचल साउमा[3] । पयोष्णी[4] नदी जलसुगमा[5] । तपोधनाच्या आश्रमा । मार्गीं जातां देखसी. ॥ ७९ ॥ हा सुपंथ[6] विदर्भाप्रती । जेथें जनका[7] तुझिया वस्ती । येणें मार्गें अयोध्यापती[8] । कोसलदेशीं[9] देखिजे[10].' ॥ ८० ॥ ऐकोनी प्राणेश्वराची मात[11] । वल्लभेहृदयीं[12] शस्त्रघात । म्हणे, 'हा कायसा[13] संकेत[14] । दावीतसां सांक्षेपें[15]? ॥ ८१ ॥ मनीं[16] धरूनी माझा त्याग । ज्ञान[17] करितां नाना मार्ग । हा संकल्प[18] अति अयोग्य । पुण्यश्लोका! तुजलागीं. ॥ ८२ ॥ सांडुनीयां देवांचिया मूर्ती[19] । त्यागुनी पृथ्वीचे भूपती । तुंम्हांतें[20] वरिलें परम आर्ती[21] । एक भक्तिभावार्थें[22]. ॥ ८३ ॥ काया वाचा आणि मन । त्वांही ठेविला मजवरी प्राण । ऐशियाचें हृदय कठिन ।

---

१. गोदावरी नदी. गोहत्येच्या पापापासून मुक्त होण्याकरितां गौतमानें ही नदी पृथ्वीवर आणिल्यामुळें हिला गौतमी असें नांव पडलें. ही त्र्यंबकेश्वर येथें उत्पन्न होऊन पूर्वेकडे नाशिकावरून औरंगाबाद, वऱ्हाड व गोंडवन यांतून वाहत जाऊन बंगालच्या उपसागरास मिळते. हिच्या कांठीं त्र्यंबक, नाशिक, पैठण, मंत्रपुर, राक्षसभुवन व भद्राचल हीं शहरें आहेत. २. पलीकडे. ३. समोर. ४. ही नदी जेथें समुद्रास मिळाली आहे तेथें 'पयोष्णीसंगम' नांवाचें क्षेत्र आहे. ५. 'जलसंगमा' असाही पाठ आहे. ६. चांगला रस्ता. 'सुपंथ' या शब्दानें हा तुझ्या जनकगृहाला जाण्याला उत्तम रस्ता असल्यामुळें तूं याच मार्गानें जाशील तर चांगलें, असा नळानें आपला हृद्गतसंकेत जाणविला. ७. जनकाची; भीमराजाची असा भाव. 'तुझिया पितयाची वस्ती' असाही पाठ आहे. ८. अयोध्येचा राजा ऋतुपर्ण. ९. हिंदुस्थानांत एकंदर कोसल देश दोन; एक उत्तर कोसल व दुसरा दक्षिण कोसल; पैकीं अयोध्या ज्याची राजधानी तो उत्तर कोसल होय. हा बहुतेक सांप्रतचा अयोध्याप्रांतच होय. १०. पाहशील. 'देख' धातूचें हें भविष्यकाळाचें रूप चिंतनीय होय. हा अयोध्येला जाणारा रस्ता होय असा नळाच्या म्हणण्याचा भाव. ११. गोष्ट, भाषण. १२. पत्नीच्या, स्त्रियेच्या, दमयंतीच्या. १३. 'कासया' असा अन्य पाठ आहे. १४. सूचना, बेत, अप्रत्यक्षरीतीनें मला काय सुचवितां असें दमयंती म्हणते. १५. यत्नानें. १६. मनीं धरूनी=मनांत आणून. १७. ज्ञान करितां=माहिती करून देतां. मला सोडून जाण्याचा तुमचा विचार आहे व मला सोडिल्यानंतर मी जनकगृहीं निघून जावी म्हणून तुम्हीं मला हे निरनिराळे मार्ग दाखविले हा दमयंतीच्या म्हणण्याचा अंतरार्थ. १८. बेत, विचार. १९. देवाचिया मूर्तीं=देव. मूर्तीं=पुरुष. उदाहरण 'मूर्तीं तितक्या प्रकृती.' २०. 'तूतें' असाही पाठ आहे. २१. आवडीनें. २२. भक्ति व भाव या दोहोंच्या योगानें. तूं फार शूर असून पुण्यश्लोकाग्रणी आहेस म्हणून मला कधींही अंतर देणार नाहींस याविषयीं तुझ्यावर भाव म्हणजे विश्वास ठेवून मीं तुला वरिलें; असें असून मला अंतर देणें तुला योग्य आहे काय?—हा दमयंतीच्या बोलण्याचा भाव.

केंवी जालें कळेना? ॥ ८४ ॥ पतिव्रता[१] मी निर्धूत[२]। तुज ही एकपत्नीव्रत[३]। माझा त्याग करितां एथ। काय ईश्वर संतुष्टे[४]? ॥ ८५ ॥ गेलें असतां सर्व राज्य। क्षुधेतृषेनें पीडिली भाज[५]। अर्धवस्त्रा एकटी मज। त्यागूं म्हणशी काननीं[६]? ॥ ८६ ॥ तापत्रयनिवारणाचें[७] छत्र। भार्ये परता नाहीं मित्र[८]। पतिव्रता मी सुपवित्र। कशी त्यागूं भाविशी? ॥ ८७ ॥ तुज ही प्रबळ क्षुधा बाधी।

---

१. 'मी पतिव्रता' असें सांगून दमयंती आत्मस्तुति करीत आहे, तस्मात् ती गर्हणीय होय असा येथें दमयंतीवर आरोप येणार आहे. परंतु हा आरोप खरा नाहीं. कारण एकाद्यानें जर वस्तुस्थितीला न सोडतां योग्य प्रसंगीं आपल्या गुणांचें वर्णन केलें तर त्या वर्णनाला 'आत्मस्तुति' असें नांव देतां येणार नाहीं. शिवाय आपण महत्संकटांत सांपडलों असतांना त्यापासून स्वसंरक्षण करण्याकरितां जर स्वगुणकथनाचा प्रसंग आला तर त्या स्वगुणकथनाला 'आत्मस्तुति' म्हणतां येणार नाहीं. दमयंती खरी पतिव्रता असल्यामुळें वियोगदुःखापासून स्वसंरक्षण करण्याकरितां ती आत्मगुणकथन करीत असल्यामुळें 'आत्मस्तुती'चा आरोप तिच्यावर कधींही लागू पडणार नाहीं. २. 'पवित्र' असाही पाठ आहे. ३. एका धर्मपत्नीशिवाय दुसऱ्या सर्व स्त्रियांना मातृवत् समजण्याचा दृढ निश्चय. ४. न संतुष्टे—असा भाव. ५. वायको. ६. वनांत. ७. 'उष्णींचें' अन्य पाठांतर. ८. Compare :—

"A wife is half the man, his truest friend—
A loving wife is a perpetual spring
Of virtue, pleasure, wealth; a faithful wife
Is his best aid in seeking heavenly bliss;
A sweetly-speaking wife is a companion
In solitude; a father in advice;
A mother in all seasons of distress;
A rest in passing through life's wilderness."

स्त्रियांविषयीं मिडलटन नामक एका इंग्रजी विद्वानाचें काय म्हणणें आहे पहा:—

"The treasures of the deep are not so precious
As are the concealed comforts of a man
Locked up in woman's love."

संस्कृतकविवरांनींही स्त्रियांची थोरवी थोडीथोडकी गाइली आहे असें नाहीं:—कार्ये दासी रतौ वेश्या भोजने जननीसमा। विपत्तौ बुद्धिदात्री च सा भार्या सर्वदुर्लभा ॥ १ ॥ प्रतिरजनि प्रतिदिवसं विहर बहिश्चंडि डिंडिमं दत्वा। कोणवधूदृग्वलितैर्विश्वं पुनराकुलीभवति ॥ २ ॥ तल्पे प्रभुरिव गुरुरिव मनसिजशास्त्रे श्रमे भुजिष्येव। गेहे श्रीरिव गुरुजनपुरतो मूर्तेव सा व्रीडा ॥ ३ ॥ कार्येषु मंत्री करणेषु दासी भोज्येषु माता शयनेषु रंभा। धर्मानुकूला क्षमया धरित्री भार्या च षाड्गुण्यवतीह दुर्लभा. ॥ ४ ॥

राज्यहानीची सखेद व्याधी[1] । संगीं भार्या दिव्यौषधी[2] । उपचारीन[3] दासीत्वें[4]. ॥ ८८ ॥ भार्या सकळ श्रमातें हर्ती[5] । भार्या सकळ सुखातें कर्ती[6] । भार्या पवित्र वंशधर्ती[7] । यशकीर्ती स्त्रीसंगें. ॥ ८९ ॥ स्त्रीसंगें[8] धर्म निर्दोष । पुरुष कुमार्गी न पवे भ्रंश । भार्या नसतां महादोष । कामादिक पीडिती[9]. ॥ ९० ॥ यालागीं पवित्र पतिव्रता । वनीं येकली त्यागी[10] भर्ता । तैं[11] दोष अपयश मूर्खता । लोक माथां[12] स्थापिती. ॥ ९१ ॥ मातें घेउनी राजेश्वरा! । चालिजे वैदर्भाचिया नगरा । दुष्ट[13] काळ क्रमुनी चतुरा! । पुढें वर्तो प्रारब्धें. ॥ ९२ ॥ भीम[14] दयावंत सहसा । परिहारील आपल्या[15] क्लेशा । संशय सांडुनी मानसा । शीघ्र गेलें पाहिजे.'॥ ९३ ॥

नळ म्हणे, 'विचारनिष्ठे! । आपत्तिकाळीं न वंचीजे[16] कोठें । विशेष[17] सन्मानहानी मोठें । परम[18] दुःख अंतरीं. ॥ ९४ ॥ राज्य हारवुनीयां पणीं । भार्येसहित एकवसनी । श्वशुरगृहीं जातां व्यसनीं[19] । विश्वें[20] ठेवील मूर्खता. ॥ ९५ ॥ दारिद्र्यकाळामाजी देख । नीच श्रेष्ठातें म्हणती मूर्ख[21] । उपहासिती सकळ लोक । आप्तवर्ग[22] विशेषें. ॥ ९६ ॥ यालागीं धरुनियां धीर । प्रारब्धावरी घालूं भार । भोग सरलिया ईश्वर । कृपा करील निर्धारें[23]. ॥ ९७ ॥ आतां ऐकें गुणवेल्हाळी[24]! । चिंता सांडुनी हृदयकमळीं । चालतां श्रमलीस भूतळीं । निद्रा करीं

---

१. रोग. २. उत्तम औषध. ३. चिकित्सा करणें, सेवा करणें. ४. 'दास्यत्वें' असाही पाठ आहे. ५. हरण करी, निवारी. 'भार्या सकळ श्रमांची हर्ती' असाही पाठ आहे. या पाठांतील हर्ती=हरण करणारी, निवारण करणारी. ६. 'सुखांची कर्त्री' असें पाठांतर आहे. ७. वंशाला धारण करणारी. पुत्रोत्पत्तीचें काम स्त्रियेकडे असल्यामुळें तिला 'वंशधर्ती' म्हटलेलें आहे. ८. भार्येशिवाय कोणतेंही धर्मकृत्य यथासांग होत नाहीं हें सुप्रसिद्ध आहे. भार्येला 'सहधर्मचारिणी' अशी संज्ञा आहे तिचें तात्पर्य हेंच आहे. ९. 'नाडिती' असाही पाठ आहे. १०. 'त्यागी'चा कर्ता 'भर्ता' होय. ११. त्या कारणामुळें, वनांत स्त्रीचा परित्याग केल्यास. १२. आरोप आणिती. १३. 'कष्ट' असा अन्य पाठ. १४. मूळांतलें दमयंतीचें भाषण किंचित् भिन्न आहे:—'यदि चायमभिप्रायस्तव ज्ञातीन् व्रजेदिति । सहितावेव गच्छावो विदर्भान् यदि मन्यसे ॥ ३५ ॥ विदर्भराजस्तत्र त्वां पूजयिष्यति मानद । तेन त्वं पूजितो राजन् सुखं वत्स्यसि नो गृहे ॥' [वनपर्व—अ० ६१.] १५. 'सर्व' असाही पाठ आहे. १६. जाणें. 'वसीजे' असा अन्य पाठ. १७. विशेष=मुद्दाम, फार. १८. 'अश्लाघ्य जाण परगृहीं' असाही पाठ आहे. १९. संकटीं. २०. सर्व लोक—असा भाव. २१. एका कवीनें म्हटलें आहे:—'दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी'. २२. म्हणूनच दुसऱ्या एका कवीनें म्हटलें आहे:—'वरं वनं व्याघ्रगजादि सेवितं द्रुमालयं पत्रफलांबुभोजनम् । तृणानि शय्या वसनं च वल्कलं न बंधुमध्ये धनहीनजीवितम् ॥'. २३. निश्चयें. २४. गुणवेल्हाळी=सद्गुणी स्त्री. [गुण=सद्गुण; वेल्हाळी=स्त्री, बायको.]

नावेक.[१]' ॥ ९८ ॥ दमयंतीस लागली निद्रा । तळमळ नावरे[२] नरेंद्रा । ग्रहणीं राहू[३] गिळी चंद्रा । तेंवी चिंतें ग्रासिलें. ॥ ९९ ॥ भार्येसी[४] क्षुधे तृषेची[५] झोंप । राजया मनीं उद्वेग[६] ताप । धुंधुःकारे[७] जैसा सर्प । 'हा ! हा ! कष्ट' म्हणोनी. ॥१००॥ कली संचरला[८] आंगीं । यालागीं[९] निश्चय केला त्यांगीं[१०] । अर्धवस्त्रछेदना लागीं । उपाय चित्तीं करितसे. ॥ १०१ ॥ अर्धवस्त्र नेणतां[११] इतें । खंडोनी[१२] गेलें पाहिजे परतें । ऐसा विचार करुनी चित्तें[१३] । विलोकित काननीं. ॥ १०२ ॥ कोशें[१४]रहित पडलें शस्त्र । तेणें छेदिलें[१५] अर्ध वस्त्र । निद्रिस्त पतिव्रता पवित्र । निर्जन वनीं एकली. ॥ १०३ ॥ त्यागुनी चालिला तो राया । परतोनी पातला त्याचि ठाया । निद्राभूत देखोनी जाया । जाता जाला मागुता[१६]. ॥ १०४ ॥

---

१. क्षणभर. २. 'लागली' अन्य पाठ. ३. कित्येक पुराणांच्या मतें राहु हा कश्यप ऋषीपासून सिंहिकेस झालेल्या पुत्रांतील एक; व कित्येक पुराणांच्या (भागवत व पद्मपुराण) मतें हा विप्रचित्ती नामक दानवाचा पुत्र होय. मोहिनीरूप धारण करून विष्णूनें अमृताची वांटणी केली त्यावेळीं देवांच्या व दानवांच्या पंक्ति निरनिराळ्या वसविल्या होत्या. परंतु राहु हा दानव असूनही कोणाला न कळतां देवांच्या पंक्तींत येऊन वसला. सर्व देवांना अमृत मिळालें त्यावेळीं चुकून यालाही मिळालें. व यानें तें पिऊनही घेतलें. इतक्यांत हा दानव होय हें सूर्यचंद्रांनीं ओळखिलें व त्यांनीं विष्णूला कळविलें. विष्णूनें एकदम याचा शिरच्छेद केला, परंतु प्यालेलें अमृत याच्या गळ्यापर्यंत पोहोंचल्यामुळें शिरच्छेदानंतरही हा जिवंत राहिला, व आपणाला ओळखणाऱ्या सूर्यचंद्रास दरवर्षीं ग्रासूं लागला. ग्रहणाचें हेंच कारण होय असें पौराणिकांचें मत आहे. हा नवग्रहांपैकीं एक ग्रह होय. परंतु हा तामसग्रह (अंधकारमय) असल्यामुळें इतर ग्रहांइतका याला मान नाहीं. कित्येक ज्योतिषशास्त्रज्ञांच्या मतें राहु म्हणजे पृथ्वीची छायाच होय. या छायेंत चंद्र जेव्हां सांपडतो तेव्हां चंद्रग्रहण होतें. ४. दमयंतीला. ५. 'क्षुधाश्रमाची' असाही पाठ आहे. ६. 'हृदयीं वियोग ताप' असाही पाठ आहे. ७. हा अनुकरणवाचक शब्द होय. ८. राजाच्या आंगीं मागेंच कलि शिरला होता म्हणून तो आतां शिरला असें मानितां येत नाहीं. म्हणून 'संचरला' हें रूप भूतकालवाचक आहे असें समजावें. ९. आंगांत कली असल्यामुळें. १०. दमयंतीला सोडून देण्याविषयीं—असा भाव. ११. (इतें) नेणतां=हिला कळल्याशिवाय, दमयंतीला समजल्याशिवाय. १२. चिरोनी, फाडून. १३. 'कथं वासो विकर्त्तेयं न च बुध्येत मे प्रिया । विचिंत्यैवं नलो राजा सभां पर्यचरत्तदा ॥ १७ ॥ परिधावन्नथ नल इतश्चेतश्च भारत । आससाद सभोद्देशे विकोशं खड्गमुत्तमम् ॥ १८ ॥' [महाभारत—वनपर्व—अ० ६२.] १४. तरवार इत्यादिकांचें वेष्टन. (म्यान.) १५. पंतानीं म्हटलें आहे:—'खड्गें पट कापविला न, तिचा अर्धा गळाचि तो कलिनें'. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंतकृत महाभारत—वनपर्व—पृ० ५१ गी० ११६ पूर्वार्ध.] १६. पुन्हा.

शिंणली[1] पायीं चालतां वाट । उपोषणीं आगळे[2] कष्ट । चेतनारहित[3] पडे काष्ट[4] । तेंवी निद्रिस्त भूतळीं. ॥ १०५ ॥ म्हणे,[5] ‘हे[6] पतिव्रता निर्दोष । स्पर्शों[7] न शके परका पुरुष । इचे नेत्रींचा हुताश[8] । भस्म करील दुष्टातें[9]. ॥ १०६ ॥ माझिये आशीर्वचनीं । क्षेम[10] कल्याण वांचो विजनीं[11] । दुःख न देखवे नयनीं । यालागीं त्यागुनी जातसें. ॥ १०७ ॥ निकट असतां आपदा[12] । माझेनी न देखवे कदां । त्यागीलिया पवित्र प्रमदा[13] । ईश्वर ईतें रक्षील. ॥ १०८ ॥ आदित्य[14] रुद्र[15] आणि वसव[16] । आश्विन[17] मरुत[18] नागदेव[19] । संतऋषी[20] सिद्ध सर्व । धर्मशील रक्षतु. ॥ १०९ ॥ ग्रह[21]नक्षत्र[22]पंचभूतां । श्वापदें पक्षी वनदेवतां । वृक्षवल्लीगुल्म

---

१. श्रमली, दमली. २. निराळे, अधिक. ३. प्राणांशिवाय. ४. लांकूड. ५. हें नलाचें भाषण आहे. ६. ही दमयंती. ७. ‘स्पर्शों न शके’ याचा कर्ता ‘परका पुरुष’ असून याचें कर्म ‘हिला’ हें अध्याहृत होय असें समजावें. ८. अग्नि. ९. जे दुष्ट हिला स्पर्शूं पाहतील त्यांना. १०. कुशल. ११. ओसाड अरण्यांत. ‘वनीं’ असाही पाठ आहे. १२. ‘इच्या आपदा’ असाही पाठ आहे. १३. स्त्री. १४. द्वादशादित्य. त्यांचीं नांवें:—धाता, मित्र, अर्यमा, शक्र, वरुण, अंशुमान्, भग, विवस्वान्, पूषा, सविता, त्वष्टा, विष्णु. १५. एकादश रुद्र. त्यांचीं नांवें:—मृग, व्याध, सर्प, निर्ऋति, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, महाद्युति, भर्ग. १६. ‘वसु’ शब्दाचें अनेकवचन. वसव आठ आहेत. त्यांचीं नांवें:—धर, ध्रुव, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास. १७. अश्विनीकुमार. आश्विनेय; वडवा (अश्विनी) रूपधारिणी सूर्यपत्नी संज्ञा (त्वाष्ट्री) हिला अश्वरूपधर सूर्यापासून झालेल्या दोन पुत्रांस अश्विनीकुमार असें म्हणतात. यांतील ज्येष्ठाचें नांव नासत्य आणि कनिष्ठाचें दस्त्र. हे देवांचे वैद्य होत, म्हणून यांस ‘स्वर्वैद्य’ अशी संज्ञा आहे. हे सप्तविध देवांपैकीं होत. हे दोन भाऊ असल्यामुळें यांस नासत्यौ, अश्विनौ, दस्त्रौ, आश्विनेयौ, वाडवेयौ असें साधारण नांव आहे. हे नकुलसहदेव यांचे जनक होत. १८. मरुद्गण. कश्यपापासून दितीला झालेले पुत्र. यांची संख्या एकोणपन्नास आहे. १९. कश्यपापासून दक्षकन्या कद्रू हिच्या ठायीं झालेले शंभर पुत्र. यांत प्रमुख शेष, वासुकि, कर्कोटक, तक्षक इ० होत. २०. प्रत्येक मन्वंतरांत सात धर्मोपदेशक ऋषि होत असतात. त्यांनाच ‘सप्तर्षि’ म्हणतात. सांप्रत वैवस्वत मन्वंतर असून कश्यप, अत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि भरद्वाज हे या मन्वंतरांतील सप्तर्षि होत. २१. नव ग्रह:—रवि, सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु. हे आपआपल्या नांवाच्या मंडळाचे अधिपति होत. २२. नक्षत्रांविषयीं लिंगपुराणांत सांगितलें आहे:—‘नक्षत्राणि च सर्वाणि नक्षत्राणि विशंति च । गृहाण्येतानि सर्वाणि ज्योतींषि सुकृतात्मनाम् ॥’ [अध्याय ६१ श्लोक १२.]

लतां[१] । नमन माझें साष्टांगीं. ॥ ११० ॥ धरादेवी[२]! तुज नमन[३] । तुजवरी कंटक बहु पाषाण । दमयंतीचे सुकुमार चरण । छिन्नभिन्न न करावे. ॥ १११ ॥ तुम्हीं समस्तीं स्नेहभावें । लावण्यलतिके[४] सांभाळावें । तुम्हांसी निरवूनी[५] स्वस्थ जीवें । मी जातसें वनपंथीं. ॥ ११२ ॥ सर्वां[६] वसतिया आत्मारामा[७]! । तुवां वांचवावी[८] अंगनोत्तमा[९] । पंच प्राण नमन तुम्हां । त्यागूं नका इयेतें. ॥ ११३ ॥ आपतत्वा[१०]! तुवां जीवना । इच्छिलिया करीं[११] जलपाना'. । सूर्यासी म्हणे, 'उष्णकिरणा । लागों ईतें न द्यावें.' ॥ ११४ ॥ 'ईश्वर रक्षील सर्वथा । माझ्यानें न देखवे व्यथा । या लागीं त्यागुनी जातों आतां । क्षेम कल्याण हे असो. ॥ ११५ ॥ मी सत्यवादी पुण्यश्लोक । हें सत्य[१२] असेल निष्टंक[१३] । 'तरी[१४] लोटुनी कोटि दुःख । स्वस्थ जाईल माहेरा[१५].' ॥ ११६ ॥ ऐसा देऊनि आशीर्वाद । जाता जाला **नळ नैषध** । पुढती पश्चात्तापें खेद । अत्यद्भुत

---

१. वृक्षांचा लहानसा समूह. २. पृथ्वी. मागल्या ओवींत **न**लानें पंचभूतांची प्रार्थना केली होती व पृथ्वी पंचभूतांतली एक आहे, म्हणून तिची पुनः प्रार्थना करण्याची आवश्यकता नव्हती. तरी **न**लानें तिची पुनः प्रार्थना केली. यावरून आपल्या मागें आपल्या स्त्रीचें काय होईल याविषयीं त्याला फार चिंता होती असें स्पष्ट होतें. शिवाय **द**मयंतीला सोडण्यांत **न**ळाचा मुख्य उद्देश हा होता कीं, तिनें पितृगृहीं जावें. अर्थात् ती माहेरीं चालत जाणार. चालतांना रस्त्यावर कंटक, पाषाण इत्यादि नसल्यास ती त्वरित पितृगृहीं पोहोंचेल हें उघड आहे. **द**मयंती चालत असतां पृथ्वीदेवीनें तिच्या वाटेंत असला कांहीं अडथळा आणूं नये याबद्दल **न**ळाच्या मनांत जी उत्कंठा होती तीच पृथ्वीदेवीला पुनः पुनः प्रार्थण्याचें दुसरें कारण होय. ३. 'शरण' असाही पाठ आहे. ४. लावण्याची जी लता दमयंती तिला. ५. समर्पून. ही ओंवी करुणरसाचें उत्तम उदाहरण होय. ६. सर्वां वसतिया=सर्वांचे ठायीं वास करणारा, सर्वांतर्यामी–असा भाव. हा शब्द चिंतनीय आहे. ७. हा शब्द बहुतकरून 'जीवात्मा' या अर्थीं योजितात. प्रस्तुतस्थलीं हा 'परमात्मा' या अर्थीं योजिलेला आहे. ८. 'निववावी' असाही पाठ आहे. ९. स्त्री. अंगना=जिचें अंग सुंदर आहे ती स्त्री. 'अंग' शब्दाला 'न' प्राशस्त्यदर्शक प्रत्यय लागून 'अंगना' शब्द झाला आहे. १०. हे पाण्या. पाणी शुद्धतत्व (element) आहे अशी पूर्वजांची समजूत होती; परंतु ती समजूत आधुनिक रसायनशास्त्रज्ञांनीं खोटी ठरविलेली आहे. पाणी हा शुद्ध पदार्थ नाहीं, परंतु तो 'आक्सिजन' (Oxygen) आणि 'हायड्रोजन' (Hydrogen) या दोन वायुरूपतत्वांच्या संयोगापासून झाला आहे असें इ० स० १७८१ सालीं **क्या**वेन्डीश नामक प्रख्यात इंग्लिश रसायनशास्त्रवेत्त्यानें सिद्ध केलें. ११. 'करवीं' असा अन्य पाठ. १२. 'हें जरी सत्य' असाही पाठ आहे. १३. पूर्णपण. १४. 'हे लोटुनी कष्ट दुःख' असाही पाठ आहे. १५. मातृगृहा.

उदेला[1]. ॥ ११७ ॥ त्यागुनी जाय परता । परत ये मागुता[2] । सात पांच वेळां चित्ता । संशयचक्रीं[3] सूदलें[4]. ॥ ११८ ॥ मग कठिनता घालुनी[5] मनीं । कलीनें लोटिला[6] दुरी वनीं । खेचरभूचरांचे[7][8] नयनीं । अश्रुपात[9] डळमळती. ॥ ११९ ॥ या परी सांडुनी दमयंती । नैषध गेला अरण्यपंथीं । स्वल्प उरली असतां रात्री । प्रबोधली[10] पतिव्रता. ॥ १२० ॥ निकट न देखे भ्रतार । भीमकी करी हाहाकार । सबळ दाटला[11] अंधकार । भंवतें[12] कांहीं दिसेना. ॥ १२१ ॥ घाबरेपणीं धांवोनि चरणीं । अडखळोनी पडे धरणीं । मस्तकीं लागोनी पाषाणीं । रक्त वाहे भडभडां. ॥ १२२ ॥ हांक मारी दीर्घ स्वरें । म्हणे, 'वल्लभा! धांव कां त्वरें । मातें सांडोनी पुढारे । पाय कैसे चामकती[13]? ॥ १२३ ॥ तुज न देखतां प्राण । देहीं न राहे अर्ध क्षण । येईं सत्वर धांवोन । आलिंगन मज देईं[14]. ॥ १२४ ॥ माझा करुनियां घात । काय[15] तो

---

१. उदय पावला. २. 'परत परतोनि ये मागुता' असाही पाठ आहे. ३. 'स्नेहचक्रीं घातलें' असाही पाठ आहे. ४. घातलें. ५. उत्पन्न करून. नळ करतो तें सर्व कलीच्या मायेनेंच करितो स्वतः करीत नाहीं, असें वारंवार स्पष्ट करून सांगून नळास निरपराधी ठरविणें हा कवीचा मुख्योद्देश होय. ६. 'लोटिली काया वनीं' असाही पाठ आहे. ७. आकाशांत फिरणारे पक्ष्यादि. 'जातां खेचर' असा अन्य पाठ. ८. भूचर=भूमीवर फिरणारे मृगादि. ९. अश्रूंची धार. हा **'संबंधातिशयोक्ति'** अलंकार होय. तल्लक्षणः—'संबंधातिशयोक्तिः स्यादयोगे योगकल्पनम् । सौधाग्राणि पुरस्यास्य स्पृशंति विधुमंडलम् ॥' [कुवलयानंद.] जेथें कोणा एकास कांहीं एक वस्तूचा संबंध नसतां संबंध वर्णिलेला असतो तेथें **'संबंधातिशयोक्ति'** अलंकार होतो. जसें या नगरांतील सौधाग्रें इतकीं उंच आहेत कीं तीं चंद्रमंडलास स्पर्शितात, या उदाहरणांत वाड्याचीं शिखरें चंद्राला शिवत नसूनही तीं तसें करितात असें वर्णिलें आहे, म्हणून हा **'संबंधातिशयोक्ति'** अलंकार होय. प्रस्तुत स्थळीं नळाच्या जाण्याशीं व खेचरभूचरांशीं कांहीं एक संबंध नसतां नलगमनामुळें खेचरभूचर रडले असें वर्णिलें आहे, म्हणून हा 'संबंधातिशयोक्ति' अलंकार होय. १०. उठली. ११. 'पडलासे' असाही पाठ आहे. १२. भोंवतीं, चोहोंकडे. १३. जाती. १४. ही ओंवी व हिच्या मागची ओंवी ह्या करुणरसपरिप्लुत आहेत. १५. काय तो साधिशी=कांहीं एक साधणार नाहीं. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. बोलणारा प्रश्न विचारतो, पण त्याला त्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून त्याजविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो अशा स्थळीं हा अलंकार होतो. त्याला इंग्रजींत Erotesis असें म्हणतात. हा अलंकार नेहमी बोलण्यांत येतो व सुंदरत्व, चमत्कारकारित्व, कविप्रतिभाजन्यत्व ('सुंदरत्वे सत्युपस्कारकत्वमलंकारत्वम् । चमत्कारनिबंधह्यलंकारभावउपमादीनाम् । तत्तदलंकारलक्षणेषु अलंकारसामान्यलक्षणे वा चमत्कारित्वस्योक्तत्वात् ॥' रसगं-

साधिशी [1]पुरुषार्थ? । मज वेगळें तुझें चित्त । काय विश्रांती पावेल? ॥ १२५॥ [2]क्षुधित वनीं मी [3]गोरटी । [4]अर्ध वसनें होय कष्टी । [5]पडलिया [6]वनसंकटीं । प्राण कंठीं पातला. ॥ १२६ ॥ [7]तुज वेगळी करूं काय । कवणातें मी [8]मोकलूं धाय? । नाहीं बाप अथवा माय । [9]ईश्वर तोही दिसेना. ॥ १२७ ॥ [1]भयें झोंबूं

---

गाधरे पंडितराजजगन्नाथः.) इत्यादि अलंकाराला आवश्यक गुण यांत विशेष दृष्टोत्पत्तीस येत नसल्यामुळें अलंकारशास्त्रज्ञ प्रश्नालंकाराला महत्व देत नाहींत.

१. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ होत अशी सामान्य जनाची समजूत आहे. पुरुषार्थ म्हणजे पुरुषानें जगतांत येऊन करावयाचें काम—या जगांतील त्याचें मुख्य कर्तव्य. तेव्हां या विषयासंबंधी मतभेद फार असण्याचा संभव आहे. निरनिराळ्या धर्मांची उत्पत्ति याच तत्वावर अवलंबून आहे. हिंदूधर्माप्रमाणें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे पुरुषार्थ आहेत. आणि दमयंती म्हणते कीं तिच्या शिवाय नलाला या पुरुषार्थांपैकीं एकही साधतां येणार नाहीं. हिंदू धर्मांत स्त्रीला फार महत्व दिल्यामुळें व अनेक धर्मकार्यांत तिची फार जरूर असल्यामुळें दमयंतीचें म्हणणें अगदीं खरें होतें असें म्हणावें लागतें. स्त्री ही पुरुषाचें अर्धांग होय अशी समजूत आहे. २. राज्य सोडल्या दिवसापासून कांहीं एक खायला न मिळाल्यामुळें नळदमयंती हीं उपाशींच होतीं. बायकोला अन्नवस्त्र देऊन तिचें संरक्षण करणें हें नवऱ्याचें कर्तव्य होय असें धर्मशास्त्राचें मत आहे. असें असून मी (दमयंती) क्षुधित असतां मला कांहींएक खायला न देतां मला सोडून निघून गेलास हें विशेष वाईट केलेंस असा दमयंतीच्या म्हणण्याचा भावार्थ. आधींच धर्मपत्नी अत्यागार्हा; ती क्षुधित असतांना तर फारच अत्यागार्हा होय—असा भाव. ३. 'क्षुधित वनिता धाकुटी' असाही पाठ आहे. 'गोरटी'=स्त्री. येथें 'गोरटी' शब्दाचाच उपयोग करण्याचें कारण असें कीं या शब्दानें दमयंती फार सुंदर होती असा बोध होतो; अशा सुंदर स्त्रीला एकटी सोडणें फार धोक्याचें आहे; म्हणून अशी सुंदरस्त्री अत्यागार्हा होय—असा भाव. ४. 'अर्धवसना' असा अन्य पाठ. ५. पडल्यामुळें. ६. 'वनिं' असाही पाठ आहे. 'वनसंकटीं'=वनासंबंधी संकटांत, फळें भक्षण करणें, कांट्यांवरून चालणें, क्रूर पशूंच्या हातीं सांपडणें इत्यादि वनासंबंधी संकटांत—असा भाव. ७. तुज वेगळी=तुझ्या शिवाय, एकटी. पतीशिवाय, स्त्री अबला असल्यामुळें कांहीं एक करूं शकत नाहीं हें प्रख्यातच आहे. एका कवीनें म्हटलें आहे.—'श्रीपार्वती शंकर एक जैसे । पत्नीपती एक शरीर भासे । पूर्णांतुनी अर्धशरीर जाय । तैं राहिलें अर्ध उरेल काय? ॥' ८. मोकलूं धाय=मन मोकळें करून रडूं. 'धाय' हा रोदनक्रियेचा अनुकरणवाचक शब्द होय. उ० 'धायधाय रडतो.' हा शब्दसमूह कोशकारांनीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ९. ईश्वर दीनांचें रक्षण करितो, त्यांना संकटांत साहाय्य करितो अशी ईश्वराची कीर्ति असूनही तो मला (दमयंतीला) साहाय्य करण्यास आतां येत नाहीं; म्हणून माझ्या जीविताची आतां आशा राहिली नाहीं—असा दमयंतीच्या म्हणण्याचा भाव. आपण पुष्कळ दिवसपर्यंत धांवा केला तरी आपल्या साहाय्यास ईश्वर येत नाहीं असें पाहून गजेंद्रालाही असेंच वाटलें होतें व त्याला एकदां ईश्व-

कवणाचे कंठीं । सांग रिघों कवणापोटीं[१] ? । तुज वेगळी सर्व सृष्टी । वोसे[२] वाटे वल्लभा[३] ! ॥ १२८ ॥ स्नेहें धांवोनी लवलाही[४] । मातें कवळीं[५] [६]दोन्हीं वांहीं[७] । तुज वेगळा मज[८] नाहीं । सोडविता[९] रक्षिता. ॥ १२९ ॥ तुजवरी टेवूनियां दृष्टी । मी विसरलें दुःखकोटी । तुझ्या संगीं सर्व सृष्टी । सुखभरित मंज[१०] वाटे. ॥ १३० ॥ धांव धांव नैषधराया! । केशीं[११] झाडीन तुझ्या[१२] पायां । झाडणें[१३] करुनी सांडीन काया[१४] । तुजवरुनी आवडी[१५]."[१६] ॥ १३१ ॥

---

राच्या अस्तित्वाविषयीं शंका देखील आली. १०. भयें=भय वाटल्यास, भयापासून आपलें रक्षण करण्यास—असा भाव.

१. पोटीं रिघणें=संकटांतून स्वसंरक्षण करून घेण्याकरितां दुसऱ्याच्या पोटाला चिकटून वसणें. याचें उत्तम उदाहरण माकडाचें पिलूं होय. २. ओस, रिकामी, मनुष्यविरहित, भयंकर. ३. 'वल्लभो दयितेऽध्यक्षे सलक्षणतुरंगमे' इति कोशः. ४. लवकर, त्वरेनें. या शब्दाचें 'लवलाहें' असेंही रूप आहे. ५. आलिंगीं. ६. या शब्दाचीं दोहीं, दोनीं, दोन्ही, दोनही, दोहों इत्यादि रूपें आहेत. ७. बाहूंनीं. ८. 'आन' असाही अन्य पाठ आहे. ९. सोडविता=संकटापासून सोडविणारा. रक्षिता=सर्व तऱ्हेनें संरक्षण करणारा. येथें प्रथमदर्शनीं सोडविता' आणि 'रक्षिता' हे दोन्ही शब्द समानार्थक भासतात. परंतु तसें मानूं नये. 'सोडविता' म्हणजे प्राप्त झालेल्या संकटापासून सोडविणारा व 'रक्षिता' म्हणजे संकटापासून मुक्त झाल्यानंतर पुन्हां संकट प्राप्त होऊं नये म्हणून रक्षण करणारा. उ० रोग प्राप्त झाल्यावर औषध देऊन रोगापासून मुक्त करणारा (दमयंतीच्या म्हणण्याप्रमाणें) 'सोडविता' होय; व मुळीं रोगच न होऊं देण्याविषयीं यत्न करणारा 'रक्षिता' होय. १०. 'मी मानीं' असाही पाठ आहे. ११. केशीं झाडीन तुझ्या पायां=डोक्यावरील केसांनीं तुझे पाय साफ करीन—तुझ्या चरणांवर मस्तक ठेवीन—असा भाव. येथें 'केशीं' या शब्दावरून लक्षणेनें 'मस्तक' (डोकें) असा अर्थ काढावयाचा. लक्षणेचें लक्षण काव्यप्रकाशांत सांगितलें आहे:—'मुख्यार्थबाधे तद्योगे रूढितोऽथ प्रयोजनात् । अन्योऽर्थो लक्ष्यते यत्सा लक्षणारोपिता क्रिया ॥.' [काव्यप्रकाश—द्वितीय उल्लास ९ पृ० ३२.] आंग्लालंकारशास्त्राप्रमाणें सांप्रतस्थळीं 'Metonymy' नामक अलंकार झाला. याची व्याख्या:—"*Metonymy* is the change of names as have some relation to each other; as when we put the *cause* for the *effect*, or the *effect* for the *cause*, the *container* for the thing *contained*, the *sign* for the thing *signified* &c." १२. 'सकुमार' असा अन्य पाठ आहे. १३. झाडणें करुनी=तुझ्या पायांवर मस्तक ठेवून. १४. आपला देह तुझ्यावरून ओंवाळून टाकीन. काया सांडणें=देह टाकणें. १५. आवडीनें, आनंदानें, कुरकुर न करितां. १६. शेक्सपियरकृत Midsummer Night's Dream (मधुयामिनीस्वप्न) नामक नाटकांत Lysander अदृश्य झाल्यावर Hermia हिनें झोंपेंतून उठून केलेला शोक सांप्रतस्थळीं दमयंतीनें केलेल्या शोकाप्रमाणेंच आहे:—

पडे[1]; उठी; मागुती पडे[2] । दिशा अवलोकुनी चहूंकडे । 'नळा! नळा!' म्हण-उनी रडे[3] । आकांतली[4] काननीं[5]. ॥ १३२ ॥ 'प्राणेश्वरा! नळनरेशा!' । मुखें गाजवी हाचि घोष । ऊर्ध्व अवलोकी आकाश[6] । रिघों पाहे[7] पाताळीं.॥ १३३ ॥ 'नमन माझें' म्हणे 'अनिला[8]! । माझी वार्ता[9] जाणवीं नळा । लोटूनी[10] आणीं मजजवळां । श्रेय घेईं जीवांचें[11]. ॥ १३४ ॥ नमन करितसें तुझिया चित्ता । उपजों नेदी निष्ठुरता । चर[12] हो! तुम्हातें वाहातसें[13] माथां । परतोनी आणा नळातें. ॥ १३५ ॥ पक्षी हो! तुम्हां पक्षबळ[14] । उडोनी शोधा[15] माझा नळ । वार्ता सांगोन उतावीळ[16] । शीघ्र आणा मजपाशीं.' ॥ १३६ ॥ चक्रवाका-चिया युग्मा[17] । म्हणे 'वेदना[18] ठाउकी तुम्हां । नळातें शोधुनियां श्रमा । माझिया हो! परिहरीं.' ॥ १३७ ॥ मधुकरातें[19] बोले शब्द । 'तुम्हां प्रिय पुष्पगंध[20] । नळाचा मुखाब्जमकरंद[21] । सेवुनी सांगा शुद्धीतें[22].' ॥ १३८ ॥ दुःखसमुद्रामाजी मग्न । संकटीं गेला वर[23] सांडुन । परी मुखें नुच्चारी अवगुण[24] ।

---

"Lysander! look how I do quake with fear!
Methought a serpent eat my heart away,
And you sat smiling at his cruel prey:
Lysander! what, removed? Lysander! lord!
What, out of hearing? gone? no sound, no word?
Alock, where are you? speak, are if you hear;
Speak, of all loves; I swoon almost with fear.
No?—then I well perceive you are not nigh:
Either death, or you, I'll find immediately."

*Act* II, *Scene* 3.

१. 'रडे' असा अन्य पाठ आहे. २. 'पडे', 'उठी' यांची कर्त्री 'दमयंती' होय असें समजावें. ३. 'हिंडे' असा अन्य पाठ आहे. ४. आकांत करूं लागली, मोठ्यानें रडूं लागली. ५. अरण्यांत. ६. 'दाही दिशा' असा अन्य पाठ आहे. ७. 'म्हणे' असा अन्य पाठ आहे. ८. वायो. ९. मी फार दुःखांत व संकटांत आहें अशी खबर. १०. परत येण्याची नळाची इच्छा नसेल तरी बलात्कारानें त्याला मजकडे आण—असा भाव. ११. जीव वांचविल्याचें, माझ्या प्राणांचें रक्षण केल्याचें. १२. जंगम वस्तु (पक्ष्यादि). 'चरण' असाही पाठ आहे. १३. वाहातसें माथां=वंदन करीतसें. १४. पंख असल्यामुळें तुम्ही लौकर उडूं शकतां—असा भाव. १५. शोधून आणा. १६. उतावळीनें, लौकर. नळाला शोधून लौकर आणा—असा भाव. १७. जोडप्याला. १८. पतिविरहापासून पत्नीला होणाऱ्या वेदना. रोज रात्रीं चक्रवाक व चक्रवाकी यांची तुटातूट होते अशी समजूत आहे. तेव्हां चक्रवाकयुग्माला वियोगदुःख माहीत असेल हें साहजिक आहे. १९. भ्रमर. २०. 'त्वां चाखिले नाना सुगंध' असाही पाठ आहे. २१. मुखकमल. २२. माहिती, बातमी. २३. नवरा. २४. नळाचे दुर्गुण.

निंदा कांहीं न बोले. ॥ १३९ ॥ आठवुनी [1]नळाचे कष्ट । दुःखें होतसे हृदयस्फोट । नाठवी [2]आपुलें संकट । [3]वनिताश्रेष्ठ दमयंती. ॥ १४० ॥ 'हा हा महाराज! [4]नळनरेशा ! । मातें होतें कां तुझे क्लेश । तुवां असावें [5]सुखसंतोष । तुझें अरिष्ट मज लागो. ॥१४१॥ माझा [6]पतिव्रताधर्म । तुतें सर्वदा करू क्षेम ।

१. नळाला मागें सोसावे लागलेले व पुढें सोसावे लागणारे कष्ट. २. यावरून दमयंतीचें दूरदर्शीपणा व अप्रतिम पतिप्रेम हे गुण व्यक्त होतात. आपल्या पतीच्या असंख्य संकटांविषयीं दुःख करण्यांत सर्व मन गुंतल्यामुळें तिला स्वदुःखाची आठवण झाली नाहीं, असें सांगून कवीनें वाचकांना दमयंतीच्या अप्रतिम पातिव्रत्यधर्माची अप्रत्यक्ष रीतीनें ओळख करून दिली. ३. सर्व स्त्रियांत उत्तम, 'अपांसुलानां धुरि कीर्तनीया' (कालिदास). नररत्न, स्त्रीरत्न, अशीं नुसत्या नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत पण ज्यांस हें नांव गुणानें शोभतें अशीं नल व दमयंती यांच्यावांचून कोणी नाहीं अशा अर्थाची जी उक्ति मोरोपंतानें हंसाच्या तोंडीं घातली आहे ती 'वनिताश्रेष्ठ दमयंती' या मुक्तेश्वराच्या म्हणण्याचें दृढीकरण करितेः—'नररत्न तोचि (नल) तूंचि (दमयंती) स्त्रीरत्न उदंड आडनांवाचीं । न बुडविति न वा तारिति चित्रें वरवींहि आडनावाचीं. ॥' ४. 'महाराज' व 'नळनरेशा' हीं सहेतुक संबोधनें होत. महाराज मोठा राजा, सम्राट्. नळनरेश=नरांचा ईश (सर्व जग ज्याच्या आज्ञेंत वागतें) असा नळ. या दोन संबोधनांनीं नळाचें पूर्वींचें सार्वभौमत्व, लोकप्रियत्व व ऐश्वर्य दाखवून असला अप्रतिम व गर्भश्रीमंत राजा असलीं संकटें मुळींच सोसूं शकणार नाहीं असें सुचविलें आहे. ५. होत कां=होईनात कां, होवोत. एकाचीं संकटें दुसऱ्यानें सोसणें जरी असंभव आहे तरी नळाचीं संकटें त्याला सोडून माझ्यावर येवोत अशी माझी इच्छा आहे असें दमयंतीनें 'कां' या पदानें ध्वनित केलें आहे. 'कां' शब्दानें असंभाव्यता दाखवून इच्छाही प्रदर्शित केली आहे याकडे वाचकांनीं विशेषतः लक्ष्य द्यावें. ६. संकटावांचून, आनंदानें. या ओंवींत पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या चरणाच्या अंतीं अनुक्रमें **'शा', 'श', 'ष'** या अक्षरांनीं यमक साधलेला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. **'श', 'ष', 'स'** या अक्षरांच्या उच्चारांत अगदीं जरी नाहीं तरी बरेंच साम्य असल्यामुळें यमक साधण्याच्या वेळीं या तीन अक्षरांत भेद मानीत नाहींत हें साहजिक आहे. परंतु **'शा'** या **आ**कारांत दीर्घाक्षराशीं **'श'** या **अ**कारांत ऱ्हस्वाक्षरानें यमक साधणें याला 'अपूर्वयमकसाधन' असेंच म्हटलें पाहिजे. चरणाचें शेवटचें अक्षर ऱ्हस्व पाहिजे असेल तर ऱ्हस्व मानावें व दीर्घ पाहिजे असेल तर दीर्घ मानावें असा जो छंदःशास्त्राचा नियम आहे त्यानें ही 'अपूर्वयमकसाधनविधि' कदाचित् दोषमुक्त ठरेल; परंतु **पं**ताच्या दीर्घ पण प्रौढ यमकांचा व **पं**डितांच्या आल्हादजनक प्रासांचा स्वाद घेतलेल्या कानाला **मु**क्तेश्वराची यमक साधण्याची ही रीत, कधींही पसंत पडणार नाहीं. ७. पातिव्रत्याला व पतिव्रतेला हिंदुधर्मांत ब्रह्मज्ञान व ब्राह्मण यांपेक्षां अधिक महत्व दिलें आहे. पातिव्रत्याचे नियम कमी कडक आहेत असें नाहीं. या नियमांप्रमाणें 'पतिव्रताधर्म' पाळिल्यास सर्व कामना पूर्ण होतात अशी समजूत आहे. 'पतिव्रताधर्म' या नांवाखालीं कविवर्य **ज**यदेव

यांची पत्नी पतिव्रताशिरोमणी पद्मावती हिनें क्रौंच राजाच्या पत्नीला केलेला उपदेश सर्व स्त्रियांनीं वाचण्यासारखा आहे. सांप्रतस्थळीं त्याचा सारांश देणें अयोग्य होणार नाहीं असें समजून येथें देतों. "महिषी! या जगांत स्त्रियांना अत्यावश्यक धर्म म्हटला म्हणजे 'पातिव्रत्य' होय. स्त्रियांना पतीशिवाय दुसरें दैवत नाहीं, पतीशिवाय दुसरी गति नाहीं, पतीशिवाय दुसरें धन नाहीं, पतिसेवेहून उत्कृष्ट धर्म नाहीं, पतीच्या आज्ञेंत वागणें हेंच मोक्षसाधन, पतिव्रताधर्मचिंतन हेंच ब्रह्मज्ञान, पतिसद्गुणस्मरण हेंच ब्रह्मध्यान, पतिवियोगाभाव हाच ब्रह्मानंद, पति मृत झाल्याबरोबर देह ठेवणें हाच मोक्ष अशी ज्या साध्वीची पक्की खातरी झाली आहे तिला सर्व शुभें आपोआप प्राप्त होतात. पातिव्रत्याहून दुसरें कोणतेंही उत्तम व्रत नाहीं. जपतप होमहवनादि पातिव्रत्याची बरोबरी कधींही करूं शकणार नाहींत. अखंड मोहपाशांतून महद्धैर्यानें पातिव्रत्याचें रक्षण करणाऱ्या स्त्रीला 'सती' (पार्वतीचें हें एक नांव आहे) असें म्हणतात. पतिव्रतेला परमपद करतलामलकवत् आहे असें विद्वान् सांगतात. कामातुर होऊन पातिव्रत्याचा भंग करून घेणाऱ्या स्त्रियेला अनेक संकटें भोगावीं लागतात. प्राणांपेक्षां अधिक प्रीतीनें पातिव्रत्याचें रक्षण केलें पाहिजे. सर्व भूषणांत अत्यंत सुंदर व मौल्यवान् म्हटलें म्हणजे 'पातिव्रत्य' होय. पातिव्रत्य भंगानें दूषित झालेल्या स्त्रीनें जरी अनेक सत्कर्में केलीं तरी तीं सर्व दुष्कर्मवत् समजावीं; व त्यांपासून तिला कांहींएक लाभ न होतां उलट दुःखच होत जाईल. पतिव्रतास्त्रियांच्या प्रभावानेंच निराधारा असून ही पृथ्वी आकाशांत निश्चल गमन करिते व पतिव्रतांना ब्रह्मादिदेवही भिऊन असतात ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. स्वपातिव्रत्यप्रभावानें सावित्री हिनें आपला मृत पति जिवंत केला नाहीं काय? दमयंतीनें पातिव्रत्यभंगोद्युक्त दुष्ट किराताला क्षणांत भस्म केलें नाहीं काय? चंद्रमतीनें इतरांस न कळूं देतां स्वमांगल्याचें रक्षण केलें नाहीं काय? स्वचित्तशुद्धिद्योतनार्थ सीतादेवीनें अग्नींत उडी टाकून हुताशनाला चंदनाप्रमाणें शीतल करून सोडिलें नाहीं काय? रेणुकादेवीनें वाळूच्या कणांतून पाणी काढिलें ना? नारदानें दिलेले लोखंडी हरभरे तळून खऱ्या हरभऱ्यांप्रमाणें खाण्यास योग्य करण्यास अनुसूयाच समर्थ झाली ना? याच पतिव्रतेनें आपली परीक्षा घेण्यास आलेल्या ब्रह्मविष्णुमहेशांस, स्वपातिव्रत्यसामर्थ्यानें, मुलें वनविलीं. निमिषार्धांत अरुंधतीनें वाळूचा भात बनविला ना? 'ईशानः सर्वभूतानामीश्वरः' अशी ज्याची त्रिभुवनांत ख्याति त्या महेश्वराला ब्रह्महत्येपासून मुक्त करण्यास लक्ष्मीच समर्थ झाली ना? पातिव्रत्याच्या प्रभावानेंच वरील स्त्रियांना असलें अलौकिक सामर्थ्य प्राप्त झालें असें म्हणण्यास काय हरकत आहे? आणखी पहा. अरुंधतीचा जन्म हलक्या जातींत जरी झाला तरी पातिव्रत्यमाहात्म्येंकरून तिनें 'आर्या' अशी पदवी व सप्तर्षींतील श्रेष्ठ जे वसिष्ठ त्यांच्या जवळ जागा मिळविली. मुनिपत्नींविषयीं कामातुर झालेल्या आपल्या पतीची (अग्नीची) इच्छा पूर्ण करण्याकरितां स्वाहादेवीनें सर्व ऋषिपत्नींचीं रूपें घेऊन, अरुंधती अप्रतिम पतिव्रता असल्यामुळें, तिचें रूप घेऊं शकली नाहीं. सत्कुलप्रसूता व सकलसद्गुणसंपन्ना अहल्या मनोवैकल्यानें पातिव्रत्यापासून भ्रष्ट झाली. या पापापासून मुक्त होण्यास तिचें कोणतेंही पूर्वार्जित सत्कर्म कामी आलें नाहीं, व तिला अनंत कालपर्यंत शिलारूपानें पडून रहावें लागलें.

तुझे [1]अवदशेचा श्रम । सर्व हो कां [2]मजलागीं.' ॥ १४२ ॥ ऐशी मुखीं गाजवी ध्वनी । अश्रुधारा गळती नयनीं, । मार्गरहित वनोपवनीं । कोमळ पायीं [3]चामके. ॥ १४३ ॥ [4]वोहळ वोहळ दरे दरकुटे । [5]विवरें [6]कुहरें गिरिकपाटें । वनें भयानकें कष्टें । लंघूनियां जातसे. ॥ १४४ ॥ उंच नीच महा [7]दरडी । वाट अत्यंत [8]निसरडी । कोसळोनी पडली तोंडीं । अजगराचे ते काळीं. ॥ १४५ ॥ तो क्षुधित विशाळ व्याळू । मुखें कवळूनी लागला गिळूं । [9]परि आक्रंदे 'नळा! स्नेहाळू । केउता गेला ये काळीं? ॥ १४६ ॥ धांव धांव नैषधराया! । सर्पें गिळिली माझी काया । तुजविण मज सोडवावया । आन कोणी दिसेना.' ॥ १४७ ॥ तिची ऐकोनी रुदितध्वनी । मृगपारधी विचरे वनीं । धांवोनी पातला तंव नयनीं । देखे सर्पें धरिलीसे. ॥ १४८ ॥ [10]मुखीं घालुनी [11]लोहखांडें । [12]हातेंची चिरिलीं [13]जोंभाडें । उभय हस्तीं धरुनी फडे ।

---

काळजीपूर्वक पातिव्रत्याचें रक्षण केल्यास उपवासादिव्रतांचें कांहींएक प्रयोजन नाहीं. पतिव्रताधर्मांत किंचित्‌ही उणें पडल्यास महान् संकटें सोसावीं लागतात. देवताचार्यांची भार्या तारा हिनें बुद्धिमांद्येंकरून चंद्राशीं व्यभिचार केला; त्यामुळेंच तिची दुष्कीर्ति आजपर्यंत त्रिभुवनांत पसरली आहे. ............ कर्णावर लक्ष्य असल्यामुळें झाडावर फळ चढविण्यास द्रौपदी असमर्थ झाली. मृतांस जिवंत करणें, हरिहरांचें रक्षण करणें, ब्रह्मांडास उलटविणें, इत्यादि अघटित कार्यें देखील पतिव्रता करूं शकतात! ब्रह्मनिष्ठ व पतिव्रता यांची योग्यता सारखी आहे असें महर्षींचें म्हणणें आहे. .............. धनवान् असो, निर्धन असो, रूपवान् असो, कुरूपी असो, विवेकी असो, अविवेकी असो, निरोगी असो, रोगी असो, किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारचा असो, एकदां ज्याच्याशीं आपला विवाह झाला त्याच्या आज्ञेंत सदासर्वदा वागणें हें पतिव्रतेचें आद्य कर्तव्य होय...............” [जिय्यरसूरिकृत आंध्र महाभक्तविजय.] या उताऱ्यावरून 'माझा पतिव्रताधर्म । तुतें सर्वदा करू क्षेम' या दमयंतीच्या म्हणण्यांत सत्याचा अंश फार होता हें उघड आहे. आपल्या पातिव्रत्याविषयीं तिची पक्की खातरी होती व त्यापासून आपल्याला प्राप्त होणारे लाभही ती जाणून होती हें स्पष्ट आहे.

१. दुर्दशेचा, दुर्दैवाचा, राज्यपदच्युत होऊन वनांत हिंडण्यापासून झालेलें. २. माझें सर्व सौख्य तुम्ही घेऊन तुमचें सर्व दुःख मला द्या—असा भाव. दमयंतीचें हें वाक्य करुणरसानें ओथंबलेलें तर आहेच शिवाय यांत प्रीतिरस म्हणून एक नवीन रस उद्भवलेला आहे. तो चाखणें वाचकांच्या रसिकत्वावर अवलंबून आहे. ३. गमन करी, जाई. ४. ओढा. हा शब्द 'वाहाळ' 'वाहळी' असाही लिहितात. ५. छिद्र, भुयार. ६. बिळ, गुहा. ७. डोंगर. ८. पाय घसरून मनुष्य पडेल अशी. ९. 'येरी' असा अन्य पाठ. १०. सर्पाच्या मुखीं. ११. लोखंडी गज. १२. हातांनींच. या शब्दानें पारधी बराच शूर होता असें सुचविलें. १३. 'हातें उघडिलें' असाही पाठ आहे.

ओढुनियां कडे काढिली. ॥ १४९ ॥ [1]उदकें प्रक्षाळुनियां काया । म्हणे, 'तूं कवणाची जाया? । कोठुनियां कवणा ठाया । येकटी जासी काननीं.'॥१५०॥ येरी म्हणे, 'मी वैदर्भकुमरी । नैषधरायाची [2]अंतुरी । कांतें सांडिलें [3]वनांतरीं । त्याचें शोधन करीतसें.' ॥ १५१ ॥ तिचें अवलोकितां वदन । व्याधा हृदयीं धडकला मदन । म्हणे, 'सेवीं तूं माझें [4]सदन । भार्या होईं सुंदरी.' ॥ १५२ ॥ कामबुद्धी येतां [5]निकटी । [6]पवित्रा पाहे क्रोधदृष्टी । प्रेत होउनी पृथ्वीतटीं । [7]पडता जाला तात्काळीं. ॥ १५३ ॥ तेथुनी चालिली [8]अमार्गें । देखे वृक्षांचीं [9]दांगें । मार्ग पुसावया मागें । पुढें कोणी दिसेना. ॥ १५४ ॥ विचित्र [10]शृं-गांचे पर्वत । तरू लागले असंख्यात । [11]श्वापद पक्षी यांचें [12]गणित । कोणातेंही न [13]करवे. ॥ १५५ ॥ व्याघ्र [14]सिंह देखोनि दृष्टी । निर्भय[15] धांवे [16]गोरटी । 'नै-

---

१. दमयंती मूर्च्छा येऊन पडली होती असें समजावें म्हणजे पाणी शिंपण्याचें प्रयोजन समजेल. २. स्त्री. ३. 'कांतारीं' असाही पाठ आहे. ४. या ओवींत 'वदन' 'मदन' 'सदन' या शब्दांनीं साधलेला त्र्यक्षरी यमक लक्षांत ठेवण्यासारखा आहे; कारण मुक्तेश्वरकृत ग्रंथांत असले यमक दुर्लभ होत. ५. पारध्याच्या जवळ, पारध्याच्या मनांत—असा भाव. ६. पवित्र अशी दमयंती. ७. 'पडता जाला' याचा कर्ता 'मृग पारधी' असें समजावें. ८. वाईट मार्गानें, चालण्यास अयोग्य अशा मार्गानें. ९. अरण्यें 'दांग' असाही या शब्दांचा उच्चार करितात. १०. शिखराचे. ११. इंग्रजींत ज्यांना 'Beasts of prey' किंवा 'Carnivorous animals' म्हणतात. त्यांनाच मराठींत 'श्वापद' म्हणतात. हा शब्द कधीं कधीं फक्त 'मृग' याच अर्थीं योजितात. १२. संख्या, शिरगणती. ['परः शताद्यास्ते येषां परा संख्या शतादिकात् । गणनीये तु गणेयं संख्याते गणितमथ समं सर्वम्' इत्यमरः.] १३. त्या अरण्यांत असंख्यात पशुपक्षी होते—असा भाव. १४. 'कुंजर' असा अन्य पाठ आहे. १५. हा शब्द दमयंतीच्या अप्रतिम धैर्याचा द्योतक नसून तिच्या शोकातिरेकाचा द्योतक होय. कारण प्रस्तुतस्थलीं तिच्या धैर्याची स्तुति करण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं. शिवाय ती वीरपत्नी असल्यामुळें तिच्या शौर्याचें वर्णन करणें चर्वितचर्वण झालें असतें. म्हणून 'निर्भय' शब्दानें, दुःखातिवेगामुळें दमयंती वेडी झाली होती व ज्या त्या मृगाकडे धांवत जात होती असें ध्वनित होतें. उर्वशीच्या विरहानें पुरूरवा व सीतेच्या विरहानें श्रीराम असेच वेडे होऊन रानांतल्या ज्या त्या पक्षाला व मृगाला प्रियेची माहिती विचारीत होते. तेव्हां प्रियजनविरहानें मनुष्य वेडा बनून स्वप्राणाची आहुति देण्यास तयार होतो हा सिद्धांत स्त्रीपुरुषांना सारखाच लागू पडतो असें म्हणावें लागतें. १६. स्त्री. 'तयां निकटीं' असाही पाठ आहे. 'सुकुमार स्त्री' व 'निर्भय' या दोहोंतलें वैषम्य दर्शविण्याकरितां 'गोरटी' हा शब्द मुद्दाम योजलेला आहे.

षध देखिला हे[1] गोष्टी । सांगा' म्हणे 'सुहृद हो!' ॥ १९६ ॥ विशाळ[2] देखोनी पर्वत । तया करूनियां प्रणिपात[3]। पुसे, 'नैषध प्राणनाथ । येणें मार्गें देखिला.' ॥ १९७ ॥ अशोक[4] वृक्ष देखोनि त्यातें । प्रार्थूनी पुसे जोडिल्या हस्तें,[5] । 'नळाची शुद्धि[6] सांगोनी मातें । अशोक करीं अशोका!'[7] ॥ १९८ ॥ अनेक श्वापदांचिया थाटी[8] । भयें[9] कोणी न येती निकटीं । म्हणती, 'पतिव्रता दृष्टी[10] ।

१. हे गोष्टी=ही गोष्ट, हा समाचार. 'हे गोष्टी' हा प्रयोग व्याकरणदृष्ट्या शुद्ध आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण 'गोष्टी' हें स्त्रीलिंगी अनेकवचनी नाम आहे व 'हे' पुल्लिंगी सर्वनाम. स्त्रीलिंगी नामावद्दल नपुंसकलिंगी सर्वनाम योजण्याची रीत जुन्या कागदपत्रांत व जुन्या काव्यांत सांपडते. परंतु स्त्रीलिंगी नामांवद्दल पुल्लिंगी सर्वनामांचा प्रयोग कोठेंच आढळत नाहीं. तेव्हां 'निरंकुशाः कवयः' किंवा 'महाकवेः प्रयोगः साधुः' या वर्गांतला हा प्रयोग आहे असें म्हणावें लागतें. २. विशाळ=प्रचंड, फार मोठे. 'यत्प्राचंड्य बघोनि काळ दचके भी घे तयाची मति' अशी एका कवीनें पर्वताच्या विशलत्वाविषयीं उत्प्रेक्षा केली आहे. ३. नमस्कार. ४. हा वृक्ष संस्कृत कवींच्या फार प्रीतींतला आहे. सुंदर स्त्रियांच्या पादताडनानें या वृक्षाचीं फुलें फुलतात अशी समजूत आहे. या संबंधानें पुढील श्लोक पाहण्यासारखे आहेतः—'एकः सख्यास्तव सह मया वामपादाभिलाषी' [मेघदूत–उत्तरमेघ–श्लोक १५.] 'असूत सद्यः कुसुमान्यशोकः, स्कंधात् प्रभृत्येव सपल्लवानि । पादेन नापैक्षत सुंदरीणां, संस्पर्शमासिंजितनूपुरेण ॥' [कुमारसंभव–सर्ग ३ श्लो० २६.] 'कुसुमं कृतदोहदस्त्वया, यदशोकोऽयमुदीरयिष्यति । अलकाभरणं कथं नु तत्, तव नेष्यामि निवापमाल्यताम् ॥' [रघुवंश–सर्ग ८ श्लो० ६२.] मदनाच्या पंचबाणांमध्यें या वृक्षांचें पुष्प आहे. ५. जोडिल्या हस्तें=जोडिलेल्या हातांनीं, हात जोडून, नमस्कार करून. ६. माहिती. ७. दुःखरहित. तुझें नांव अशोक असल्यामुळें आपलें नांव अन्वर्थक करण्यास मला अशोक (दुःखरहित) कर–असा दमयंतीच्या म्हणण्याचा भाव. साहित्यशास्त्राप्रमाणें येथें श्लेषालंकार जरी झाला नाहीं तरी 'अशोक' शब्दासंबंधानें प्रस्तुत ओंवींत उत्कृष्ट श्लेषाची छटा मारीत आहे असें म्हणावें लागतें. ८. समूह. ९. दमयंतीच्या भीतीनें. १०. केवल अवलोकनानें, रागानें पाहिल्यावरोबर आम्हीं भस्म होऊन जाऊं या भीतीनें श्वापदें दमयंतीजवळ गेलीं नाहींत–असा स्पष्टार्थ. हा वाक्यार्थहेतुक **काव्यलिंग** अलंकार. याचें लक्षणः–**काव्यलिंगं** हेतोर्वाक्यपदार्थता' [मम्मट.] 'हेतोर्वाक्यपदार्थत्वे **काव्यलिंगं** निगद्यते' [श्रीविश्वनाथकविराज.] 'समर्थनीयस्यार्थस्य **काव्यलिंगं** समर्थनम्' [दीक्षित.] प्रतिपादित अर्थाच्या संशयनिवृत्त्यर्थ ज्या काव्यांत सहेतुक दुसरीं वाक्यें द्यावीं लागतात तो **'काव्यलिंगा'**लंकार समजावा. 'भयें कोणी न येती निकटीं' (भीतीनें अरण्यश्वापदांजवळ अबला दमयंतीनें जाऊं नये असें असून तिलाच भिऊन श्वापदें पळून गेलीं असें सांगितल्यामुळें हें वाक्य संशयास्पद झालें.) तन्निवृत्त्यर्थ 'पतिव्रता दृष्टी । भस्म करील आम्हुतें' (आम्हीं पति-

भस्म करील आमुतें.' ॥ १९९ ॥ पुढें प्रचंड [१]वनकेसरी । त्यातें विनवी जोडुनी करीं । म्हणे, '[२]कृपा करोनी माझे शिरीं । नैषध सांग केउता?' ॥ १६० ॥ [३]सव्य घालुनी [४]पद्मनयना । केसरी गेला विशाल वना । पुढें जातां [५]तापसारण्या । देखती जाली ती वनीं. ॥ १६१ ॥ [६]अमृतोदकें दे[७]वतटिनी ।

व्रतेच्या कोपानें भस्म होऊं–या भीतीनें) हें हेतुगर्भ वाक्य.

१. सिंह. २. 'चतुर्दंष्ट्र क्रूर केशरी' असाही पाठ आहे. ३. डावी. प्रदक्षिणा करून–असा भाव. ४. कमलनेत्री. या विशेषणानें दमयंती स्त्रीवर्गांतील उत्तम वर्गांतली म्हणजे 'पद्मिनी' या वर्गांतील होती असें ध्वनित होतें. कारण पद्मिनीच्या लक्षणांत 'भवति कमलनेत्रा' असें म्हटलें आहे. अशी उत्तमोत्तम स्त्री मृगराज केसरीकडून मान (प्रदक्षिणा करण्याचा) घेण्यास योग्य होती असेंही 'पद्मनयना' या शब्दानें सुचविलें आहे. 'पद्मनयना' हें विशेषण साभिप्राय आहे म्हणून हा **'परिकर'** अलंकार होय. जेथें विशेषण सहेतुक अथवा साभिप्राय असतें तेथें **'परिकर'** नामक अलंकार होतो. याचें लक्षण:–(१) 'विशेषणसाभिप्रायत्वं परिकरः' [काव्यमाला ३५, अलंकारसर्वस्व–पृ० ९४], (२) 'साभिप्रायविशेषणैरुक्तिः परिकरः' [काव्यमाला ४३, काव्यानुशासन–पृ० ४२], (३) 'विशेषणैर्यत्साकूतैरुक्तिः परिकरस्तु यः' [काव्यमाला २४, काव्यप्रदीप–पृ० ४३३], (४) 'विशेषणानां साभिप्रायत्वं परिकरः' [काव्यमाला १२, रसगंगाधर–पृ० ४८३] या अलंकाराचीं उदाहरणें:—(१) मी अबला भीरु कसी साहों त्या गाधितनय तेजातें?-। भ्यालासि असा दुःसह मानुनियां तूंहि सुरपते! ज्यातें. ॥ [आदिपर्व–अ० ११ गी० २२], (२) 'मी बाहुकसूत' असें सांग, रहा तत्समीप सेवकसा, । या व्यसनीं सेव्य नव्हे रविवंशज तो मनुष्य देव कसा? ॥ [वनपर्व–अ० ४ गी० ६८], (३) कीं पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे । आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रु पथ वाटे. ॥ [वनपर्व–अ० १२ गी० १४], (४) होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव, हो! । येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदाशिव हो. ॥ [वनपर्व–अ० १३ गी० २७], (५) साधु म्हणति, हा होय द्रोणप्रियशिष्य, होय हरदास, । होय अजितसख, म्हणतिल धन 'गुरुजी' या शरप्रकरदास. ॥ [विराटपर्व–अ० ६ गी० २५.] (६) रथचक्र उद्धरूं दे श्रुतिशास्त्रज्ञा महारथा कुळजा, । साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुळ ज्या. ॥ [कर्णपर्व–अ० ४८ गी० ६५], (७) त्यजि राज्यातें, दावपरिवृता जेंवि जग अरण्यातें, शरणागत तो बहुमत झाला त्या विश्वशरण्यातें. ॥ [पंचशतीरामायण–साकी ३०७, काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें–भाग ३, पृष्ठ ६८]. ५. ऋषींचें अरण्य. ६. या ओंवीचा अन्वय जरा कठिण असल्यामुळें तो येथें देतों:–[जैशी] अमृतोदकें (अमृत नामक पाण्यानें) देवतटिनी [प्रवाहे] तैशी जीवनीं सरिता प्रवाहे (वाहत होती). [त्या] माजी (त्या सरितेंत) श्वेत (पांढऱ्या), रक्त (तांबड्या) [आणि] बहुवर्ण (अनेक रंगांच्या) नलिनी विकासल्या [होत्या]. ७. देवनदी गंगा.

तैशी [1]सरिता प्रवाहे [2]जीवनीं । माजी विकासल्या [3]नलिनी । श्वेत रक्त बहु-
[4]वर्ण. ॥ १६२ ॥ तेथें हंस [5]कारंडक । चकोर [6]मयूर चक्रवाक । सदां फळीं फुलले
[7]रुंख । आम्र[8]जंबूपनसादी. ॥ १६३ ॥ बैसल्या तपोधनांच्या [9]श्रेणी । जपी
तपी [10]अनुष्ठानीं । एकांतनिष्ठ ध्यानीं । 'सोऽहमस्मि' या [11]लक्षीं. ॥ १६४ ॥
[12]वसिष्ठ [13]अत्री [14]भृगु ऋषी । तयांसमान तपोराशी । दृष्टी देखोनीं मानसीं ।
परम [15]विश्रांती [16]पावली. ॥ १६५ ॥ तयांतें करुनी नमस्कार । विदित केला
[17]समाचार, । ऋषी म्हणती, 'वो ! [18]साचार । सर्व आम्ही जाणतसों. ॥ १६६ ॥
आतां चिंता त्यागीं [19]चित्तें । शीघ्र भेटशी वल्लभातें । तुमचें ऐश्वर्यपद तुम्हांतें ।
प्राप्त होईल जाण पां.' ॥ १६७ ॥ ऐसें वदोनी ते क्षणीं । अदृश्य जाले
सिद्ध मुनी । नदी ना ते वृक्ष नयनीं । एकही तेथें दिसेना. ॥ १६८ ॥ च-
मत्कार मानुनी चित्तीं । पुढां चालिली महासती । वनोपवनें लंघितां क्षिती ।
महा मार्ग [20]उंतरे. ॥ १६९ ॥ [21]देखती झाली [22]वसता पंथू । [23]वाणी जाण असं-

---

१. नदी. २. उदक. ३. कमलिनी. ४. वर्ण=रंग. ५. बदक. ६. मह्यां रौतीति मयूरः. ७. वृक्ष, झाडें. ८. जंबू=जांबूळ. ९. पंक्ति. १०. 'ध्यानी अनुष्ठानी' असाही पाठ आहे. ११. विचारांत, याच्या चिंतनांत असा भाव. १२. स्वनामख्यात ऋषि—सूर्यवंशांतील राजांचा पुरोहित. १३. एक प्रजापति. अनुसूया याची स्त्री होती, व दत्तात्रय यांचा पुत्र. या ऋषीच्या डोळ्यांतून चंद्र उत्पन्न झाला अशी कथा आहे. हा सप्तर्षींपैकीं एक आहे. १४. परशुरामाचा एक पूर्वज. हा मोठा प्रख्यात ऋषि होता. इतर ऋषींच्या विनंतीवरून हा एकदां देवांची परीक्षा करण्यास निघाला व प्रथम शिवाकडे गेला. परंतु शिवानें याला दर्शनच न दिल्यामुळें 'तूं लिंगाकार होशील' असा यानें त्यास शाप दिला व ब्रह्मदेवाकडे निघून गेला. तेथें याचा योग्य सत्कार न झाल्यामुळें 'तुझी कोणी पूजा करणार नाहीं' असा यानें पितामहास शाप दिला व विष्णूकडे गेला. विष्णु निजला आहे असें पाहून यानें त्याच्या हृदयावर लाथ मारिली. याबद्दल न रागावतां, लाथ मारल्यानें ऋषीच्या पायाला इजा झाली असेल म्हणून, विष्णु भृगूचे पाय चोळूं लागला. हें पाहून ऋषि प्रसन्न झाले व 'विष्णूच पूजनीय आहे' असा त्यानें सिद्धांत ठरविला. १५. चित्तस्थैर्य, संतोष. १६. 'मानिली' असाही पाठ आहे. १७. आपल्या व आपल्या पतीच्या संकटाची हकीकत. १८. खरें. १९. मनानें, मनापासून, मुळापासून, समूळ. २०. दिसे. २१. 'देखणें' या क्रियापदाचा बहुतकरून कवितेंतच उपयोग होतो; गद्यांत याचा फार उपयोग करीत नाहींत. विशेषतः प्राचीन कवींच्या कवितेंत हें क्रियापद फार आढळतें. 'देखतां' (पाहणें) हें ब्रिजभाषेंतील क्रियापदच मराठींत आलें असेल. उत्तरहिंदुस्थानांतील साधुसंतांशीं दक्षिणेंतील साधुसंतांचें फार संघट्टन असल्यामुळें व या साधुसंतांपैकीं बरेच कवि असल्यामुळें

ख्यातू । भरूनी नाना [१]वस्तुजातू । सुखें जाती स्वदेशा. ॥ १७० ॥ [२]हस्ती-वाजीउष्ट्रशकटीं । गोणिया वृषभांचिये पृष्ठीं । [३]घंटाघोषें एक दाटी । मार्गीं जातां [४]देखिले. ॥ १७१ ॥ ते उतरतां सरिता[५]जळीं । समीप पातली विदर्भ-

महाराष्ट्रकाव्यांत जे अनेक ब्रिजशब्द घुसले त्यांतलाच हा एक होय. **दृश्** (पाहणें) या संस्कृतधातूंत **श**काराच्या ठिकाणीं **ख**कार व आणखी कित्येक फरक होऊन 'देख्' हा ब्रिजधातु तयार झाला असावा. २२. येथें 'वसता' शब्दाच्या अर्थाविषयीं घोंटाळा होण्याचा संभव आहे. (१) 'वसता'=वसलेले असतां, वास करीत असतां; रहदारीचा रस्ता. असा अर्थ घेतल्यास अन्वय असा करावा लागेलः—[पंथ वसता (चालणाऱ्या) असंख्यातू वाणी देखती झाली]. (२) 'वसता'=वस्ती असलेला. 'वस्ती असलेलें गांव' या अर्थीं 'वसतें गांव' असा प्रयोग ज्ञानेश्वरानें योजिलेला आहे. या प्रयोगान्वयें 'वसता पंथू'=वस्ती असलेला रस्ता; जेथून पुष्कळ लोक जात होते असा रस्ता. येथें 'वसता' हें 'पंथू'चें विशेषण आहे असें समजावें. (३) वसता=वाटसरू. 'वसतीकर,' 'वसताकर,' 'वसुतार,' 'वसतार' इत्यादि शब्द 'वाटसरू' या अर्थीं योजिलेले जुन्या महाराष्ट्रग्रंथांत आढळतात. तेव्हां 'वसता' शब्दही त्याच अर्थीं घेण्यास हरकत दिसत नाहीं. २३. 'वणिग्जन' व 'वणिक्समुदाय' असाही पाठ आहे.

१. समूह. 'वित्तू' असाही पाठ आहे. २. हस्ती=हत्ती; वाजी=घोडा; उष्ट्र=उंट; शकट=गाडा. ३. बैलांच्या गळ्यांत बांधलेल्या घंटांच्या आवाजानें. ४. या क्रियापदाचा कर्ता 'दमयंतीनें' व कर्म 'वाणी' आहे असें समजावें. या ओवींत शब्दरचनेचा व वाक्यरचनेचा जरा घोंटाळा झाला आहे. ५. नदीच्या कांठीं. 'सरिताजळीं' याचा 'नदीच्या प्रवाहांत' असा शब्दशः अर्थ होतो; परंतु नदीच्या पाण्यांत सर्व सामानासह उतरणें अगदीं असंभव असल्यामुळें लक्षणेनें 'नदीच्या कांठीं' असा अर्थ घ्यावा. ['लक्षणा शक्यसंबंधस्तात्पर्यानुपपत्तितः.' भाषापरिच्छेदः. 'लक्षणाशक्यसंबंध इत्यादि । गंगायां घोष इत्यादौ गंगापदस्य शक्यार्थे प्रवाहरूपे घोषस्यान्वयानुपपत्तिस्तात्पर्यानुपपत्तिर्वा यत्र प्रतिसंधीयते तत्र लक्षणया तीरस्य बोधः । सा च शक्यसंबंधः । तथाहि । प्रवाहरूपशक्यार्थसंबंधस्य तीरे गृहीतत्वात् तीरस्य स्मरणम् । ततः शाब्दबोधः.' **मु**क्तावली. अर्थः—'लक्षणा म्हणजे शक्य अर्थाचा संबंध व अन्वयानुपपत्ति किंवा तात्पर्यानुपपत्ति (अन्वयानुपपत्ति म्हणजे शक्य अन्वयाचा बाध होणें हें होय. आणि तात्पर्यानुपपत्ति म्हणजे वक्त्याचे (प्रयोगकर्त्याचे) तात्पर्यास बाध येणें हें होय) ज्या ठिकाणीं येत असते त्या ठिकाणीं लक्षणा मानणें भाग असल्यामुळें लक्षणेचीं बीजें पूर्वोक्त दोन अनुपपत्ति ह्या होत.………………'गंगायां घोषः' (गंगेचे ठायीं घोष म्हणजे गवळीवाडा आहे) या ठिकाणीं 'गंगा' या पदाचा शक्य अर्थ प्रवाह (जल) हा असून या प्रवाहस्वरूपी अर्थाचे ठायीं घोष राहत नसल्यामुळें प्रवाहाचे ठायीं घोषाचा अन्वय संभवत नाहीं म्हणून अन्वयानुपपत्ति किंवा तात्पर्यानुपपत्ति ही आहे तेव्हां अशी अन्वयानुपपत्ति किंवा तात्पर्यानुपपत्ति याजमुळें त्या शक्यअर्थाचा (प्रवाहाचा) जो संबंध (संयोग) तत्स्वरूपी लक्षणा तीराचे ठायीं मानावी. तेणेंकरून 'गंगा' या पदापासून ती

बाळी[1] । तीतें देखोनी वैश्यीं सकळीं । नाना तर्कीं तार्किले. ॥ १७२ ॥ एक म्हणती, 'वनदेवता । शाकिनी डाकिनी देवकांता.' । एक म्हणती, 'भूमाता[3] । यक्षिणी किंवा राक्षसी.' ॥ १७३ ॥ एक प्रार्थिती, 'महाशक्ती ! । आम्हीं निर्विघ्न जाइजे पंथीं । ऐसा वर देउनी हातीं । अभय वोपीं आमुतें.' ॥ १७४ ॥ येरी म्हणे, 'मी मानविणी[4] । नव्हें राक्षसी अथवा यक्षिणी; । पतीनें त्यागिलें दुस्तर वनीं । त्याचें शोधन करितसें.' ॥ १७५ ॥ वाणी म्हणती, 'तूं डोळसा[5] । एकली मार्ग क्रमिशी कैसा । आम्ही जातसों चैद्यदेशा । त्वांही संगीं चलीजे.[6]' ॥ १७६ ॥ शुचीनामा वैश्य एक । सकळ वणिजांचा नायक । आश्वासुनी म्हणे. 'लोकँ[7] । भेटवीन तुज तुझा.' ॥ १७७ ॥ तयासंगीं पंच राती । क्र-

राचा बोध होतो. तो असा–प्रथम 'गंगा' या पदाचें ज्ञान होतें. त्यानंतर शक्य अर्थ जो प्रहार त्याचा संबंध तीरावर आहे असें लक्षणेचें ज्ञान होतें. नंतर तेणेंकरून 'एकसंबंधि ज्ञानमपरसंबंधि स्मारकं' अशा अनुभवसिद्ध नियमावरून तीराची उपस्थिति (स्मरण) होतें, नंतर तिच्या योगानें तीराचे ठायीं घोष आहे' असा शाब्दबोध 'गंगायां घोषः' या समुदित वाक्यापासून होतो.' न्यायभारती.]

१. कन्या. २. 'नाना तर्कें तार्किले' 'अनेक तर्क तार्किले' अशीं पाठांतरें आहेत. इंग्रजींत ज्यांना Cognate object म्हणतात त्याचें हें उदाहरण आहे:—'Some verbs, generally intransitive take occasionally after them an object whose *meaning* is *akin* to the verb. These objects are called cognate objects. (*co*=together; not =born; hence 'born together' 'related' 'akin.') e. g. They have slept their sleep; He has fought a good fight; They ran a race &c.' अशा प्रकारच्या कर्माला महाराष्ट्र व्याकरणांत निराळें नांव नाहीं. तरी असले प्रयोग कधीं कधीं पाहण्यांत येतात:–उ० मार मारिला; गीत गाइलें; खाऊ खाल्ला. इ० ३. 'भूतमाता' असा अन्य पाठ. ४. संस्कृतांत 'मानव' 'शब्दाला **ङीप्** प्रत्यय लागून मानवी' असें स्त्रीलिंगाचें रूप होतें. परंतु प्रस्तुत स्थळीं कवीनें, या नियमाकडे लक्ष न देतां, महाराष्ट्र व्याकरणाच्या नियमाप्रमाणें 'मानविणी' असा स्त्रीलिंगवाचक शब्द बनविला आहे. '**अ**कारांत, **इ**कारांत आणि उकारांत प्राणिवाचक पुल्लिंग नामांस पुढें '**ईण**' प्रत्यय लाविल्यानें त्याच नामाचा स्त्रीलिंगवाचक शब्द होतो, परंतु हा प्रत्यय लावितेसमयीं शब्दाच्या अंत्यस्वराचा लोप होतो.' [दादोबा.] या नियमाप्रमाणें 'मानव'शब्दाला **ईण** प्रत्यय लागून 'मानवीणी' असा शब्द झाला. 'मानवीण' या शब्दाला **ई** हा स्त्रीप्रत्यय पुन्हा लागून 'मानवीण' असा शब्द झाला; व वृत्ताच्या सोईकरितां 'मानविणी' असा शब्द बनविला गेला. याप्रकारें हा शब्द दोन स्त्रीलिंगद्योतक प्रत्यय लागून झालेला आहे हें व्याकरणज्ञांनीं लक्षांत ठेवावें. असले शब्द भाषेंत बहुधा ग्राह्य होणार नाहींत. ५. सुंदर. ६. 'चालिजे' असाही पाठ आहे. ७. बांधव, नातेवाइक.

मितां दिवस एक वसती । तडागतटीं वणिक्पती । स्वस्थ आनंदें राहिली.[1] ॥ १७८ ॥ अर्ध रात्रीं कुंजरथाट[2] । पाणिया पातला एक वाट[3] । मार्ग रोधिला देखोनी[4] आट[5] । मार्गस्थांतें मांडिला. ॥ १७९ ॥ ते कुंजर[6] पाणियाकडे देखा[7] । नित्याभ्यासें येती उदका । मार्ग कोंडिला[8] देखोनी लोकां । महा प्रळय मांडिला. ॥ १८० ॥ तंव[9] वारण मत्त करिणी । असंख्य सावकारांच्या श्रेणी । चूर्ण करूं लागल्या चरणीं । मार्गीं वसती तयांतें. ॥ १८१ ॥ शुंडा[10] पिळूनी[11] पाडी धरणी । एक हाणोनियां[12] दशनीं[13] । एक ऊर्ध्व सांडिती गगनीं । पिष्टें[14] करिती अस्थींचें. ॥ १८२ ॥ तेथें उठिला[15] हाहाकार । दाही दिशा पळती नर । पाठी लागले कुंजर । पिटूनियां[16] मारिती. ॥ १८३ ॥ वृक्षगुल्मीं[17] वणिकमेळा । म्हणती, 'पातली काळवेळा[18] । अंधकार दाटला डोळां । पळतां मार्ग दिसेना. ॥ १८४ ॥ म्हणती, 'कवणाचें[19] हें पाप । कीं दुष्ट[20] ग्रहाचा[21] कोप ।

---

१. याची कर्ती 'दमयंती' होय असें समजावें. अन्वय:—तयासंगीं पंचराती क्रमितां एक दिवस [तो] वणिक्पती [आणि त्याचे लोक] तडागतटीं वसती, [दमयंती देखील] [तेथें] स्वस्थ आनंदें राहिली. २. हस्तिसमूह. ३. प्रस्तुत स्थलीं 'एक वाट' याचे दोन अर्थ होऊं शकतील. (१) तडागाजवळ जाण्यास जो एकच मार्ग होता तो. (२) ज्या मार्गानें हत्ती तडागाजवळ गेले तो एक मार्ग. यांपैकीं पहिला अर्थ विशेष ग्राह्य आहे. कारण एकच मार्ग होता असें समजल्यास, तो मार्ग बंद झाल्यामुळें कुंजरांना इतका राग कां आला, हें सहज समजेल. मार्ग पुष्कळ होते असें समजल्यास एका मार्गाचा अवरोध झाल्याबद्दल कुंजरांना तितका राग येण्याचें कारण नव्हतें. कारण सरोवराजवळ जाण्यास त्यांना इतर मार्ग खुले होते. ४. 'म्हणोनी' असाही पाठ आहे. ५. प्रळय, अनर्थ. ६. हत्ती. ७. पहा. [अहो साचें, इत्यादिकांप्रमाणें पादपूरणार्थ योजिलेला शब्द.] (२) वहिवाटीनें, अभ्यासाला अनुसरून, संवय होती म्हणून हत्ती आले—असा भाव. [चाल, रीति या अर्थीं 'देखी' व 'देखा' हे शब्द ज्ञानेश्वरींत योजलेले आढळतात.] ८. मार्ग कोंडिला [कोंडिलेल्या] लोकां [लोकांना] देखोनी—असा अन्वय. ९. 'मत्त' असाही पाठ आहे. १०. सोंडा. ११. 'कवळूनी' असा अन्य पाठ आहे. १२. मारून, दुःख देऊन. १३. 'रगडूनियां सांडिती चरणीं' असाही पाठ आहे. १४. हाडें मोडिती असें सांगण्यासाठीं कवीनें केलेली अतिशयोक्ति. १५. हें इंग्रजींतल्या 'Transferred epithet' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. लोक उठले आणि हाहाकार करूं लागले असें न सांगतां हाहाकारच उठला असें वर्णिल्यामुळें हा अलंकार झाला. १६. 'टिपूनियां' असाही पाठ आहे. १७. झाडांच्या समूहांत लपून असा भाव. १८. मृत्युसमय, मरण्याची वेळ; आतां आपण जीवंत राहत नाहीं—असा उद्देश. १९. कोणी केलेलें. सरोवराजवळ उतरलेल्या वाण्यांपैकीं एकाद्यानें केलेल्या पापामुळें हा अनर्थ झाला—असा भाव. एकाच्या अपराधाकरितां त्याच्याबरोबरच्या सर्व मंडळीला शिक्षा

कां मुहूर्तलोपाचा[1] विक्षेप[2]। किंवा दोष आमुचे. ॥ १८९ ॥ चुकलों यक्षराजाची[3] पूजा। विभाग[4] नेदूं देवराजा[5]। कीं स्थळदेवता[6] क्षोभूनि वोजा[7]।

भोगावी लागते असें सांगण्याचा, या वाक्याचा झोंक दिसतो. परंतु हें म्हणणें न्यायतत्वांच्या विरुद्ध आहे. ज्यानें अपराध केला त्यालाच अपराधाची शिक्षा मिळाली पाहिजे; त्या अपराधाबद्दल दुसरा कधींही शिक्षेला पात्र होणार नाहीं, हा न्यायशास्त्राच्या मुख्य सिद्धांतांपैकीं एक होय. या नियमाला उद्देशूनच एका आधुनिक इंग्लिश ग्रंथकारानें म्हटलें आहे:—'Hamlet must answer for himself; Horatio cannot answer for him.' परंतु कित्येक धर्मग्रंथांतून एका पुरुषानें केलेल्या अपराधाबद्दल त्याच्या पूर्वजांना व संततीला शिक्षा सांगितलेली असते! या विपरीत न्यायाचें ढोबळ उदाहरण बैबलांत आहे. **ऑडम** व **ईव** या आमच्या आद्यपितरांनीं केलेल्या आज्ञाभंगाबद्दल आम्हां सर्वांना स्वर्गच्युत व्हावें लागलें! २०. 'नेणों' असा अन्य पाठ आहे. २१. ग्रहांच्या जातीविषयीं व गुणांविषयीं लिहितांना **वराहमिहिरानें** लिहिलें आहे:—'विप्रादित: शुक्रगुरू कुजार्कौ शशी बुधश्चेत्यसितोऽन्त्यजानाम् । चंद्रार्कजीवाज्ञसितौ कुजार्कौ यथाक्रमं सत्वरजस्तमांसि ॥' अर्थ:—शुक्र व बृहस्पति हे ब्राह्मणवर्णाचे, अंगारक आणि सूर्य क्षत्रियवर्णाचे, चंद्र वैश्यवर्णाचा, बुध शूद्रवर्णाचा व शनैश्चर अंत्यज होय. चंद्र, रवि आणि गुरु हे सत्वगुणाचे, बुध, शुक्र रजोगुणाचे, कुज व शनि हे तमोगुणाचे ग्रह होत. [बृहज्जातक–ग्रहयोनिभेदाध्याय–अध्याय २ श्लोक ७ पहा.]

१. 'किंवा शिवाचा कोप' असा अन्य पाठ आहे. २. अवेळीं निघाल्याचा, अशुभमुहूर्तीं निघाल्यामुळें. कोठेंही जावयाचें असलें म्हणजे चांगला मुहूर्त पाहून निघण्याची जी चाल आहे तिला उद्देशून हें वाक्य आहे. अशुभमुहूर्तीं निघाल्यास कांहींना कांहींतरी संकट येतें अशी समजूत आहे. एक मुहूर्त म्हणजे किती काळ याविषयीं **अमरसिंहानें** म्हटलें आहे:—'अष्टादशनिमेषास्तु काष्ठा त्रिंशत्तु ताः कला । तास्तु त्रिंशत्क्षणस्ते तु मुहूर्तो द्वादशास्त्रियाम् ॥' अक्षिस्पंदकालाला 'निमेष' अशी संज्ञा आहे. अठरा 'निमेषां'ची एक 'काष्ठा,' तीस 'काष्ठां'ची एक 'कला,' तीस 'कलां'चा एक 'क्षण,' व बारा 'क्षणां'चा एक मुहूर्त. ३. कुबेराची. ['कुबेरस्त्र्यंबकसखो यक्षराड्गुह्यकेश्वरः' इत्यमरः.] कुबेराची पूजा फारशी कोठें प्रचारांत नाहीं. परंतु अत्यंत धनवान् असल्यामुळें वाणी इत्यादि धनाभिलाषी व्यापारी लोक याची पूजा करितात. कारण याच्या प्रसादानें व्यापारांत पुष्कळ लाभ होतो अशी समजूत आहे. यक्षराजाची पूजा न केल्यामुळें हा अनर्थ गुदरला असा वक्त्याचा उद्देश. ४. 'कीं विभाग न दिला' असाही पाठ आहे. ५. इंद्राला. ज्याप्रमाणें आपल्या उत्पन्नाचा कांहीं भाग राजाला दिला पाहिजे त्याचप्रमाणें देवांचा राजा जो इंद्र त्यालाही कांहीं भाग मनुष्यानें दिला पाहिजे अशी समजूत आहे. या ठिकाणीं 'देवराजा' हा शब्द साभिप्राय योजिलेला आहे. ६. ज्या स्थळीं वणिग्जन निजले होते त्या स्थानाची देवता. पुराणकारांनीं जलदेवता, स्थलदेवता, वनदेवता इत्यादि अनेक देवता कल्पिल्या आहेत. ७. 'वोज' किंवा 'वोजा' हा शब्द रीति, चांगुलपण, स्वच्छ, उमज (समज) इत्यादि अर्थीं योजिलेला प्राचीन ग्रंथांतून सांपडतो. परंतु यांपैकीं कोणताही अर्थ घेतल्यास सांप्रतस्थळीं योग्य होत नाहीं. म्हणून 'वोजा' शब्द येथें कवीनें पादपूरणार्थ किंवा यमकसाधनार्थ योजिलेला आहे असें समजून निर्वाह करावा.

महाव्यसनीं[1] पडियेलों. ॥१८६॥ एक म्हणती, 'संगें[2] नारी। ते नेमस्त[3] निशाचरी[4]। तिचेनि[5] योगें महामारी[6]। पातली हें जाणिजे[7]. ॥ १८७ ॥ दिन उगवल्या पडेल नयनीं। तरी काष्ठीं कां पाषाणीं[8]। मारूनि सांडा[9] एथें मनीं। अनमान कोणीं न करावें.[10]' ॥ १८८ ॥ ऐकोनी हें विदर्भकुमरी। न विचारितां अति घाबरी। पळों लागली अंधकारीं। वनें उपवनें लंघुनी. ॥ १८९ ॥ विचार करी हृदयस्थळीं,[11] । 'काय बोलिजे जनीं सकळीं। एवढी विस्तीर्ण महीस्थळी[12]। मज एकीतें उबगली[13]. ॥ १९० ॥ उभें राहवया न ठाव। कवण्या

---

१. संकटांत. २. बरोबर असलेली. ३. नियमानें हिंडणारी, लोकांना फसवून त्यांच्यावर संकटें आणणें हा जिचा नित्य नेम आहे अशी. ४. राक्षसी. ५. तिच्याच. येथें 'नि' अक्षर 'च' अक्षराबद्दल योजिलेलें आहे. ६. घोर अनर्थ. हा शब्द बहुतकरून 'पटकी' या अर्थीं योजितात. परंतु सांप्रतस्थळीं याचा फक्त 'अनर्थ' असा अर्थ घेतला पाहिजे. ७. 'जाण पां' असा अन्य पाठ आहे. ८. 'कां शस्त्रीं हो पाषाणीं' असाही पाठ आहे. ९. सोडा. १०. कोणाला न सांगतां; कारण, सांगितल्यास मारतील अशी भीति होती. ११. हृदयांत विचार करूं लागली. विचाराचें स्थान हृदय होय अशी आजपर्यंत पुष्कळांची समजूत होती; परंतु ती समजूत आतां खोटी ठरली आहे. सांप्रतच्या मानसशास्त्रवेत्त्यांनीं मनोविकारांचे तीन भेद कल्पिले आहेतः–(१) ज्ञान किंवा विचार (Knowing or thinking), (२) इच्छा (willing), (३) मनोक्षोभ (feeling e. g. pity, love, anger &c). यांपैकीं पहिल्या दोन विचारांचें स्थान मेंदू होय व तिसऱ्याचें स्थान हृदय होय. सर्व विचार डोक्यांतून निघतात, हृदयांतून नव्हे. तरी मुक्तेश्वराच्या वेळीं अशी समजूत नसल्यामुळें त्यानें 'विचार करी हृदयस्थळीं' असें लिहिलें आहे. सांप्रतस्थळीं दमयंतीच्या मनाचा अतिशय क्षोभ झाल्यामुळें त्याचा परिणाम तिच्या हृदयावर स्पष्ट दिसत होता म्हणून कवीला भास झाला कीं तिचे सर्व विचार तिच्या हृदयांतच चालले आहेत कीं काय? असा अर्थ घेऊन उत्प्रेक्षालंकार केल्यासही चालेल. कारण "सुख किंवा दुःख बरेंच झालें, म्हणजे त्याचा परिणाम हृत्कमलावर व रक्तवाहिन्यांवर कसा होतो हें आपण रोज पहातों: जरासा तीक्ष्ण असा कोणताही ठसा कोणत्याही इंद्रियावर उमटला, म्हणजे नाडीचे ठोके लागलेच पहिल्यापेक्षां जलद पडूं लागतात; आणि मनोविकारांस उकळी फुटल्यानें हृत्कमलावर त्यांचा परिणाम किती जलद होतो, याबद्दल फारसा पुरावा आणणें नलगे; तर अंतःकरण व मनोवृत्ति ह्या दोन शब्दांचा एकमेकांच्या अर्थीं रोजच्या संभाषणांत आपण उपयोग कसा करितों, एवढें ध्यानांत आणिलें तरी पुरे. उदाहरणार्थ, 'दुःखानें त्याच्या मनोवृत्ति क्षुब्ध झाल्या आहेत' असें म्हणण्याच्या ऐवजीं, 'दुःखानें त्याचें अंतःकरण संतप्त झालें आहे' असें आपण सहज म्हणतों." [शास्त्ररहस्य.] १२. 'तळी' असाही पाठ आहे. १३. कंटाळली.

कर्में कोपला देव । सुकृतें जोडिलीं तीं वाव[1] । सर्व जालीं एकदां. ॥ १९१ ॥ जन्मोनी असत्य नेणें वदनीं । भूतद्रोह[2] नाठवे मनीं । स्वप्नीं साधुनिंदेची कहाणी । श्रवणीं नाहीं परिशिली. ॥ १९२ ॥ नाहीं गुरूची केली अवज्ञा । छळिलें नाहीं तपोधना । एवढा दुःखभोग प्राणा । किमर्थ जाला कळेना. ॥ १९३ ॥ स्वयंवरीं हेळुनी[3] देवपंक्ति । म्यां नैषध वरिला पति । हें पाप[4] कांहीं ग्रंथीं । तें मज कांहीं नेणवे.' ॥ १९४ ॥ ऐशी सखेद अंतःकरणीं । तंव उगवला वासरमणी[5] । वसता देश देखे नयनीं । गोधनें[6] वनीं विचरती. ॥ १९५ ॥ गोरक्षकां पुसे पंथ, । ते दाविती हस्तसंकेत,[7] । 'चैद्यदेश हा पुण्यवंत । पवित्र लोकीं वसतसे.' ॥ १९६ ॥ पुढें चैद्यनृपाची पुरी । सुबाहु राजा राज्य करी । न्यायें वसंत[10] सदाचारी । प्रजा पाळी स्वधर्में. ॥ १९७ ॥ दिवस असतां चार घटिका । नगरीं प्रवेशली[11] देखा । तीतें अवलोकितां लोकां । अत्यद्भुत[12] भासलें. ॥ १९८ ॥ अर्धवस्त्रा, मुक्तकेशी । धूळीधूसर[13] दाटलें शिसीं[14] । उपोषणें वदनशशी[15] । क्षीण[16] जैसा अमावास्ये. ॥ १९९ ॥ नेत्रीं क्षीरसिंधूचें[17] जळ । हृदयीं संतापवडवानळ । परी सत्य[18] स्वधर्म[19] अचळ । न भंगेची स्वधर्मी[20]. ॥ २०० ॥ लहान थोर लोक बोले[21] । टाकिती कर्दमगोमयगोळे[22][23] । पिशाच मानुनी सकळें । उपहासिती विनोदें[24]. ॥ २०१ ॥ राजमाता उपरिकासदनीं[25] । दुरूनि देखती झाली

१. व्यर्थ. २. प्राण्यांचे ठायीं दया नसणें, आत्मवत् सर्व प्राण्यांना न पाहणें. ३. सोडून. ४. 'जरी पाप असेल कांहीं' असाही पाठ आहे. ५. 'दिव्य तरणी' असाही पाठ आहे. ६. प्राचीन ऋषि गाईनांच धन समजत असत. ज्याप्रमाणें सध्यां रुपयांच्या मापानें धन मोजतात त्याप्रमाणें तेव्हां (वैदिककालांत) गाईंच्या मापानें धन मोजीत असत. ७. या दिशेकडे गेल्यास चैद्यदेश सांपडेल अशा अर्थाची गुराख्यांनीं खूण केली. ८. 'महा' असा अन्य पाठ आहे. ९. 'न्यायवंत' असा अन्य पाठ आहे. १०. वसतसे, न्यायानें वसतसे, राज्य करीतसे—असा भाव. ११. या क्रियापदाची कर्त्री 'दमयंती' होय असें समजावें. १२. अत्यद्भुत भासण्याचें कारण पुढील ओंवींत दिलें आहे. १३. मळकटपणा. १४. मस्तकीं. १५. मुखरूपी चंद्र. १६. तेजरहित. १७. क्षीरसमुद्राचें. हा समुद्र सप्तसमुद्रांपैकीं पांचवा होय. १८. 'सत्यवचन धैर्य अचळ' असाही पाठ आहे. १९. पतिव्रताधर्म असें समजावें. २०. 'मर्यादा' असाही पाठ आहे. २१. 'लहान' आणि 'थोर' असे दोन कर्ते आहेत तरी 'बोले' हें क्रियापद एकवचनांत आहे हें चिंत्य असे. २२. चिखल. २३. शेण. २४. 'पिशाच मानुनी सकळें । उपहासिती विनोदें' हें वाक्य अनुभवाच्या विरुद्ध आहे. कारण लोक पिशाचाची थट्टा करीत नाहींत; पिशाचाला लोक भितात व त्यापासून पळून जातात. २५. माडी.

नयनीं । धात्री[1] धाडुनी आज्ञावचनीं[2] । पाचारिली जवळिकें. ॥ २०२ ॥ दुरी वारूनियां[3] लोकां[4] सकळां[5] । निकट बैसविली वेल्हाळा[6] । वदन अवलोकितां डोळां । करुणा आली अद्भुत. ॥ २०३ ॥ सुरत्न देखोनी पारखी[7] । म्हणे, 'हे वस्तु अमोलिक निकी.' । तेंवी जाणोनी म्हणे 'सखी! । सांग; तूं कवण कवणाची[8]. ॥ २०४ ॥ रूपें स्त्रियांचा[9] हरिशी मानू[10] । क्लेशें[11] व्यापिली तनू[12] । एकटी हिंडसी हा कवणू । भोग तुझा नेणवे.' ॥ २०५ ॥ येरी म्हणे, 'मी नृपनंदिनी[13] । पवित्रभूपाळराजपत्नी[14] । पति पडला द्यूतव्यसनीं । तेणें[15] वनीं त्यागिलें[16]. ॥ २०६ ॥ या लागीं वसुधा[17] शोधीं । अद्यापी कोठें नलगे शुद्धी । आजी दैवें भाग्यनिधी । पावल्यें मी सुकृतें[18].' ॥ २०७ ॥ वृद्धा[19] म्हणे, 'गुणवती! । स्वस्थ राहें मजसंगती । शोधुनी आणीन तुझा पती । हें निश्चित जाण पां. ॥ २०८ ॥ राम जानकी ऐसें जाण । योग करीन दोघांजणां, । खेद संताप नाठवीं मना । चिंता दवडीं परौती[20].' ॥ २०९ ॥ भैमी म्हणे, 'ऐक माते! । कन्या म्हणोनी पाळिशी[21] मातें । मनें[22] नेमिलीं तिन्ही व्रतें[23] । तीं

---

१. दाई. २. दमयंतीला आणण्याविषयीं दाईला आज्ञा करून—असा भाव. 'आज्ञावचनीं' 'जवळिकें' इत्यादि पुरातन प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. ३. 'सारूनियां' असाही पाठ आहे. ४. 'लोकां सकळां' हा संस्कृताप्रमाणें प्रयोग झाला. नेहमीं 'सकळ लोकां' असें लिहितात. ५. 'लोकपाळां' असाही पाठ आहे. ६. सुंदरी. ७. ओळखी. बाकीचे सर्व लोक अरसिक व ज्ञानरहित असल्यामुळें त्यांनीं दमयंतीला, ही खरी पतिव्रता आहे असें ओळखिलें नाहीं; परंतु सुबाहूची माता शहाणी असल्यामुळें तिनें हलक्या गोष्टींतून रत्न ओळखून काढिलें—असा कविहृद्गतार्थ. ८. कोणाची स्त्री आहेस? ९. 'श्रियेचा' असाही पाठ आहे. १०. गर्व. ११. 'क्लेशें तुझी व्यापिली तनू' असाही पाठ आहे. १२. 'दिसे तनू' असाही अन्य पाठ आहे. १३. राजाची मुलगी. १४. पवित्र (पुण्यश्लोकांत पहिला अशा) भूपाळाची (सम्राट् राजाची) राजपत्नी (पट्टराणी). येथें 'राजपत्नी'चा राजाची स्त्री असा अर्थ घेतल्यास या शब्दाच्या मागचा 'भूपाळ' शब्द फाजील होतो. १५. त्या माझ्या पतीनें. १६. 'त्यागिलें' याचें कर्म 'मला' असें समजावें. १७. पृथ्वी. १८. या भाषणांत दमयंतीनें आपलें नांव, आपल्या पतीचें नांव व आपल्या बापाचें नांव कळविलें नाहीं हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. पंतांनीं म्हटलें आहेः—'पुसतां स्ववृत्त सर्वहि सांगे, पतिरीतिची कथी थोरी, । सैरंध्री म्हणउनि घे पतिनाम स्वात्मनामही चोरी. ॥' [वनपर्व—अ० ४ गी० १५०.] १९. राजाची माता. २०. परौती=पलीकडे, दूर, फार लांब. 'साजणी' अन्य पाठ. २१. पाळावयाची तुझी इच्छा असल्यामुळें—असा भाव. २२. माझ्या मनानें ठरविलेलीं. माझी अशी इच्छा आहे हा सांगण्याचा उद्देश. २३. अध्याय ६५ श्लो० ६८-७० पहा.

त्वां नेमें रक्षावीं. ॥ २१० ॥ न करीं उच्छिष्ट भोजन[1] । न करीं परपादप्रक्षालन । परपुरुषाशीं संभाषण । स्वप्नीं तेंही करीना. ॥ २११ ॥ ऐसा चालविशी नेम । तरिच घडेल समागम[2] ' । वृद्धा म्हणे, 'अति उत्तम । भाव[3] मातें मानवला. ॥ २१२ ॥ तूतें पाहेल पापनेत्रीं[4] । त्याचें मस्तक छेदीन शस्त्रीं, । समाधानें[5] गुण पवित्रीं[6] । संगीं असें[7] माझिये. ॥२१३॥ स्वहस्तें सुवासपवित्रीं[8] । आच्छादिली सुकुमारगात्री[9] । फळें जळें अहोरात्रीं । सांभाळीत असे स्नेहें. ॥ २१४ ॥ सुनंदा[10] आपुली नंदिनी[11] । तीतें म्हणे, 'हे तुझी भगिनी, । दोघीं असावें एकमिळणीं[12] । गंगायमुनेसारिख्या[13]'. ॥ २१५ ॥ यापरी वैद्य-

१. 'रसभोजन' व 'अशन' असे अन्य पाठ आहेत. २. तुझ्याबरोबर राहणें. याच अर्थाच्या **मो**रोपंतांच्या गीती पाहण्यासारख्या आहेत:—'उच्छिष्टाशन पादक्षालन परपुरुषभाषण स्पष्ट, । न घडों द्याल तरी, निजपतिशोधावधि करीन मी कष्ट. ॥ १५१ ॥ बोलेन प्राणप्रियशोधार्थ ब्राह्मणासवें मात्र, । मदधीन असावें हें व्रत माझें, देवि! आणि हें गात्र.' ॥ १५२ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—वनपर्व—अ० ४; पृष्ठ ५६.] ३. तुझें म्हणणें मला मान्य आहे—हा म्हणण्याचा उद्देश. येथें भाव=इच्छा, सद्धेतु. ४. वाईट हेतूनें, कुबुद्धीनें, कामवासना मनांत ठेवून—असा भाव. ५. कांहीं एक काळजी न बाळगतां. ६. 'पवित्रगुणीं' असें पाहिजे, पण यमक साधण्याकरितां 'गुणपवित्रीं' असें लिहिलें आहे. पवित्रगुणीं=आपल्या सद्गुणांनीं युक्त; सद्गुणसंपन्न अशी. ७. 'वसें' अन्य पाठ. ८. येथें ही यमकाकरितां 'पवित्रसुवासी' असें लिहिण्याच्या ऐवजीं 'सुवास पवित्रीं' असें लिहिलें आहे. पवित्रसुवासीं=सुवस्त्रानें. ९. जिचे अवयव फार नाजूक आहेत अशी. 'सुकुमारगात्री' हें हेतुगर्भ विशेषण आहे. राजमातेनें स्वतः वस्त्र नेसविण्याचें कारण दमयंती 'सुकुमारगात्री' होती हें होय. १०. 'सुमेध' असाही पाठ आहे. ११. कन्या. १२. एक विचारानें, एक दिलानें, एका मार्गानें. मिळणीं=मिळून, एकत्र. सांप्रत हा शब्द या अर्थीं योजण्यांत येत नाहीं. 'सुनिर्मळ मनीं' असाही पाठ आहे. १३. **गं**गा ही **वि**ष्णूची मुलगी व **य**मुना ही **सू**र्याची मुलगी, म्हणजे **गं**गा व **य**मुना ह्या बहिणी नव्हेत. असें असून त्या सख्या बहिणीप्रमाणें राहतात, एकत्र मिळून चालतात, एकमेकांना कधीं सोडीत नाहींत. तशाच तुम्हीं (**द**मयंती व **सु**नंदा) जरी सख्या बहिणी नाहीं—तरी एकदिलानें वागा, एकमेकांना सोडूं नका व एकमेकांवर प्रेम ठेवा—असा राजमातेच्या सांगण्याचा भाव. **गंगाय**मुनेचा दृष्टांत या स्थळीं फारच समर्पक आहे. कारण राजमातेच्या दृष्टीनें ज्याप्रमाणें **गं**गा व **य**मुना यांचा मूळचा कांहींच संबंध नव्हता त्याचप्रमाणें **सु**नंदा व **द**मयंती यांच्यांत रक्तसंबंध मुळींच नव्हता. शिवाय दोन मैत्रिणींचा एकजीव झाल्याचें **गं**गा व **य**मुना यांच्या संगमापेक्षां उत्तम उदाहरण दुसरें सांपडणें कठीण. प्रयागक्षेत्रीं **गं**गा व **य**मुना या नदींचा संगम झाला आहे हें प्रख्यातच आहे. या क्षेत्रापासूनच दोनही नद्यांचा एकजीव झाला व त्या नेहमीं अद्वितीय मैत्रिणी झाल्या. दुःख, प्रवासप्रदास, रस्त्यांतली व खो-

नृपाचे घरीं । स्थिरावली[1] वैदर्भकुमरी. । कथा लागली[2] दुसरी[3] । नळाकडे ते ऐका. ॥ २१६ ॥ इति **श्रीभारतवनपर्वणि** । कथा नर्मदा रस[4]वाहिनी । ओंविया[5] रूपें पवित्र पुलिनीं । बाणलिंगें[6] विचित्रें[7]. ॥ २१७ ॥ तटीं[8] श्रवण सुखाचे आर्ती[9] । तपश्चर्या करितां श्रोतीं[10] । भुक्ति[11] मुक्ति आयती[12] । स्वधर्मपत्नी सा-

---

ङकर मुलांनीं फेकलेली माती इत्यादिकांमुळें दमयंती काळसर व मळकट दिसत होती म्हणून तिला सांवळ्या यमुनेची उपमा व गौरवर्णाच्या सुनंदेला शुभ्रगंगेची उपमा फारच शोभते. या शब्दरचनेबद्दल रसिकांना आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं व या द्राक्षारसपाकाबद्दल कोणता काव्यलोलुप कवीची तारीफ करणार नाहीं ? गंगा व यमुना यांच्या संगमाचें एका आधुनिक कवीनें वर्णन केलें आहे तें वाचण्यासारखें आहे:—'गंगा सुफेनधवला यमुना सुनीला, ह्यांचा मना रुचिर संगम दे सुखाला । आरक्त सूर्यकर बिंबुनियां तरंगीं, आल्हाद तेथ भरती रसिकांतरंगीं ॥ २ ॥ गंगातरंग शिरुनी यमुनातरंगीं, लोळे सुनीळ सलिलावरि ते शुभांगी । कल्होळ उत्सवकर प्रिय संगमाचे, नानातरंग निघती जणुं ते सुखाचे ॥ ३ ॥ भागीरथी स्वभगिनीसह पुण्यदात्री, वाहे परोपकृतिला रमणीयपात्रीं । विस्तीर्ण दूरवर सुंदर संगमाचें, गंभीर पात्र करि रंजन या मनाचें ॥ ४ ॥ गंगातरंग नवशीकर शीतवातें, आनंद होय अवघ्या श्रमल्या मनातें । गंगावनीं उधळुनी नवपुष्पराजी, देई सुगंधरचना हृदयंगमा जी ॥ ५ ॥ कर्णांस दे सुख विहंगममंजुवाणी, गाती सुरम्यरमणी अति गोड गाणीं । गंगातटाक हिरवे रमणीय झाले, झालें पिकोनि बहु सौख्यद धान्य ओलें ॥ ६ ॥.'

१. राहूं लागली. 'स्थिरावली' म्हणण्याचें कारण ती आतांपर्यंत भटकत होती. स्थिरावली=स्थिर झाली, इकडे तिकडे न जातां एकाच ठिकाणीं राहूं लागली. २. 'कथा लागली **पुढारी**' असा जो अन्य पाठ आहे तो प्रशस्त नाहीं. कारण आतां नळाविषयीं जी कथा सांगावयाची आहे ती दमयंती सुबाहुपुराला पोहोंचल्यानंतर सुरू झालेली नव्हे, तर अरण्यांत दमयंती निजलेली असतांना नळ तिला सोडून गेला तेव्हांपासूनची होय. म्हणून 'कथा लागली पुढारी' असें म्हणणें दोषास्पद होईल. दोन कथा एकाच वेळीं सांगणें अशक्य असल्यामुळें कवी, एकसमयावच्छेदेंकरून घडलेल्या दोन गोष्टी एकामागून एक वर्णितो एवढेंच. ३. 'पुढारी' असाही पाठ आहे. ४. रस (जल, पक्षीं काव्यांतले नवरस) वाहून नेणारी. 'रसवाहिनी हें विशेषण 'कथा' व 'नर्मदा' या दोहोंनाही लावतां येते. हें **श्लेष** नामक अलंकाराचें उदाहरण होय. ['शब्दैः स्वभावादेकार्थैः श्लेषोऽनेकार्थवाचनम्' इति साहित्यदर्पणकारः.] ५. ओंव्या. ६. नर्मदानदींत लिंगाकृति दगडाच्या मूर्ती तयार होतात; त्या नर्मदेच्या काठीं जागजागीं भक्तजनांनीं शिवलिंगांची स्थापना केली आहे. हीं कांठावरचीं लिंगें असा अर्थ घेतल्यासही चालेल. ७. 'पवित्रें' असाही पाठ आहे. ८. 'तरी' असाही अन्य पाठ आहे. ९. आवड. १०. महाभारत ऐकणाऱ्या श्रोत्यांना नर्मदेच्या कांठीं स्वस्थ बसून तपश्चर्या करणाऱ्या साधूंची उपमा दिलेली आहे. ११. 'भोगा' असाही अन्य पाठ आहे. १२. विशेष श्रम केल्याशिवाय. येथें कवीनें आपली कल्पनाशक्ती फारच उत्तम रीं-

रिखी. ॥ २१८ ॥ इति 'वनपर्व' भारत । मुक्तेश्वरकविविरचित । आदरें ऐका समस्त । कथा निश्चित परिसावी. ॥ २१९ ॥

---

## अध्याय आठवा.

निद्रिस्त सांडुनी दमयंती । नैषध गेला अरण्यपंथीं । पुढां देखे चंड पर्वतीं । वणवा प्रचंड लागला. ॥ १ ॥ त्यामाजी पडिलासे भोगी । तो म्हणे, 'नैषधा! धांवें वेगीं । मातें काढुनी त्रिजगीं । यश घेईं पवित्रा!'. ॥ २ ॥ राजा म्हणे, 'पातलों पाहीं । मरणभयातें न शिवें कांहीं.' । पावकचक्रांतुनी लवलाहीं । महा-भुजंग काढिला. ॥ ३ ॥ हातें उचलितां राजा नळ । अंगुष्ठमात्र जाला व्याळ । वन्हीपासुनी सुशीतळ । दुरी ठायां पातला. ॥ ४ ॥ त्यातें सांडितांची धरणीं । तव तो जाला विशाळ फणी । म्हणे, 'राजया! पवित्र पाणी ।

---

तीनें व्यक्त केली आहे. नर्मदेच्या कांठच्या साधूंना, पतिव्रता स्त्रियांना व वनपर्व ऐकणाऱ्या श्रोत्यांना 'भुक्ति मुक्ति आयती' मिळते–असा कवीचा उद्देश. नर्मदेच्या कांठच्या साधूंना यात्रेकरूंकडून बसल्याजागीं खायला मिळतें हें सुप्रसिद्धच आहे. व मरणानंतर त्यांना मुक्ति मिळते असें मानण्यास विशेष हरकत नाहीं. पतिसेवेंत निमग्न असलेल्या धर्मपत्नीस आपल्या भोजनाकरितां व मुक्तीकरितां निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं हें सर्व हिंदूंना माहित आहेच. त्याचप्रमाणें मत्कृत वनपर्व वाचल्यानें किंवा ऐकल्यानें मनुष्यांचें आयतें पोट भरतें–काव्यामृत प्राशन करून ते तृप्त होतात–त्यांना शारीरिक भूक राहत नाहीं व शेवटीं ते श्रवणफलानें स्वर्गाप्रत जातात–असा कविहृद्गतार्थ. या वाक्यांत जरा गर्वोक्ति आहे व ती मुक्तेश्वरासारख्या कवीला शोभत नाहीं असें कोण म्हणेल? मुक्तेश्वरानें २१७ व २१८ या ओवींत जो रूपकालंकार साधिला आहे तो फारच उत्तम आहे. यांत नदीचें व काव्याचें, ओव्यांचें व बाणलिंगांचें, श्रोत्यांचें व तापसीजनांचें साम्य दाखविलें आहे.

१. 'धार्मिकां देतसे' असाही पाठ आहे. २. प्रचंड. ३. सर्प. 'त्यामाजी पडला मंडळा ऐसा भोगी' असाही पाठ आहे. ४. 'पवें' असाही अन्य पाठ आहे. शिवूं नकोस; मरणभयाला दूर सार, आतां तूं खास मरणार नाहींस–असा भाव. ५. अग्नि. ६. तात्काळ. ७. आंगठ्यायेवढा. (अ० ६६ श्लो० ९.). ८. 'तेथें' असाही पाठ आहे. ९. 'सांडुनी' अन्य पाठ. 'सांडणें' याचा मुक्तेश्वरानें अनेक अर्थीं उपयोग केला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्या क्रियेचा सामान्यत: 'आपल्याजवळची वस्तू आपणास नकळत पडून जाणें' या अर्थीं प्रयोग करितात. सांप्रतस्थळीं या क्रियेचा अर्थ 'खालीं ठेवणें' असा घेतला पाहिजे; व 'निद्रिस्त सांडुनि दमयंती । नैषध गेला अरण्यपंथीं' या ठिकाणीं सांडुनि=सोडून, त्याग करून.

वर प्रसाद घे माजा. ॥ ५ ॥ कर्कोटक[1] नागराज[2] । शेष वासुकीचा अनुज[3] । नारदशापास्तव निस्तेज । वन्हीचक्रीं पडियेलों. ॥ ६ ॥ [4]'तुंतें ग्रासितां वन[5]पावक । सोडवील पुण्यश्लोक[6] । ते वेळे शापाचा कलंक । परिहरेल निर्धारें.' ॥ ७ ॥ ते आजी पातली प्रतीती[7] । तुझेनि पावलों सुखविश्रांती । आतां सांगेन तें चित्तीं । धरूनी तैसें वर्तावें.' ॥ ८ ॥ उभा[8] करूनियां रांया[9] । 'पदीं[10] गणविली[11] अंगच्छाया । दहावे[12] पाउलीं तीं पाया । दंश केला फणींद्रें. ॥ ९ ॥ दशनीं[13] चावितांची चरण । गौरतेचा[14] सुवर्णवर्ण[15] । लोपुनी श्यामता[16] संपूर्ण । शिरपादांत पातली. ॥ १० ॥ आजानुबाहू[17] लोपुनी शब्द[18] । ऱ्हस्वबाहू[19] ऱ्हस्वपाद[20] । विरूपता पातली मंद । असौंदर्य जालें स्वदेहीं[21]. ॥ ११ ॥ नागेंद्र म्हणे, 'कारण[22] येथें[23] । अज्ञातवास[24] घडेल तुतें । ओळख न व्हावी कवणातें । नांवें रूपें

१. कश्यप ऋषीची पत्नी व संपूर्ण सर्पांची माता जी कद्रू तिच्या शतपुत्रांपैकीं तिसरा किंवा चौथा पुत्र होय. २. सर्पश्रेष्ठ. ३. धाकटा भाऊ. ४. हा नारदाचा कर्कोटकाला उःशाप होय. बोलणारा कोण आहे हें न सांगतां भाषण दिल्यामुळें कधीं कधीं घोंटाळा होतो त्याचें हें एक उदाहरण आहे. ५. दावाग्नि. ६. नळ. 'तेव्हां सोडवील नृपनायक' असाही पाठ आहे. ७. खातरी, अनुभव. ८. नळ बसला होता असें मागें कोठें सांगितलें नसल्यामुळें 'उभा करुनियां' याचा अर्थ 'बसलेल्या नळास उठवून' असा घेऊं नये. सर्पाला खालीं टाकून नळ जाऊं लागला; त्याला 'जाऊं नकोस' असें सांगून सर्पानें थांबविलें असें समजावें. ९. 'महाराया' अन्यपाठ. १०. 'पादीं' असाही अन्यपाठ आहे. ११. मोजविली. अध्याय ६६ श्लोक ११ पहा. १२. नल 'एक' 'दोन' 'तीन' असें मोजीत दहापर्यंत आला व 'दश' (दहा किंवा दंश कर—डस) असें म्हणाला. त्यासरशीं कर्कोटक नळाला चावला. १३. दांतांनीं. १४. गोरेपणाचा. १५. सोन्यासारखा रंग. १६. 'काळेपणा,' 'नीलता' असाही पाठ आहे. १७. जानूपर्यंत (गुडघ्यापर्यंत) आहेत बाहू (हात) ज्याचे असा. फार लांब हात असणें शुभलक्षण समजतात. कृष्ण व अर्जुन आजानुबाहू होते. १८. आजानुबाहू [असा] शब्द लोपुनी ऱ्हस्वबाहू, ऱ्हस्वपाद [व] मंद विरूपता पातली—असा अन्वय करावा. १९. लहान हातांचा. २०. लहान पाद. खुजा झाला—हा सांगण्याचा उद्देश. २१. आपल्या देहीं, नळाच्या शरीरांत. 'स्वदेहीं' या पदानें, नळ आपल्या नूतन शरीराकडे पाहूं लागला व तें त्याला अगदीं कुरूप दिसलें, असें दर्शविलें आहे. असें करण्यापेक्षां दुसऱ्या एका ओवीनें नळाचे स्वरूपांतराविषयींचे विचार प्रगट केले असते तर काव्याला अधिक माधुर्य येण्याचा संभव होता. 'सौंदर्य गेलें स्वदेहीं' असाही पाठ आहे. २२. असें करण्याचें कारण, तुला (नळाला) विकृतरूप करण्याचें कारण. २३. या स्थितींत, यानंतर, या शब्दाचा, या अर्थी, इतरत्र प्रयोग आढळत नाहीं. २४. कोणाला न कळत राहणें, गुप्तपणें वेळ काढणें, वेष पालटून राहणें.

[1]जनदृष्टीं. ॥ १२ ॥ माझें विष हें भेदलें[2] आंगीं । हें तुज वज्रकवच[3] हो[4] जगीं,। कलीची बाधा न हो आगीं[5] । शीत[6] जैसें बाधिना. ॥ १३ ॥ माझें विष महाश्रेष्ठ[7] । कष्ट[8] भोगितां नेव्हे[9] कष्ट । शीतोष्णादि भय संकट । झगटतां ही न पांवे[10]. ॥१४॥ **बाहुक** ऐसें धरुनी नाम । सेवित[11] ऋतुपर्णाचें धाम[12]। चतुर्थ वरुषीं[13] **पुरुषोत्तम** । कृपा करील निर्धारें. ॥ १५ ॥ स्वस्वरूपाची[14] वासना[15]। उठतां मातें स्मरावें प्राज्ञा! । स्मरणमात्रें मनकामना । पूर्ण करीन निर्धारें'. ॥ १६ ॥ ऐशी वदोनी वरदवाणी । अदृश्य जाला विशाळ फणी[16]। नैषध '**बाहुक**' या

---

१. हा शब्द फाजील आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण याच्याशिवाय वाक्याच्या अर्थांत मुळींच भेद होत नाहीं, किंवा याच्या योगानें वाक्याला विशेष शोभा कांहींच येत नाहीं. शिवाय वाक्याच्या अन्वयांत गडबड केल्याशिवाय याला वाक्यांत जागा देतां येत नाहीं. म्हणून 'कधींही' असा जो अन्य पाठ आहे तो विशेष प्रशस्त होय. पहाः—'डसलों यास्तव कीं या कुदशेंत तुला जनें न वळखावें' [**मो**रोपंत.] २. भरलें, पसरलें, व्यापून राहिलें. भेदणें=शौर्यानें पार निघून जाणें किंवा कपटानें स्वजनांच्या गुप्तगोष्टी दुसऱ्यांना कळविणें. या अर्थावरून 'पसरणें' हा अर्थ कसा निघाला याचा भाषाशास्त्रज्ञांनीं विचार करावा. ३. वज्रानें बनविलेलें कवच. वज्राचें प्रचलित नांव गुर्दा असें आहे; व कवचाचें जिराह असें आहे. ['गुर्दा नाम भवेद्वज्रं' 'जिराहः कवचं विदुः' इति राजव्यवहारकोशः.] वज्रकवच=अत्यंत कठिण कवच, महान् महान् शस्त्रांनाही अभेद्य असें कवच. ४. 'हो आंगीं' असाही पाठ आहे. ५. अग्नींत, अग्नीच्या अस्तित्वांत, अग्नी असतांना—असा भाव. ६. थंडी. ७. उत्तम, सर्व विषांत माझें विष अत्यंत तीक्ष्ण आहे—हा सांगण्याचा उद्देश. ८. 'कष्ट भोगितां नव्हे कष्ट' हें विरोध नामक अलंकाराचें उदाहरण आहे. याच अलंकाराला इंग्रजींत Oxymoron असें म्हणतात. ['विरोधः सो विरोधोऽपि विरुद्धत्वेन यद्वचः' इति काव्यप्रकाशकारः.] या अलंकाराचें लक्षण असें:—Oxymoron is the saying of that which at a first look appears foolish—that which is wise while it *seems* foolish; *e. g.* "That was *cruel kindness.*" "Home is home." *Elements of Rhetoric by Neil.* 'कष्ट भोगितां नव्हे कष्ट'=कष्ट जरी भोगशील तरी त्यांपासून तुला त्रास होणार नाहीं. कारण तुझ्या आंगांत विष आहे. सुरा पिऊन मस्त असलेल्या मनुष्यास सुरा उतरून जाईपर्यंत कोणत्याही कष्टापासून पीडा होत नाहीं किंवा पीडा झाल्यासारखा त्याला भास होत नाहीं. तद्वतच नलाला विष उतरून जाईपर्यंत पीडा होणार नाहीं असें समजावें. ९. 'नेणसी कष्ट' असाही पाठ आहे. १०. 'नेणवे' असाही पाठ आहे. ११. 'सेवीं' असा अन्य पाठ. १२. घर. १३. 'दिवशीं' असा अन्य पाठ. १४. आपलें पूर्वीचें किंवा नेहमीचें स्वरूप. वेदांतशास्त्रांत या शब्दाचा 'आपण परब्रह्म आहों व आपलें व परब्रह्माचें रूप एक आहे असें समजणें व तें रूप अवलोकन करणें' या अर्थीं योजतात. १५. इच्छा. १६. सर्प.

अभिधानीं[1] । अयोध्यापुरा पातला. ॥ १७ ॥ नमस्कारिलें राजोत्तमा । 'अश्वपारखी[2] सूतकर्मा[3] । पाकविद्या दुर्गधामा[4] । निर्मू जाणे शिल्पक. ॥ १८ ॥ आणिक विद्येचीं कौतुकें । तीं ही दावीन मी प्रत्येकें[5] । भृत्यत्व[6] देउनी जवळिकें । पालन केलें पाहिजे.' ॥ १९ ॥ ऋतुपर्ण[7] अयोध्यापति । म्हणे, 'मज मानलें बहुतां[8] रिती । सारथी होउनी सेवावृत्ति । आप्तवादें[9] असावें. ॥ २० ॥ वार्ष्णेय नामा नळसारथी । तोही असे मजसंगती । विशेष[10] विद्या देखोनी प्रीती । तुझ्या ठायीं जडलीसे. ॥ २१ ॥ अश्वशाळेचें स्वामित्व, । अन्नपाकाचें कर्तृत्व । निकटवर्तीया श्रेष्ठत्व । तुज विश्वासें दिधलें. ॥ २२ ॥ सहस्र निष्क मासमासा[11] । वेतन देईन परम पुरुषा ! । तुतें देखतां मानसा । परमानंद वाटतसे.' ॥ २३ ॥ बाहुक म्हणे, 'नरवरेशा[12] । नाहीं द्रव्याची दुराशा[13] । देहनिर्वाहग्रासवासा[14] । कृपेनें कांहीं अर्पावें.' ॥ २४ ॥ आश्चर्य[15] मानुनी अंतरीं[16] । बाहुक[17] राहिला अयोध्यापुरीं; । रात्रीं निद्रेच्या अव-

---

१. नांवानें. २. घोड्यांची परीक्षा करण्यांत निपुण. ३. सारथ्य. ४. दुर्ग (किल्ले) व धाम (घरें) निर्मू (बांधणें किंवा बांधण्याची विद्या) जाणे (जाणतो). या विद्येबद्दल मूळांत उल्लेख नाहीं. ५. 'समयीं' असाही पाठ आहे. ६. सेवा. ७. 'ऋतुपर्णराया' असाही पाठ आहे. ८. पुष्कळ रीतीनें, अनेक कारणामुळें. ९. आप्तप्रमाणें, मित्राप्रमाणें. १०. त्या वार्ष्णेयाला ज्या विद्या येतात त्यापेक्षां जास्त विद्या तुला येतात असें पाहून. ११. दरमहिन्यास. १२. नरांमध्यें जे वर (श्रेष्ठ) ते नरवर (मनुष्यश्रेष्ठ=राजे) नरवरांचा ईश (स्वामी) तो नरवरेश (नृपश्रेष्ठ); नरवरेश=सार्वभौम. 'ना विष्णुः पृथिवीपतिः' अशी समजूत असल्यामुळें सर्व मनुष्यांत राजालाच श्रेष्ठ मानीत असत. म्हणूनच कृष्णानें, नरांमध्यें श्रेष्ठ जो राजा तोच मी आहें ['नराणां च नराधिपं'] असें गीतेंत सांगितलें आहे. म्हणून नरवर=नराधिप=राजा. १३. फारसें वेतन मागत नाहीं—असा भाव. १४. देह+निर्वाह+ग्रास+वासा=शरीर+पोषण+अन्न+वस्त्र याकरितां. शरीराचें रक्षण करण्याकरितां लागणाऱ्या अन्नवस्त्राकरितां—असा उद्देश. माझ्या शरीरपोषणाला अन्न व वस्त्र या दोन अत्यावश्यक पदार्थांशिवाय कांहीं एक नको—असा भाव. १५. 'आश्रय' असाही पाठ आहे. १६. 'आश्रय रायाचा धरीं' असाही पाठ आहे. 'आश्चर्य मानुनी अंतरीं' या पाठापेक्षां हा दुसरा पाठ विशेष प्रशस्त आहे. कारण नळाला आश्चर्य वाटण्याला कारण नव्हतें. आपल्या स्थित्यंतराविषयीं त्याला दुःख वाटलें असेल; परंतु आश्चर्य वाटलें असेल असें मानितां येत नाहीं. १७. ऋतुपर्णराजाच्या घरीं आल्यापासून नळाचा, 'नळ' या नांवानें उल्लेख न करितां नळानें आपणांस ठेवून घेतलेल्या 'बाहुक' याच नांवानें कवी त्याचा उल्लेख करीत आहे हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वर्णित असलेल्या कथानकांशीं तादात्म्य झाल्यामुळें ज्या वेळीं ज्या नांवानें ज्या रूपानें व ज्या स्थितींत नायक असेल, त्यावेळीं त्याच नांवानें, त्याच रूपानें व त्याच स्थितींत

सरीं । हाक मारी आक्रोशें. ॥ २९ ॥ 'अर्ध वस्त्र छेदूनि[1] करी । कांता सांडिली[2] वनांतरीं[3] । निरुदक[4], निराहारी[5] । पतिव्रता एकटी. ॥ २६ ॥ धिक् धिक् जळो

---

कविजन नायकाचें वर्णन करित असतात. म्हणूनच **मु**क्तेश्वरानें **न**ळाच्या अज्ञातवासांत 'बाहुक' याच पदाचा उपयोग केला आहे. यावरून काव्याची रुचि वाढविणाऱ्या लहानसहान गोष्टींकडे देखील कधीं कधीं आपल्या कवीचें लक्ष जात असे असें दिसतें. सांप्रतस्थळीं आपल्या कवीनें **मो**रोपंतांपेक्षांही अधिक विपर्यासदोषभीति दाखवून आपली रसिकता प्रगट केली आहे, कारण **पं**तानें याच प्रसंगीं पुष्कळ वेळां '**बा**हुक' शब्दाचाच उपयोग केला आहे तरी '**न**ळ' शब्द तीन चार ठिकाणीं आलेला आहे. हा अत्यंत क्षुल्लक दोष आहे म्हणून यावद्दल **पं**तांना मुळींच दोष देतां येणार नाहीं. परंतु येवढ्या लहानशा दोषाकडेही लक्ष पुरविल्याबद्दल **मु**क्तेश्वराची तारीफ कोण करणार नाहीं? १८. रोज रात्रीं. ['रात्रीं' या शब्दानें 'एके दिवशीं रात्रीं' अशी समजूत होण्याचा संभव आहे. परंतु तसें समजूं नये. कारण:—'तेथें असतां नित्यहि निद्रासमयींच्च उत्तमश्लोक । आठवुनि स्वमनांत स्त्रीस म्हणे एक उत्तम श्लोक ॥' [मोरोपंत] असें महाभारतांत सांगितलें आहे.] १९. 'निदेच्या अवसरीं' याचे दोन अर्थ होऊं शकतात. 'निजायाला जाण्याचे वेळीं' किंवा 'झोंपेंत असतांना;' यांपैकीं दुसराच अर्थ विशेष प्रशस्त दिसतो. कारण निजायाला जाण्याच्या वेळीं आपण अज्ञातवासांत आहों हें विसरून 'आक्रोशें' 'हाक मारी' असें होऊं शकणार नाहीं. कारण असें केल्यानें स्वीकृतरूपाविष्करण होईल अशी त्याला भीति वाटली असती. म्हणून झोंपेंत असतांना स्वप्नें पडत असल्यामुळें झोंपेंतच 'हाक मारी'त असे, असेंच मानणें प्रशस्त होईल. 'मनीं वसें तें स्वप्नीं दिसे' या न्यायाला अनुसरून, सतत **द**मयंतीविषयींचे विचार **न**ळाच्या मनांत घोळत असल्यामुळें, रोज त्याला तिजविषयीं स्वप्न पडत असे व त्यामुळें तो **द**मयंतीविषयीं कांहीं मोठ्यानें म्हणत असे असें समजावें. निजण्याच्या वेळीं तो एकांतांत असल्यामुळें त्याला **द**मयंतीची आठवण होई व तिजविषयीं आपल्याशींच दुःख करी, असा 'रात्रीं निद्रेच्या अवसरीं' या पदांचा अर्थ केल्यास 'हाक मारी आक्रोशें' हें वाक्य निष्फल होईल. २०. प्रसंगीं.

१. उष्णता व थंडी यांपासून स्वदेहाचें रक्षण करण्यास **द**मयंतीजवळ वस्त्र देखील नाहीं; व वस्त्र नाहींसें करण्यास मी कारणीभूत झालों म्हणून मी फारच. अदय—असा **न**ळाच्या म्हणण्याचा भाव. २. या शब्दानें **न**ळ आपल्या निष्काळजीपणाला निंदित आहे. ३. 'कांतारीं' असाही पाठ आहे. ४. पाणी देखील न पितां. या शब्दानें दमयंतीची अधिक शोचनीय स्थिति दर्शवीत आहे. ५. कांहींएक न खातां. साहित्यशास्त्रज्ञांच्या मतें येथें 'Climax' (सार) नामक अलंकार झाला आहे. अगोदर 'अर्ध वस्त्र' छेदणें, नंतर 'वनांतरीं' सांडणें, तदनंतर 'निरुदक' व 'निराहारी' असणें व शेवटीं 'पतिव्रता' असून अरण्यांत एकटी असणें या उत्तरोत्तर अधिकाधिक दया उत्पन्न करणाऱ्या शब्दांनीं दमयंतीच्या दैन्याचें व आपल्या निर्दयतेचें वर्णन केल्यामुळें हा Climax (सार) नामक अलंकार झाला आहे. या ओंवींत शब्दांच्या क्रमामध्यें किंचित फेरफार केल्यास हा अलंकार विशेष खुलेल. **प्रौ**ण्यनिघंटूंत या अलंकाराच्या

त्या नराचें जिणें । प्रेतप्राय[1] जातसे[2] प्राणें । गति काय झाली[3] जाणे । ईश्वर[4] एक तियेची. ॥ २७ ॥ निमाली किंवा वांचली प्राणें । हें तत्वता[5] जाणिजे कोणें? । तो आठव[6] आठवूनि मनें । शोक करी अपार. ॥ २८ ॥ राजा[7] म्हणे, 'रे बाहुका! । कायसा शब्द[8] जल्पिसी मुखा?' । येरू म्हणे, 'अभाग्य मूर्खा[9] । पुरुषा एका देखिलें. ॥ २९ ॥ त्याची आठवली कथा । तेची मुखीं पातली आतां । तें दुःख[10] आठवुनी चित्ता । खेद वाटे अद्भुत.' ॥ ३० ॥ येरीकडे कुंडिनपुरीं । भीमक भार्येशीं चिंता करी । सांडुनी[11] जामात पवित्र कुमरी[12] । काय झाली कळेना. ॥ ३१ ॥ राज्यहानीचा हृदयीं शोक । शरीरीं क्लेशाचें परम दुःख, । निराहारी, निरुदक, । पादचारी, सुकुमार[13]. ॥ ३२ ॥ दोघीं जणीं

---

उदाहरणादाखल बिल्हणाचा पुढील श्लोक दिलेला आहे:—'किमिंदुः किं पद्मं किमु मुकुरबिंबं किमु मुखं किमब्जे किं मीनौ किमु मदनबाणौ किमु दृशौ । खगौ वा गुच्छौ वा कनककलशौ वा किमु कुचौ तडिद्वा तारा वा कनकलतिका वा किमबला ॥.'

१. प्रेताप्रमाणें. कारण प्रेत झालेला म्हणजे मेलेला मनुष्य देखील, अरण्यांत आपली स्त्री सांडणाऱ्या मनुष्याप्रमाणें, आपल्या (प्रेत झालेल्या मनुष्याच्या) मरणानें 'निरुदक, निराहारी' अशी जी स्वतःची 'पतिव्रता' 'कांता' तिला संसाररूपी घोर 'वनांतरीं' सांडतो व तिचें 'अर्धवस्त्र' छेदून टाकितो म्हणजे तिला जगांत उघडी (अनाथ) टाकून जातो. अशा रीतीनें २६ वी ओंवी, प्रेत व वनांतरीं स्त्रियेला सोडणारा मनुष्य, या दोघांनाही लागू पडते. अशा रीतीनें सुरेख 'श्लेष' साधल्याबद्दल कवीची कोण तारीफ करणार नाहीं? २. 'जितसे' असाही पाठ आहे. ३. मृत झाली. ४. नक्की, विश्वसनीय. ५. कोणीही समर्थ नाहीं—असा भाव. ६. हा शब्द पुल्लिंगी आहे व याच अर्थाचा 'आठवण' हा शब्द एका 'ण'कारामुळें स्त्रीलिंगी झाला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ७. अश्वशाळेंत रात्रींच्या वेळीं निद्रासमयीं बाहुकानें उच्चारिलेले शब्द, आपल्या विलासमंदिरांत निद्रित असलेल्या ऋतुपर्णाच्या कानीं कसे पडले हा मोठाच प्रश्न आहे. ८. 'कुशब्द' असाही पाठ आहे. ९. नळाला आपल्या वर्तनाबद्दल फार वाईट वाटलें होतें असें या विशेषणांवरून वाटतें. १०. त्या अभाग्य पुरुषाचें व त्याच्या स्त्रीचें. ११. 'सुगुण' असाही अन्य पाठ आहे. सोडून. अरण्यामध्यें दमयंतीला सोडून नळ निघून गेला ही बातमी भीमकाला कळल्याचा उल्लेख कोठेंच नसल्यामुळें व ती कळण्याचा संभवही नसल्यामुळें 'सुगुण जामात' असा जो दुसरा पाठ आहे तोच विशेष प्रशस्त होय. १२. मुलगी—दमयंती. 'कुमारी' या संस्कृत शब्दाचा 'कुमरी' हा मराठी अपभ्रंश होय. १३. ही ओंवी Climax (सार) नामक अलंकाराचें उत्तम उदाहरण होय. राज्यहानीमुळें अगोदरच ते मनांत दुःखित होते, त्यानंतर शरीरक्लेशामुळें अधिक दुःखित झाले; पुढें त्यांना खाण्यास मिळालें नाहीं म्हणून ते शरीरानें क्षीण व मनानें अत्यंत दुःखित झाले; इतक्या महत्संकटांतूनही ते वांचले असते परंतु पुढें जेव्हां त्या, 'सुकुमार' म्हणजे कधींही

सांडिला प्राण । ईयेविषयीं नाहीं अनुमान; । कीं गांठीं होतें अपार पुण्य । यास्तव दैवें वांचलीं. ॥ ३३ ॥ हाचि कळला पाहिजे अर्थ, । ब्राह्मण प्रेरिले असंख्यात । वोपूनियां अपार वित्त । छपन्न देशीं धाडिले. ॥ ३४ ॥ 'शोधील जो नळदमयंतीतें । सहस्र धेनु अर्पीन त्यातें । सहस्र ग्राम देईन निश्चितें । शत सहस्र धन संख्या'. ॥ ३५ ॥ पृथ्वी शोधितां ब्राह्मणीं । कोठें वार्ता न पडे श्रवणीं । शून्यवादी यांचे वचनीं । नास्तिकता ज्या परी. ॥ ३६ ॥ त्यांत सुदेव पुरोहित । पुरें पट्टणें अवलोकित । नळ दमयंती पुसत । चैद्यपुरा पातला. ॥ ३७ ॥ तेथें राजयाचे सदनीं । मांगल्यगृहांगणीं । सुनंदा वैदर्भी दोन्ही । लावण्यलतिका देखिल्या. ॥ ३८ ॥ न्यहाळुनी पाहतां नयनीं । भैमी वोळखिली लक्षणीं । प्रपंचनिष्ठांमाजी ज्ञानी । आत्मनिष्ठ वोळखे. ॥ ३९ ॥

---

कष्ट न भोगेलल्या जोडप्याला 'निरुदक' व 'पादचारी' व्हावें लागलें म्हणजे सतत चालत राहूनही पिण्यास पाणी देखील मिळेना तेव्हां त्या 'दोघींजणीं सांडिला प्राण' हा भीमकाच्या म्हणण्याचा उद्देश व अशा रीतीनें येथें उत्तम अलंकार साधिला आहे.

१. 'सांडिला प्राण' या गोष्टीविषयीं. २. शंका. ३. 'कल्पिजे' असाही पाठ आहे. ४. पाठविले. ५. सुवर्ण व रौप्यरूपाचें. ६. नास्तिक वाद करणारे. ईश्वर व आत्मा यांचें अस्तित्व नाकबूल करणारे. यांच्या तोंडीं नेहमीं 'ईश्वर नाहीं,' 'आत्मा नाहीं,' 'परलोक नाहीं' इत्यादि नकार असतात. त्याचप्रमाणें जेथें जेथें नळ व दमयंती यांना शोधण्यास ब्राह्मण गेले तेथें तेथें त्यांना 'नाहीं' 'नाहीं' असाच जबाब मिळाला—हा कवीच्या सांगण्याचा भाव. 'शून्यवाद्या'च्या 'नास्तिकते'चें खालील श्लोक उदाहरण होय:—'न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः । नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायिकाः ॥' मनूनें 'नास्तिको वेदनिंदकः' अशी नास्तिकाची व्याख्या दिली आहे. हिंदुस्थानांत एकंदर सहा प्रकारचे नास्तिक (शून्यवादी) होऊन गेले. त्यांचीं नांवें:—चार्वाक, अर्हत् व चार प्रकारचे बौद्ध (योगाचार, सौत्रांतिक, वैभाषिक, माध्यमिक.) अद्वैतवादी व वेदांती यांना नास्तिक लोक 'शून्यवादी' म्हणतात, कारण त्यांचा सिद्धांत शून्यांनीं किंवा नकारांनीं भरलेला आहे:—'माता नास्ति, पिता नास्ति, नास्ति बंधुः सहोदरः । अर्थो नास्ति, गृहं नास्ति तस्मात् जागृहि जागृहि ॥' अद्वैताविषयीं व नास्तिकतेविषयीं मुक्तेश्वराच्या ग्रंथांत वारंवार उल्लेख आढळतात म्हणून हा कवि नेहमीं धर्मविचार करीत असे व त्यांत त्यानें प्रवीणता संपादिली होती असें दिसतें. ७. 'वदनीं' असा अन्य पाठ आहे. ८. 'नास्ति, नास्ति' असें म्हणण्याची जी क्रिया तिचा भाव. ९. मंगलकार्यांनीं युक्त अशा वरांत. 'पुण्याहवाचनीं तो चेदिपतिगृहांत जाय सन्महित' [मोरोपंत]. १०. 'सुमांगल्यकृत्य पुण्याहवाचन' असा अन्य पाठ आहे. ११. वल्ली. १२. लक्ष लावून. १३. शुभलक्षणाच्या योगानें. १४. 'प्रपंचामाजील प्राणी' असाही पाठ आहे. १५. [ज्याप्रमाणें] आत्मनिष्ठ प्रपंचनिष्ठांमाजी ज्ञानी [मनुष्याला] वोळखे [त्याप्रमाणें] [त्या सुदेवानें] नयनीं न्यहाळुनि पाहतां लक्षणीं भैमी वोळखिली—असा अन्वय.

म्हणे, '[1]कष्टाची जाली सिद्धी[2] । [3]उदीम करितां लाधला निधी[4].' । **जा**नकीदर्शनें [5]वेलाब्धी । [6]**ह**नुमंत जैसा संतोषे.॥ ४० ॥ मग [7]संकेतें प्रगटी मात, । 'मी जाण **सु**देव पुरोहित । पुरें पट्टणें अवलोकीत । [9]तुजची लागीं पातलों. ॥ ४१ ॥ क्षेमें[10] तुझा जनक जननी, । क्षेम बंधु[11] बाळकें दोन्हीं[12] । [13]तुझे चिंतेचा वडवाग्नी । अहोरात्रीं [14]जाळीतसे'. ॥ ४२ ॥ ऐकोनी **सु**देवाचें वचन । **द**मयंतीतें पातलें रुदन । अश्रुधारा [15]श्रवती नयन । तें देखिलें [16]**सु**नंदा. ॥ ४३ ॥ तिणें जाणविलें राजमातेतें । ते[17] पाचारी **सु**देवातें । 'सर्व वृत्तांत सांग मातें । हे कोठील? कोण? कोणाची?' ॥ ४४ ॥ तो म्हणे, 'हे **वै**दर्भतनया । **नै**षध नृपाची प्रिय जाया । [19]**द**मयंती नामें विश्व इयां[20] । मान्य होय सद्गुणीं. ॥ ४५ ॥ द्यूतीं हारवुनी राज्य । वना गेले **नै**षधराज । वनीं सांडिली हे भाज[21] । ऐसें कर्णीं[22] परिसिलें. ॥ ४६ ॥ [23]यांचें करावया शोधन । **भी**मकें प्रेरिले बहु ब्राह्मण[24] । त्यां शोधिलीं

---

**आत्मनिष्ठ** म्हणजे 'वळख तूं तुज टाकुनि मीपणा' या **वा**मनी उपदेशाप्रमाणें अहंभाव सोडून 'मी कोण?' 'कोठून आलों?' 'कशाकरितां आलों?' 'कोठें जाईन' इत्यादि प्रश्नांविषयीं पूर्ण विचार करून आपणाला पूर्णपणें ओळखून असणारा योगी. याला 'ब्रह्मनिष्ठ' व 'तत्वनिष्ठ' असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१. केलेल्या श्रमांची, देशोदेशीं हिंडून कष्ट सोसल्याबद्दल. २. फल, साफल्य. ३. उद्योग. ४. ठेवा. ५. वलसागर. ६. **मो**रोपंतानेंही असेंच म्हटलें आहे:—'त्यांत **सु**देव ब्राह्मण होय यशस्वी, **कपींद्रसा** सुकृती.' [वनपर्व—अ० ४ गीति १८४; काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० ५९.] ७. खूण दाखवून, आपण **सु**देव असल्याबद्दल तिची खातरी करून. ८. समाचार, तिच्या मातापितरांचा व आपण आल्याबद्दलचा समाचार. ९. तुझ्याचकरितां. अन्य कारणावरून नव्हे. १०. कुशल. ११. **द**म, **दां**त, **द**मन. १२. **द**मयंतीचा मुलगा व मुलगी. १३. तुझ्या विरहामुळें उत्पन्न झालेल्या चिंतेचा. १४. या क्रियेचें कर्म 'जनक, जननी, बंधु व बालक यांना' हें आहे असें समजावें. १५. वाहती. १६. राजमाता. १७. 'पुसती झाली एकचित्तें' असा अन्य पाठ आहे. १८. कोणाची स्त्री हा विचारण्याचा उद्देश. १९. 'दमयंती नावो विश्वमाया' असा अन्य पाठ आहे. '**द**मयंती' या नांवानें ही त्रिजगद्वंद्य आहे—हा म्हणण्याचा भाव. हिच्या स्वयंवराच्या वेळीं देव देखील हिची इच्छा मनांत धरून आले होते तेव्हां ही विश्ववंद्या आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. २०. हिला. 'ही' या सर्वनामाचें हें द्वितीया एकवचनाचें रूप होय. हें चमत्कारिक रूप फारच थोड्या ठिकाणीं योजलेलें दिसतें. 'विश्व इया मान्य होय'—सर्व सृष्टी हिला मान देते म्हणजे सर्व सृष्टींतले प्राणी हिला पूज्य मानितात—असा मथितार्थ. २१. स्त्री. २२. **द**मयंतीला अरण्यांत टाकून जेव्हां **न**ळ निघून गेला तेव्हां या दोघांशिवाय तेथें तिसरा कोणी नव्हता; म्हणून ही बातमी **ऋ**तुपर्णाला किंवा **सु**देवाला कळण्याचा संभव नव्हता. असें असून 'वनीं सांडिली हे भाज। ऐसें कर्णीं परिसलें॥' असें **सु**देव कसें म्हणतो? २३. **न**ळानें सोडून दिलेली **द**मयंती कोठें आहे याचा शोध लावण्याकरितां. २४. 'उत्तम ब्राह्मण' असा अन्य पाठ आहे.

वनें उपवनें । दैवें येथें देखिली. ॥ ४७ ॥ उपजत भाळीं[1] अनर्घ्य[2] मणी । तो आच्छादिला मृत्तिकाकणीं[3] । तो म्यां लक्षिला[4] लक्षुनी[5] । जेंवी पारखी रत्नातें. ॥ ४८ ॥ सुनंदा राजमाता हातें । भाळीं पाहतां त्या चिन्हातें । दृष्टी देखोनीया निरुतें । आश्चर्यातें पावली. ॥ ४९ ॥ वातें[6] सारोनी अंबरा[7] । जेंवी लक्षिजे भार्गवतारा[8] । तेंवी वारुनी कबरीभारा[9] । रत्नमणी देखिला. ॥ ५० ॥ हृदयीं कवळोनी दमयंती । दीर्घ स्वरें रुदना करिती । राजमाता आणि गुंणवंती[10] । सुनंदा हीं आक्रंदे. ॥ ५१ ॥ स्नेहें बोले राजमाता । 'माझे भगिनीची[11] हे दुहिता । खुणा वोळखिली आतां । हा काळवरी नेंणें[12]. ॥ ५२ ॥ लग्नामाजी म्यां देखिली । ते आजी लक्षणीं[13] वोळखिली । सुनंदेहुनी वेंहिली[14] । कन्या माझी निर्धारें.' ॥ ५३ ॥ भैमी म्हणे, 'मातृभगिनी । शोकें शोकलीं पिता जननी । मातें देखिलीयां[15] नयनीं । अमृतपान तयातें. ॥ ५४ ॥ कन्या कुमर दोन्ही बाळां । पहावयाची आवडी डोळां । धेनु[16] वत्सा होय मेळां[17] । ऐसें

१. कपाळावर. २. अमूल्य. ३. मातीच्या थरानें. पतीच्या विरहानें दमयंती केंस विंचरीत नसे त्यामुळें तिच्या कपाळावर मळ सांचला होता व म्हणूनच मणी दिसत नव्हता. ४. पाहिला. ५. बारीक दृष्टीनें, पूर्ण लक्ष लावून. ६. हवेनें. ७. ढग. ८. शुक्र. आपला कवि ज्योतिषी नसल्यामुळें 'तारा' व 'ग्रह' यांच्यांतला भेद त्याला माहीत नव्हता असें दिसतें. सूर्यमालेंत राहून सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या आकाशस्थ गोलांना 'ग्रह' अशी संज्ञा आहे. व तदितर आकाशस्थ गोलांना 'तारा' किंवा 'तारका' म्हणतात 'शुक्र' ग्रह आहे, तारा नव्हे. तेजाविषयीं शुक्राची ख्याति असल्यामुळें कवीनें मणीला त्याची उपमा दिली आहे. 'रात्रीं प्रकाशणाऱ्या सगळ्या आकाशस्थ ज्योतींमध्यें शुक्रासारखें तेजस्वी आणि शुक्रासारखें सुंदर दुसरें कोणी नाहीं. पाश्चात्य लोकांत शुक्राला 'सौंदर्याची देवता' अथवा 'प्रीतीची देवता' अशा अर्थाचें 'वीनस' असें नांव आहे. तें यथार्थ आहे.......................सूर्याच्या प्रकाशास न जुमानतां दिवसासही दिसणारा सर्व ग्रहांत एक 'शुक्रच.' [ज्योतिर्विलास—पृ० १६०—प्रथम आवृत्ति.] शुक्र हा भृगु ऋषीला पुलोमा नामक स्त्रीच्या ठायीं झालेला मुलगा होय अशी पौराणकी कथा आहे. म्हणूनच याला 'भार्गव' असें म्हणतात. ९. केशपाश. १०. 'गुणवती' असा शब्द पाहिजे होता. ११. वहिणीची. दमयंतीची आई राजमातेची बहीण होय. १२. 'नेणेंचि पैं' असाही पाठ आहे. १३. खूण पाहून, मण्याच्या योगानें. १४. 'हे वहिली' असा अन्य पाठ आहे. १५. पाहिल्यास. 'देखलीया,' 'देखिलीया' अशींही रूपें आहेत. १६. गाय आणि वासरूं. धेनू वत्स यांच्यांत फार प्रीति असते हें प्रसिद्ध आहे. वत्सांना सोडून सकाळीं गाई चरण्यास किती नाखुषीनें जातात व वत्सांना भेटण्याकरितां सायंकाळीं त्या कशा धांवत येतात याकडे लक्ष दिलें म्हणजे, दमयंतीनें आपणास धेनूचें व मुलांस वत्सांचें जें सादृश्य

करीं दयाळे![1] ॥ ९५ ॥ तुवां[2] रक्षिला माझा[3] प्राण[4]। कृपेनें केलें संरक्षण। आतां पितयाचें दर्शन। होय ऐसें करावें.' ॥ ९६ ॥ राजमाता संतुष्ट मनीं। पुत्रा[5] आज्ञापी सुवचनीं, 'दमयंतीतें शिबिकायानीं[6]। छत्रछाये[7] बोळवीं'[8].॥९७॥ वस्त्राभरणीं फळीं जळीं[9]। दासदासीसुहृद्मेळीं। स्नेह भावें गुण वेल्हाळी।

दिलें आहे त्याची खुबी लक्षांत येईल. अगोदर मुलाला व मुलीला सोडतांना चरायला जाणाऱ्या गाईप्रमाणेंच तिची स्थिति झाली होती; परंतु नाइलाजास्तव तिला जाणें भाग पडलें; आतांपर्यंत ती जंगलांत फिरत (चरत) होती; आतां ती ग्रामाजवळ किंवा घराजवळ आली आहे तेव्हां मुलामुलीविषयीं तिला उत्कंठा वाटणें स्वाभाविकच होय. इतका अर्थ या सादृश्यावरून निघतो. १७. भेट. मेळा=लोकांचा समुदाय; पुष्कळ लोक एकत्र मिळून झालेला संघ.

१.'दयाळे' हा शब्द साभिप्राय आहे. २. मुक्तेश्वराचें शब्दयोजनाचातुर्य कधीं कधीं स्वाभाविक रीतीनें दृष्टीस पडतें; व असली शब्दयोजना कवीच्या चातुर्याची साक्ष देते. 'तुवां' 'त्वां' हीं 'तूं' शब्दाच्या तृतीयेच्या एकवचनाचीं दोन रूपें आहेत. 'तूनें' असेंही रूप कित्येक प्रांतीं प्रचारांत आहे. ३. मी कोण, कोठची हें न जाणतां व मी तुमची भाची आहें असें न ओळखतांच तुम्हीं माझे प्राण वांचविले यामुळें तुम्हीं फारच स्तुतीस पात्र आहां—कारण मी तुमच्या बहिणीची मुलगी आहें असें समजून जर तुम्हीं माझे प्राण वांचविले असते तर तुम्ही स्तुतीस पात्र झालां नसतां—हा दमयंतीच्या म्हणण्याचा भाव; यावरून दमयंतीची परोपकाराविषयींची कल्पना किती उदात्त होती हें स्पष्ट होत आहे. पंतानेंही याच अर्थाची उक्ति दमयंतीच्या तोंडीं घातली आहे:—'भैमी म्हणे, 'सुनंदा तसि हेहि, असेंचि पाहिलें कीं तें। कोटि गमे प्रीतिमुळें तुच्छा अमृतप्रपाहि लेंकीं तें ॥ जाणोनि दया केली ते तों तुच्छाचि मावशी, हेमीं। रत्नींहि न रुचि, शीलीं, धान्यें तेणेंचि मावशी! हे मी' ॥ १९४ ॥' [वनपर्व—अ० ४ काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ०६०]. ४. प्राण पांच असून हा शब्द येथें एकवचनांत योजिलेला आहे याबद्दल वाचकांना शंका येण्याचा संभव आहे. प्राण स्थानभेदेंकरून पांच आहेत—मूळ प्राण एकच आहे असें नैयायिकांचें मत आहे, म्हणून 'प्राण' शब्द एकवचनीं व अनेकवचनीं हीं योजितां येईल. ५. सुबाहु नामक तिचा जो पुत्र राज्य करीत होता त्याला. ६. शिबिका=पालखी किंवा म्याना, यान=वाहन—हत्ती, घोडे, रथ इ० [सर्वं स्यात् वाहनं यानम्' इत्यमरः. या अवतरणांतील 'सर्वम्' शब्दावर व्याख्या लिहितांना महेश्वरानें म्हटलें आहे:—'सर्वं, हस्त्यश्वादि वाहनं यानादि शब्दवाच्यम्]. ७. छत्राच्या छायेखालीं, उन्हापासून किंवा पावसापासून त्रास होणार नाहीं अशा रीतीनें—असा भाव. ८. दमयंती ही सुबाहूची बहीण होत असल्यामुळें माहेराहून ज्याप्रमाणें मुलीची बोळवण होते त्याप्रमाणें दमयंतीची बोळवण कर—असें राजमाता सांगते. ९. 'जळीं बोळविली' म्हणजे काय हें समजणें कठिणच आहे. ज्याप्रमाणें वस्त्र, आभरण इत्यादि देण्याची चाल आहे त्याप्रमाणें जल देण्याची चाल नाहीं. तेव्हां 'जळीं' हा शब्द येथें यमकाकरितां योजण्यांत आला असें म्हणण्यास विशेष हरकत नाहीं, 'जल'शब्दानें 'सरबत' 'अत्तर' इत्यादि मिष्ट व सौगंधिक जलांचें ग्रहण केल्यास कवि दोषांतून मुक्त होईल. संस्कृतांत 'जल'-

बोळविली माहेरा. ॥ ५८ ॥ [1]कुमारी पातली कुंडिनपुरा । देखोनी आल्हाद राजेश्वरा । आलिंगुनी [2]अश्रुधारा । अभिषेकिला मस्तक. ॥ ५९ ॥ मातेतें देवुनी आलिंगन । दीर्घ स्वरें करी [3]रुदन, । म्हणे 'धन्य धन्य माझे नयन । तुतें [4]देखिली मागुती.' ॥ ६० ॥ बंधूंसि भेटोनी गोरटी । उभय बालकें धरिलीं पोटीं । नेत्रीं होत उदकवृष्टि । ते पुसिली [5]जननीयें. ॥ ६१ ॥ अरण्यवास [6]परगृहवास । दोहीं क्लेशांचा जाला नाश । पितृगृहींचा सुवास । [7]यातनाप्राय अवगमे. ॥ ६२ ॥ फल [8]तांबूल अन्नोदक । न शिवे [9]आभरणांशुक । [10]पतिवियोगाचें दुःख । देहीं [11]धडके सर्वदा. ॥ ६३ ॥ दुःखें सांगे [12]माते प्रति । [13]मातें वांचवावयाची [14]आर्ती । [15]तरीं शोधावा नैषधनृपति । नाना देशीं भूतळीं. ॥ ६४ ॥ [16]राजयातें सांगे कांता, । 'कुमारीहृदयीं अपार व्यथा । वाटे नळातें न देखतां । प्राण त्यजील निर्धारें.' ॥ ६५ ॥ अपार [17]वोपोनी धना । रायें

---

शब्दाला 'वाळा' अर्थ आहे ['यावत्केशस्यांबुनश्च नामानि तानि सर्वाणि वालस्यापि' इति महेश्वरः] परंतु याअर्थानें वरील वाक्यास विशेष खुवी येते असें नाहीं.

१. या ओवींत कवीनें अनुप्रासालंकार थोडासा अनायासें साधिला आहे. पहिल्या चरणांत 'क'काराची व 'प'काराची दोन दोन वेळां आवृत्ति झाली आहे. दुसऱ्या व चौथ्या चरणांत मिळून 'आ'काराची चार वेळां आवृत्ति झाली आहे. हा छेकानुप्रास होय. तल्लक्षणम्—'छेको व्यंजनसंगस्य सकृत साम्यमनेकधा' [साहित्यदर्पणम्]. २. व्याकरणदृष्ट्या 'अश्रुधारेनें' 'असें तृतीयांत रूप पाहिजे. ३. माहेरीं आल्यावरोबर दमयंती रडायला लागली असें मुळांत नाहीं. दमयंती आल्यावरोवर तिच्या भावानें तिची पूजा केली व नंतर तिनें देवतांची पूजा केली आहे इत्यादि असें वर्णन केलें आहे व पंतांनींही असेंच वर्णिलें आहे. परंतु फार दिवसांपासून संकटांनीं पीडित झालेल्या व ज्यांची भेट होण्याची आशा उरली नाहीं अशा निकट आप्तांची भेट झाल्यावरोवर उभय पक्षांनाही रडूं येतें व कांहीं वेळ रडल्याशिवाय त्यांचीं मनें स्थिर होत नाहींत, हा सर्व मानवांना सामान्य असा नियम ध्यानांत आणून मुक्तेश्वरानें कथानकांत अशी वदलावदल केली आहे; तेव्हां त्याला 'खरा कवि' असें कोण म्हणणार नाहीं? ४. 'देखती' असा पाठ आहे. ५. जननीनें, मातेनें. ६. दमयंती अज्ञानवासांत असतां मावशीच्याच घरीं राहिल्यामुळें 'परगृहवास' म्हणतां येत नाहीं. ७. 'सुवास' [सुखानें राहणें] व 'यातनाप्राय' हे दोन शब्द परस्पर विरुद्ध आहेत. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ८. विडा. ९. वस्त्र. १०. पति जवळ नसतां स्त्रियांविषयीं असें सांगितलें आहे:—'क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् । हास्यं परगृहे यानं त्यजेत् प्रोषितभर्तृका ॥'. ११. 'चिंताग्रस्त मानसीं' असा अन्य पाठ. १२. आईला. १३. मला. २४. आवड. १५. असेल तर. १६. भीमराजाला. १७. देऊन.

पाठविले द्विजगणां[1] । करुनी मेदिनीची[2] खनना । नळनिधाना शोधावें.॥ ६६॥
नळशोधना[3] जाती जे द्विज । पवित्र तयां भैमी बोधी बीजमंत्र । तोची मंत्र जगाच्या श्रोत्रां[4] । ऐकवीत चालिले. ॥ ६७ ॥ 'सवर्म[5] ऐकोनी वचनें । उत्तर देईल सखेद मनें । तोची वोळखावा[6] खुणें[7] । कोण वेश केउता[8]'. ॥ ६८ ॥
'क्षुधित वनिता[9] अर्धवसनी । रात्रीं सांडिली येकटी[10] वनीं । ऐसा पुरुष ये[11] मेदिनी । देखिला अथवा ऐकिला ! ॥ ६९ ॥ जो कथील त्याचीये[12] वार्ते । बहुत पुण्य घडेल त्यातें,[13] । ऐसा घोष[14] हो जगातें । गर्जोनिया बोलती. ॥ ७० ॥

---

१. ब्राह्मणवृंदाला. २. भूमीची. नळ पातालांत असेल ही शंका नाहींशी करण्याकरितां भूमि ही खणा असं राजा सांगतो व नळाला 'निधान' [धन—सोनें, रुपें इत्यादि] याचें सादृश्य देऊन आपल्या म्हणण्यास दृढता आणिली आहे. ३. या ओंवीचा हा प्रथम चरण फारच लांब आहे व इतर चरणही नेहमींपेक्षां लांब आहे. यामुळें मुक्तेश्वराच्या ओंवीचें लक्षण बरोबर लावितां येत नाहीं. ४. कानाला. ५. 'समर्थ' असाही पाठ आहे. मनाला टोंचून लागेल असें वचन—असा या शब्दांचा अर्थ आहे. ६. ओळखावा. अशाच प्रकारें 'ओ'काराचा 'व'कार झाल्याचीं महाराष्ट्रभाषेंत उदाहरणें पुष्कळ आहेत. ७. उत्तर देईल या खुणेनें; कारण जो उत्तर देईल त्याचा त्या गोष्टीशीं कांहीं तरी संबंध असतो हें उघड आहे; व म्हणूनच उत्तर देणें हीच त्याची खूण होय. ८. कशाप्रकारचा; आकार; आकार, रूप, वर्ण इत्यादि. नल अर्धवस्त्र परिधान करून गेल्यामुळें, वस्त्रावरून किंवा वेशावरून त्याला ओळखितां येईल असें मनांत आणून, दमयंती ब्राह्मणांना सांगते कीं उत्तर देणाऱ्या गृहस्थाचा वेश प्रथम लक्षांत आणा व नंतर त्याचा आकार लक्षांत ठेवा. ९. स्त्री, पत्नी. १०. एकटी, एकली. 'ए'काराच्या जागीं 'य'कार उच्चारण्याची किंवा लिहिण्याची हलक्या जातींतील लोकांची प्रवृत्ति असते. ११. या जगांत 'या'बद्दल 'ये'चा प्रयोग चिंत्य आहे. १२. त्या पुरुषाची वार्ता, अरण्यांत स्त्रियेला सोडून देणाऱ्या मनुष्याचा समाचार. १३. हें भाषण कांहींसें नीरस उतरलें आहे. मुळाकडे मुळींच लक्ष न देतां मुक्तेश्वरानें हें प्रकरण रचिलें असावें असें वाटतें. मूळ संस्कृत भारतांत, दमयंतीनें ब्राह्मणांना राजांच्या दरबारांत म्हणण्याकरितां सांगितलेला मजकूर सात श्लोकांनीं वर्णिलेला आहे. (वनपर्व—अ० ६९ श्लो० ३७-४३.) त्याचा सारांश असाः—'पुण्यश्लोका! त्यजिली निजली असतां वनीं कशी भार्या? । नसतां दोष, सतीचा योग्य परित्याग काय गा! आर्या! ॥' [मोरोपंत—वनपर्व—अ० ४ गी० २०४. काव्यसंग्रहग्रंथमाला पृ० ६१.] दमयंतीच जणों नळास प्रश्न करून राहिली आहे असें मूळांत वर्णन आहे. मुक्तेश्वरानें हें वाक्य नीरस केलें आहे. (१) प्रत्यक्ष नळाला संबोधून संभाषण चाललें आहे असें न वर्णितां 'अशा प्रकारचा पुरुष कोणीं पाहिला आहे काय?' अशा अर्थाचें वाक्य घातलें आहे त्यामुळें वाक्याची खुबी गेली. (२) हें वाक्य दमयंती म्हणते आहे असें न वर्णितां ब्राह्मणच विचारीत आहेत असें वर्णिल्यामुळें वाक्याचें सारस्य बरेंच कमी झालें आहे. १४. 'ते जगातें' 'या जगातें' 'सर्व जगातें' असे अन्य पाठ आहेत.

'[1]नगरें पुरें बहु पट्टणें। शोधिलीं ऋषींचीं तपोवनें। परंतु प्रत्युत्तर '[2]हो' वचनें। कोणी तोही वदेना. ॥ ७१ ॥ [3]ब्राह्मणीं शोधितां भूमंडळ। कोठें चो[4]जेवेना नळ। अभाग्य काळ पातलिया वि[5]केळ। कष्ट होती ज्या परी. ॥ ७२ ॥ पर्णादनामा ब्राह्मण सुमती। [6]मथुरा, [7]माया, [8]कांची, [9]काशी। अवंतिका द्वा-

१. 'नगर' 'पुर' 'पट्टन'(पत्तन) हे सर्व शब्द एकार्थवाचक आहेत असें पुष्कळांना वाटण्याचा संभव आहे व ते कवीवर पुनरावृत्तीचा दोष लादूं पाहतील, परंतु या शब्दांत थोडा फरक आहे. तो असा:—खेड्यांतील लोकांपेक्षां ज्या ग्रामाचे रहिवासी सुधारले आहेत तें **'नगर'**. याच कारणावरून 'सुधारक' 'शिष्टाचारसंपन्न' या अर्थीं 'नागरिक' या शब्दाचा उपयोग करतात. ज्या ग्रामाची लांबी एका मैलापेक्षां कमी नाहीं, जेथें सर्व प्रकारचे धंदेवाले राहत असून त्यामुळें अनेक प्रकारचे व्यापार चालत असतात त्याला **'पुर'** अशी संज्ञा आहे. जेथें राजा वास करितो व ज्याभोंवती खंदक व भिंत आहे त्याला **'पट्टण'** म्हणतात. २. 'होय. तशा प्रकारचा मनुष्य पाहिला आहे' अशा अर्थाचें वचन. ३. ब्राह्मणांनीं. 'ब्राह्मण'शब्दाचें हें तृतीयेचें रूप चिंत्य होय. ४. समजेना ५. 'विफळ' असा अन्य पाठ आहे. ६. त्रेतायुगांत, रावणाची जी **कुं**भीनसी नांवाची वहीण होती तिचा **म**धु नामक पति या स्थानीं तपश्चर्या करीत असे, म्हणून त्या देशाला **'म**धुवन' असें नांव पडलें. पुढें त्याची तपश्चर्या संपूर्ण होऊन **शं**कराच्या प्रसादानें तो संपन्न झाला व त्यानें **म**धुरा नामक पुरी स्थापिली. याच्या मरणानंतर, याच पुरींत, **लव**णासुर नांवाचा याचा पुत्र राज्य करीत असे. परंतु तो फार दुष्ट होता म्हणून, **रा**माज्ञेवरून **श**त्रुघ्नानें त्याचा संहार केला व आपणच त्या पुरींत राज्य करूं लागला. [रामायण—उत्तर० स० ७० पहा.] यावरूनच ही नगरी शत्रुघ्नानें बांधिली असें लोक म्हणतात. या देशांतील सेना शूर होईल असा देवांचा वर मिळाल्यामुळें याला 'शूरसेनदेश' असें नांव पडलें. या देशाची राजधानी **म**धुरा किंवा **म**थुरा होय. ('मथुरा मधुरापुरी' इति शब्दभेदप्रकाशे. । हेमाद्रि—रघुवंश स० ६ श्लो० ४८ टीका) **कृ**ष्णाचा जन्म याच पुरींत झाल्यामुळें **पां**डवांच्या वेळीं ही फारच प्रख्यात होती. सध्यां **शू**रसेन देशाची सीमा समजण्याला जरी कांहीं साधनें नाहींत तरी **'म**थुरा' नगरी जगत्प्रसिद्ध आहे. ७. ही सप्तमोक्षदायक पुरींपैकीं एक. ८. शिवकांची व विष्णुकांची या नांवाच्या दोन पुरी दक्षिणदेशांत सुप्रसिद्ध आहेत. यांचें मनोरम वर्णन **'केसरी'** पत्रांत (ता० १४।१।९६) आहे तें अवश्य पहावें. ९, **का**शी व **वा**राणसी ही दोन नांवें एकाच शहराचीं आहेत असें सर्वप्रसिद्ध आहे. तरी या नांवासंबंधी पुढील उतारा पाहण्यासारखा आहे.—'काशीशब्दं व्याहरंति तच्चिंत्यम्। काश्यादिभ्यष्ठञ्ञिठाविति सूत्रगणे काशिचेद्यादयो देशविशेषवाचका एव संगृहीताः। तेषां देशवाचकतया पुंस्त्वाभिधायिकत्वेन स्त्रीवाचकव्यक्तिविशेषपरतायां शिष्टप्रतिपत्तिषूपलंभाभावात्। रूढिपरतासंभवेऽपि गमकाभावाच्च। तथा विराटपर्वणि महाभारते—'रणे तेन विराटेन भविता वः समागमः। यः स काशिपतिर्राजा वाराणस्यां महारथः॥' इति वाक्यात् काशिवाराणसीशब्दयोर्द्यावाभूमिवन्महान्तरयोरेकार्थसंबन्धकरणं केवलं स्वल्पज्ञताद्योतकमेव ॥' [भगवद्गीताभाष्ये भीमसेनशर्मा.]

रावती । साही पुऱ्या शोधिल्या. ॥ ७३ ॥ मग पातला अयोध्यापुरा । भेटला ऋतुपर्ण राजेश्वरा । वार्ता जाणवितां, तो उत्तरा । सुफळ कांहीं बोलत.[1] ॥ ७४ ॥ 'आमुच्या घरीं बाहुकनामा[2] । सेवकवृत्ती सूतकर्मा[3] । निद्राकाळीं ब्राह्मणोत्तमा ! । ऐसें कांहीं अनुवादे.[4] ॥ ७५ ॥ त्याची घेऊनियां भेटी । त्यातें जाणवी हे गोष्टी । तो बोलेल तेचि पोटीं । जाणवेल[5] शाहाणियां.' ॥ ७६ ॥ मग येउनी बाहुकाप्रति । पर्णाद पुसे नाना[6] युक्ति, । 'अदुष्टा[7] चिन्मया[8] पवित्रा सती । सानुकूळ[9] सर्वदा. ॥ ७७ ॥ क्षुधिता तृषिता वस्त्ररहिता । वनीं एकटी सांडी भर्ता । धैर्य विश्रांति त्याचिया चित्ता । कोणे विचारें[10] कल्पावें. ॥ ७८ ॥ ऐसा पुरुष ये मेदिनीं[11] । देखिला ऐकिला असेल श्रवणीं । तरी आमुतें सत्य वचनीं । सांगितलें पाहिजे.' ॥ ७९ ॥ बाहुक परिसोनी द्विजवाणी[12] । अश्रुपात उभय नयनीं । मुख आच्छादुनी वसनीं[13] । परम दुःखें विलपतु.[14] ॥८०॥ म्हणे,[15] 'पुरुष तो[16] देखिला । त्याचेनि दुःखें उभड[17] आला । परंतु नेणों केउता

१. पर्णादाचें वाक्य ऐकून ऋतुपर्ण राजा कांहीं बोलला नाहीं असें मूळांत आहे. ['तच्छ्रुत्वा नाब्रवीत् किंचित् ऋतुपर्णो नराधिपः'] असें असून मुक्तेश्वरानें येथें तद्विरुद्ध वर्णन केलें आहे. २. बाहुक आहे नाम ज्याचें तो. ३. सूताचें (सारथ्याचें) कर्म (सारथिपणा). ४. पुनः पुन्हा उच्चारितो. ५. राजाच्या म्हणण्याचा असा उद्देश आहे कीं बाहुक जी गोष्ट सांगेल तिचा उद्देश शहाण्या लोकांनीं आपल्या मनांत जाणावा—इतरांना तो समजावयाचा नाहीं. ६. यावरून नळानें पर्णादाच्या प्रश्नाला एकदम उत्तर दिलें नाहीं असें दिसतें. ७. शिष्टा, सद्गुणसंपन्ना. ८. या शब्दाचा येथें बरोबर संदर्भ लागत नाहीं. 'चित् म्हणजे प्राण किंवा मन. तेव्हां 'चिन्मया' म्हणजे 'ज्ञानस्वरूपा', पण हा अर्थ येथें इष्ट नाहीं, म्हणून मनांत नेहमीं पतीविषयींच विचार करीत असणारी'—असा अर्थ करावा लागेल; तरी हा ओढून ताणून आणलेलाच अर्थ होय. ९. पतीच्या मताप्रमाणेंच चालणारी. १०. वर वर्णिलेल्या प्रकारच्या मनुष्याच्या मनाचें कोणत्या विचारानें समाधान होईल? त्याला समाधान कोणत्याही रीतीनें वाटणार नाहीं—असा भाव. ११. पृथ्वीवर. [मेदिनी= पृथ्वी. 'क्ष्मावनिर्मेदिनी मही' इत्यमरः । मेदमस्त्यस्यामिति मेदिनी. पृथ्वीला मेदिनी असें नांव पडण्याचें कारणः—मधुकैटभ नांवाचे दोन असुर होते. त्यांस विष्णु 'वर माग' म्हणाला. ते म्हणाले 'तूंच वर माग.' तेव्हां विष्णूनें 'तुम्ही मला वध्य असावें' असा वर मागितला. असुरांनीं 'तथास्तु' म्हटलें. तेव्हां त्यांस विष्णूनें मारिलें. तेव्हां असुरांच्या शरीरमेदानें संपूर्ण पृथ्वी भरली. तीस 'मेदिनी' असें नांव पडलें. १२. ब्राह्मणाचें वाक्य; पर्णादाचे शब्द. १३. वस्त्रानें. १४. विलाप करूं लागला. 'विलप्' धातूचें हें रूप विचार करण्यासारखें आहे. १५. आपल्या विलापामुळें ब्राह्मणाला शंका येऊं नये म्हणून नळ विलापाचें कल्पित कारण सांगत आहे. १६. जशा प्रकारचा पुरुष वर वर्णिला आहे तसा पुरुष माझ्या पाह-

गेला। जवळी म्हणोनी ऐकिजें. ॥ ८१ ॥ तोही मुखें बोलिला ऐसें, । 'अनुचित राहाटलीया पुरुषें । कुलस्त्रियासीं द्वेषरोषें । निंदा सहसा न करिती. ॥ ८२ ॥ जे अवगुण बोले मुखीं । दोष आच्छादी लौकिकीं । ते पैं देवाचे मस्तकीं । मान्य होय पवित्र.' ॥ ८३ ॥ ऐसें बोलोनी महापुरुषा! । नेणों गेला कवण्या देशा । पुढती भेट होईल स्वल्प दिवसां । नेमशब्द वदलासे.' ॥८४॥ ऐकोनी सूताचीं उत्तरें । पर्णाद नगरा पातला त्वरें । दमयंतीस सविस्तारें । निवेदिला वृत्तांत. ॥ ८५ ॥ 'कांहीं रूपाचा पालट नयना । ईतर सर्व सारख्या सूचना । कोण माया ते विचक्षणा । चोजवेना सुजाणे! ॥८६ ॥ स्पर्शला तुझ्या त्यागपापा । म्हणवुनी पालट जाला रूपा । येऱ्हवीं नळची तो, विकल्पा । ठाव नाहीं निर्धारें.' ॥ ८७ ॥ सुदेव पाचारुनी सुमती । त्याप्रति

ण्यांत आला व त्याचीच आठवण झाल्यामुळें मी रोदन करीत आहे इत्यादि कारण नळ सांगत आहे. १७. गहिंवर, दुःखाचा ऊत.

१. तो पुरुष माझ्यापासून फार लांब नव्हता म्हणून त्याचें (पुढें दिलेलें) संभाषण मला ऐकूं आलें हा नळाच्या सांगण्याचा उद्देश. नळानें, दुसऱ्या पुरुषाचें भाषण सांगतों असें म्हणून आपले हृद्गतविचार पर्णादाला कळविले—असें मूळांत नाहीं; एकदम आपले विचार प्रदर्शित करूं लागला असें लिहिलें आहे. तेव्हां योग्य फेरफार केल्याबद्दल कवि स्तुतीस पात्र आहे. २. या व पुढच्या दोन चरणांचा अन्वय व अर्थ:—द्वेषरोषें पुरुषें कुलस्त्रियांसीं अनुचित राहाटलीया (वागणूक ठेविली असतांही) [त्या कुलस्त्रिया पुरुषाची] सहसा निंदा न करिती. ३. वागणें. ४. हे श्रेष्ठ पुरुषा! ५. सारथ्याचीं. ६. डोळ्यांस. ७. नळाच्या रूपांत कांहीं फरक होऊन बाहुक बनलेला आहे असें डोळ्यांस (म्हणजे पाहणाऱ्यांस) वाटतें. हा केवळ भास होय व तो खरोखर नळच होय—असा भाव. रूप खेरीजकरून इतर खुणा एकसारख्या आहेत. परंतु रूप खेरीजकरून इतर खुणा त्या कोणत्या? कर्कोटकानें दंश केल्यानंतर 'गौरतेचा सुवर्ण वर्ण । लोपुनी श्यामता संपूर्ण । शिरपादांत पातली ॥१०॥ आजानुबाहु लोपुनी शब्द । ऱ्हस्वबाहू ऱ्हस्वपाद । विरूपता पातली मंद । सौंदर्य जालें स्वदेहीं ॥ ११ ॥' असें मागें कवीनेंच वर्णिलें आहे. तेव्हां इतर खुणा कोणत्या असाव्या हें बरोबर लक्षांत येत नाहीं. ८. 'खुणा' अन्य पाठ. ९. [हे] सुजाणे! विचक्षणा (शहाण्याला देखील) ते कोण माया (हें) चोजवेना—असा अन्वय. कोणत्या कारणांमुळें नळाच्या रूपांत पालट झाला हें शहाण्याला देखील समजणार नाहीं—असा भावार्थ. १०. शहाण्याला. ११. समजेना. १२. त्यागरूपी पाप. नळानें दमयंती त्यागिली या पापामुळें त्याच्या रूपांत फरक झाला असा ब्राह्मणाच्या सांगण्याचा उद्देश. १३. खरोखर विचार केल्यास, रूपांत फरक आहे इतकी गोष्ट सोडून देऊन. १४. संशय. १५. निश्चयानें.

अनुवादे[१] **द**मयंती, । ‘तुवां जाउनी **अ**योध्येप्रति । आन[२] युक्ति करावी. ॥ ८८ ॥ ‘शोधितां[३] कोठें न दिसे **न**ळ । **द**मयंतीचा तारुण्यकाळ[४] । राजा धर्मशास्त्रीं[५] कुशल[६] । सारासार जाणता. ॥ ८९ ॥ पुढती[७] कन्येचें स्वयंवर[८] । करीतसे **भी**-मक नृपवर । पृथ्वीतळींचे राजेश्वर[९] । पाचारिले आदरें. ॥ ९० ॥ उदईक[१०] एका[११] प्रहरांत । स्वयंवर नेमिलें नेमस्त[१२] । तुम्हीं[१३] यावें जी त्वरित । समारंभें[१४] सो-हळीया’. ॥ ९१ ॥ **सु**देव[१५] जाउनी **अ**योध्यापुरा । कथिलें **ऋ**तुपर्ण राजेश्वरा। तेणें[१६] सारथिया[१७] चतुरा । पाचारूनी आज्ञापी. ॥ ९२ ॥ ‘शत योजनें[१८] **वि**दर्भ नगरी । येका दिवसा हो! माझारी[१९] । सूर्य[२०] असतां घटिका[२१] च्यारी । शीघ्र गेलें पाहिजे.’ ॥ ९३ ॥ सारथी म्हणे[२२], ‘हें अघटित[२३] । शत योजनें दुरी पंथ । अश्व[२४]

---

१. अनुपूर्वक वद धातूचा अर्थ—एकदां म्हटलेली गोष्ट पुन्हां म्हणणें—असा होतो; परंतु येथें अनुवादे=वदे, म्हणे, सांगूं लागली. २. अन्य, दुसरी नळाचा शोध लावण्याकरितां दमयंतीनें जी युक्ति योजिली होती ती पहिली युक्ति होती; व यापुढें योजावयाची जी युक्ति ती दुसरी युक्ति होय असें समजावें. ३. हें वाक्य सुदेवानें ऋतुपर्णाच्या दरबारीं म्हणावयाचें होय. ४. ‘तारुण्यकाळ’ याचा संबंध ‘जाणता’ या शब्दाशीं आहे. तारुण्यकाळ जाणता= आपली मुलगी तरूण व रूपयौवनसंपन्न आहे असें जाणून. ५. चातुर्य, प्रावीण्य इत्यादि गुण दाखविणाऱ्या विशेषणामागें सप्तमी विभक्ति योजितात—गणितांत हुषार, गानांत पटु, खेळ-ण्यांत पटाईत. ६. धर्मशास्त्राचा ज्यानें पूर्ण विचार केला आहे असा. स्त्रियांचा दुसऱ्यानें वि-वाह करावा किंवा करूं नये याविषयीं धर्मशास्त्राचें काय मत आहे याचा राजानें पूर्ण विचार केला आहे व म्हणूनच तो आपल्या मुलीचा द्वितीयविवाह करीत आहे—असा सांगण्याचा भाव. ७. पुनः. ८. तीन प्रकारचे स्वयंवर सांगितले आहेतः—‘स्वयंवरस्तु त्रिविधो विद्वद्भिः परिकीर्तितः । राज्ञां विवाहयोग्यो वै नान्येषां कथितः किल ॥ इच्छास्वयंवरश्चैको द्वितीयश्च प-णाभिधः । यथा रामेण भग्नं वै त्र्यंबकस्य शरासनम् ॥ तृतीयः शौर्यशुल्कश्च शूराणां परि-कीर्तितः ॥’ [इति देवीभागवते.] ९. मोठमोठे राजे. १०. ज्या दिवशीं ऋतुपर्णाच्या दरबारीं सुदेव जाईल त्याच्या दुसऱ्या दिवशीं. ११. पहिल्या प्रहरीं, सकाळीं नऊ वाजेपर्यंत. १२. ब-रोबर, ठीक, वेळ न चुकतां. १३. ऋतुपर्णाला उद्देशून हें वाक्य आहे. १४. थाटमाटानें. १५. ‘सुदेवें’ किंवा ‘सुदेवानें’ असा हा शब्द तृतीयांत पाहिजे होता, कारण हा शब्द ‘क-थिलें’ याचा कर्ता आहे. अथवा ‘कथिलें’ या पाठाच्या ठिकाणीं ‘कथी’ असा तरी पाठ पाहिजे होता. १६. स्वयंवराची गोष्ट ऐकिल्यामुळें. १७. सारथ्याला, नळाला. १८. योजन=चार कोस. [‘योजनं परमात्मनि, चतुष्क्रोश्यां च योगे च’ इति मेदिनी.] १९. मध्यें, एका दि-वसांत. २०. ‘दिवस’ असाही पाठ आहे. सूर्य=सरत्याकाशे सूर्यः। सुवति कर्मणि लोकं प्रेरय-तीति सूर्यः. [सिद्धांतकौमुदी—२८६५ पाणिनि ३-१-११४.] २१. सूर्य च्यारी घटिका अ-सतां=सूर्य बुडण्याला चार घटिका वेळ असतांना, सूर्य बुडून जाण्याच्या पूर्वीं एक दोन तास. २२. ‘म्हणती’ असा अन्य पाठ आढळतो. २३. न घडणारें, असें होऊं शकणार नाहीं.

घेउनी जाती रथ । केंवि घडे सांग[1] पां?' ॥ ९४ ॥ '[2]दमयंतीचें स्वयंवर । पुढती होतसे नवल[3] थोर । गेलें पाहिजे सत्वर' । बाहुकातें[4] म्हणतसे. ॥ ९५ ॥ बाहुका जाणवलें[5] चित्तीं, । 'आपणा शोधावयाचे आर्ती[6] । मांडलीसे उपाययुक्ति । येरें[7] वदंती[8] वाउगी[9]. ॥ ९६ ॥ अथवा माझे अवगुणदोष । आठवुनी घेतला असेल त्रास । नेणवे स्त्रियांचें मानस । विकार[10] पावे प्रारब्धें. ॥ ९७ ॥ तथापि दमयंतीचें मन । मजवांचुनी न स्मरे आन[11] । मातें शोधावया जाण[12] । [13]हेंचि घडे निर्धारें. ॥ ९८ ॥ असो[14]. ऋतुपर्ण राजेश्वरा । घेउनी जाणें कुंडिनपुरा । तेथें घडेल त्या विचारा । जाणवेल[15] स्वभावें[16].' ॥ ९९ ॥ मग[17] हांसुनी

---

२४. रथ घेउनी अश्व जाती—असा अन्वय. मूळांत बाहुकाच्या तोंडीं हें वाक्य घातलें नाहीं. परंतु हें वाक्य त्याच्या तोंडीं घातल्यामुळें वर्णनाची शोभा वाढली आहे. याबद्दल कवी स्तुतीस पात्र आहे.

१. तूंच सांग असें म्हणून ही गोष्ट असंभवनीय आहे हें कोणीही कबूल करील असें ध्वनित केलें आहे. २. बोलणारा कोण आहे हें न सांगतां एकदम त्याचें भाषण देण्याची आजकालच्या कादंबरींत जी चाल दृष्टीस पडते तीच चाल मुक्तेश्वराच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडते. परंतु बोलणारा कोण आहे हें वाचकाच्या मनांत तेव्हांच येत-असल्यामुळें हा दोष आहे असें म्हणतां येत नाहीं. प्रस्तुतस्थळीं ऋतुपर्ण बोलणारा असून नळ ऐकणारा आहे हें स्पष्ट कळत आहेच. ३. 'नवल' म्हणण्याचें कारण 'द्वितीयस्वयंवर' होय. ४. अगोदर ऋतुपर्णानें स्वयंवर आहे असें न सांगतां मला विदर्भाला एका दिवसांत जावयाचें आहे असें सांगितलें. याचें कारण असें कीं नलपत्नी जी दमयंती तिच्यावर आसक्त होऊन आपण जात आहों, असें दुसऱ्यास कळूं नये. यावर, घोडे शतयोजन एका दिवसांत जाऊं शकत नाहींत असें जें नळानें उत्तर दिलें तेंही यथायोग्य होतें. कारण कोणत्या न कोणत्याही कारणामुळें बाहुकाला आपल्या सासऱ्याच्या गांवीं जाणें टाळावयाचें होतें. सारथी जेव्हां घोडे चालणार नाहींत असें म्हणूं लागला तेव्हां आपल्या कामाचें महत्त्व उघड करणें राजास भाग पडलें. दमयंतीचें पुनः स्वयंवर होणार असें ऐकून बाहुकही फार उद्विग्न झाला व काय होईल तें होवो, एकदा विदर्भास जाण्याचा त्यांनीं निश्चय केला. मूळांत नसतांही अशा रीतीनें मजेदार कथानक जुळविल्याबद्दल आपला कवि स्तुतीस पात्र आहे असें कोण म्हणणार नाहीं? ५. समजलें, बाहुकानें ओळखिलें. ६. उत्कट इच्छेनें. ७. येर=दुसरा, अन्य. (येथें) खरोखर विचार केल्यास, तत्वदृष्ट्या. ८. वदंती=वाक्य, भाषण, दमयंतीचें द्वितीय स्वयंवर होणार ही बातमी. ९. व्यर्थ, निष्प्रयोजन. १०. विकार पावे=विकारवश होई, सारासार विचार न करितां काम, क्रोध इत्यादिकांस वश होई. ११. अन्य पुरुषाला. १२. 'प्रयत्न' असा अन्य पाठ आहे. १३. हे जे यत्न चालले आहेत ते. १४. आतां ज्यास्त विचार करून काय करावयाचें आहे? १५. समजेल. 'जाण' धातूचें हें रूप चिंत्य होय. १६. आपोआप, विशेष श्रम केल्यावांचून. १७. या ओं-

म्हणे आपुले ठायीं, । 'म्हणे काम अवघड काई । राजा म्हणे तेच समयीं । रथ नेईन त्या ठायां.' ॥ १०० ॥ रायें देउनी आलिंगन । पाठी थापटी संतोषोन । अश्वशाळेप्रति नेऊन । म्हणे, 'वारू अवलोकीं. ॥ १०१ ॥ जे मानतील तुझिये युक्ति । तेच वारू योजीं रथीं । शत योजनें दुरी पंथीं । एके दिवसीं जे जाती.' ॥ १०२ ॥ बाहुकें अवलोकुनी हातीं । कृश ठेंगणे परि

---

वीचा सान्वयार्थः—[तो बाहुक] मग (मनांत विचार केल्यानंतर) हांसुनी आपुले ठायीं (आपल्याशींच) म्हणे (म्हणूं लागला) [राजा] काई (कांहींएक किंवा मुळींच) अवघड काम [न] म्हणे (सांगे); राजा म्हणे [म्हणतो, सांगतो, आज्ञापितो] तेच समयीं (त्याच वेळीं) त्या ठाया (कुंडिनपुरा) रथ नेईन.

१. राजा ऋतुपर्ण यानें आपला जो बाहुक सारथी त्याला आलिंगन दिलें हें शिष्टाचारविरुद्ध आहे; कारण राजवंशोत्पन्न पुरुष आपल्याच नौकरांना आलिंगन देईल असें संभवत नाहीं; तेव्हां हें वर्णन जरा शिष्टाचारास सोडून आहे, असा या वर्णनावर आक्षेप येणारा आहे, परंतु तो अयथार्थ होय. प्राचीनकाळीं सारथ्याची योग्यता फार मोठी होती. श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनाचा सारथि होता, शल्य कर्णाचा सारथि होता. यावरून प्राचीनकाळीं सारथ्याची पदवी कांहीं विशेष मान्यतेची होती असें स्पष्ट दिसतें. त्या कालचे सारथि सांप्रत गाडी-हाकणाऱ्या सेवकांप्रमाणें नव्हते. सारथि हा एकार्थी राजाचा चाकर खरा, तथापि तो राजाशीं बराच बरोबरीनें वागे, त्यास युद्धाची माहिती असे, व तो युद्धामध्यें आपल्या धन्यास बुद्धिवाद सांगून त्यास यशःश्री संपादन करून देण्यासाठीं प्राणाचीही पर्वा बाळगीत नसे. तो विश्वासु, युद्धज्ञानकुशल, आणि युद्धनीतिज्ञ असा असल्यामुळें त्याचा धनी त्यास बिकटप्रसंगीं सल्लामसलत विचारल्यावांचून राहात नसे. रामायणांत दशरथाचा सारथी सुमंत हा त्याचे अष्टप्रधानांतील एक होता असें आढळतें व त्याचा सल्ला दशरथ बहुत प्रसंगीं घेत असे असें बालकांडांत व अयोध्याकांडांत स्पष्ट सांगितलें आहे. यावरून सारथ्याची योग्यता केवढी होती हें स्पष्टपणें कळून येईल. २. शाबासकी देई. नौकरानें एकादें चांगलें काम केल्यास त्याला मालक शाबासकी देतो—या नित्य व्यवहाराला अनुसरून हें वर्णन असल्यामुळें या चरणांत कवीनें व्यवहारचातुर्य दाखविलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. ३. संतोषून, संतोष किंवा आनंद झाल्यामुळें. ४. वारू—युद्धांत उपयोगीं पडणारा हत्ती. सांप्रतस्थळीं या अर्थानें निर्वाह होत नाहीं; व 'वारू' शब्दाचा 'हत्ती'शिवाय दुसरा अर्थ कोणत्याही संस्कृत कोषांत सांपडत नाहीं. येथें आपणाला 'घोडे' असा अर्थ पाहिजे आहे तेव्हां हा शब्द 'वाजी' शब्दाबद्दल चुकून पडला असावा असें वाटतें. 'वारू' म्हणजे 'युद्धोपयोगी घोडा' असा अर्थ—ग्रंथभाषारूढ असून मराठी कोशांत आढळतो. ५. पसंत पडतील, मनास येतील. 'मानवती' असाही पाठ सांपडतो. ६. घोडे चालविण्याची जी युक्ति किंवा विद्या. 'चित्तीं' 'बुद्धि' असेही अन्य पाठ सांपडतात. ७. येथें 'रथीं'चा अर्थ 'रथांत' किंवा 'रथावर' असा नसून 'रथाला' असा आहे. ८. 'पंथीं' असा सप्तम्यंत प्रयोग करण्यांत कवीचा, यमक जुळविण्यापेक्षां दुसरा उद्देश होता असें दिसत नाहीं. येथें द्वितीयेनें कार्य झालें असतें. ९. हातीं अवलोकुनी—हातानें

[1]सुजाती । तेची जोडिले [2]कनकरथीं । म्हणे, 'आरुढें नरेंद्रा!' ॥ १०३ ॥ राजा म्हणे, 'बाहुक सुमती । निर्बळ रोडके जुंपिले रथीं.' । [3]तो म्हणे, '[4]यांचिया पंक्ती । बळिवंत [5]आन असेना.' ॥१०४॥ [6]सांट [7]वोपितांची ठायीं । वारू पडले [8]पुढले पायीं । बाहुकें उतरोनी भुई । कुरवाळिले स्वहस्तें. ॥ १०५ ॥ नळाचेनी हस्तस्पर्शें । वारू [9]उडाले [10]गरुडाऐसे । [11]पवनवेगाहुनी विशेषें । मनोगती निघाले. ॥ १०६ ॥ [12]चमत्कारला अयोध्यापाळ, । '[13]मिथ्या बाहुक, यथार्थ नळ । रथविद्ये ऐसा कुशळ । आन [14]त्यांविण असेना.' ॥ १०७ ॥ [15]वार्ष्णेय आश्चर्य

---

चांचपून पाहून. हातानें चांचपून पाहण्याचें कारण हें कीं कोणते घोडे फार रोडके आहेत हें समजावें. फक्त डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां हात लावून पाहिल्यास विशेष समजण्याचा संभव आहे. १०. अगदीं रोडके, बारीक.

१. चांगल्या जातीचे, उत्तम कुलांतले, शरीरानें ते घोडे जरी बलवान नव्हते तरी ते घोड्यांच्या उत्तम जोडप्यापासून उत्पन्न झालेले होते—असा भाव. स्वत: नळ उत्तम कुळांतला असून सांप्रत त्याला दीनावस्था प्राप्त झाली असल्यामुळें त्याला उत्तम कुळांतले पण क्षीण घोडे आवडले यांत आश्चर्य नाहीं. २. सुवर्णरथीं, सोन्याच्या रथाला. ३. वाहुक. ४. या घोड्यांच्या पंक्तीला बसण्यास मोठमोठे घोडेही समर्थ होऊं शकणार नाहींत; म्हणजे मोठमोठे घोडे देखील या घोड्यांबरोबर धावूं शकणार नाहींत—हा सांगण्याचा उद्देश. ५. अन्य, इतर. ६. चाबूक. ७. वोपणें=देणें. परंतु येथें 'सांट ओपितां'=सांटानें मारल्याबरोबर, चाबूक वाजविल्याबरोबर. ८. पुढल्या पायावर. ९. 'उधळले' असा अन्य पाठ आहे. १०. कश्यप ऋषीपासून विनतेस झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा, अरुणाचा कनिष्ठ भ्राता. हा मोठा पराक्रमी असे व यानें आपल्या मातेस कद्रूच्या दास्यांतून सर्पांस अमृत आणून देऊन मुक्त केलें होतें. हा संपूर्ण पक्ष्यांचा प्रस्तुतच्या मन्वंतरांत अधिपति असून विष्णूचें वाहन होय. याची शीघ्रगामित्वाविषयीं सुप्रसिद्धि आहे. ११. हवेच्या वेगाहून अधिक वेगानें. १२. विस्मित झाला. १३. हे ऋतुपर्णाच्या मनांतले विचार होत. हा (सारथी) बाहुक नसून नळच होय—असे विचार ऋतुपर्णाच्या मनांत चालले होते. १४. नळाविण, नळाशिवाय दुसऱ्याला इतक्या कुशलतेनें घोडे हांकलतां येणार नाहींत; म्हणून हा नळच होय—असा भाव. १५. ऋतुपर्णाजवळ येऊन राहिलेला नळाचा सारथी. मूळ महाभारतांत वार्ष्णेयाच्या मनांतले विचार फार विस्तृत रीतीनें वर्णिलेले आहेत. बाहुकाच्या वयावरून, गुणावरून व अश्वविद्यानिपुणत्वावरून, वार्ष्णेयानें, हा नळच असावा असा तर्क बसविलेला आहे. त्यापैकीं मुक्तेश्वरानें कांहींच वर्णिलें नाहीं ही दु:खाची गोष्ट होय. मूळांतील या कथाभागास मुक्तेश्वरानें मराठी वेष दिला असता तर तें वर्णन मोठें बहारीचें उतरलें असतें. पण 'गतं न शोच्यम्' या न्यायानें समाधान मानणें भाग आहे.

करी चित्तीं, । म्हणे, 'नळा ऐसी [1]रहंवरगति । वाटे [2]नळाचीये संगती । विद्या येणें साधिली.' ॥ १०८ ॥ रथ चालतां मानसगति । [3]राजवसन पडिलें क्षिती, । वार्ष्णेयातें म्हणे [4]नृपति, । 'शीघ्र घेईं सुजाणा!' ॥ १०९ ॥ बाहुक म्हणे, 'कैचें वसन । रथ पातला [5]देश योजन । [6]येतां जातां परतोन । आज तुम्हा न [7]भेटे.' ॥ ११० ॥ मार्गी [8]भल्लातकाचा तरु । देखोन बोले राजेश्वरु । [9]म्हणे, 'बाहुका! चमत्कारु । माझा कांहीं अवलोकीं. ॥ १११ ॥ तूं तंव विद्यासमुद्रजगतीं । निश्चयें [10]मानला माझ्या चित्तीं । मी ही कुशळ असें गणितीं । [11]लीलावतीग्रंथज्ञ.

---

१. मोठ्या रथाची गति. २. वार्ष्णेय नळाचाच सारथी होय; तेव्हां नळाजवळ बाहुक नांवाचा कोणी सारथी नव्हता हें त्याला माहीत असलें पाहिजे. तेव्हां ही कल्पना त्याच्या मनांत यावी हें संभवत नाहीं; तेव्हां कवीनें वार्ष्णेयाच्या तोंडीं युक्त भाषण घातलें नाहीं असें म्हणावें लागतें. ३. उत्तरीय वस्त्र. ४. 'हातीं' असा अन्य पाठ. ५. 'दोन' असाही पाठ आहे. [अध्याय ७२ श्लो० ३-५.] ६. 'येणें मार्गी' असा अन्य पाठ. ७. वस्त्राकरितां जर मी उतरून गेलों तर आज तुमची आमची भेट होणार नाहीं; कारण वस्त्र फार दूर राहून गेलें आहे—हा सांगण्याचा भाव. ८. बिब्बा. मूळांत 'बिभीतकवृक्ष' म्हणजे 'बेहड्याचें झाड' असें लिहिलें आहे; 'भिल्लातक' म्हणजे 'बिब्बा' याचा उल्लेख नाहीं. मोरोपंतानें देखील बिभीतकाचाच उल्लेख केला आहे. [मोरोपंत—वनपर्व—अ० ४ गीति २३१ पृ० ६४.] ९. मागच्या चरणांत. 'बोले' हा शब्द असल्यामुळें 'म्हणे' या शब्दाची या चरणांत आवश्यकता नव्हती. १०. चित्तीं मानला=पसंत झाला; आवडला. ११. '**लीलावती**' हें नांव भास्कराचार्यांच्या गणितग्रंथास कां पडलें याविषयींची कथा ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. महान् ज्योतिर्विद् भास्कराचार्य यांस लीलावती नांवाची एक कन्या होती. ती गणित व ज्योतिष् या दोन विषयांत इतकी पारंगत झाली होती कीं तशी पारंगतता फारच थोड्यांस प्राप्त होते. बाप महाज्योतिषी. त्यानें तिच्या जन्मकाळींच तिचें जातक तयार करून पाहिलें तों एकंदर नक्षत्रगुणांवरून असें दिसलें कीं मुलीच्या नशिबीं बालवैधव्य आहे. ही मुलीची भावी स्थिति पाहून भास्कराचार्यांस अत्यंत दुःख झालें, व त्यामुळें त्यांच्या जिवास तो एक हृद्रोगच लागून राहिला. होतां होतां लीलावती उपवर झाली. आचार्यांनीं विचार करून असा मुहूर्त शोधून काढिला कीं, ज्या मुहूर्तावर लग्न झालें असतां लीलावतीस वैधव्य येण्याची मुळींच भीति नको. इतकेंच नव्हे तर ती 'अष्टपुत्रा सौभाग्यवती' होईल. भास्कराचार्य कालाची अत्यंत सूक्ष्मपणें विवेचना व्हावी म्हणून मोठमोठ्या नामांकित पंडितांस व दैवज्ञांस बसवून आपण स्वतः एकसारखे घटकापात्राकडे नजर देऊन राहिले होते. लीलावती बालस्वभावानें सहजच त्या घटकापात्राच्या अत्यंत जवळ येऊन पाहत होती; इतक्यांत अकस्मात् तिच्या मस्तकावरील कांहीं दागिन्यांतून एक बारीक मोतीं जलबिंदूप्रमाणें त्या घटकापात्रांत पडून पाणी येण्याच्या सूक्ष्म छिद्राच्या तोंडावर जाऊन बसलें, व

पाणी येईनासें झालें; व तो मुहूर्त टळला. नंतर आचार्यांनीं दुसऱ्या मुहूर्तावर कन्येचा विवाह करून टाकिला. लौकरच **ली**लावती वैधव्यदु:खाग्नीनें दग्ध झाली. आतां आपल्या प्रियकन्येचें उरलेलें आयुष्य उत्तमप्रकारें जावें म्हणून **भा**स्कराचार्यांनें आपल्या कन्येस विद्यासंपन्न करण्याचें योजिलें. त्यांनीं कन्येस अंकशास्त्र व ज्योतिषशास्त्र शिकविण्यास प्रारंभ केला. आणि गीर्वाणभाषेंत तिला चांगली पटाईत करून तिच्या नांवानें एक अंकग्रंथ प्रसिद्ध केला. हा ग्रंथ केव्हां तयार झाला हें त्या ग्रंथांत लिहिलें नाहीं. परंतु त्यांच्याच 'नक्षत्रनिर्णयकर्णकुतूहल' नांवाच्या ग्रंथांत तो ग्रंथ शके ११०० सालीं लिहिला असें लिहिलें आहे. या ग्रंथांत अंकगणिताचा जो अनुक्रम आहे तो अत्यंत सुंदर आहे. त्यांत प्रथमत: परिभाषेचें निरूपण करून क्रमाक्रमानें संकलन, व्यवकलन, पूरण, हरण, वर्ग, वर्गमूल, घन, घनमूल इत्यादि अंकक्रम फारच सुबोध व अत्यंत उत्तम अशा नियमसूत्रांनीं व उदाहरणांनीं स्पष्ट केला आहे. त्यामुळें अंकगणिताचीं आदितत्वें फारच सुलभ व हृदयंगम रीतीनें समजावून देतां येतात. याच ग्रंथांत क्षेत्रफळ, घनफळ हेही विषय आहेत. **ली**लावती ही अंकशास्त्र व ज्योति:शास्त्र या दोन शास्त्रांत तर इतकी प्रवीण होती कीं तिच्याविषयीं अद्यापिही अशी एक आख्यायिका आहे; ती एकाद्या झाडाच्या खालीं बसली असल्यास फारच थोड्या वेळांत त्या झाडांचीं पानें, फळें, फुलें व डहाळ्या किती आहेत त्यांची गणना बरोबर करीत असे. याच आख्यायिकेवरून **ली**लावती शिकल्यास झाडाचीं पानें व फळें सांगतां येतात, अशी कित्येक लोकांची समजूत झालेली आहे. परंतु ही समजूत अगदीं खोटी आहे असें हल्लीं छापून प्रसिद्ध झालेलें लीलावतीचें पुस्तक ज्यांनीं पाहिलें असेल, त्यांस दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. सार्थ 'लीलावती' 'विविधज्ञानविस्तार' मासिकपुस्तकांत कै० वा० **जनार्दन बा**ळाजी **मो**डक यांनीं छापविली होती. इष्ट तर त्या पुस्तकांत पहावी. [वि० ज्ञा० विस्तार—पुस्तक ५ पृ० ११४, १७२; पु० ६ पृ० ३९, ९३, १५०; पु० ११ पृ० ५३,१५७; पु० १२ पृ० १८, ६२, २०८ पहा.] या चरणांत **'कालविपर्यासदोष'** नामक मोठा दोष आहे. याला इंग्रजींत Anachronism म्हणतात. **डेकेन्सी** नामक इंग्रजी विद्वानानें याची व्याख्या दिली आहे ती वाचण्यासारखी आहे:—

"We mean by an anachronism, in common usage, that sort of blunder when a man ascribes to one age the habits, customs or inalienable characteristics of another. This, however, may be a mere lapse of memory, as to a matter of fact, and implying nothing at all discreditable to the understanding, but only that a man has shifted the boundaries of chronology a little this way or that.................A far worse kind of anachronism, though rarely noticed as such, is where a writer ascribes sentiments and modes of thought incapable of co-existing with the sort or the degree of civilisation that attained, or otherwise incompatible with the

॥ ११२ ॥ पत्रें फळें याचीं लक्षीं[1] । तळीं पडलीं जडलीं वृक्षीं । तें मी सांगेन तूं साक्षी । गणना धरूनी पाहें[2] पां. ॥ ११३ ॥ पांच कोटी पत्रीं फळीं । पूर्वे दिशे शाखा सरळी । दहा कोटी वरी आगळीं । पांच शत दक्षिणे. ॥ ११४ ॥ परि हा नाहीं गणिताचा समय । अस्तमाना पावेल सूर्य । सायंकाळ होतां वायो । शीतल वाजूं लागला.' ॥ ११५ ॥ बाहुक म्हणे, 'करीन गणना.' । राजा म्हणे, 'न करीं प्राज्ञा ! । सूर्य न वेंचतां[3] अस्तमाना । शीघ्र गेलें पाहिजे.' ॥ ११६ ॥ बाहुक म्हणे, 'राजेश्वरा ! । संख्या करूनी परमचतुरा ! । दिवस असतां कुंडिनपुरा । तुज[4] नेईन निर्धारें.' ॥ ११७ ॥ पत्र फळांची गणना । बाहुकें मोजितां आणिली मना । रायें बोलिल्या प्रमाणा । गांठी पडली नेमस्त.[5] ॥ ११८ ॥ म्हणे, 'बहुरत्ना[6] वसुंधरा[7] । कोणी गर्व न करणें पुरा । गणितविद्या राजेश्वरा ! । अवगत नाहीं आमुतें.' ॥ ११९ ॥ राजा म्हणे, 'विद्याद्वय । गणित आणि

---

structure of society in the age or the country assigned." [De Quincey in his 'The Cæsars'.] या उताऱ्याचा सारांश असा कीं कोणत्याही देशांतील किंवा कोणत्याही काळीं चालू असलेले आचारविचार भिन्न देशांतील किंवा भिन्न काळांतील लोकांना लागूं केल्यास 'कालविपर्यास' नामक दोष संभवतो. वेनराजाच्या तोंडीं वर्तमानपत्र घालणें, धर्मराजाच्या वेळीं भीम कृष्णाला तारेनें बातमी पाठवीत होता असें वर्णन करणें, दाशरथीरामानें कालिदासाच्या उक्तीचें प्रमाण दाखविणें, भोजराजानें अकबरबादशाहाशीं लढाई करणें, कालिदासाचा व जगन्नाथ पंडिताचा वादविवाद होणें, सोलोनच्या कायद्यांप्रमाणें विक्रमानें शिक्षा सांगणें, प्रजासत्ताकसंबंधी गंभीर विचार शिवाजीकडून वदविणें, शाहूकडून अश्वमेध करविणें—इत्यादि 'कालविपर्यासदोषा'चीं उदाहरणें होत. असे दोष घडण्याचें कारण कोणत्यावेळीं कोणत्या गोष्टी झाल्या याची विस्मृति होय. हिंदुस्थानांत इतिहासाचा अभाव आहे व म्हणून कोण अगोदर झाला व कोण मागाहून झाला हें बरोबर समजत नाहीं. यामुळें 'कालविपर्यासदोष' होण्याचा पुष्कळ संभव आहे. परंतु सांप्रतस्थळीं आमच्या कवीच्या हातून जो दोष घडला तो इतिहासाच्या अज्ञानामुळें घडला असें म्हणतां येणार नाहीं. ऋतुपर्णाच्या तोंडीं भास्कराचार्यांची लीलावती घातली आहे हा कांहीं लहानसा दोष नव्हे. ऋतुपर्ण नळाच्याच वेळचा. नळ कृतयुगांत झाला हें सुप्रसिद्ध आहे, व भास्कराचार्य कलियुगांत होऊन गेले हेंही प्रसिद्ध आहे. ऋतुपर्ण व भास्कराचार्य यांच्या कालांत इतका फरक असतां आमच्या कवीच्या हातून ही चूक कशी झाली याचें आश्चर्य वाटतें !

१. लाखों पानें व फळें खालीं पडलीं आहेत—असा अर्थ. २. पहा. [मोरोपंत—वनपर्व—अ० ४ गी० २३२ पृ० ६४.] ३. जातां. ४. 'रथ' असा अन्य पाठ. ५. बरोबर. ६. बहु (पुष्कळ) रत्नें (उत्तम वस्तु) जींत ती. ७. पृथ्वी.

अक्षहृदय । तुज मी देईन, वीर्यशौर्य । जेणें होय वाढतें. ॥ १२० ॥ अश्वविद्या मातें । तुवां सांगावी उदारचित्तें । गुरुत्व शिष्यत्व दोहांतें । समसमान वसों दे.' ॥ १२१ ॥ अक्षविद्या कथिली राया । जाणता जाला अश्वहृदया । पाश देती इच्छिल्या डाया । ते दिधली नळातें. ॥ १२२ ॥ अक्षविद्या हृदयकमळीं । रिघतां बाहेर निघाला कली । कृष्णवर्ण जिव्हा काळी । रक्तनेत्र भयासुर. ॥ १२३ ॥ नळें देखतांचि तेथ । क्रोधें खड्गा घातला हात, । पुढती सांवरोनी चित्त । शांत केलें विवेकें. ॥ १२४ ॥ शाप वदों पाहे वदनीं । तों विनवी जोडुनी पाणी, । म्हणे, 'पुण्यश्लोका! करणी । तामसाची तुज नसों दे. ॥ १२५ ॥ कलियुगीं तुझी कीर्ती । विस्तारीन त्रिजगतीं, । तूतें स्मरती त्यां निश्चिती । विषबाधा असेना. ॥ १२६ ॥ तुझें चरित्र जे गाती । अथवा पुढिलातें ऐकविती । त्यांतें अक्षय भुक्ति मुक्ति । विघ्नशांति मी कर्ता. ॥ १२७ ॥ काम क्रोध लोभ मानें । ऐश्वर्याच्या मदानें । प्राणी राहाटे तें तें करणें । मज कलीचें जाण पां. ॥ १२८ ॥ नळदमयंतीचें स्मरण । करितां कलीची बाधा जाण । नाहीं नाहीं हें प्रमाण । सत्य जाण त्रिवाचे.' ॥१२९॥ ऐसा वर वदोनी मुखीं । कली रिघाला भल्लातकीं । तैंपासुनी ये लोकीं । वृक्ष निषिद्ध जालासे. ॥ १३० ॥ वमन होऊनि तात्कालिक । गेलें आंगींचें विषोदक । श्यामता लोपोनी निःशेष । वैरूप्य कांहीं राहिलें. ॥ १३१ ॥ कृष्णवर्ण लोपली छाया । सुवर्णवर्णी आंतली छाया । विलक्षणता हातां पायां । तो नावेक उरलीसे. ॥ १३२ ॥ दिवस असतां चारी घटिका । राजा वार्ष्णेय सहबाहुका । रथ पातला नगरमुखा । कुंडिनपुरा जवळिके. ॥१३३॥ नाहीं राजे, ना राजकुमर । नाहीं चतुरंग दळभार । स्वयंवरवार्ता नारीनर । नगरीं कोणी नेणती. ॥ १३४ ॥ राजा साशंक हृदयीं । म्हणे, 'ब्राह्मणें कथिलें काई । स्वयंवराची इये ठायीं । कथा वार्ता नायकों.' ॥१३५॥ ऋतुपर्ण

---

१. 'अश्वहृदय' असाही पाठ आहे. २. फांसे. ३. डाव. ४. सोंगट्यांनीं खेळण्याची विद्या. ५. शिरतां. ६. भयंकर. ७. तरवार. ८. हात. ९. तमोगुणपुरुषाची. १०. 'युगानुयुगीं' असाही पाठ आहे. ११. वागे. १२. 'सत्य आण शिवाची' असाही पाठ आहे. १३. शिरला. १४. बिब्याचे झाडांत. १५. 'निंद्य वृक्ष तो झाला' असाही पाठ आहे. १६. ओकणें, वांती. १७. काळेपणा. १८. सकल. १९. विरूपता. २०. कांति. २१. 'विरूपता' असा अन्य पाठ. २२. किंचित्. २३. अश्व, हत्ती, रथ, पदाति, हीं चार अंगें. २४. सैन्य. २५. 'विषयीं' असाही अन्य पाठ आहे.

[1]पातला कुंडिनपुरा, । भीमक पातला सामोरा । हृदयीं म्हणे, 'अति सत्वरा । कारण कोण यावया. ॥ १३६ ॥ शत योजनें दूरी पंथ । एका दिवसा यावया येथ । कवण कार्य तें यथार्थ । [2]चोजवेना [3]अनुमाना. ॥ १३७॥ नळावेगळी हे युक्ती । आणिकां नाहीं त्रिजगतीं । त्याची न देखों आकृती । हाही येथें संशय.' ॥ १३८ ॥ असो उदईक विचारूं भाव । विश्रांतीस वोपिला ठाव । भोजनसामुग्री सुदेव । राजआज्ञेनें देतसे. ॥ १३९ ॥ ऐकोनी रथाचा घडघडाट । गृहीं गोपुरीं दणदणाट । दमयंती म्हणे, 'प्रगट । हा निर्घोष नळाचा. ॥ १४० ॥ कृपा करील रमाकांत । तरी आज देखेन प्राणनाथ । आनंदसिंधु हृदयांत । हे[5]लावत सुचिन्हीं.' ॥ १४१ ॥ राजा आणि वार्ष्णेय दोन्ही । विश्रामले विश्रामसदनीं । रथ घेऊनी बाहुक गुणी । अश्वशाळे पातला.॥१४२॥ वारु करूनी श्रमातीत । आपण आसनीं बैसला स्वस्थ । दमयंती धाडी वेगें तेथ । राजदासी केशिनी. ॥ १४३ ॥ तिणें वंदुनी मस्तकें । म्हणे, 'पवित्रा ! आलासी सुखें । पर्णाद बोलिला तें मुखें । वाक्य मातें परिसवीं. ॥ १४४ ॥ ऐकूं इच्छितसे दमयंती । शोकें शोकली अहोरात्रीं । तिचीया शोका होय शांती । [6]ऐसें करीं धार्मिका ! ॥ १४५ ॥ रायासवें तिसरी प्रतिमा । तो कोण सांगें मानवोत्तमा !' । येरू म्हणे, 'वार्ष्णेयनामा । नळसारथी जाणतसां.'॥१४६॥ केशिनी म्हणे, 'गा ! [7]गुणाब्धी ! । तो सांगेल नळाची [8]शुद्धि.' । येरू म्हणे, 'कासया बुद्धि । दहा मार्गीं धांवडिसी. ॥ १४७ ॥ अपत्यें ठेवुनी तुमच्या घरीं । आपण राहिला अयोध्यापुरीं । नळवृत्तांत तो निर्धारीं । नेणे ऐसें मी जाणें. ॥ १४८ ॥ लोपोनियां रूप नाम । तीर्थें क्षेत्रें पुरें ग्राम । तापसवेषें नरेंद्रोत्तम । अटन करित वैराग्यें. ॥ १४९ ॥ मुखें बोले ऐसी वाणी । पुरुषें केली अनुचित करणी । उत्तम स्त्रिया दृष्टी वचनी । न बोलती दोषांतें. ॥ १५० ॥ अवदशेचा [9]दुष्ट संचार । जालिया अविवेकें वर्ते नर । अवगुण निंदेचा उच्चार । कुलवधू जे करीना. ॥ १५१ ॥ ते लोटुनी सूर्याचे मस्तक । पावे अक्षय ब्रह्मलोक । उमेसमान [10]वृंदारक । मान्य होय ते निर्धारें. ॥१५२॥ दोषी याचे दोष अनेक । बोलणें तो अविवेक । न बोले नाठवी तो देख । मूर्तिमंत ईश्वर. ॥ १५३ ॥ ऐसें बोलतां विचरे महीं । पूर्वीं वार्ता परिसिली

१. आला. २. कळेना. ३. 'आमुतें' असा अन्य पाठ आहे. ४. समुद्र. ५. उचंबळत. ६. 'ऐसें केलें पाहिजे' असाही पाठ आहे. ७. गुणसागरा ! ८. माहिती. ९. 'भूतसंचार' असाही पाठ आहे. १०. देव.

पाहीं । प्रस्तुत कोठें कळलें नाहीं । समीप किंवा दुस्तर.' ॥ १५४ ॥ केशिनी सांगतांचि सुवचनें । पुढती पाठवी चेष्टाचिन्हें । अवलोकोनी आपुल्या नयनें । सर्व सांग मजप्रति. ॥ १५५ ॥ केशिनी पाहे तेचिक्षणीं । भोजनसामग्री ब्राह्मणीं । आणिली तेही वन्ही पाणी । नसतां तेथें बाहुकें. ॥ १५६ ॥ तृण कवळितांचि मुष्टीं । ज्वाळा निघाल्या धडधडाटी । हस्त लावितां मृत्तिकाघटीं । गंगोदक उसळलें. ॥ १५७ ॥ क्षणामाजी केला पाक । स्वादिष्ट सुवास चोख । केशिनी म्हणे, 'अलोलिक[1] । चमत्कार देखिला'. ॥ १५८ ॥ शतपत्र[2] चंपकांची माळा । रगडुनी हातीं केली गोळा । पुढती स्पर्शतां कोमळा । सद्य साजुक परिमळ. ॥ १५९ ॥ दमयंतीनें धाडिलें मांस । स्पर्शतां जालें उष्ण सुरस । भैमी चाखतां म्हणे, 'पीयूष[3] । हस्तगुण नळाचा'. ॥१६०॥ केशिनी सांगतां कौतुक । खुणा बाणली[4] प्रत्येक । मग म्हणे, 'दोन्हीं बाळक । दृष्टीं नेऊन दाखवीं.' ॥ १६१ ॥ अपत्यें देखतांचि दृष्टीं । मोहें धांवुनी धरिलीं पोटीं । दुःख वांटोन[5] कंठीं । शोक करीत आक्रोशें. ॥ १६२ ॥ पुढती म्हणे, 'माझिया बाळां- । सारिखींहीं देखिलीं डोळां । यालागीं उपजोनी कळवळा । हृदयीं दुःख दाटलें.' ॥ १६३ ॥ परिसोनी दासींच्या वचना । दमयंती पैंवली[6] खुणा । मग मातेसी विवंचना । मनोभावें मांडिली. ॥ १६४ ॥ 'रूपावेगळा सर्व गुणीं । नैषध होय हा सुलक्षणी । मी जाऊनियां आपुले नयनीं । अवलोकीन जननीये!' ॥ १६५ ॥ पतीस पुसोनी दिधली आज्ञा । नळ-परीक्षे धाडिली कन्या । सती म्हणे, 'महाप्राज्ञा! । सत्य वायां लोपिसी. ॥ १६६ ॥ प्रकट करीं आपणीयातें । कां वधुनी जाय आपुले हातें । तुझिया वियोगाचिया व्यथे । साहूं न शकें सर्वथा. ॥ १६७ ॥ सांडूनि देवँसमूह[7] । तुतें आवडी अर्पिला देह । तो विसरोनी सर्व स्नेह । केंवि निष्ठुर जालासी? ॥ १६८ ॥ शत योजनें क्रमुनी पंथ । एके दिवशीं आणिला रथ । येवढें विद्येचें सामर्थ्य । तुजविण कोणा सांग पां?' ॥ १६९ ॥ ऐकोनी दमयंतीची वाणी । अश्रुधारा स्रवती नयनीं. । म्हणे, 'वल्लभे! बोलतां वचनीं । लज्जा मातें येतसे. ॥ १७० ॥ कली संचरला मद्यपानें । विवेकस्मरण[8] सांडिलें मनें । म्हणोनी ऐसें कुश्चित करणें । घडलें जाण सुजाणे! ॥ १७१ ॥ त्या दुर्जनें सांडिली काया । आतां बुद्धि पातली ठाया । पश्चात्ताप जाला हृदया । तो वदनीं न बोलवे. ॥ १७२ ॥

---

१. अपूर्व. २. कमल. ३. अमृत. ४. ठसली. ५. 'दाटोन' असाही पाठ आहे. ६. समजली. ७. इंद्रादिक देवगण. ८. 'विवेकविचार' असाही पाठ आहे.

शकुनीनें[1] वस्त्र नेलें गगना । मग छेदिलें अर्ध वसना । न देखवे तव वेदना । यालागीं त्यागुनी मी गेलों. ॥ १७३ ॥ कर्कोटकें केला दंश । यालागीं रूपा जाला नाश, । बाहुक नामें होऊन दास । ऋतुपर्णातें सेविलें. ॥ १७४ ॥ तुझी परिसिली स्वयंवरवार्ता । म्हणोनियां ऋतुपर्णाचिया रथा । शत योजनें क्रमुनी पंथा । कौतुक पाहों पातलों. ॥ १७५ ॥ पुढती कीजे विवाहकर्म । ऐसी माझी करणी अधम । नूतन भ्रताराचा काम । धरितां दोष तुज नाहीं. ॥ १७६ ॥ पवित्र पुरुषातें पतिव्रता । त्यागील न घडे सर्वथा । दूत सांगती स्वयंवरवार्ता । भूमंडळीं रायातें.' ॥ १७७ ॥ ऐसें अनुवादितां नल, । भैमी हस्तें पिटी कपाळ[2] । म्हणे, 'साक्ष त्रैलोक्यपाळ । अंतरात्मा कर्मातें. ॥ १७८॥ हृदयीं प्राण, सूर्य चक्षीं[3], । मनीं चंद्रमा, पावक[4] कुक्षीं, । माझिया स्वधर्माची साक्षी, । प्रत्यक्ष होउनी देती कीं. ॥ १७९ ॥ जरी आचरें पापलेश । तरी या शरीरा हो कां नाश । नळावेगळा आन[5] पुरुष । जागृतीं स्वप्नीं जाणेना'. ॥ १८० ॥ अंतरिक्ष वायो देवो । म्हणे, 'पवित्र वोळखे भावो । दमयंतीच्या विषयीं वावो[6] । विकल्प[7] तुझा सर्वही. ॥ १८१ ॥ हिचा परिहारु म्यां बोलिजे । हिची उपमा हिसीच साजे । सांडुनी विकल्पाचें ओझें । पतिव्रता शांतवीं. ॥ १८२ ॥ तुतें शोधावयाचे आर्ती । स्वयंवरशब्दें साधिली युक्ति । अन्यथा असेल तरी क्षिती । भार सांडील विश्वाचा. ॥ १८३ ॥ आतां संशय सोडुनी मना । आलिंगीं हे पवित्रांगना[9] । इंद्रसेनी[10] इंद्रसेना[10] । अंकासनीं बैसवीं. ॥ १८४ ॥ हृदयीं कवळी हे कामिनी[11] । कडिये घेईं बाळकें दोन्हीं । विशेष बोलसी तरी हे वाणी । आण[12] विष्णु शिवाची.' ॥ १८५ ॥ दिव्य दुंदुभी लागल्या गगनीं । आशीर्वादें गर्जती मुनी । दिव्याभरणें देवांगनीं । दमयंतीवरी टाकिलीं. ॥ १८६ ॥ ऐसें ऐकतां उत्तर । उभय लोकीं जयजयकार । वर्षले सुमनांचे[13] भार । अमरगणीं विमानीं. ॥ १८७ ॥ करितां कर्कोटकाचें स्मरण । कुरूपतेचें जीर्ण वसन । दृष्टीवातें उडोनी पूर्ण । नलस्वरूप प्रगटलें. ॥ १८८ ॥ अभ्रें फिटतां जैसा भानू । दृष्टीं दिसे देदीप्यमानू । तेंवि देखतां लावण्यधनु । नयनपद्में निवालीं. ॥ १८९ ॥ परस्परें झोंबोनि कंठीं । आलिंगनीं पडली मिठी । परमानंदें कोंदली सृष्टी । सुख संतोष सर्वांतें. ॥ १९० ॥ नाठवे वनवासाचें दुःख । न स्मरे वियोगशोक । ब्रह्मांड-

---

१. पक्ष्यानें. २. 'भाळ' असाही पाठ आहे. ३. नेत्रांत. ४. अग्नि. ५. अन्य. ६. व्यर्थ. ७. संशय. ८. पृथ्वी. ९. शुद्ध स्त्री. १०. अपत्यें. ११. ललना. १२. शपथ. १३. पुष्पांचे.

घटीं भरिला हरिख[1]। जो कल्पांतीं सरेना. ॥१९१॥ प्रीतिपडिभरें[2] कळवळुनी।
प्रवेशला राजसदनीं । नारी करिती अक्षवाणीं[3] । एकासनीं दोहींतें. ॥ १९२ ॥
करुनी पादप्रक्षालन । करविलें अभ्यंगमर्दन । सारूनियां[4] सुखभोजन । सुमन-[5]
शेजे पहुडलीं. ॥ १९३ ॥ मन मीनलें हृदयकमळीं । परस्परें क्षेमें[6] कवळीं ।
उभय तनू जाल्या मेळीं । जावळ[7] फळापरी. ॥ १९४ ॥ विदेशीं निधान[8]
हारपलें । तेंचि आंगणीं सांपडलें । हृदयमांदुसे[9] सांठविलें । आंवळिलें भुजग्रंथीं.
॥ १९५ ॥ म्हणती, 'ब्रह्मींचें अक्षय सुख । द्वैतदर्शनाविण हीन तुक'. ।
**न**ळ**द**मयंतीचा [10]हरिख । सांठवेना ब्रह्मांडीं. ॥ १९६ ॥ पुरलें मनोरथाचें
आर्त । **द**मयंतीतें आल्हाद बहुत । क्लेश भोगिले ते म्हणत । तपश्चर्या मज
फळली. ॥ १९७ ॥ शांतिसुखाची शार्वरी[11] । भोगितांचि भानु उदय करी ।
मात[12] विस्तारली नगरीं । तेणें[13] आल्हाद पौरजां. ॥ १९८ ॥ **भी**म पातला
दर्शना, । प्रीतीनें दिधलें आलिंगना । म्हणे, 'पारणें झालें नयना । बहुतां दि-
वशीं आमुतें.' ॥ १९९ ॥ महोत्सव मांडिला नगरीं । गुढिया तोरणें घरोघरीं।
गर्जना मांडिली[14] मंगळतुरीं[15] । तेणें अंबर[16] कोदलें. ॥ २०० ॥ शर्करा फळांचे
पर्वत । जना वांटिले अपरमित । धनें वसनें असंख्यात । कुबेर केले मागते[17].
॥ २०१ ॥ **सु**देवा आणि **प**र्णादातें । धेनु रत्नें अपार[18] वित्तें । ग्रामें रत्नें
अपार नगरातें । अग्राहारें दीधलीं. ॥ २०२ ॥ **ऋ**तुपर्ण करी विज्ञापना, ।
'नेणतां घडली जे अवज्ञा । ते कृपासमुद्रें दीना । क्षमा केली पाहिजे.'
॥ २०३ ॥ **न**ळ बोले प्रतिवचन, । 'तुवां रक्षिला माझा प्राण । तुझिया उ-
पकारा उत्तीर्ण । केंवि होय सांग पां? ॥ २०४ ॥ उचिता वोपोनियां संपत्ति ।
**अ**योध्ये धाडिला **अ**योध्यापति । **वा**र्ष्णेय नामा **न**ळसारथी । पूर्वाधिकारीं
राहिला. ॥ २०५ ॥ मास एक क्रमुनी तेथें । आज्ञा पुसोनी **वि**दर्भातें ।
स्वल्प [19]परिवार सांगातें । घेउनियां चालिला. ॥ २०६ ॥ वहना आपणा दिव्य
रथ । दिव्य वारू[20] पांच शत । षोडश हस्ती मदोन्मत्त । पायदळ षट् शतें.
॥ २०७ ॥ ऐसें घेऊनी राजेश्वरा । पातला **वी**रसेननगरा । जनसमुदाय सा-

---

१. हर्ष. २. अतिशय. ३. वाण. (बायका देतात तें.) ४. करून, उरकून. ५. पुष्पशय्येवर. ६. आलिंगन. 'सर्व इंद्रियां क्षेम कवळीं' असा अन्य पाठ आहे. ७. जुळ्या. ८. ठेवा. ९. पेटी. (मंजूषा=मांदुस.) १०. हर्ष. ११. रात्र. १२. वार्ता. १३. 'परमानंद जगातें' असाही पाठ आहे. १४. 'होत' असाही पाठ आहे. १५. वाद्य. १६. आकाश. १७. याचक. १८. 'अ-परमितें' असाही पाठ आहे. १९. सेवकगण. २०. घोडे.

मोरा । योजन एक धांविन्नला. ॥ २०८ ॥ राहोनी नगराबाहेर क्षिती । निरोप धाडिला पुष्कराप्रति । द्यूत खेळावया पुढती । पण घालूनी राज्याचा. ॥ २०९ ॥ 'जरी न येसी द्यूतकाजा । तरी सिद्ध होई निर्वाण झुंजा । घालुनियां प्राणाची पैजा । महा युद्धा प्रवर्ते'. ॥ २१० ॥ पुष्कर म्हणे, 'अभाग्यमूर्ती । पैजा जिंतली संपत्ति । भोगिली नाहीं रे! दमयंती । ते वासना उरलीसे. ॥ २११ ॥ आज पुरवीन मनींची आशा । पुढती धाडीन अरण्यवासा.' । खेळ द्यूत म्हणोनी फांसा । कपटबुद्धि ढाळितु. ॥ २१२ ॥ राज्यमदें मदोन्मत्त । पुष्करें मांडिलेंसे द्यूत । प्रथम डावीं समस्त । राज्य [1]वैभव हारविलें. ॥ २१३ ॥ गेलें कलीचें साह्यबळ । ऋतुपर्णाची विद्या सुफळ । जयवंत जाला राजा नळ । हार आली पुष्करा. ॥ २१४ ॥ शिरच्छेदना उभविला हात । सर्वेंचि जाला कृपावंत । कळीच्या अपराधें याचा घात । व्यर्थ करणें कासया? ॥ २१५ ॥ म्हणे, 'जीवदान दिधलें, जाईं । आपुले गृहीं स्वस्थ राहीं, । माझी आज्ञा पाळुनी गृहीं । दासमर्यादें वर्तावें.' ॥ २१६ ॥ समुद्रवयलांकित[2]धरित्री । राज्य पावला एकछत्री । पुत्र कन्या सह [3]कलत्रीं । ऐश्वर्य भोगी स्वानंदें. ॥ २१७ ॥ अश्वमेध राजसूय याग । [4]असंख्य संपादिले सांग । इच्छादानभूषणीं जग । शृंगारिलें पवित्रें. ॥ २१८ ॥ इहलोकीं [5]जोडुनी कीर्ति । परलोकीं साधिली मुक्ति । पुण्यश्लोक [6]चक्रवर्ती । नळनामा सुपवित्र. ॥ २१९ ॥ यापरी कष्ट भोगुनी क्षिती । सत्व रक्षूनी जोडिली कीर्ति । धर्मा! तुझे कष्ट किती । नळापुढें सांग पां? ॥ २२० ॥ बंधु परिहारिती क्लेशा । द्रौपदीसंगें क्रमिती [7]निशा । साधुसेवनें पवित्र पुरुषा । दोषनाश होतसे. ॥ २२१ ॥ [8]चाऱ्ही पुरुषार्थ धरुनी चित्तीं । सत्यें जोडावी सत्कीर्ति । करुनी शत्रुकुळाची [9]शांति । अक्षय राज्य [10]पांवसी. ॥ २२२ ॥ ऋतुपर्णें दिधली नळा । ते तुज देतसें नृपाळा । अक्षय अक्षविद्या कुशळा । धर्मा ऋषीनें दीधली. ॥ २२३ ॥ आज्ञा मागोनी बृहदश्वा । आश्रमा गेला कुरुपार्थिवा । नलोपाख्यानश्रवणें जीवा । चारी पुरुषार्थ जोडती. ॥ २२४ ॥ लीलाविश्वंभर ईश्वरू । कवि गुरूचा आदिगुरु । त्याचेनि प्रसादें मुक्तेश्वरू । निरोपीतसे [11]संतोषें. ॥ २२५ ॥

---

१. 'सर्व' असाही पाठ आहे. २. पृथ्वी. ३. स्त्री. ४. 'अपार' असा अन्य पाठ. ५. 'निर्दोष कीर्ति' असाही पाठ आहे. ६. सार्वभौम राजा. ७. रात्र. ८. अर्थ, धर्म, काम, मोक्ष हे चार. ९. नाश. १०. 'पावाल' असा अन्य पाठ. ११. 'संतातें' असाही पाठ आहे.

इति श्रीभारते वनपर्वणि । 'नलोपाख्यान'कथाश्रवणीं । दोष दवडोनी निरोपणीं । सादर श्रोतीं परिसावें. ॥ २२६ ॥

## अध्याय नववा.

चौघे बंधु आणि पांचाळी । वनीं वसती एके मेळीं । अर्जुनवियोगें हृदयकमळीं । परम दुःखी समस्तें. ॥ १ ॥ बृहदश्वा गेलियावरी । ब्रह्मनिष्ठ ब्रह्मचारी । नारद मुनी कृपे करी । धर्मभेटी पावला. ॥ २ ॥ साष्टांग करूनियां[१] नमन । विनीत भावें करी प्रश्न, । म्हणे, 'स्वामी! तूं सर्वज्ञ । परम गुरु आमुतें. ॥ ३ ॥ केलिया सकळ पृथ्वीप्रदक्षिणा । कर्ता पावेल फळ कवणा? । भूमंडळीं[२] तीर्थें[३] नाना । केलिया कवण सुकृत?' ॥ ४ ॥ नारद म्हणे, 'ऐक स्वस्थ । गंगाद्वारीं पितृव्रत । भीष्म करितां अकस्मात । पुलस्त्य तेथें पातला. ॥ ५ ॥ त्याप्रति भीष्माचार्यें जाण । तुझ्याचि ऐसा केला प्रश्न । ऋषीनें केलें निरूपण । तेंचि तूं ऐक धर्मज्ञा. ॥ ६ ॥ जो शुचिर्भूत शुद्धमती । ईश्वरभावना सर्वभूतीं[४] । तो वसे सर्वदां तीर्थीं । तीर्थें वसती त्यासंगीं. ॥ ७ ॥ तीर्थीं न[५] वसतां तीर्थवास । सत्यवंत[६] नित्य निर्दोष । तीर्थीं वसतां पुण्य लेश । तीर्थें एका नेंदिती. ॥ ८ ॥ मत्सर नैष्ठुर्य भूतद्वेष । भजनमार्गींचा उपहास । तीर्थें त्याचा घेती त्रास । कीटकदेशीं[७] त्या वसती. ॥९॥ कामक्रोधलोभ त्रयां । स्पर्श न करी जयाची काया[८] । तो तीर्थवासी जाण राया! । तीर्थें पाय वंदिती. ॥१०॥ विष्णुस्मरण शिवस्मरण । दोघीं वसविलें ज्याचें वदन । तोचि तीर्थवासी जाण । तीर्थें चरण वंदिती. ॥ ११ ॥ इंद्रियनियमाचा[९] व्यसनी[१०] । सत्य मधुर असे वाणी[११] । अहंकार ज्याचिया मनीं । संचरेना सर्वथा. ॥ १२ ॥ तो सकल [१२]तीर्थांचा धात्रा । तीर्थें करिती त्याची यात्रा । पादोदकालागीं पवित्रा । तीर्थें माथा वोढवती. ॥ १३ ॥ तीर्थीं असोनी इच्छारहित । प्रतिग्रहा[१३] न घाली हात । यथालाभें संतोषभरित । तो 'तीर्थस्वरूप' जाणावा. ॥ १४ ॥ परधनीं

---

१. नम्रपणें. २. 'भूमंडळींचीं' असाही पाठ आहे. ३. 'सर्वज्ञा' असाही पाठ आहे. ४. प्राण्यांच्या ठिकाणीं. ५. 'नसतां' असा अन्य पाठ आहे. ६. 'सत्वनिष्ठ' व 'सत्यव्रत' असे अन्य पाठ आहेत. ७. 'कीटक दंश त्या करिती' असा अन्य पाठ. ८. शरीर. ९. 'नित्यनियमाचा' असा अन्य पाठ. १०. 'आसनीं' अन्य पाठ. ११. भाषण. १२. 'सृष्टीचा' असें पाठांतर. १३. दान घेणें.

अंधत्व ज्याचिया नयना । परस्त्री पहातां [1]क्लीबत्व मना, । परापवादीं मूकत्व वदना । तो जनक जाण तीर्थांचा. ॥ १५ ॥ मन इंद्रियनिग्रहकारी। तो गृहीं असोनी [2]जान्हवीतीरीं । तीर्थीं असोनी अनाचारी । तो कीटकवासी जाणावा. ॥ १६ ॥ सत्यशील दृढवृत्ती । आत्मभावना सर्वभूतीं । क्रोध कधीं का [3]नातळे शांती । तो तीर्थीं सर्वी सेविजे. ॥ १७ ॥ [4]सुबुद्धशील विद्यातीर्थीं । साधु सुस्नात सत्यतीर्थीं । कुलांगना लज्जातीर्थीं । पवित्र होती जाण पां. ॥ १८ ॥ धनाढ्य निर्दोष दानतीर्थीं । पाप निःपाप गंगातीर्थीं । क्षत्रिय राजे धारातीर्थीं । प्रक्षाळिती [6]अघातें. ॥ १९ ॥ योगी आत्मज्ञानतीर्थीं । आत्मस्वरूप [7]स्वयंज्योती । [8]श्रवणादिक नव ही तीर्थीं । भक्ति होती [9]हरिरूपें. ॥ २० ॥ असो निरूपणाची युक्ती । जाणती अथवा नेणती । [10]भक्तां होय मोक्षप्राप्ती । [11]सत्य जाण निर्धारें. ॥ २१ ॥ ऋषीश्वरीं वेदवचनीं । महाफळें [12]कल्पिलीं यज्ञीं । तीं यज्ञफळें तीर्थस्नानीं । वेदवाणी [13]अनुवादे. ॥ २२ ॥ तें प्रमाण करूनियां गंगापुत्रा । ज्या म्यां केल्या तीर्थयात्रा । श्रवणफळालागीं सुपवित्रा । कर्णकूपिका [14]वोडवीं'. ॥ २३ ॥ भारतीं सत्यवतीचा [15]कुमर । तीर्थें बोलिला [16]शतें सहस्र । तितकीं सांगतां सविस्तर । दुजें भारत होऊं पाहे. ॥ २४ ॥ यालागीं श्रेष्ठ एकदोनी । तीर्थें परिसवूं श्रोतयां श्रवणीं । सकळ तीर्थफळांच्या श्रेणी । बांधुनी [17]देऊं एकदां. ॥ २५ ॥ कृतयुगीं मुख्य पुष्कर, । त्रेतीं नैमिषारण्य पवित्र, । द्वापारामाजी कुरुक्षेत्र, । गंगा श्रेष्ठ कलियुगीं. ॥ २६ ॥ गोदा जान्हवी [18]रेवा पाहीं । कृष्णा [19]वेणी जलप्रवाहीं । 'गंगा'शब्द यांच्या ठायीं । नेमिलासे निर्धारें. ॥ २७ ॥ पृथ्वी निर्मितां विधाता । आधीं निर्मी पुष्करतीर्था । तेथील महिमा बोलतां । माझेनीही न बोलवे. ॥ २८ ॥ पुलस्त्य म्हणे, 'मन्मथजिता । भीष्माचार्या ! सत्यव्रता । आधीं जाउनी पुष्करतीर्था । मग आणिक वंदावीं. ॥ २९ ॥ दहा सहस्र महातीर्थें । तुलने घा-

१. नपुंसकत्व. २. भागीरथी. ३. 'घटिका' असा अन्य पाठ. ४. 'शुद्ध' असा अन्य पाठ. ५. 'सुस्नात होती संकल्पें' असा अन्य पाठ. ६. पाप. 'आपणातें' असा अन्य पाठ आहे. ७. 'स्वयें होती' असा अन्य पाठ. ८. श्रवणादि नवविध भक्तीविषयीं अध्याय ११ ओंवी २७ यावरची टीप पहा. ९. 'प्रिय हरिहरां' असाही पाठ आहे. १०. 'शरीर प्रक्षाळितां तीर्थीं' असाही पाठ आहे. ११. 'मोक्ष' असा अन्य पाठ. १२. मानिलीं. १३. 'यथार्थ' असाही पाठ आहे. १४. पुढें कर. १५. व्यास. १६. अ० ८३ श्लो० २१ पहा. १७. 'दाऊं' असा अन्य पाठ. १८. नर्मदा. १९. 'वेणि' व 'वेण्या' असे अन्य पाठ आहेत.

लूनी तुळितां हातें। पुष्करींचा भाग शतें। समानता न पवती. ॥ ३० ॥ दहा सहस्र वर्षेंवरी। वास करितां गंगातीरीं। पुष्करामाजी एक रात्री। वसतां ते फळ पावती. ॥ ३१ ॥ त्या वंदोनी तीर्थोत्तमा। जंबूमार्ग तंदुलिकाश्रमा। अगस्त्यकण्वाश्रमा। श्रीजुष्ट जाण त्यापुढें. ॥ ३२ ॥ धर्मारण्य महाकाल। कोटितीर्थें असती विशाळ। [1]भद्रवर उमापतिस्थळ। पुढां नर्मदा पवित्र. ॥ ३३ ॥ दक्षिणासिंधू चर्मण्वती। हिमवंत अर्बुदाचल क्षिती। प्रवेशावया पाताळपंथीं। छिद्र जेथें महीतें. ॥ ३४ ॥ [2]पूर्वें श्रेष्ठ वसिष्ठाश्रम। पिंगलतीर्थ [3]प्रभास परम। सरस्वती सागर सिंधूत्तम। [4]ब्रह्मतुंग इत्यादि'. ॥ ३५ ॥ हीं मुख्य करुनी शत सहस्र। वदला पुलस्त्य ऋषीश्वर। तें परिसोनी गंगाकुमर। त्याचिरीती वर्तला. ॥ ३६ ॥ रहस्य वदोनी भीष्माप्रती। [5]अदृश्य जाला मुनि पुलस्ती। त्याचे [6]श्रवणें पवित्र मूर्ती। [7]चारी पुरुषार्थ पावला. ॥ ३७ ॥ कपट[8]पाश धरिले करीं। तेव्हांच अवदशा तव शरीरीं। प्रवेशली ते नानापरी। पीडा करी जाण पां. ॥ ३८ ॥ काया प्रक्षाळितां तीर्थीं। पुण्य शरीरीं करील वसती। सर्व दोषां होउनी [9]शांती। अष्ट ऐश्वर्य पावसी. ॥ ३९ ॥ आतां लोमश येईल एथें। तो दावील तेणेंचि पंथें। द्रौपदी बंधुत्रय सांगातें। तीर्थयात्रे निघावें.' ॥ ४० ॥ ऐसें सांगूनी नारदमुनी। जाता जाला तेचि क्षणीं। धौम्य म्हणे, 'विवेकखाणी!। तीर्थयात्रा म्यां केली. ॥ ४१ ॥ तेही कांहीं परिसवूं तूतें। मीही येतसें सांगातें। भूप्रदक्षिणा जेणें पंथें। केली तेंही ऐक पां. ॥ ४२ ॥ पूर्वदिशे तीर्थाटन। करितां आधीं नैमिषारण्य। [10]गोमतीतीर अतिपावन। वसतिस्थान ऋषींचें. ॥ ४३ ॥ [11]ब्रह्मगया फल्गुतटीं। तेथें पितृगणांच्या कोटी। पाषाणरूपें फल्गूचे वाळवंटीं। अनंतकाळ तिष्ठती. ॥ ४४ ॥ वंशज येउनी गयावर्जनीं। तृप्ती करील पिंडदानीं। यास्तव अक्षय्य [12]ब्रह्मभुवनीं। वास घडे आमुतें. ॥ ४५ ॥ यालागीं उत्तम पुरुष जाण। गयेस देती पिंडदान। देव त्यातें म्हणती धन्य। येर पाषाण नरदेही. ॥ ४६ ॥ भारद्वाजाचा आश्रम। गंगायमुनेचा संगम।

---

१. 'भैरवदेव' असा अन्य पाठ. २. 'पुढें' अन्य पाठ. ३. 'पवित्र' असा अन्य पाठ. ४. 'प्रलतुंग' असा अन्य पाठ आहे. ५. अ० ८५ श्लो० ११३ पहा. ६. 'वाक्यें' असाही पाठ आहे. ७. धर्म अर्थ काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ. ८. फांसे. ९. नाश. १०. 'गौतमीतीर' असाही पाठ आहे. ११. 'ब्रह्मयाग' असाही पाठ आहे. १२. 'स्वर्गभुवनी' असाही पाठ आहे.

प्रयाग 'तीर्थराज' हें नाम । तया ठाया बोलिजे. ॥ ४७ ॥ वैकुंठ कैलास एक मिळणी । काशीरूपें पातले धरणी । म्हणोनी धूर्जटी[1] मुरारी[2] दोन्ही । एके ग्रामीं वसिन्नले. ॥ ४८ ॥ बिंदुमाधव आणि धूर्जटी । सुखसंवाद करिती गोष्टी । मोक्ष विके फुकासाठीं । समस्तांतें सारिखा. ॥ ४९ ॥ कौशिकी नदी परम । विश्वामित्राचा आश्रम । शरयूशोणभद्रसंगम । पूर्वप्रयाग बोलिजे. ॥ ५० ॥ तेथूनी सहस्रमुखी गंगा । ऐक्यें मीनली[3] सिंधुओघा । स्मरणें पावन करी जगा । दर्शनें सायुज्य रोकडें. ॥ ५१ ॥ हिरण्यबिंदु तीर्थोत्तम । कालंजर पर्वतनाम । अगस्त्याश्रम पवित्र[4] परम । महेंद्र पर्वत त्यापुढें. ॥ ५२ ॥ भार्गवाश्रमीं गंगाआप[5] । ब्रह्मशाला[6] धूतपाप । मंगलीयकेदारदर्शनें[7] ताप । संसारींचा परिहरे. ॥ ५३ ॥ मतंग कुंडोद देववन । बाहुदा नदी नद जाण । हे मुख्य करुनी जन पावन । कोटितीर्थें पूर्वेचीं. ॥ ५४ ॥ आतां तीर्थें दक्षिणदिशे । तींही आयका सावकाशें । श्रवणें कोटि पाप नासे । दर्शनें मोक्ष आयता. ॥ ५५ ॥ गोदा तापी पयोष्णी । भीमा कृष्णा तुंगा वेणी । उभय कावेरी ताम्रपर्णी । दक्षिणदिशे प्रसिद्ध. ॥ ५६ ॥ मार्कंडेय नृगाश्रम । वराहतीर्थ पवित्र परम । माठरवन कण्वाश्रम । वरुण स्रोतसगिरी. ॥ ५७ ॥ गंगादि सरितांच्या[8] सेवनीं । जितुकें पुण्य लाहे प्राणी । तितुकें पयोष्णीचें पाणी । स्पर्शतां फळ लाहिजे. ॥ ५८ ॥ वेदीतीर्थ शूर्पारक । जमदग्नीचा आश्रम देख । चंद्रतीर्थ आणि अशोक । पाषाणतीर्थ त्यापुढें. ॥ ५९ ॥ पांड्य देशामाजी जाण । अगस्त्यतीर्थ आणि वारुण । कुमारीतीर्थ अतिपावन । सिंधुपारीं पवित्र- ॥ ६० ॥ ताम्रपर्णी संगमीं विमळें । निपजती माणिकें मुक्ताफळें । सुवर्ण खाणी सरोज नीळें । स्थळस्थळीं प्रसवती. ॥ ६१ ॥ गोकर्ण जें कां समुद्रतीरीं । तृणवृक्षसहित[10] देवगिरी । वैडूर्य पर्वतापरिसरीं । अगस्त्याश्रम साजिरा. ॥ ६२ ॥ सुराष्ट्रीं चमसोद्भेदनपंथीं । प्रभास पिंडारक तें क्षिती । तेथुनी पुढां द्वारावती । सप्तम[11] पुरी मोक्षाची. ॥ ६३ ॥ आतां पश्चिमेमाजी अवधारीं । रेवा[12] सिप्रा अवंतिपुरी[13] । विश्रवसुकुबेराश्रम निर्धारीं । वैदूर्यशिखर पर्वत. ॥ ६४ ॥ पुण्य[14]

---

१. शिव. 'त्रिपुरारी' असाही पाठ आहे. २. विष्णु. ३. मिळाली. ४. 'तामसाधम' असाही पाठ आहे. ५. उदक. ६. 'निर्मळ शुभ्र न उरे पाप' असाही पाठ आहे. ७. 'मंगलकेदार' असाही पाठ आहे. ८. नद्यांच्या. ९. रघुवंश–सर्ग ४ श्लोक ५० पहा. १०. 'तृण सोमांक देवेश गिरी' असाही पाठ आहे. ११. सातवी. १२. नर्मदा. १३. 'औदुंबरी' असा अन्य पाठ. १४. 'प्रफुल्लनंदा ही नदी' असाही पाठ आहे.

तीर्था महानदी । विश्वामित्रसामर्थ्यसिद्धी । दिव्या ऱ्हदिनी निर्मिली व्याधी । जन्ममृत्यु देवडावया. ॥ ६५ ॥ कक्षसेनाश्रम च्यवनाश्रम । जंबूमार्ग शमीनाश्रम । केतुमाल पवित्र परम । मेध्या तीर्थ जाण पां. ॥ ६६ ॥ स्तुपित पर्वत गंगारण्य । पितामह सैंधवारण्याश्रमाजाण । पुष्करादि मुख्य करून । तीर्थे अपार पश्चिमे. ॥ ६७ ॥ आतां आइक उत्तरपंथीं । अग्निशिर यमुना सरस्वती । वालखिल्याश्रम दृषद्वती । न्यग्रोधाख्य प्रसिद्ध. ॥ ६८ ॥ पांचालदाल्भ्याश्रम निःपाप । पलाशतीर्थ विशाखयूप । गंगाद्वारकनखलआप । स्पर्शतां मोक्ष तापसां. ॥ ६९ ॥ भृगुतुंग पुरुपर्वत । विशाल बदरी जगविख्यात । नारायण स्वयें जेथ । तपश्चर्या करीतसे. ॥ ७० ॥ नदी उष्णोदकशीतोदका । रत्नपाषाणसुवर्णवालुका । बदरीमहिमा सहस्त्रमुखा । वर्णवेना निर्धारें. ॥७१॥ स्वल्प कांहीं वदलों वाणी । अटतां देखसी अपार नयनीं । धौम्य सांगे तेच क्षणीं । लोमश तेथें पातला. ॥ ७२ ॥ तो मुनिवर्य देखोनि नयनीं । धर्मे मस्तक ठेविला चरणीं । नकुल सहदेव याज्ञसेनी । भीमसेनें वंदिला.॥७३॥ वंदूनी चरणतीर्था । पुष्पांजली वोपिली माथां । प्रसन्नमुखें मग सुवार्ता । धर्मराज विचारी. ॥ ७४ ॥ 'कोठूनी येणें जाणें कोठवरी, । एथें कीं वास्तु वा पुढारी.' । लोमश म्हणे, 'गा! निर्धारीं । येणें एक तुजपाशीं. ॥७५॥ शक्रपार्थी प्रेरणें । तुजचि प्रती जालें येणें । बंधूची सुवार्ता सांगणें । परिहरणें तव चिंता. ॥ ७६ ॥ शक्राचिया अर्धासनीं । स्वर्गवैभवीं लोकनयनीं । तें देखोनी माझे मनीं । परम आश्चर्य वर्तलें. ॥ ७७ ॥ मनुष्यदेहीं स्वर्गसुख । भोगितां नाहीं देखिला एक । अर्जुनाचें भाग्य चोखें । ऐक वाचे न वदवे. ॥ ७८ ॥ ब्रह्मशिरोनाम अस्त्र । त्रैलोक्यातें अनिवार । प्रसन्न होउनी श्रीशंकरें । पार्थालागीं दीधलें. ॥ ७९ ॥ पाशुपत दिधलें रुद्रें । लोकपाळीं दिधलीं शस्त्रें । तेणें तुमच्या शत्रूंचीं गात्रें । खंडविखंड होतील. ॥ ८० ॥ सरला अवदशेचा काळ । किंचित् उरला कर्ममळ । तो तीर्थें क्षाळुनी विमळ । स्वधर्म केला पाहिजे. ॥ ८१ ॥ प्रार्थना केलीसे पार्थें । लोमश ऋषीचे सांगातें । भूमंडळींचीं पवित्र तीर्थें । विलोकावीं ये काळीं. ॥ ८२ ॥ यासी विलंब न कीजे

---

१. 'नरीपार निर्मिल्या व्याधी' असाही पाठ आहे. २. 'खंडावया' असाही पाठ आहे. ३. 'मेधा' असाही पाठ आहे. ४. 'विश्व' असा अन्य पाठ.. ५. 'सैंधवारण्य' असाही पाठ आहे. ६. शेषास. ७. फिरतां. ८. अ० ९१ श्लो० १-१० पहा. ९. द्रौपदी. १०. अ० ९१ श्लो० ६ पहा. ११. 'अधिक' असाही पाठ आहे. १२. अ० ९१ श्लो० ११ पहा.

येक क्षण । आतांचि केलें पाहिजे गमन । तीर्थपंथीं हो दर्शन । पार्थाचेंही
लाधसी. ॥ ८३ ॥ विलोकीं सुबुद्धीचा मार्गू । ब्रह्मऋषीचा समुदायसंघू । तो
हस्तिनापुरा धाडूनी लघू । तुवां जालें पाहिजे. ॥ ८४ ॥[1]प्रज्ञाचक्षु राया भीष्मा ।
तुझिये वचनीं स्नेह प्रेमा । पावूनियां सुखविश्रामा । पाळिती द्विजांतें. ॥ ८५ ॥
कांहीं पाठवीं द्रुपदाप्रती । तोही राजा धर्ममूर्ती । तुझें वचन मानूनी प्रीती ।
सांभाळील ऋषींतें.' ॥ ८६ ॥ लोमशाचेनि आज्ञाशब्दें । धर्में सांडिलीं ब्रह्मवृंदें ।
धृतराष्ट्रभीष्में आणि द्रुपदें । ईश्वरातुल्य मानिलीं. ॥ ८७ ॥ पुढती धर्माचें
आगमन । तंववरी केलें द्विजपालन । [3]जैसें वेदविहित वचन । देवतार्चन निय-
माचें. ॥ ८८ ॥ यावरी स्वयें व्यास भगवान । नारद पर्वत दोघेजण । धर्में
करितां तीर्थगमन । भेटीलागीं पातले. ॥ ८९ ॥ देखोनियां ऋषिसज्जना ।
अत्यंत आल्हाद कुरुनंदना । सुमुहूर्तें नैमिषारण्या । तेचि दिवशीं पातला.
॥ ९० ॥ क्रमूनी मार्गशीर्ष मास । पौष मासीं कुरुनरेश । निघता झाला
जेंवि महेश । नाशावया दुरितातें. ॥ ९१ ॥ धर्म चालिला तीर्थासी । हें
ऐकोनी वनतापसी । अपार पातले तयांसीं । समागमें घेतलें. ॥ ९२ ॥ लोमश
म्हणे, 'कुरुनंदना । हे तिसरी आवृत्ति तीर्थाटणा । तुझेनी धर्में बहु ब्राह्मणां ।
तीर्थयात्रा घडेल.' ॥ ९३ ॥ वंदोनी व्यासचरणा । नारदपर्वतांची आज्ञा ।
धौम्यलोमशसंगीं जाणा । नैमिषारण्या पातले. ॥ ९४ ॥ सारुनी गोमतीचें
स्नान । द्विजां दीधलें अपार धन । जें कां देउनी गेला श्रीकृष्ण । धृष्टद्युम्न
आवडी. ॥ ९५ ॥ कन्यातीर्थ अश्वतीर्थ । कालकोटि गवांतीर्थ । बाहुदा
विप्रप्रस्थ । तीर्थें मार्गीं वंदिलीं. ॥ ९६ ॥ तेथूनी पातले प्रयागोत्तमा । गंगा-
यमुनांचिया संगमा । अवलोकुनी तीर्थमहिमा । श्रवण केला पाहिजे. ॥ ९७ ॥
तो प्रयाग तीर्थराज । स्नानमात्रीं प्राणी सहज । उल्लंघूनी विष्णुसायुज्य । पूर्ण-
ब्रह्मीं समरसे. ॥ ९८ ॥ तेथूनी वाराणसी पुरी । मनकर्णिका गंगातीरीं ।
मुक्तिदासी घरोघरीं । जलवाहिनी शिवाज्ञा. ॥ ९९ ॥ विश्वनाथ बिंदुमा-
धव । धुंडी काळभैरव । अवलोकितां शिववैभव । जीव तत्काळ पावती.
॥ १०० ॥ पुढें गया देखिली दृष्टी । तेथें पितृगणांच्या कोटी ।
फल्गुचिये वाळवंटीं । अहोरात्र तिष्ठती. ॥ १०१ ॥ वंशींचे येति उदंड ।

---

१. धृतराष्ट्र. २. 'धाडिलीं' असाही पाठ आहे. ३. 'जैसें वेदवचन मान्य' असाही पाठ आहे.
४. 'तैसें त्यांहीं मानिलें' असाही पाठ आहे. ५. शंकर. ६. 'बाहुदा नदी विप्रप्रस्थ' असाही
पाठ आहे. ७. 'श्रवणमात्रीं' असाही पाठ आहे. ८. 'पाणी वाहती' असाही पाठ आहे.

शमीपत्र प्रमाण पिंड । गयेसी देतां मोक्ष सुरवाड । सप्तगोत्रेंसी आमुतें. ॥ १०२ ॥ तेथें अर्पूनी पिंडदान । अक्षय्यवटीं द्विजभोजन । हेम रत्नें धन वेंसन । गयावासियां दिधलीं. ॥ १०३ ॥ गयराजाचें महदाख्यान । लोमशमुखें केलें श्रवण, । जयातुल्य दाता आन । ब्रह्मसृष्टींत असेना. ॥ १०४ ॥ सुस्नात जाले अगस्त्यतीर्थी । लोपामुद्रा लाधली सती । इल्वल वातापी यांची शांती । ऋषिमुखें परिशिली. ॥ १०५ ॥ दधीच ऋषीचें पवित्र स्थान । अस्थि देवां दीधल्या दान । अगस्त्यानें सिंधुप्राशन । दैत्यनाशाकारणें. ॥ १०६ ॥ पुढती भगीरथाच्या यत्नें । समुद्र भरला गंगाजीवनें । सगररायाचें उद्धरणें । कपिलशापापासूनी. ॥ १०७ ॥ ऋष्यशृंगाचें चरित्र । जमदग्नीचें अतिपवित्र । कार्तवीर्याचे पुत्र पौत्र । निःपातिले भार्गवें. ॥ १०८ ॥ प्रभास तीर्थ देखिलें दृष्टी । यादवपांडवांचिया भेटी । ऋषिसिद्धांचिया थाटी । धर्मराजें वंदिल्या. ॥ १०९ ॥ सुकन्येचें महदाख्यान । रैभ्याचेंही परम स्थान । तेथूनी पुढें गंधमादन । महापर्वता पातले. ॥ ११० ॥ तेथ उठिला प्रलयवात । पृथ्वीपासूनी रज दाटलें बहुत । पडली द्रौपदी मूर्छित । श्वासोच्छ्वास लागला. ॥ १११ ॥ धर्माचेही झांकले नयन । द्रौपदी झाली अति उद्विग्न । ते वेळीं स्मरे भीमसेन । घटोत्कचा पुत्रातें. ॥ ११२ ॥ तो पावला निमिषार्धांत । चौघे पिते मातेसहित । खांदीं वाहूनी बळसमर्थ । गगनमार्गें उडाला. ॥ ११३ ॥ संगीं निशाचर बळनिधी । तिहीं ऋषीश्वर घेतले खांदीं । गगनमार्गें लंघूनी अवधी । पर्वताग्रीं पावले. ॥ ११४ ॥ पुढें अलकानदीचे तीरीं । बदरी विशाळ अतिपवित्रीं । नारायणाश्रम विचित्रीं । सभाग्य दृष्टी

---

१. सुख. २. 'पिंडदानें' असा पाठभेद. ३. 'द्विजभोजनें' असें पाठांतर आहे. ४. 'धेनुवसनें' असाही पाठ आहे. ५. नाश. ६. मारिले. ७. मंडळी. ८. अध्याय १२१-१२५ पहा. ९. गंधमादन हें हिमालयाच्या उंच उंच शिखरांपैकीं एक आहे. याच्या उत्तरेस प्रख्यात मानससरोवर आहे. अनेक तीर्थें पाहत पाहत सानुज सदार धर्मराज येथें आला. अर्जुन येथें इंद्रलोकाहून परत येऊन त्यांना भेटला. येथें त्या सर्वांनीं चार वर्षें वास केला. १०. अ० १४४ श्लो० ४ पहा. ११. 'मंदला' असा अन्य पाठ. १२. घटोत्कच—हा भीमसेनापासून हिडिंबा नामक राक्षसीच्या ठायीं झालेला पुत्र. (मोरोपंत—आदिपर्व—अध्याय २९ गीति ६३, काव्यसंग्रह—पृष्ठ १५५ पहा.) याचें मस्तक घटसदृश आणि उत्कच (केशरहित) होतें म्हणून यास 'घटोत्कच' असें नांव पडलें. यानें सर्व पांडवांस खांद्यावर घेऊन एका खेपेंत गंधमादनपर्वतशिखरावर नरनारायणाश्रमीं नेऊन उतरिलें. (अध्याय १४५ पहा.) १३. राक्षस. १४. 'पर्वताची' असा अन्य पाठ.

देखिला. ॥ ११५ ॥ द्रौपदी जाली सावधान । हर्षें केलें गंगास्नान । नारायणाचे दर्शनें । समाधान जीवशिवां. ॥ ११६ ॥ तेथूनी पुढां पंथ न्यहाळी । तंव सुवर्णकमळ सहस्रदळीं । पवनें पातल्या[1] परिमळीं । दाही दिशा कोंदल्या. ॥ ११७ ॥ द्रौपदी त्या धरूनी करीं । भीमासी म्हणे हर्षोत्तरीं । 'ऐशिया सहस्र कल्हारीं[2] । धर्मराज पूजावा. ॥ ११८ ॥ जेथें निपजती तेथूनियां । तूंचि समर्थ आणावया । माझें आर्त[4] पुरवावया । तुजवीण आन असेना'. ॥ ११९ ॥ ऐकोनी द्रौपदीचें उत्तर[5] । भीम चालिला अतिसत्वर । मृगत्वचे[6]लागीं रघुवीर । सीतावाक्यें ज्यापरी. ॥ १२० ॥ धर्मासी म्हणे, 'सकळ तुम्हीं । सुखें असावें बदरिकाश्रमीं । कनकपुष्पें घेऊनियां मी । ये तंववरी स्वस्थ असावें'. ॥ १२१ ॥ प्रवेशला महावन । वृक्ष देखे नानावर्ण[7] । पक्षी हरित[8] रक्त कृष्ण । श्वेत पीत चित्रांग. ॥ १२२ ॥ अनेक पर्वत अनेकवर्ण । गुहागुल्मलताकीर्ण । नाना सरिताजीवन । उल्लंघीत जातसे. ॥ १२३ ॥ महिष[9] [10]कुंजर सिंह [11]शार्दूल । [12]शरभ पक्षी अतिविशाळ । [13]गंड भैरवांचे मेळे । भयें पळती दश दिशा. ॥ १२४ ॥ पुढां टाकिलें कर्दळीवन । तंव हिमालयासमान । [14]कपिनायक श्वेतवर्ण । महाविशाळ देखिला. ॥ १२५ ॥ पुच्छ पसरिलें शेषाकृती । तेणें मार्ग रोधिला क्षिती, । तेथें जावया नव्हे शक्ती । पवनातेंही सर्वथा. ॥ १२६ ॥ जांभईमाजी आकाश बुडे । भुभुःकारें कोंदलीं ब्रह्मांडें, । भृकुटी पाहतां प्राण विघडे । [15]कृतांताचा अतिभयें. ॥ १२७ ॥ गर्जना करितां भीमसेन । श्वापद पक्षी मूर्छापन्न । कपि होउनी कोपायमान । म्हणे, 'हें काय मानवा! ॥ १२८ ॥ त्रास देणें सकळ जीवां । हा कोण पुरुषार्थ पार्थिवा? । दयावंत तोचि देवा । मान्य होय सर्वस्वें. ॥ १२९ ॥ असो. हें सांग तूं एथें कवण । दुरी यावया काय कारण । मानवियातें जातें स्थान । हें तव नव्हे सर्वथा. ॥ १३० ॥ येणें मार्गें चालतां प्राणी । मृत्यूवेगळा न भेटे कोणी । शीघ्र परत तूं एथूनी । पुढें जातां अनर्थ.' ॥ १३१ ॥ येरू म्हणे, 'मी धर्मानुज । [16]पांडव कुंतीचा आत्मज । वायुदेवाचा वीर्यज । भीमसेन नाम पैं माझें. ॥ १३२ ॥ द्रौपदी भार्येचिया वचनें । सुवर्णकमळांलागीं जाणें ।

---

१. सुवास. २. कमळ. ३. मोरोपंत—वनपर्व—अ० ५ गी० ३८-४० पहा. ४. आवड. ५. 'वचनोत्तर' असा अन्य पाठ. ६. मृगाचें कातडें. ७. नाना तऱ्हेच्या रंगाचे. ८. हिरवा. ९ रेडे. १० हत्ती. ११. वाघ. १२. अष्टपद मृगविशेष. (सिंहाचा शत्रु.) १३. गेंडे. १४. वानरश्रेष्ठ. १५. यमाचा. १६. 'यादवी' असाही अन्य पाठ आहे.

कृपेनें मार्ग मुक्त करणें । पुच्छ काढीं, कपींद्रा!' ॥ १३३ ॥ कपी म्हणे, 'मी बहुत काळींचा । वृद्ध वानर त्रेतायुगींचा । पुच्छ उचलावया साचा । लेश बळाचा असेना. ॥ १३४ ॥ तूंही दिसशी पुरुषार्थी । तरी प्रकट करीं आपुली शक्ती । पुच्छ सारूनियां हातीं । येणें पंथें [1]चामकें.' ॥ १३५ ॥ भीमें मारूनियां हाक । पुच्छीं [2]सूदले द्वय हस्तक । अणुमात्र न ढळे [3]पीनाक । सीतास्वयंवरीं ज्यापरी. ॥ १३६ ॥ कीं रामधर्मी नियम वाणी । विपरीत करितां आप्त जनीं । चळूं न पवे तेंवि धरणी । [4]वाळ विशाळ ढळेना. ॥ १३७ ॥ दांत खाउनी करकर । पुच्छ उचलितां [5]वृकोदर । हस्त पाद जाले चुर । गात्रें विकळ पडियेलीं. ॥ १३८ ॥ धापा दाटोनी पडला क्षिती । विलंबें सावध झाला पुढती । लोटांगण घालुनी क्षितीं । मस्तक चरणीं ठेविला. ॥ १३९ ॥ म्हणे, 'सांग तूं कवण पुरुष? । ब्रह्मा, विष्णु कीं महेश? । अवज्ञा घडली, मी तों दास । क्षमा करीं स्वामिया!' ॥ १४० ॥ हांसोनी बोले तो पवित्र, । 'मी अंजनीतनय वायुपुत्र । रघुनाथभक्त मुख्य शत्रु । रावणाचा जाण पां. ॥ १४१ ॥ तो मी हनुमंत रामायणीं । ऐकिला असेल बहुतां [6]वचनीं । रामआज्ञेनें मी या धरणी । अटन करीत संतोषें. ॥ १४२ ॥ [7]गोष्पदप्राय समुद्र दृष्टी । लंघूनी राक्षस कोट्यानुकोटी । निर्दाळुनी लंका त्रिकुटी । तृप्त केलें पावका. ॥ १४३ ॥ चार कोटी द्रोणाचळा । रात्रींतुनी गेलों चार वेळां । औषधी आणुनी प्राणकळा । [8]सौमित्राची जीवविली. ॥ १४४ ॥ येणें काळें अकस्मात । सुहृद भेटलासी एथ । पवनतनय कृष्णभक्त । मीही दास कृष्णाचा.' ॥ १४५ ॥ ऐसें बोलितां वचन । भीमें धरिले दोन्ही चरण । आवडी देउनी आलिंगन । प्रेमानंदें स्फुंदत. ॥ १४६ ॥ म्हणे, 'मी धाकुटें भावंड । प्रीतीचें बालक [9]लेंडिवाड । अवज्ञा केली ते उदंड । उपेक्षिली पाहिजे. ॥ १४७ ॥ आवडी एक असे हृदयीं । समुद्रलंघन करितेसमयीं । रूप अनगळासी तें इहीं । डोळां प्रकट पहावें.' ॥ १४८ ॥ हनुमान् म्हणे, 'ते उग्र [10]प्रतिमा । प्रकट करितां नरेंद्रोत्तमा! । विश्वप्रळय होईल तुम्हां । ठाव नुरे वांचावया. ॥ १४९ ॥ तथापि तुझिये आर्ति ऐसें । तेज प्रकटवूं सहस्रांशें.' । उभय नेत्रीं पाणिस्पर्शें । दिव्य दृष्टी बाणली. ॥ १५० ॥ कोटी चंद्र कोटी [11]तरणी । खरतर प्रळयींचा प्रळयाग्नी । तेंवी तेज पहातां नयनीं । मूर्च्छा आली

---

१. जाईं. २. घातले. ३. शिवायुध (चाप). ४. शेंपूट. ५. भीम. ६. 'वदनीं' असाही पाठ आहे. ७. गाईचे पावलाप्रमाणें. ८. लक्ष्मणाची. ९. लाडकें. १०. रूप. ११. सूर्य.

अद्भुत. ॥ १९१ ॥ नेत्र लावुनी बद्धहस्त । भूमी घालुनी दंडवत । म्हणे, 'स्वामी ! हें अद्भुत । आच्छादिलें पाहिजे.' ॥ १९२ ॥ लोपवूनी रौद्र[1] प्रतिमा । हांसोनी बोले, 'राया ! भीमा ! । कुबेरसद्मा जाउनी पद्मां । द्रौपदीलागीं आणीं पां.' ॥ १९३ ॥ चहूं युगांचा आचारू । भीमा सांगोनी वानरेश्वरू । माथां ठेवुनी अभय करू । स्नेहें आदरें बोळ्वीत[2]. ॥ १९४ ॥ '[3]आज्ञा देईल गो-पाळ । तरी कौरवांचें सकळ दळ । पायीं मर्दीन[4] तात्काळ । राज्य देईन धर्मातें. ॥ १९५ ॥ जैसा बिभीषण लंकापुरीं । चिरंजीव चंद्रार्कवरी । कोटिकल्प सहपरिवारीं । धर्म स्थापीन भूलोकीं.' ॥१९६॥ भीम म्हणे, 'तुझिया [5]कणवा । कौरवांचा के[6]तुला केवा[7] । तुझिया नामस्मरणें सर्वा । अरिष्टांतें विभांड.'॥१९७॥ ऐसें बोलत असतां भीम । अदृश्य जाला [8]प्लवंगम । आश्चर्य मानुनी नरेंद्रोत्तम । निर्भय पंथीं चामके. ॥ १९८ ॥ देखे दिव्यवृक्षांचीं [9]दांगें । रंगली [10]अरुण संध्यारागें । राजहंस कस्तुरीमृगें । चंपकारण्यीं क्रीडती. ॥ १९९ ॥ अमृतोदकीं [11]सरिता गहन । देखतां हर्षें सारिलें स्नान । स्वस्थ करितां उदकपान । ब्रह्मानंद वोसंडे. ॥ १६० ॥ त्या गंगेचिया उभय [12]कूलीं । रत्नीं बांधिल्या सरोवर[13]पाळी । सुवर्ण कमळांच्या [14]परिमळीं । दाही दिशा कोंदल्या. ॥ १६१ ॥ सुवर्ण [15]नाळीं सुवर्ण कमळें । सहस्रसंख्य [16]नरनृपाळें । तोडूनी घेतां राक्षसमेळे । युद्धकदना पातले. ॥ १६२ ॥ [17]कुबेरवन भयंकर । असंख्य [18]धनदाचे [19]किंकर, । कमळें छेदितां वृकोदर । शस्त्रपाणी धाविन्नले. ॥ १६३ ॥ मारूं लागले नाना शस्त्रीं । ते वारुनी गदाप्रहारीं । रागें झोडितां पृथ्वीवरी । असंख्य प्रेतें पाडिलीं. ॥ १६४ ॥ एक पळाले वनपर्वतीं । एक धाविन्नले कुबेराप्रती । म्हणती, 'ब-ळिष्ठ भद्रजाती । पुरुष एक पातला. ॥ १६५ ॥ सुवर्ण कमळें तोडिलीं बहुत । राक्षस भंगिले असंख्यात.' । कुबेर म्हणे, 'कुंतीसुत । भीमनामा मी जाणें. ॥ १६६ ॥ तो कृष्णाचा परम भक्त । आम्ही कृष्णाचे [1]अंकित । कमळें तोडितां तो समर्थ । निषेध कोणी न करावा.' ॥ १६७ ॥ कमळें घेउनी तो नरनाथ । नदी उतरोनी मार्गीं येत । तंव सुटला प्रलयवात । पर्वत

१. भयंकर. २. 'बोलते' असाही अन्य पाठ. ३. 'आज्ञा देखील जरि कृपाळ' असाही पाठ आहे. ४. 'मर्दुनी' असा अन्य पाठ. ५. दया. ६. किती. ७. पाड. ८. वानर. ९. वनें. १०. लाल. ११. नद्या. १२. तीरीं. १३. समूह. १४. सुवासानें. १५. देंठ. १६. 'भीमनृपाळें' असें पाठांतर. १७. 'कुबेरवनीं' असा पाठभेद. १८. कुबेर. १९. सेवक. 'स्थापित' असा अन्य पाठ आहे.

उडवी सैत्राणें. ॥ १६८ ॥ चिंता वर्तली राया **धर्मा** । म्हणे, 'कवण अवस्था असेल **भीमा**?' । **द्रौपदी लोमश धौम्या**-। सहित मार्गीं धाविन्नले. ॥१६९॥ सुवर्णकमळांसहित जाणा । येतां देखिलें **भीमसेना** । आवडी देउनी आलिंगना । **कुबेरवना** अवलोकी. ॥ १७० ॥ **भीम**दर्शनें चिंता हरली । परी मार्ग न कळे, दिशा भुली, । तंव अंबरीं गर्जिन्नली । आकाशवाणी ते काळीं. ॥ १७१ ॥ 'पुढें जावया नव्हे शक्ती । गमन करावें आलिये पंथीं.' । **द्रौपदी**-सहित वंधु नृपती । पूर्वमार्गें मुरडले. ॥ १७२ ॥ पुढती पातले **बदरिकाश्रमा** । विसरोनी सर्वश्रमा । भेटले तापसां ऋषिसत्तमां । सुख विश्राम पावले. ॥१७३॥ पुढें जटासुराचा वधू । सहज भेटले **पार्थ** बंधू । ते कथेचा अतिविनोदू । सादर श्रोतीं परिसावा. ॥ १७४ ॥ इति **श्रीभारत वनपर्वणि** । अमृत स्रवे **व्यास**वाणी । परम सभाग्य सेविती श्रवणीं । **मुक्तेश्वर** कवि वदे. ॥ १७५ ॥

---

## अध्याय दहावा.

**बदरिकाश्रमीं** वसतां **धर्म** । ब्राह्मणवेशें दुष्ट दुरात्मा । राक्षस **जटासुर** नामा । नित्य सेवे तिष्ठत. ॥ १ ॥ नित्य भोजन **धर्मा** घरीं । अहोरात्रीं वसे द्वारीं । पत्रें पुष्पें फळसंभारीं । गृहसुश्रूषे सावध. ॥ २ ॥ **द्रौपदी** हरावयाचा काम । अवसर पाहे नसतां **भीम** । जैसा विषमकाळीं अधम । घात करी पुढिलांचा. ॥ ३ ॥ कोणे एके दिवशीं जाणा । मृगये धाडिलें **भीमसेना** । **धौम्य लोमश** अनुष्ठाना । गंगास्नानातें ते गेले. ॥ ४ ॥ घेउनी राक्षसांची सेना । **घटोत्कच** वळघला गगना । पारधीलागीं दुरी वना । जाता झाला स्वभावें. ॥ ५ ॥ **धर्म** आणि **माद्रीकुमर** । एकटी **द्रौपदी** सुंदर । संधी पाहोनी निशाचर । हरण करी चौघांचें. ॥ ६ ॥ शस्त्रभार घेउनी हातीं । चौघें वाहिलीं पृष्ठीवरुतीं । आडमार्गीं वातगती । पापमूर्ती पळतसे. ॥ ७ ॥ **धर्म** म्हणे, 'रे दुर्जना! । अमृत न जिरे **राहू**च्या वदना । बँडिश आमिष भावितां मीना । प्राणसंशय रोकडा. ॥ ८ ॥ पातलिया **भीमसेन** । **हिडिंबबकां**-चिया दर्शना । पाठवील या वचना । अनमान कांहीं असेना.' ॥ ९ ॥ **सह-देव** म्हणे, 'देई शस्त्रें । एकांग झुंजोनी निकुरें । मातें जिंकोनियां सुंदरे । **द्रौ**-

---

१. सवेग, वेगानें. २. आकाशांत. 'अंबरीं अकस्मात् गर्जिन्नली' असा अन्य पाठ. ३. परत फिरले. ४. 'अत्यंत प्रेम सत्संगीं' असा अन्य पाठ. ५. वनपर्व—अध्याय १५७ पहा. ६. संधी. ७. गळ. ८. मासा. ९. 'प्राणनाश' असें पाठांतर.

पदीलागीं हरीं कां?' ॥ १० ॥ अनाचारिया धर्मशास्त्र । सांगतां मानितो अशास्त्र । तेंवी तो न मानुनी अपवित्र । चोरमार्गें पळतसे. ॥ ११ ॥ विचित्र प्रारब्धाची गती । राक्षस पळे ज्ये पंथीं । त्याचि मार्गें भद्रजाती । भीमसेन येतसे. ॥ १२ ॥ देखोनी दैत्याचें कौतुक । हांसोनी पावला सन्मुख, । म्हणे, 'भला तूंचि एक । देखिलासी पुरुषार्थी. ॥ १३ ॥ ज्याचे गृहीं सेविलें अन्न । सेवा केली होउनी दीन । त्याचेंचि केलें दाराहरण । धन्य रे! धन्य! राक्षसा!' ॥ १४ ॥ मांसभार ठेउनी वेगें । शत्रुसन्मुख धांवला रागें, । येरें उतरोनियां चौघें । सज्ज झाला झुंजावयातें. ॥ १५ ॥ म्हणे, 'रे भीमसेना! मूर्खा! । सिंचुनी तुझ्या रक्तोदका । किर्मीर हिडिंब आणि बका । तृप्त करीन तर्पणीं.' ॥ १६ ॥ दोघे उपडोनी तरुवरां । ताडिते झाले येरयेरां । खंडविखंडित शतसहस्र । वृक्ष जाले त्यां हस्तीं. ॥ १७ ॥ वन झालिया निर्झाडी । मग उचलिल्या प्रचंड धोंडी । परस्परें ताडितां प्रौढी । रक्त वाहे भडभडां. ॥ १८ ॥ वाळी सुग्रीव सुंदोपसुंद । मेरुमंदार द्वंद्वयुद्ध । जेंवी भिडतां घोर शब्द । हुंकारती अतिरागें. ॥ १९ ॥ द्वंद्वयुद्धीं होतां मिळणी । सहदेवें शत्रु धरिला चरणीं, । भीम म्हणे, 'दुरूनी नयनीं । कौतुक पाहें बाळका! ॥ २० ॥ या मशकाची केतुली गोष्टी? । घायें मेळवीन पृथ्वीतटीं.' । म्हणोनी वोपिली वज्रमुष्टी । वक्षस्थळीं राक्षसाच्या. ॥ २१ ॥ तेणें मूर्छा दाटली बहुत । सावध झाला निमिषार्धांत, । करकराटें खाउनी दांत । भीम कंठीं कवळीला. ॥ २२ ॥ कोंपरें हाणोनियां उरीं । झिंझाडुनी सांडिला दुरी, । वज्रमुष्टी कवळूनी समरीं । युद्धकदना मिसळला. ॥ २३ ॥ भीमें मुष्टी ताडितां बळें । कडकडाटें मोडती अस्थिजाळें । राक्षस हाणितां बाहुमुळें । उखळूनी जालीं दुखंडें. ॥ २४ ॥ झोंबिये भिडतां आंग नेटी । भीमें पाडिला पृथ्वीतटीं । तळीं शिळा कडकडाटीं । चूर्ण जाल्या अपार. ॥ २५ ॥ मग बैसोनी वक्षस्थळीं । हस्त सूदला कंठनाळीं । शिर उपडोनी निराळीं । झुगारिलें सत्राणें. ॥ २६ ॥ तें टाकूनी गेलें अर्का, । सूर्या गमे राहुशंका, । पुढती उतरलें भूलोका । स्वीकारिलें निर्जीव. ॥ २७ ॥ जाला जटासुराचा वध, । सुरां वाटला महाविनोद, । ऋषी देती आशीर्वाद, । 'धन्य! रे! भीमा!' म्हणोनियां. ॥ २८ ॥ पांचही पातलीं पूर्वाश्रमा, । धर्मराज म्हणे, 'भीमा! । पर्वत वनें पवित्र रम्य । विलोकीत नि-

१. 'वेगें पातला सन्मुख' असाही पाठ आहे. २. स्त्रीहरण. ३. 'स्वर्गीं निमाल्या बका' असाही पाठ आहे. ४. वृक्षरहित. ५. धुंगुडें. ६. किती. ७. क्षणार्धांत. ८. सवेग.

घावें.' ॥ २९ ॥ ऋषीसहित चालिले सकळ । देखती पर्वत महाविशाळ । मेरु सागरान्त भूगोळ । द्वीपें खंडें भासती. ॥ ३० ॥ गिरी उपगिरी महागिरी । भेदले स्वर्गाचिये सरी । गंधमादनपरिसरीं । वन विस्तारूनी न वदवे. ॥ ३१ ॥ नाना वनें नाना [1]द्रुम । नाना सरितांचे संगम । नाना श्वापदें वि[2]हंगम । नाना [3]वर्ण भासती. ॥ ३२ ॥ देवर्षि गंधर्वगण । यक्ष पिशाच सिद्ध चारण । आश्रम करूनी सुखसंपन्न । परमानंदें क्रीडती. ॥ ३३ ॥ आर्ष्टिषेणाचा आश्रम । देखोनी पावले सुख विश्राम । तेणें धरूनी स्नेह परम । बहुत काळ राहविलें. ॥ ३४ ॥ तेणें धर्म धरूनी हातीं । चालतां पूर्वदिशेप्रती । कैलास मैनाक देखिला क्षिती । चंद्रप्रभेसारिखा. ॥ ३५ ॥ हिमवत्पृष्ठीं श्वेतगिरी । रत्नशिखरी सुवर्णशिखरी । पर्वत दावूनी ऋषीश्वरीं । माल्यवंता चढिन्नले. ॥ ३६ ॥ पुढती पातले गंधमादना । अमृतफळें [4]पीयूषासमान । भक्षूनी सरितांचिया जीवना । अमृतोपमा सेविती. ॥ ३७ ॥ तया पर्वताचिया माथा । भेदूनी वेधला जैसा सविता । भीम चढला तयावरुता । वातवेगें बळिष्ठ. ॥ ३८ ॥ तेथूनी विलोकी बळखाणी । तंव [5]कुबेरनगर देखिलें नयनीं । सरोवर बांधिलें रत्नीं । अमृतोदकीं तुडुंबलें. ॥ ३९ ॥ माणिकफळें कनकद्रुम । चतुर्दंत गज उत्तम । वायुवेगीं [6]तुरंगम । विचित्र नृत्यें नाचती. ॥ ४० ॥ नाना वाद्यांचा ध्वनी । नादामृत [7]झगटे श्रवणीं । यक्षगंधर्वांचीं गाणीं । कुबेरवनीं परिसिलीं. ॥ ४१ ॥ धनेश्वराचे बळिष्ठ दूत । मणिमंतमुख्य असंख्यात । [8]पारखा देखोनी मदोन्मत्त । युद्धकंदना पातले. ॥ ४२ ॥ नाना शस्त्रें धरूनी मुष्टी । ताडिते जाले कोट्यानुकोटी । जैसी पर्वतावरी वृष्टी । मेघ मांडी अपार. ॥ ४३ ॥ असंख्य पातकांचिया श्रेणी । स्पर्शों न शकती विष्णुस्मरणीं, । कीं [9]धन्वंतरिया [10]काळफणी । विष बाधों न शके. ॥ ४४ ॥ तेंवी यक्षांचीं शस्त्रजालें । भीमाआंगीं जालीं विकळें । [11]वृकोदरें ताडितां बळें । यक्ष असंख्य [12]निमाले. ॥ ४५ ॥ सूड ध्यावया मणिमंत । रागें धाविन्नला [13]क्रोधभरित । भीमा आंगीं शस्त्रघात । असंख्यात ताडिले. ॥ ४६ ॥ ते साहोनी महाबळी । प्रचंड गदा ताडिली मौळीं, । हाक मारूनी भूमंडळीं । प्रेत होउनी पडियेला. ॥ ४७ ॥ मरण पावला मणिमंत । सैन्य पाडिलें असं-

---

१. वृक्ष. २. पक्षी. ३. रंग. ४. 'पिशिताशन' असा अन्य पाठ. ५. 'कुबेरवन' असा अन्य पाठ. ६. घोडे. ७. 'न संटे गगनीं' असाही पाठ आहे. ८. परकी मनुष्य. ९. वैद्यश्रेष्ठ. १०. काळसर्प. ११. भीमानें. १२. मेले. १३. 'त्वरित' असा अन्य पाठ.

ख्यात । कुबेराप्रति धाविन्नले दूत । हाका मारीत आक्रोशें. ॥ ४८ ॥ म्हणती, 'मानवी वीर गाढा । संग्रामशूर बली पाडा । मणिमंत मारुनी होडा[1] । यक्ष असंख्य मारिले. ॥ ४९ ॥ रागें उठिला धनेश्वर । सज्जूनियां रहंवर[2] । रणा पावला तंव समोर । महावीर देखिला. ॥ ५० ॥ हस्तलाघव आंगबळ । शस्त्रास्त्रीं परम कुशाळ । अजिंक देखोनी राक्षसपाळ[3] । तुकवी मौळी[4] कौतुकें. ॥ ५१ ॥ तुळितां पर्वत शिखराकार गदा । परम कौतुक वाटे धनदा[5], । हृदयीं सांडूनियां क्रोधा । वरद वदे स्वमुखें. ॥ ५२ ॥ म्हणे, 'तुवां मारिलें सैन्य । त्यासी कारण असे आन । अगस्त्याचें शापवचन । आजी आलें प्रतीती.[6] ॥ ५३ ॥ अवज्ञा करूनी अगस्तीची । सुवर्णकमळीं आणिकांची[7] । पूजा करितां समर्थांची । मनोवृत्ति क्षोभली. ॥ ५४ ॥ म्हणे, 'तुझें सकळ सैन्य । मानवहस्तें पावेल मरण, । तें आजी जालें जाण । दोष जाण तुज नाहीं.' ॥ ५५ ॥ रथ सांडूनी नैर्ऋत्यपती । भीम आलिंगिला अतिप्रीती, । म्हणे, 'कृपा करूनी पर्वतीं । सुखवस्ती असावें. ॥ ५६ ॥ द्रौपदीसहित पांचही जणीं । समागमें पवित्र मुनी । वास करावा इये वनीं । काळमर्यादापर्यंत. ॥ ५७ ॥ अमृतोदकें अमृतफळें । सेवुनी असावें सज्जनमेळें । दास्य असेल या वेगळें । तेंही मातें निरोपीं.' ॥५८॥ ऐसें बोलतां निधींचा[8] पति । प्रसन्न जाला मुनि अगस्ती, । मणिमंतसेना[9] पुढती । सजीव केली दयाळें. ॥ ५९ ॥ स्वस्थळा गेलिया राक्षसनाथ[10] । धर्मराज बंधुसहित । गंधमादन पर्वतांत । विश्रामस्थळीं बैसले. ॥ ६० ॥ अवघीं करिती ईश्वरवार्ता । आत्मनिरूपण अध्यात्मकथा । म्हणती, 'क्लेशकाळ आतां । शीघ्र काळें सरेल'. ॥ ६१ ॥ तंव स्वर्गीं शक्र म्हणे, 'पार्था ! । तुझे भेटिची परम अवस्था । धर्मा होतसे चिंता । परिहरिली पाहिजे. ॥ ६२ ॥ युगासमान जातसे पळ । सरला स्वर्गभोगाचा खेळ, । पांच वर्षें क्रमिलीं वेळ । न लावीं आतां पवित्रा !' ॥ ६३ ॥ सवें दिधला मातली[11] रथ । सहस्रसंख्याक देवदूत । दिव्य वाद्यें गर्जतां तेथ । गंधमादनीं ऐकिलीं. ॥ ६४ ॥ ऋषि बोलती धर्मराजातें, । 'स्वर्गवाद्यें वाजती बहुतें । वाटे भेटीलागीं पार्थें । गमन आजी केलें असे.' ॥ ६५ ॥ ऐसें बोलतां ऋषींचा मेळा । धर्मासी

---

१. पैज. २. रथश्रेष्ठ. 'सज्जूनियां सेना रहंवर' असा अन्य पाठ. ३. कुबेर. ४. मस्तक. ५. निराळें. ६. 'फळा आलें ये काळीं,' 'आजी मम आलें प्रतीती' असे पाठभेद आहेत. ७. अन्यांची. ८. ठेव्यांचा स्वामी (कुबेर). ९. 'मणिमंत सह सेना' असें पाठांतर. १०. कुबेर. ११. इंद्रसारथी.

गमली अमृतवेळा, । म्हणे, 'आनंद ब्रह्मांडगोळा । मज होत ये काळीं.' ॥६६॥ तंव दिनकरतेजें दिव्य रथ । छत्रचामरविराजित । माजी देखिला जयस्वी पार्थ । परिवारित सुरगणें. ॥ ६७ ॥ रथ सांडूनी उतरला धरणीं । मस्तक ठेविला धौम्यचरणीं । लोमश वंदूनी पवित्र मुनी । लोटांगणीं वंदिले. ॥६८॥ धर्मासी करुनी नमस्कार । नमस्कारिला वृकोदर । आलिंगिले माद्रीकुमर । परम स्नेहें आवडी. ॥ ६९ ॥ नेत्रां भरूनी स्नेहजीवनें । द्रौपदीमुख हास्यवदनें । अवलोकितां तीचिया मनें । अमृतपान भाविलें. ॥ ७० ॥ ऋषि करिती जयजयकार । आशीर्वचनें पुष्पभार । माथां सांडिती अपार, । 'हो कल्याण सर्वदा!' ॥ ७१ ॥ तंव दिव्य दुंदुभींचा नाद । होता झाला नानाविध । स्वर्गसुमनांचा सुगंध । पृथ्वीवरी फांकला. ॥ ७२ ॥ अवघे पहाती गगनपंथ । तंव दिव्य विमानीं अमरनाथ । देवगंधर्वपरिवारित । घंटाघोषें पातला. ॥ ७३ ॥ कोटि सूर्याहूनी आगळा । प्रकाश दाटला नभस्थळा । विमान पातलें भूतळा । धर्मराजा जवळिकें. ॥ ७४ ॥ क्षिती उतरला पुरंदर । धर्में केला नमस्कार, । चरण वंदी वृकोदर । माद्रीकुमरद्रौपदीशीं. ॥ ७५ ॥ बद्धहस्तीं उभे ठेले । देवराज आदरें बोले, । 'धर्मा! तुझे कष्ट गेले । चिंता कांहीं न करावी. ॥७६॥ शस्त्रें लाधलीं पार्थातें । तेणें विंधील शत्रुकुळातें, । लाहोनी सार्वभौमपदातें । पृथ्वी पाळीं पवित्रा!' ॥ ७७ ॥ धर्म बोले विनीत शब्द, । 'सर्वही चरणांचा प्रसाद, । भणंगभेटी त्रैलोक्यवंद्य । कृपेनें आलेती सांभाळूं. ॥७८॥ याहुनी काय प्राप्त तें आतां?' । म्हणोनी चरणीं ठेविला माथा, । शक्र म्हणे, 'मनोरथा । सफळ करीन तात्काळीं.' ॥ ७९ ॥ आश्वासूनी कुरुनंदना, । इंद्र गेला इंद्रभुवना; । धर्म म्हणे, 'आतां अर्जुना! । समूळ वार्ता मज सांगे. ॥ ८० ॥ गमन केलिया मजपासूनी । जे जे तुवां केली करणी । काय वर्तलें स्वर्गभुवनीं । विस्तरें करूनी मज सांग.' ॥ ८१ ॥ अर्जुन म्हणे, 'स्वामी! नाथा! । तपोवनीं तप करितां, । ब्राह्मण भेटला अवचिता । सर्वज्ञ जैसा नारद. ॥ ८२ ॥ किरातरूपें पातला हर । संग्राम करूनी तोषला थोर । तेणें देऊनियां वर । ब्रह्मास्त्र मातें दीधलें. ॥ ८३ ॥ त्यावरी लोकपाळ आले । तींहीं अस्त्रप्रसाद दीधले । शक्रें पाचारूं धाडिलें । मातलीसीं रथयान. ॥ ८४ ॥ पांच वर्षें स्वर्गभुवनीं । इंद्राचिये एकासनीं । स्वर्गसुख देखिलें नयनीं । जें

---

१. देवसमूहानें. २. इंद्र. ३. दरिद्री. ४. 'समर्था' असा अन्य पाठ.

पुराणीं परिसिलें. ॥ ८५ ॥ त्यावरी शक्र आज्ञापी गोष्टी, । 'पूर्वसागराचे पोटीं । निवातकवच तीन कोटी । काळशत्रू आमुचे. ॥ ८६ ॥ त्यांचा करूनी निःपात । सुखी करीं सुर समस्त.' । घेउनी मातली रथ । समुद्रतीरीं पातलों. ॥ ८७ ॥ तेथें अश्व गज पदाती । कोटीच्या कोटी सज्जुनी येती, । काळशस्त्रें घेऊनी हातीं । युद्धकंदना मिसळले. ॥ ८८ ॥ अग्नि पर्जन्य वात गिरी । वज्रचक्रमुसलधारी । कपट युद्ध करितां वैरी । नाटोपती ते [1]कृतांता. ॥ ८९ ॥ क्षणें दिवस, क्षणें रात्री, । क्षणें गगनीं, क्षणें धरित्रीं, । क्षणें गुप्त, प्रकट नेत्रीं, । आभासती बहुरूपें. ॥ ९० ॥ ते वेळीं मंत्रूनी दिव्यास्त्रें । छेदिलीं शत्रुकुळाचीं [2]गात्रें, । जैशीं [3]कुळाचळांचीं गात्रें । शक्र पाडी भूतळीं. ॥ ९१ ॥ नखीं खंडिजेती कमळें । सुरिया कणसें नवाळें । [4]शस्त्रधारा कर्दळीफळें । [5]धडचि पडती ज्या परी. ॥ ९२ ॥ ते वेळीं रक्ताचिया सरिता । भूमंडळीं लोटल्या बहुत । [6]शीसपद्मीं असंख्यात । पूजा झाली भूलिंगा. ॥ ९३ ॥ निवातकवच तीन कोटी । परिवारेशीं आटली सृष्टी । त्यांच्या [7]वधू वैधव्यपाटीं । बैसविल्या एकदां. ॥ ९४ ॥ संपत्तीशीं दैत्यनगर । अमरपुराहुनी सुंदर । दृष्टी देखिलें मनोहर । हेमरत्नीं मंडित. ॥ ९५ ॥ कालकेयपुलोमनगर । [8]अमरपुरीहुनी सुंदर । मार्गीं येतां सत्वर । चोज अद्भुत देखिलें. ॥ ९६ ॥ शक्रसारथी बोले वचन । यासी ब्रह्मयाचें वरदान । देव हस्तें नाहीं मरण । मानव जाण वधील. ॥ ९७ ॥ निश्चय कल्पी माझें मन । तुझे हातीं पावती मरण । यातें वधूनी [9]सहस्रनयन । सुखी करीं बळिष्ठा!' ॥ ९८ ॥ अर्जुन प्रवेशे नगरद्वार । तंव कालकेय साठ सहस्र । सज्ज करूनियां रहंवर । शस्त्रास्त्रीं सिद्ध जाले. ॥ ९९ ॥ इंद्रासी मानिती जैसें तृण । म्हणती, 'अर्जुन मशक कोण ? । एकाचि घायें करूं [10]चूर्ण । शिर पाठवूं शक्रातें.' ॥ १०० ॥ त्याचे निबिड बाणजाळीं । विकळता पातला मातली । पाहातां बाणाचिये धूळी । लक्ष दृष्टी दिसेना. ॥ १०१ ॥ मायामय दुसरें नगर । गगनीं निर्मिलें मनोहर । तेथूनी वर्षे जेंवी [11]जलधर । तैसीं शस्त्रें मारिती. ॥ १०२ ॥ ऐसें उभयतां संकट । मांडलें देखोनी अतिदुर्घट । म्यां

१. यमास. २. 'वक्त्रें' असें पाठांतर. ३. पुढील सात पर्वतांस कुलाचल म्ह० मुख्य पर्वत म्हणतात:—महेंद्र, शुक्ति, मलय, ऋक्षक, पारियात्र, सह्य व विंध्य. (भास्कराचार्य व तत्कृत ज्योतिष–पृ० २६.) ४. 'जैशीं तोडिजेती' असें पाठांतर. ५. 'धडेंचि पडती ज्यापरी' असें पाठांतर. ६. शिरकमलांनीं. ७. स्त्रिया. ८. 'नगर पाहोनि परम सुंदर' असा पाठभेद. ९. इंद्र. १०. 'हनन' असा पाठभेद. ११. मेघ.

चिंतिला नीलकंठ[1] । दीनदयाळ सर्वात्मा. ॥ १०३ ॥ हृदय करूनी सावधान। आव्हानिला त्रिलोचन । कर्पूरगौर गौरीरमण[2]। कामदहन कृपाळू. ॥ १०४ ॥ प्रत्यक्ष होऊनी कृपावंतें । दिव्यास्त्रें वोपिलीं मातें, । म्हणे, 'मारीं या शत्रूतें । अर्ध क्षण न लगतां.' ॥ १०५ ॥ अभिमंत्रित[3] सोडितां दिव्य शर । आपे-आप पडती शिरें, । जैसीं प्रळयींचेनि समीरें[4] । वृक्षपर्णें उसळती. ॥ १०६ ॥ कालकेय आणि पौलोम । बाणजालीं जाले भस्म । [5]ग्रीष्मीं दावाग्नी तृणोपम । ऐसें करुनी सांडिलें. ॥ १०७ ॥ नगर देश संपदा भारी । भरितां न सांठे स्वर्गागारीं । शेष सांडिलें पृथ्वीवरी । तेंचि हें भूतळीं. ॥ १०८ ॥ छेदिला दानवांचा कंद । स्वर्गीं विजयभेरीचा[6] नाद । ते काळीं इंद्राचा आनंद । ब्रह्मांडघटीं न समाये. ॥ १०९ ॥ सुवर्णभार[7] रत्नें नाना । देऊनी पूजिलें सहस्रनयना[8] । सन्मुख येउनी आलिंगना । देता जाला आवडी. ॥ ११० ॥ किरीट काढूनियां हातें । मस्तकीं लेवविला मातें, । विजयमाला कुंडलांतें । कृपेनें वोपी दयाळ. ॥ १११ ॥ मातली म्हणे, 'अमरनाथा! । पार्थवीराच्या पुरुषार्था । उपमे तुळावया आतां । आन नाहीं ब्रह्मांडीं. ॥ ११२ ॥ राम अथवा परशुराम । समान वाटे एक उपमा । दुजी उपमा द्यावया प्रतिमा । ब्रह्मसृष्टींत असेना.' ॥ ११३ ॥ ऐसें ऐकोनी पुरंदर । हृदयीं कवळी वारंवार, । म्हणे, 'वाटे हें शरीर । ओंवाळूनी सांडिजे.' ॥ ११४ ॥ देउनी मातली रथयाना। कृपेनें धाडिलें तव दर्शना । पूर्वपुण्यें कुरुभूषणा! । चरण दृष्टी देखिले.' ॥ ११५ ॥ श्रवणें संतुष्ट धर्म समर्थ । आलिंगिला विजयी पार्थ, । म्हणे, 'पुरला मनोरथ । सुहृदाचे दर्शनें.' ॥ ११६ ॥ लोमश मागूनी आज्ञा । जाता जाला शक्रसदना । जन्मेजया! कुरुभूषणा! । तीर्थयात्रा पैरिसिली. ॥ ११७ ॥ धर्म म्हणे, 'संग्रामदक्षा! । दिव्य अस्त्रांची परीक्षा । पहावी ऐसें माझिया चक्षां[10] । कांक्षा[11] वर्ते अपार.' ॥ ११८ ॥ अर्जुन विनवी अग्रजातें, । 'अस्त्रपरीक्षा दावितां एथें । युगान्त वर्तेल सृष्टीतें। ब्रह्मप्रळयासारिखा.॥११९॥ तथापि तुझिया आज्ञेसाठीं । कांहीं कौतुक दाखवूं दृष्टी'. । म्हणोनी अभिमंत्रिलें ओंठीं । मंत्रबीज महास्त्र. ॥ १२० ॥ अस्त्रप्रयोग[12] करितां मुष्टी । गगनीं उ-

१. शिव. २. पार्वतीपती. ३. 'अभिमंत्रुनी' असें पाठांतर. ४. वायूनें. ५. 'नुरेच्चि संततीचें नाम' असाही पाठ आहे. ६. दुंदुभीचा. ७. 'हेमवस्त्रें' असें पाठांतर. ८. मागें पृष्ठ ८९ टीप ८ पहा. ९. 'संपली' असा अन्य पाठ. १०. डोळ्यांस. ११. इच्छा. १२. योजना.

देल्या सूर्यकोटी, । [1]प्रळयकडकडाट आकाशघटीं । होत वृष्टी नक्षत्रां. ॥१२१॥ अस्त्रघोषाच्या कडकडाटें । [2]धरा आतळी खडखडाटे । मेरु उमळोनी उडाले कडे । स्तंभप्राय भूतळीं. ॥ १२२ ॥ [3]सिंधूदकीं निघती ज्वाळा । धूम्रें व्यापिलें ध्रुवमंडळा । कासाविस अमरपाळ । म्हणती, 'काय उदेलें?' ॥ १२३ ॥ नक्षत्रां प्रळयकाळींचा समयू । रथा सांडूनी खचला सूर्यू । चंद्रशकलें आतला वायू । कल्पांतींचा माजला.' ॥ १२४ ॥ शंभू [4]स्वयंभू चक्रपाणी । उभे ठेले विमानयानीं । प्रार्थूनियां नारद मुनी । पार्थाप्रति धाडिला. ॥ १२५ ॥ तो म्हणे, 'अकाळीं अकारण । अस्त्रप्रयोगीं महा विघ्न । आतां [5]उपसंहारीं; प्राण । वांचवीं या विश्वाचे.' ॥ १२६ ॥ अस्ताचळीं अस्तवे सूर्यू । गगनोदरीं हारपे वायू । तेंवी अस्त्र पांडुतनयू । शांत करी सामर्थ्यें. ॥ १२७ ॥ बंधूंसहित राजा धर्म । पुढती प्रवेशे बदरिकाश्रम । वनफळार्थी गेला भीम । वन विशाळ शोधित. ॥ १२८ ॥ तंव उभय पर्वतांचे संधी । पर्वतप्राय काळ क्रोधी । गोठला [6]कालकूटाचा [7]उदधी । तेंवी अजगर देखिला. ॥ १२९ ॥ पसरूनियां मुखानळ । धुधुःकारला [8]प्रलयानळ । कवळूनियां [9]कुंतीबाळ । काळसर्पें गिळिला. ॥ १३० ॥ [10]कंठप्राय गिळिला सोसे । मस्तकमात्र उघडा दिसे । भीमाचेनि बळसायासें । सुटतां मार्ग दिसेना. ॥ १३१ ॥ दुष्ट चिन्हें धर्मा [11]होती, । म्हणे, 'भीमा [12]वर्तली संकटगती'. । आंगेंची चालिला [13]लवलाहीं गती । [14]मोहें वना पातला. ॥ १३२ ॥ पहात भीमाच्या पाउला । सर्पस्थळाप्रति पातला । भीम व्याळाननीं पडला । देखोनी झाला दुश्चित. ॥ १३३ ॥ म्हणे, 'एवढें हें कर्म थोर । अवयव [15]असतां गेलें शरीर. । पुढील उद्योग अपार । निष्फळ झाले एकदां. ॥ १३४ ॥ शक्रादिकांचे आशीर्वाद । सदाशिवाचे अस्त्रप्रसाद । ऐसे [16]सकळ हे विनोद । ईश्वर दृष्टी दाखवीत. ॥ १३५ ॥ [17]धर्मराजाचें भाग्य गहन । याचेनि भरणें आम्हां मरण'. । मग बोलता झाला सखेदवचन । [18]उरगाप्रति ते काळीं. ॥ १३६ ॥ म्हणे, 'तूं कवण महासर्प? ।

---

१. 'समुद्र कढे खळखळाटी' असा अन्य पाठ. २. पृथ्वी. ३. समुद्रोदकीं. ४. ब्रह्मा. ५. परत घे, आटप. ६. महाविषाचा. ७. समुद्र. ८. 'महाप्रवळ' असें पाठांतर. ९. भीम. १०. 'कंठप्रमाण' असें पाठांतर. ११. 'देहीं' असा पाठभेद. १२. 'वर्तलें कांहीं' असा पाठभेद. १३. 'लवलाहीं । गती' असें पाठांतर.* १४. 'महा' असा पाठभेद. १५. 'असती' असा पाठभेद आहे. १६. 'असतां' व 'विफळ' असे पाठभेद आहेत. १७. 'धार्तराष्ट्राचें' असें पाठांतर आहे. १८. सर्पाप्रति.

हा देह प्राप्त कवणा पापें? । घेऊनी आमिष अमूप[1] । मुक्त करीं मम बंधू. ॥ १३७ ॥ सर्प म्हणे, 'धर्ममूर्ती । मी जाण नहुष चक्रवर्ती[2] । ऐश्वर्यमदें हे जगती । तृणप्राय मानिली. ॥ १३८ ॥ स्वामित्व पावलों शक्रभुवनीं । ऋषि जुंपिले शिबिकायानीं । आरुढोनी इंद्रासनीं[3] । बैसावया लगबगां. ॥ १३९ ॥ नेतां[4] ब्राह्मणांसीं लत्ताप्रहारें । हाणोनी पीडिले दंडकरें[5] । त्यांमाजी अगस्ती ऋषीश्वरें । शापशस्त्रें ताडिलें. ॥ १४० ॥ 'सर्प सर्पे'ति शीघ्रगमन । म्हणतां कोपला तपोधन । म्हणे, 'सर्पत्व पावोन । पाप भोगीं भूतळीं.' ॥ १४१ ॥ लक्ष यागांचें पुण्य परम । पावलोंपावलीं केलें भस्म, । सर्पत्व देउनी देह अधम । ये पर्वतीं टाकिलें. ॥ १४२ ॥ उःशाप मागतां प्रार्थूनी । तो म्हणे, 'धर्म देखसी नयनीं । त्याचेनी पवित्र वचनप्रश्नीं । मुक्त होसी मागुता'. ॥ १४३ ॥ आतां आहार नेघें आन । मुखें ग्रासीन भीमसेन । अथवा सांग माझे प्रश्न । तेव्हां मुक्त तव बंधू'. ॥ १४४ ॥ ऐकोनी धर्मराज म्हणे, । 'बोल कैसां ऐकों वचनें । तुझी आशंका यथाज्ञानें । परिहारीन फणींद्रा[6] !' ॥१४५॥ सर्प म्हणे, 'ऐक वचन । चहूं वर्णीं ब्राह्मण कोण? । जाणावें तें काय गहन[7]? । तें निर्धारें सांग पां.' ॥ १४६ ॥ धर्म म्हणे, 'सावधान । ब्रह्म जाणे तो ब्राह्मण । जाणावें तें ब्रह्म परिपूर्ण । येर अज्ञान सर्वही. ॥ १४७ ॥ जातिमात्र ब्राह्मण नाम । आचरे हिंसकाचें कर्म । तो श्वपचाहूनी[8] अधम । नरक धाम त्या वस्ती. ॥ १४८ ॥ सीतरूनी[9] नाना जन । पोशी उदर आणि शिश्न । तो युगानुयुगीं राक्षस जाण । राक्षसवीर्यें जन्मला. ॥ १४९ ॥ काया वाचा आणि चित्तें । जे नातळती परहिंसेतें । ते युगानुयुगीं ब्राह्मण निरुतें[10] । ऋषिवीर्यें ते जन्मले. ॥ १५० ॥ जे देहें वर्ण जाती । कर्म धर्म शास्त्र व्युत्पत्ती । ब्राह्मण नव्हे[11] निश्चिती । हे सर्वज्ञा ! जाण पां. ॥ १५१ ॥ जो ओतिला सत्वगुणें । कामादि दोष नातळे[12] मनें । तोचि ब्राह्मण निश्चय जाणें । जातिमात्र तो नव्हे.[13]' ॥ १५२ ॥ सर्प म्हणे, 'मानलें मनीं । ईहीं[14] लक्षणीं हीनें[15] योनी । अशियातें परम ज्ञानी । काय म्हणती सांग पां?' ॥ १५३ ॥ धर्म म्हणे, 'हीं

---

१. पुष्कळ. २. सार्वभौम राजा. ३. 'अर्धासनीं' व 'भद्रासनीं' असें पाठांतर. ४. 'यान ब्राह्मण न चालती त्वरें' असा अन्य पाठ. ५. 'म्हणोनी दंडिलें आपुल्या करीं' असा पाठभेद. ६. हे सर्पश्रेष्ठा. ७. 'कोण ज्ञान' असें पाठांतर. ८. चांडाळाहून. ९. ठकवून. १०. खरोखर. ११. 'बोलिजे' असाही पाठ आहे. १२. न स्पर्शे. १३. हें उत्तर चिंतनीय, ध्येय आणि स्मरणीय आहे. १४. 'हीन' असा अन्य पाठ. १५. नीच जातींना.

लक्षणें । ज्याचे देहीं देखशील नयनें । तोचि उत्तम ब्राह्मण जाणं । निर्धारेसीं जाण पां. ॥ १५४ ॥ सत्य ज्ञान क्षमा शीलता । अनृशंस्यता[11] तपोधनिता । ज्याचे ठायीं तो तत्वतां । ब्राह्मण ऐसें जाण पां. ॥ १५५ ॥ अचल सत्य अचल ज्ञान । भूतदया विष्णुस्मरण । हें जो वर्णी तो ब्राह्मण । तेथें अनुमान असेना. ॥ १५६ ॥ रक्षावया प्रवृत्तिमार्ग । जड मूढां कर्म सांग । वेद बोले अर्थवादांग । जाति प्रमाण ब्राह्मण. ॥ १५७ ॥ ब्राह्मणत्वाचें सकळ फळ । हीनवर्णी[2] पावे अचल । ज्याचें हृदय अतिनिर्मळ । सत्यादि[3] गुणीं वसविलें. ॥ १५८ ॥ ब्राह्मण तो ब्राह्मण नव्हे जाण, । शूद्र तो शूद्र ऐसें न म्हण, । जयापाशीं हें लक्षण । तोचि ब्राह्मण त्रिकाळीं.' ॥ १५९ ॥ सर्प म्हणे, 'धर्मसुता ! । तुझिया ऐकोनी वचनार्था । जातिकुलवर्ण वृथा । हें यथार्थ मानलें. ॥ १६० ॥ भलतिये वर्णी भलतिये व्यक्ती । सत्क्रिया विवेक विचारशक्ति[4] । जेथें वसे तेथें मोक्षपंथीं । सरता होय निर्धारें.' ॥ १६१ ॥ धर्म म्हणे, 'यथार्थ वाणी । हीनवर्ण हीनयोनी । पूर्वपुण्यें ईश्वरभजनीं । सुख सायुज्य पावती. ॥१६२॥ गरुड हनुमंत जटायु शेष । गजेंद्र नक्र ऋक्ष कर्कश । नंदि बहुळा धेनु विशेष । आवडती शिवातें. ॥१६३॥ शिवरात्रीचीं पांचही मृगें । कपोतकें[5] शरीरत्यागें । वसतीं जालीं शिवसंगें । हें पुराणीं परिसतां. ॥ १६४ ॥ पिंगळा वेश्या धर्मव्याध । विदुर ज्ञानियांमाजी प्रसिद्ध । गोपाळ[6] गोपिका विष्णुपद । यज्ञपत्न्या सत्संगें[7]. ॥ १६५ ॥ यासी ब्राह्मणत्वाचा अनळ । स्पर्शला नाहीं हो ! अळुमाळ[8] । अक्षय्य आनंदीं हो सुखसुकाळ[9] । विष्णुभजनें पावलीं. ॥ १६६ ॥ मनुष्यजाती वर्णावर्ण । विशेष ब्राह्मण वर्ण जाण । इतर देह जातिहीन । तेथें निवाड असेना. ॥ १६७ ॥ तेथें ही भिन्न मार्गभजनें । विहित स्वधर्मानुष्ठानें । ईश्वरा पावती हें मनें । हें निर्धारें जाण पां. ॥ १६८ ॥ अक्रोधता अंतप्त[1] वाणी । अप्रशंसा अहिंसा घृणी । हीं ज्यांतें ते शूद्रयोनी- । माजी ब्राह्मण जाण पां. ॥ १६९ ॥ ऐकें पापाचें रूप कवण ? । कासया नामें म्हणिजे पुण्य ? । देहीं अहिंसा अत्यंत गुण । पाप पुण्य या नांव. ॥ १७० ॥ देहीं वर्तती उत्तम गुण । त्याचि नामें ओळखें पुण्य । क्रोध हिंसा दुष्ट वचन ।

---

१. अक्रौर्य. २. नीच जातीची. ३. 'सत्वादि' असा अन्य पाठ. ४. 'विचारशांती' असा पाठभेद. ५. 'कपोती कपोत त्यागें' असा अन्य पाठ. ६. 'गोपिका विष्णूतें वंद्य' असें पाठांतर. ७. 'मोक्ष पावेल सत्संगें' असा अन्य पाठ ८. किंचित्. ९. विपुलता. १०. 'सत्य ज्ञानी' असा अन्य पाठ. ११. 'अनृशंसता' असा अन्य पाठ.

तेंचि पाप जांण पां. ॥ १७१ ॥ सर्वभूतीं ज्या सदयता । देहीं निर्लोभ निरभिमानता, । ब्रह्मप्राप्ति हो! तत्वतां । त्याचि नामें जाणावीं. ॥ १७२ ॥ देहीं अचल सत्वगुण । तोचि स्वर्ग निरुतें जाण । ज्यांचा अविचार तमोगुण । तो नरक निर्धारें. ॥ १७३ ॥ निष्काम कर्में मोक्षप्राप्ती । सकाम कर्में स्वर्गा येती । पापपुण्यें समान होती । तंव पावती नरदेहा. ॥ १७४ ॥ [1]तमोगुणीं दोष । यास्तव घडे नरकवास । [2]तिर्यग्योनी महा कर्कश । प्राप्त होती प्राणियां'. ॥ १७५ ॥ सर्प म्हणे, 'मजसारिखा । अधम योनींत पडला देख । मुक्त होय नरनायका! । ऐसें साधन कोणतें?' ॥ १७६ ॥ धर्म म्हणे, 'यथार्थ वचन । मधुर वचन सत्पात्रीं दान । सत्य आणि विष्णुस्मरण । दोघीं वदन वसविलें. ॥ १७७ ॥ अहिंसानिरत सदय पुरुष । स्वर्ग मोक्ष तयाचा दास । [3]जन्ममरण त्याचा देश । स्पर्शों न शके कल्पांतीं. ॥ १७८ ॥ साधनीं श्रेष्ठ सत्य दान । त्याहुनी अहिंसा अधिक जाण । अहिंसा तेथें भगवान । मोक्षफळेंशीं तिष्ठत.' ॥ १७९ ॥ धर्म बोले मधुर शब्दीं, । 'दिससी विवेकाचा [4]उदधी । ऐशियाची चळली बुद्धी । आश्चर्य मज वाटे.' ॥ १८० ॥ ऐकोनी बोले नागेंद्र नहुष, । 'सर्व विषयीं जाणता पुरुष । ऐश्वर्यमदें पावे भ्रंश । पात्र [5]जाला निर्धारें. ॥ १८१ ॥ इंद्र चंद्र विष्णु ब्रह्मा । श्रेष्ठ शंकर जो परमात्मा । तोही गुणक्षोभ झालिया भ्रमा । पात्र जाला निर्धारें. ॥ १८२ ॥ दळामाजी जो पाचारी । व्याघ्र झेपावे तया वरी । ऐसा ज्ञाता गर्वकरीं । महाव्यसनीं पाडिजे. ॥ १८३ ॥ ऐश्वर्याचे महामदें । अगस्तिऋषीतें ताडिलें पदें । पद भ्रंशोनी आपदे । सर्पदेहीं भोगिलें. ॥ १८४ ॥ आजी तुझिये अमृतवचनीं । मुक्त जालों इये व्यसनीं । अगस्ती उच्छापाची वाणी । फळा आली ये काळीं. ॥ १८५ ॥ धर्मराजा! तुझिये वचनीं । समाधान पावलों मनीं । बंधू मुक्त करीन वदनीं । चिंता न करीं पवित्रा!' ॥ १८६ ॥ ऐसें बोलतां बोलतां राया । पालटली सर्पकाया । दिव्य देह पावोनियां । उभा ठेला जवळिकें. ॥ १८७ ॥ 'माझिये वंशींचा वंशज । यथार्थनामा धर्मराज । तुवां उद्धरिला पूर्वज । हें आश्चर्य तंव नव्हे'. ॥ १८८ ॥ करूनी मूर्ध्नीं अवघ्राण । आवडी दिधलें आलिंगन, । म्हणे, 'घेईं आशीर्वचन । राज्य करीं पृथ्वीचें.' ॥ १८९ ॥ आश्वासोनीं कुरुनंदना । विमानयानीं शक्रभुवना । जाता झाला सहस्रकिरणा । तुल्यतेजा

---

१. 'तमोगुणीं नांव दोष' असा अन्य पाठ. २. पशुयोनी. 'नीच योनी' असा अन्य पाठ. ३. 'मरणाचा तया दोष' असें पाठांतर. ४. समुद्र. ५. 'हें कौतुक कर्माचें' असा अन्य पाठ.

नरेंद्र. ॥ १९० ॥ हृदयीं कवळूनी अनुज । आश्रमा पावला धर्मराजा । ऋषिबंधूसहित [1]भाज । परमानंद पावलीं. ॥ १९१ ॥ यावरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ। सुटला पश्चिमेचा [2]अनिळ। मेघमाला मोकली. ॥१९२॥ पृथ्वीमंडळींचा जलराशी । पारधी [3]पातला आकाशीं । पिटीत मृगांचे पाठिशीं । सैरा गगनीं धांवत. ॥ १९३ ॥ इंद्रचाप धरूनी मुष्टी । रोहिणी मृगाचिया पाठीं । मे[4]घधारा जीवनवृष्टी । करीत वेगें पातला. ॥ १९४ ॥ सूर्यकिरण मृगसमुदाय । निस्तेज होऊनी पावले भय । लपावया शोधीत ठाय । अभ्रें आड करूनियां. ॥ १९५ ॥ कीं पृथ्वीखंड त्या शाळुंखा । अनेक पर्वत शिवपिंडिका । इंद्रें मांडिलें अभिषेका । गगनपात्रीं बहु धारा. ॥ १९६ ॥ मयूर चातक कपोतक । दर्दुर करिती महाघोष । मेघ जगाचा पाळक । सर्व लोकां जाणविती. ॥ १९७ ॥ विद्युल्लतांचे कडकडाट । घनग[5]र्जना गडगडाट । गंगादि सरितांचे [6]संघाट । महापूर माजले. ॥ १९८ ॥ अठरा भार वनस्पती । [6]अंकुरवसनें वेढिली जगती । फळ शाका धान्य संपत्ती । पृथ्वी [7]पिके जगातें. ॥ १९९ ॥ विष्णु जगाचा प्रतिपाळिता । तोचि मेघ होय तत्वतां । प्रमाण करुनी चंद्र सविता । [8]आप वोपी अयनांशें. ॥ २०० ॥ चारी मास दीपदानें । पादुका छत्रें [9]ऊर्णावसनें । ऋषीश्वरां कुरुभूषणें । अपरिमित वोपिलीं. ॥ २०१ ॥ असो. वृष्टिकाळ सरला । कार्तिकाचा प्रवेश झाला । ऋषीसहित धर्म वहिला । काम्यकारण्या पातला. ॥ २०२ ॥ पुढें श्रीकृष्णपांडवभेटी । मार्कंडेयाच्या विचित्र गोष्टी । परिसतां अमृताची वृष्टी । श्रवणीं गमे श्रोतयां. ॥ २०३ ॥ इति श्रीभारत वनपर्वणि । श्रवणें कलिक्लेश[10]धुंनी । अनायासें विष्णुसदनीं । वसतें करी श्रोतयां. ॥ २०४ ॥ मुक्तेश्वराचा वाग्विलास । देशभाषा परि संतोष । मानूनियां साक्षीलागीं व्यास । उभा असे जवळिके. ॥ २०५ ॥

---

## अध्याय अकरावा.

तीर्थवासी ब्राह्मण भला । तीर्थें करितां द्वारकेसी आला । तेणें वृत्तांत निवेदिला । वि[11]श्वजीवनाजवळिकें. ॥ १ ॥ 'पांच वर्षें शक्रानिकटीं । वास करूनी

---

१. स्त्री. २. वायु. ३. 'पातला गमे आकाशीं' असा अन्य पाठ. ४. 'मेघधारा बाणवृष्टि' असें पाठांतर. ५. 'खळखळाट' असा अन्य पाठ. ६. वस्त्रानें. 'आनंदें विरूढली क्षिती' असा अन्य पाठ. ७. 'वांटी' असाही अन्य पाठ आहे. ८. पाणी. ९. लोंकरीचीं वस्त्रें. १०. नदी. 'कलिकलिमषधुनी' असा अन्य पाठ. ११. कृष्ण.

सुख संतुष्टी । दिव्य अस्त्रें लाहोनी [1]किरीटी । धर्मभेटी पातला.' ॥ २ ॥ आयकोनी आल्हाद पुरुषोत्तमा । पार्थभेटीचा अपार [2]महिमा । सवें घेउनी सत्यभामा । [3]काम्यकवना पैं आला. ॥ ३ ॥ काम्यकवना पावतां मुकुंदु । सन्मुख पावले पांचहि बंधु । [4]परस्परें ब्रह्मानंदु । ब्रह्मांडघटीं न [5]समाये. ॥४॥ सत्यभामा आणि द्रौपदी । [6]प्राप्त जालिया सुखसंवादीं । जेंवि [7]जान्हवी आणि [8]कालिंदी । ऐक्य येती [9]समरसें. ॥ ५ ॥ ऋषि[10]वृंदें वंदुनी भाळीं । बैसका केली [11]कृष्णाजवळी । मार्कंडेय तेचि काळीं । गगनमार्गें पातला. ॥ ६ ॥ मार्कंडेय ऋषीची [12]समास्या । सविस्तर बोलतां [13]कुरुनरेशा ! । आयुष्य न पुरे तेथें आशा । कैंची पुढील कथेची ? ॥ ७ ॥ [14]प्रसंगें बोलतां तेथें । पृथु[15]वैन्यादि राजचरित्रें । सरस्वतीचीं अत्यद्भुतें । संवादिला श्रीरामासीं. ॥ ८ ॥ मत्स्योपाख्यान [16]इंद्रद्युम्न । [17]धुंधुमारचरित्र गहन । [18]पतिव्रतेचें महिमान । [19]अंगिराख्यान त्या पाठीं. ॥ ९ ॥ [20]द्रौपदीसत्यभामासंवादु । सरलिया द्वारके गेला गोविंदु । मार्गें वर्तला विनोदु । तो निरोपीन परिसावा. ॥ १० ॥ द्वारके गेलिया पुरुषोत्तम । ऋषीसहित राजा धर्म । अद्वैतवना पातला परम । सुखसंतोष सर्वांतें. ॥ ११ ॥ अद्वैतवनामाजी वसतां । काय कैशी वर्तली कथा । जन्मेजया धरित्रीनाथा । वैशंपायन परिसवी. ॥ १२ ॥ दुर्योधन सह परिवारीं । राज्य

---

१. अर्जुन. २. 'प्रेमा' असाही पाठ आहे. ३. 'द्वारकेहुनी चालिला' असाही पाठ आहे. ४. 'क्षेमालिंगनें अद्वयानंदू' असाही पाठ आहे. ५. मावे. ६. 'प्रीतीनें मिनल्या सुखसंवादीं' असाही पाठ आहे. ७. गंगा. ८. यमुना. ९. एकरस, परिपूर्ण. १०. समूह. ११. 'वृक्षातळीं' असाही पाठ आहे. १२. समास्या=संगति. यास उदाहरण:—'येषां त्रीण्यवदातानि विद्या योनिश्च कर्म च । तानवेत्तैः समास्या हि शास्त्रेभ्योऽपि गरीयसी ॥ २७ ॥ [वनपर्व—अध्याय १] या श्लोकावर टीका लिहितांना नीलकंठ चतुर्धर म्हणतात:—'समास्या संगतिः सं पूर्वस्यास गतावित्यस्य रूपम्'. एकाद्या पद्याचे दोन किंवा तीन चरण म्हटले असतां सदहू चरणांतील अर्थाशीं विरोध न येईल अशा रीतीनें बाकीचे चरण रचणें यास समस्यापूरण म्हणतात; व सदहू प्रथम म्हटलेल्या चरणांस समस्या म्हणतात. मूळ वनपर्वांत मार्कंडेयसमास्यापर्व फार लांबट आहे. धर्मानें प्रश्न केल्यावरून मार्कंडेयानें सविस्तर उत्तर देऊन जसें काय त्याचे समस्येचें पूरण केलें आहे; म्हणूनच यास 'मार्कण्डेयसमास्यापर्व' (अध्याय १८२-२३२) म्हटलें आहे असें वाटतें. १३. राजा. १४. 'तया लागीं संक्षेप केला येथें' असाही पाठ आहे. १५. वेनपुत्र. १६. अध्याय १९९ पहा. १७. अध्याय २०१ पहा. १८. अध्याय २०५ पहा. १९. अध्याय २१७ पहा. २०. अध्याय २३३—२३५ पहा. यालाच 'द्रौपदीसत्यभामासंवादपर्व' असें नांव आहे.

करितां हस्तिनापुरीं। गर्वें म्हणे, 'आपुली सरी। शक्र तोही ठेंगणा.'॥१३॥ अरण्यवासी बहु तापस। अन्नोदकीं पावोनी संतोष। वर्णिती पांडवांचें यश। कौरवराजयाजवळिकें. ॥ १४ ॥ म्हणती, 'संसारीं जन्मावें। तरीच पांडवां ऐसें व्हावें,। प्रातःकाळीं नाम घ्यावें। पवित्रांचें पवित्र. ॥ १५ ॥ उत्तम पुरुषीं जी यावें कैसें। पांडव धर्मराया ऐसें। अरण्यवासीं [1]षड्रसें। लक्ष ब्राह्मण पाळित. ॥ १६ ॥ [2]स्नान करूनी द्विजपंक्ती। इच्छाभोजनें तृप्त होती। लोकत्रयीं निर्दोष कीर्ति। [3]घरटी घाली तयांची.' ॥ १७ ॥ ऐकोनी दुर्योधनमनीं। विषादें धडकला क्रोधाग्नी। जैसे साधुचिया स्तवनीं। संतापती दुरात्मे.॥१८॥ रामस्तवनें दशाननू। कृष्णस्तवनें मागधर्जनू। हरिस्मरणें ध्यावया प्राणू। हिरण्यकशिपू ज्यापरी. ॥ १९ ॥ तेंवी क्षोभला दुर्जन। म्हणे, 'येथें [5]उपाय बरवा कवण?' । तंव तेथेंची [4]अत्रिनंदन। दुर्वास ऋषी पातला. ॥ २० ॥ असंख्य शिष्यांसहित। मुनि पातला अकस्मात। देखोनी दुर्योधनें तेथ। स्वार्थ कांहीं कल्पिला. ॥ २१ ॥ तो [7]महंत देखोनी नयनीं। विनयें मस्तक ठेविला चरणीं। बैसवूनी कनकासनीं। सर्वोपचारें पूजिला. ॥ २२ ॥ ऋषि बोले समर्थोत्तरीं,। 'कांहीं काळ तुमचे घरीं। क्रमावा ऐशी मज अंतरीं। आवडी उपजे अपार.' ॥ २३ ॥ 'अवश्य' म्हणोनी कौरवनृपती। उभा ठेला जोडिल्या हस्तीं,। म्हणे, 'स्वामी! कृपामूर्ती!। सनाथ केलें पाहिजे.' ॥ २४ ॥ रत्नागार देउनी वस्ती,। माजी भरल्या सर्व संपत्ती,। जो जो पदार्थ इच्छिजे चित्तीं। तो तो पुढें स्वतःसिद्ध. ॥ २५ ॥ अवकाश नेदितां लगबगें। नाहीं तोची अकाळीं मागे। सिद्ध करूनी आणिल्या नेवे। तें सांडी [10]चौहटां. ॥२६॥ समस्त जालिया निद्रापन्न। अर्ध रात्रीं मागे अन्न। सहस्र खंडिया उष्ण उष्ण। भक्ष्य भोज्य सर्वही. ॥ २७ ॥ रस शाका धान्य फळ। ऋतुवीण मागे उतावेळ। विलंब होतां प्रलयानळ। [11]तेंवी कोपे वडी घडी. ॥ २८ ॥ 'रात्रिकाळीं चार प्रहर। जोडूनियां उभय कर। उभा राहें मज समोर'.। दुर्योधना आज्ञापी. ॥ २९ ॥ 'जरी लागेल पातया पातें। तरी माझा कोप ठाउका तूतें'.।

---

१. मधुर, कडु, कषाय, आम्ल, क्षार, तिक्त हे सहा रस—गोड, तिखट, तुरट, आंबट, खारट, कडू. २. 'स्नातक ऋषींचिया पंक्ति' असाही पाठ आहे. ३. फेरा. 'विरटी' असा अन्य पाठ आहे. ४. पुत्र. ५. 'अपाय रचावा कवण' असाही पाठ आहे. ६. दुर्वास. ७. साधु. ८. गृह. ९. 'बहु' असा अन्य पाठ. १०. चवाठ. ११. 'धडके जेंवी महावातें' असाही पाठ आहे.

येरू सहनशील चित्तें । सर्व सेवे तिष्ठत. ॥ ३० ॥ 'स्नानपानालागीं[1] विमेळ[2] ।
आपुल्या शिरीं आणीं जळ'. । 'अवश्य' म्हणोनी **कौ**रवपाळ । शब्दापाठीं
संपादी. ॥ ३१ ॥ उग्र[3] कोपातें न मानून । सेवे सादर दुर्योधन, । हें देखोनी
ऋषींचें मन । सुप्रसन्न सद्भक्ती. ॥ ३२ ॥ म्हणे, 'उतरलासी[4] माझे कसीं ।
आतां वर वोपीन यासी, । जे इच्छा असेल मानसीं । तें मातें माग नरेंद्रा !'
॥ ३३ ॥ प्रार्थुनी बोले **कौ**रवपाळ, । 'दुराशा वाहे बहुत काळ । तरी माझा
संकल्प सुफळ । मी मागेन यां करीं. ॥ ३४ ॥ **अ**द्वैतवनीं **कुं**तीसुत । राहि-
लासे **द्रौ**पदीसहित । सूर्यप्रसादें असंख्यात[5] । ऋषि पाळी सदा अन्नें. ॥ ३५ ॥
लोटलीया अर्धरात्री । भोजन सारी **द्रौ**पदी सती । थाली घालुनियां पालथी ।
निद्रा करी संतोषें. ॥ ३६ ॥ तुम्हीं जावें **अ**द्वैतवना । लक्ष शिष्यांसहित
जाणा । उठवूनी **कुं**तीच्या नंदना । इच्छाभोजन मागावें. ॥ ३७ ॥ कांहीं
अनमान[6] करितां **ध**र्म । तुम्हीं शापूनी करावें भस्म, । ऐसा माझा पूर्ण काम ।
कल्पद्रुमा! करावा.' ॥ ३८ ॥ 'अवश्य' म्हणोनी तपस्वीराज । म्हणे, 'हें माझें
सहज काज'. । **ध**र्मा छळावयाची पैज । स्वीकारिली कोपिष्ठें. ॥ ३९ ॥ अ-
संख्य ऋषींचिया पंक्ती । वना पातला अर्धरातीं, । गर्जोनि टाळी पिटिती
हस्तीं । 'हर हर' शब्दें करूनी. ॥ ४० ॥ जागृत होऊनी[7] **कुं**तीसुत । स-
न्मुख धाविन्नला बंधूंसहित । नमस्कारूनी ऋषि[8] समस्त । कुशासनीं[9] बैसविले.
॥ ४१ ॥ चरणक्षालना आणवी जळ । तंव ऋषि बोले उतावेळ, । 'पोटीं
क्षुधेचा वडवानळ[10] । वरी उपचार कांहीं रुचेना. ॥ ४२ ॥ भोजन सारावयाचे
आर्ती । पंथ लोटितां सत्वर गती । मार्गी मावळला गभस्ती[11] । निशा जाली
यावया. ॥ ४३ ॥ बोलतां अवकाश नाहीं आम्हां, । इच्छाभोजन देईं **ध**र्मा !' ।
येरें अवलोकुनी **भी**मा । [12]**द्रौ**पदी उजू पाहिलें. ॥ ४४ ॥ नमस्कारूनी ऋ-
षीच्या चरणा । **द्रौ**पदी म्हणे, 'जावें स्नाना, । [13]भुकेलेती भोजना । शीघ्र सा-
रिलें पाहिजे.' ॥ ४५ ॥ ऐकोनी **द्रौ**पदीच्या वचना । नियुतसंख्य[14] ऋषि
ब्राह्मण । जाउनी[15] **भा**गीरथी स्नाना । मुनी[16] जातसे लगबगें. ॥ ४६ ॥ दर्भ

---

१. प्राशन. २. स्वच्छ. ३. 'उबक' असाही पाठ आहे. ४. 'उतरला' असाही पाठ आहे. ५. 'त्या द्वारीं' असें पाठांतर. ६. कांकूं; टाळाटाळ. ७. धर्म. ८. 'ऋषी महंत' असाही पाठ आहे. ९. दर्भ. १०. अग्नि. ११. सूर्य. १२. 'द्रौपदीकडे' असा अन्य पाठ. १३. 'भुकेलेती जी भोजना' असाही पाठ आहे. १४. लक्ष. १५. 'समस्त' असा अन्य पाठ आहे. १६. 'मुनी गेले झपझपां' असाही पाठ आहे.

संबळिया देवधोत्रें । शालिग्राम तर्पणपात्रें । आसनें रुद्राक्षमाळा कटिसूत्रें । कमंडलूपात्रें हस्तकीं. ॥ ४७ ॥ 'दिवसा सर्व कर्म सारिलें, । भोजन मात्र असे उरलें, । पळें येतसों वाढिलें । अन्न पात्रींचि पाहिजे. ॥ ४८ ॥ स्वल्प विलंब होतां येथें । [1]शब्द न ठेवावा मातें.' । 'निकें'[2] म्हणोनियां हां![3] ते । जातां[4] म्हणती पांडव. ॥ ४९ ॥ ऐशी घालूनियां अटक । स्नाना गेलें ऋषींचें कटक,[5] । धर्मापोटीं व्याधि[6] धडक । चिंताज्वरें वाढला. ॥ ५० ॥ द्रौपदी म्हणे, 'स्वस्थ राया! । आठवीजे श्रीकृष्णपायां, । ऐसा निधी[7] असतां वायां । दैन्य कासया कल्पिशी? ॥ ५१ ॥ ऐशिया अरिष्टाच्या कोटी । नामें पळती बारा वाटी । स्मरतां पावोनी जगजेठी । अन्न देईल ऋषींतें. ॥ ५२ ॥ हस्तपाद प्रक्षाळूनी । उभी ठेली वृंदावनीं, । द्वारके उजू बद्धपाणी । स्तवन करी कृष्णाचें. ॥ ५३ ॥ 'भुतीं[8] झडपितां पंचाक्षरी, । कीं शस्त्र प्रयोजी[9] कोंडिल्या चोरीं, । बाण वर्षाव होतां वरी । कवच आंगीं लेइजे. ॥ ५४ ॥ दुकळीं सेविजे अन्नदाता । तारक कवळिजे पुरीं पडतां । तेंवी आमुतें अनंता! । तूं रक्षिता संकटीं. ॥ ५५ ॥ नौका बुडतां समुद्रोदरीं । कीं वित्र सांपडे जळतां [10]जोहरीं । सर्प लागल्या धन्वंतरी[11] । तेंवी तूं हरी! आमुतें. ॥ ५६ ॥ कीटकपक्षीहीनदीना । संकटीं रक्षिलें करितां स्मरणा, । आमुतें रक्षिसी हें कवण । चोज[12] मानी सांग पां? ॥ ५७ ॥ लोहकढईत भरलें उदक । तळीं प्रज्वळिला [13]पावक । त्यामाजी मंडूकबाळक । लोहतळीं[14] लागलें. ॥ ५८ ॥ तें संस्कारें स्मरे कृष्ण । तळीं धडकल्या हुताशन[15] । उदक अणुमात्र नोहे उष्ण । तेणें आश्चर्य समस्तां. ॥ ५९ ॥ पर्वतप्राय जळतां काष्ठें । तोयें[16] शीतलता न पालटे । आकाशवाणी महानेटें । गगनोदरीं होसरली. ॥ ६० ॥ म्हणे, 'मंडूक असतां भीतरीं । जाळ घालितां अहोरात्रीं, । उष्ण नोहेल तिळभरी । रिचवा[17] झडकरी जळातें.' ॥ ६१ ॥ तळीं रिचवूनियां जळ । कडे काढा मंडूकबाळ । उदक तापेल तात्काळ । हें निश्चयें जाणिजे. ॥ ६२ ॥ तळीं रिचवितां जी-

---

१. 'माझा कोप ठाउका असे तूतें' असें पाठांतर आहे. २. बरें. ३. 'हातें' असें पाठांतर. ४. 'जा जा' असा पाठभेद. ५. समूह. ६. व्यथा. ७. ठेवा. 'हातीं निधी वसतां' असें पाठांतर आहे. ८. मोरोपंत—वनपर्व—अध्याय ८, गीति १५-२० पहा. ९. सोडी. 'कीं शस्त्र परजिजे अडविल्या चोरीं' असा अन्य पाठ. १०. घर. ११. मंत्री. १२. नवल. १३. अग्नि. १४. 'कढळी तळीं' असा अन्य पाठ. १५. अग्नि. १६. जल. १७. रिकामें करा.

वन । पाहती मंडूकबाळ सान । मुखें म्हणे, 'कृष्ण! कृष्ण !' । विस्मित मन जनाचें. ॥ ६३ ॥ विष्णुविमान येउनी पाहीं । दर्दुर केला दिव्यदेही, । तो ठेविला वैकुंठगेहीं । कृष्णा! तुवां कौतुकें. ॥ ६४ ॥ कुटुंबी कुरंग महावनीं । दुष्ट कर्मे पडिला व्यसनीं । पुढां बाण लावुनी गुणीं । काळव्याधें गोंविला. ॥ ६५ ॥ उभय भागीं पाशश्रेणी । पाठी पेटविला वडवाग्नी । अष्टौ दिशा रोधिल्या श्वानीं । झोंबोनी दशनीं मारावया. ॥ ६६ ॥ हरिणी प्रसूतिकाळ प्राप्त । आळसें चालों न शके पंथ । पाडसें रिघती पोटांत । मोहें कंठीं झोंबती. ॥ ६७ ॥ कुरंग म्हणे, 'कमलापती! । धांव धांव ये आकांतीं.' । कळवळूनियां कृपामूर्ती । महा अरिष्ट वारिलें. ॥ ६८ ॥ विंधितां शीत तुटलें मुष्टी । धूम कोंदला बिळकपाटीं । ससे पळतां तयां पाठीं । श्वान गेले दश दिशा. ॥ ६९ ॥ जाळें जाळिल्या पाशश्रेणी । अकालवृष्टीनें शमला वन्ही । कुरंग कुटुंबेसीं वनीं । जाता झाला संतोषें. ॥ ७० ॥ भारतसेना माजली प्रचंड । तीमाजी पडलें पक्षीअंड । तेणें आश्रयूनी झाड । कृष्णस्तवन मांडिलें. ॥७१॥ रथीं पार्थाचा सारथी । अवलोकुनी रुक्मिणीपती । म्हणे, 'कृष्ण कृपामूर्ती । बाळक माझें वांचवी.' ॥ ७२ ॥ स्तवनें तोषला श्रीपती । कुंजरघंटा पडली वरती । अक्षय गृहाचे आकृती । रक्षण जालें पक्षियां. ॥ ७३ ॥ तया माजी चारा जीवन । देउनी वांचविला प्राण, । पाद पक्ष चंचू नयन । अवयव पूर्ण लाधला. ॥ ७४ ॥ घंटा उचलितां भूपाळगणीं । पक्षी उडोनी भरला गगनीं । पक्षिणीबाळकस्नेहमिळणी । केली तुवां गोविंदा ! ॥ ७५ ॥ कौलिक कृत्रिमवेश नटी । राजकन्या भोगी कपटी । निर्वाण मांडल्या संकटीं । म्हणे, 'धांव श्रीकृष्णा!' ॥ ७६ ॥ या लागीं होऊनी सकृप । आंगीं जालासी याचें रूप । पांडवांचा तंव मायबाप । हे प्रसिद्ध त्रैलोक्यीं. ॥ ७७ ॥ कपोत कपोती तरुवरी । तळीं व्याधें लक्षिलीं शरीं । ससाणा फेरे घाली शिरीं । झडपोनी मारावया. ॥ ७८ ॥ कपोती म्हणे, 'स्वामी कृष्णा! । कृपेनें रक्षीं आमुच्या प्राणा.' । करुणा आयकतां जगजीवना! । चोज कैसें वर्तलें. ॥ ७९ ॥ व्याधें मागें करितां चरणा । सर्पें डंखिलें रोंवुनी दशना । हातींहुनी निष्टला बाण । तेणें ससाणा निमाला. ॥ ८० ॥ कपोत कपोती दोघें जणें । सुखी राहिलीं

१. बेडूक. २. हरिण. ३. दोरी. ४. पारधी. ५. पंक्ती. ६. कुत्रा. ७. बालक. ८. लक्ष्मी. ९. 'ठेविलें पक्षियें अंड' असें पाठांतर. १०. 'आठवूनि झोंड' असा अन्य पाठ आहे. ११. हत्ती. १२. कोळी. १३. पारवा. १४. 'बरी' असें पाठांतर. १५. दांत. १६. मेला.

निर्भय मनें, । ऐसें कृष्णा ! तुझें करणें । उंच नीच सारिखें. ॥ ८१ ॥ समुद्रें हेळिलीं[1] पक्षीकुळें । सागरें हरिलीं त्याचीं बाळें । दुःखें पक्षीयांचे पोळे[2] । आड पडले गरुडातें. ॥ ८२ ॥ मधुमर्दना[3] चालिला हरी । सत्वर गरुडातें पाचारी, । तो म्हणे, 'समुद्रें मजवरी । बलात्कार केला समर्था ! ॥ ८३ ॥ माझीं हरितलीं बाळकें, । सेवा करूं कवण्या मुखें ? । अपमान भोगूनियां रंकें[4] । काय जें जिणें संसारीं ? ॥ ८४ ॥ शिक्षा करिशी जरी सागरा, । तरीच मी तुमचा सेवक खरा, । न करितां तुज मज दातारा । संबंध कांहीं असेना.' ॥ ८५ ॥ देवें पाचारिला सिंधू[5] । नावरे प्रलयाग्नी क्रोधू । रागें कराया वधू । सुदर्शना परजिलें. ॥ ८६ ॥ समुद्रें रिघोनियां शरण । दीधलीं बाळकें आणोन । ते वेळीं गरुड संतोषोन । विष्णुसेवे लागला. ॥ ८७ ॥ अंबरीष ध्रुव प्रल्हाद । गजेंद्र गणिका[6] रुक्मांगद । अजामिळ धर्मव्याध । विदुरादि तुवां तारिले. ॥ ८८ ॥ हे पवाडे जगप्रसिद्ध । त्यांचा न वाटे मज विनोद, । दीन तारिले अप्रसिद्ध । हें कौतुक आगळें[7]. ॥ ८९ ॥ कोणी म्हणती असाक्ष असें । हें कृष्णेंचि लिहविलें असें, । प्रत्यक्ष वर्तलें जें विशेष । तें आवडे वर्णितां. ॥९०॥ जें[8] कां लोपलें पुराणीं । तें प्रकट करावया तुझी वाणी । प्राकृत बोलती ते जनीं । अभक्तपंक्तीं मानावे. ॥ ९१ ॥ असो. द्रौपदी आर्त चित्तें । संकटीं बोभाय[9] श्रीकृष्णातें, । करुणारससागरातें । दाटलें भरतें[10] अपार. ॥ ९२ ॥ 'केश कवळितां दुःशासन । तेव्हां रक्षिला माझा मान, । तैसेंचि हें महाविघ्न । तूंचि एक वारिता. ॥ ९३ ॥ ऐशी अपार तुझी करणी । आजी कां न पावशी अजूनी ?' । धांवा करितां याज्ञसेनी[11] । कृष्णराया जाणवलें. ॥ ९४ ॥ ताट विस्तारिलें[12] रुक्मिणी । भोजना उठतां चक्रपाणी । आयकोनी द्रौपदीची वाणी । ताट हातें लोटिलें. ॥ ९५ ॥ लगबग झाली जगजीवना, । सत्वर पातला अद्वैतवना । आवडी द्रौपदीच्या दर्शना । वृंदावना पातला. ॥ ९६ ॥ किरीट कुंडलें कौस्तुभ मणी । मेखळेमध्यें वैडूर्य किरणी, । जेंवि उगवले पांच तरणी[13] । अमृतवनाआंतौतें[14]. ॥ ९७ ॥ वेधोनी सौदामिनी[15] स्थिर । तेंवि झळके पीतांबर । ऐसा देखोनियां यदुवीर । परमानंद पांडवां. ॥ ९८ ॥ अष्टौ भावें[16] वोसंडत । द्रौपदी करी दंडवत । आनंदसिंधू[17] अत्यद्भुत । विश्व व्यापोनी

---

१. अवमानिलीं. २. समूह. ३. मधुशत्रु. ४. भिकारी. ५. समुद्र. ६. वेश्या. (पिंगळा.) ७. थोर, श्रेष्ठ. ८. 'जें वर्णिलें पुराणीं' असा अन्य पाठ आहे. ९. हाक मारी. १०. भरती. ११. द्रौपदी. १२. मांडिलें. १३. सूर्य. १४. आंत. १५. वीज. १६. आठ सात्विक भाव. १७. समुद्र.

कोंदला. ॥ ९९ ॥ वंदूनी श्रीकृष्णचरण । हर्षें निर्भर पांचही जण । द्रौपदी म्हणे, 'माझें मन । स्वस्थ कर्ता तूं एक. ॥ १०० ॥ कोपिष्ठ ऋषी गेला स्नाना । ये तंव आयुष्य आमुच्या प्राणा, । विलंब होतां विश्वजीवना! । भस्म करील आमुतें.' ॥१०१॥ ऐकोनी हांसे रुक्मिणीरमण,[1] । 'अकाळीं कैसें पावेल अन्न? । कांहीं [3]वोपीं कृपे करून । दीधल्याविण स्वस्थ नव्हें मी. ॥१०२॥ परी तें असों दे प्रस्तुत, । मातें क्षुधा पीडी बहुत, । भोजन सांडूनी धांवत । तुजलागीं पातलों. ॥ १०३ ॥ फळाहार अथवा अन्न । कांहीं [3]वोपीं कृपेकरून । दीधल्याविण माझें मन । स्वस्थ नोहे सर्वथा'. ॥ १०४ ॥ द्रौपदी म्हणे, 'वासुदेवा! । ऋषीलागीं केला तुझा धांवा, । तुजवेगळें देवाधिदेवा! । स्मरों कवणा सांग पां? ॥ १०५ ॥ शुद्धभावावेंगळें कांहीं । हृदयगेहीं उरलें नाहीं.' । कृष्ण म्हणे, 'थाली पाहीं, । अन्न असेल लागलें. ॥ १०६ ॥ शेष असेल थाली आंत । तेणें क्षुधा करीन शांत.' । द्रौपदी म्हणे, 'उपाय एथ । बोलावया दिसेना. ॥ १०७ ॥ माझिया भोजना अंतीं । थाली घालिजे पालथी, । तुज नेणतां लक्ष्मीपती! । काय उरेल सांग पां?' ॥१०८॥ 'थाली आणूनी दावीं मातें.' । द्रौपदीयें वोढवली हातें, । स्वल्प शाकपत्र तेथें । लागलें दिसे लोचनीं. ॥ १०९ ॥ हात वोढवी रुक्मिणीपती । द्रौपदी देंठ घाली हातीं, । देव म्हणे, 'इतुकेन तृप्ती । जाली मातें जननीये!' ॥११०॥ 'देवा! विश्वंभरा! पावो.' । ऐसें बोले धरूनियां भावो । संकल्प सोडितां श्रीकृष्णदेवो । तृप्त झाला [4]अपाडें. ॥ १११ ॥ थाली पहिलेचि निर्मळ जाण । द्रौपदीहातींचें प्रक्षालन । शाकपत्र स्वयें आपण । आपणालागीं निर्मिलें. ॥ ११२ ॥ नाहीं भक्ताच्या प्रारब्धीं । तरी नवें निर्मुनी देतो सिद्धी, । असो. या परी [5]कृपानिधी । पांडवांतें रक्षित. ॥ ११३ ॥ ढेंकर देतां जनार्दनें । तृप्तीनें घालीं त्रिभुवनें, । मग म्हणे, 'पाचारा ब्राह्मणें । भुकें पीडिलीं बापुडीं'. ॥११४॥ द्रौपदी पाहे आश्रमांत । तंव पडले अन्नाचे पर्वत । भक्ष्यें भोज्यें अपरिमित । नानाविध रचियेलीं. ॥ ११५ ॥ अमृतप्राय शिकरणीं । [6]कथिका [7]वंटक शाकाश्रेणी[8] । उष्ण वाफा धांवती गगनीं । घमघमीत सुवासें. ॥ ११६ ॥ घृतदुग्धाचीं सरोवरें । दधी [9]नवनीत [10]दुग्धसारें. । देखोनी द्रौपदी [11]हर्षनिर्भरें । 'ब्राह्मणांतें म्हणे' 'पाचारा.'

१. पति. २. 'विचारितां दिसे महा विघ्न । हें कैसें निवारे' असाही पाठ आहे. ३. देईं. ४. अपार. ५. दयासागर. ६. कढी. ७. वडे. ८. पंक्ती. ९. लोणी. १०. तूपें. ११. अतिशय.

॥ ११७ ॥ येरीकडे अघमर्षणी । ऋषी चोज देखती नयनीं । गंगातीरीं हेमसदनीं[2] । रत्नदीप लागले. ॥ ११८ ॥ पंच वैरेंसी[3] पतिव्रता । नूतन निर्मी विश्वकर्ता । नाना चोज ऋषींचे चित्ता । ब्राह्मण जेवितां भुलले. ॥ ११९ ॥ कनकआडणीयां कनकताटें । हिरे माणिकें रत्नविटे । आसनें सूदलीं हेमपीठें । ऋषी आदरें बैसविले. ॥ १२० ॥ गंध पुष्प परिमळ माळा । धूप दीप वोपिले सकळा । दुर्वासासहित ब्राह्मणमेळा । सुखें भोजना बैसले. ॥ १२१ ॥ द्रौपदी उदार हस्तें वाढी । धर्मराज संकल्प सोडी, । क्षुधारसें[4] ब्राह्मण तोंडीं । ग्रास घेती लगबगें. ॥ १२२ ॥ कनकताटीं चंद्रकळा । तेंवी ओदन[5] वोगराळां[6] । लाजवी मालती[7] बकुळा । तेंवी सीत[8] सोज्वळ. ॥ १२३ ॥ सोलींव डाळीचें वरान्न । वरी भासे सुवर्णवर्ण । मुक्ताफळें उपमा सान । तेंवी वळवट[9] शोभती. ॥ १२४ ॥ आळलीं[10] कामधेनूचीं दुग्धें । अमृतातें ही हेळसीती[11] स्वादें । कृष्णहस्तींचीं तीं शब्दें । केंवी येती दृष्टांता? ॥ १२५ ॥ तयांवरी गयेची शर्करा । घृत साजूक पंच धारा । क्षीरभोजनीं ऋषीश्वरां । आराणूक[12] असेना. ॥ १२६ ॥ पूर्ण पोळिया आज्यें[13] तप्तें । घारिया शेवया नवनीतें । गुळवरिया थिजल्या घृतें । रुचे तितुकें सेवावें. ॥ १२७ ॥ सहदेव बोले कौतुकें, । 'भोज्यें मेळवावीं वटकें, । कथिकारसेंसीं प्रत्येकें । शाका अनेक भक्षाव्या. ॥ १२८ ॥ आम्ररसेंसीं साखरमांडे, । दधिसायेसीं कुरवडे, । दुग्धसायेशीं वांकुडे[14] । कौनवले स्वादिष्ट. ॥ १२९ ॥ दुग्धें आळूनी[15] केलीं दाटें । श्वेत[16] पोळिया शुभ्र सपीटें । जेवितां प्रेम वाटे मोठें । अधिकाधिक सेवाया. ॥ १३० ॥ खाज्या करंज्या अनारसे । साखरफेणिया वरें[17] बत्तासे । लाड्डू तिळवे सुरसें । स्वादविशेषें खांडविया. ॥ १३१ ॥ वडिया पापड तिळवडिया । चवी आगळी सांबरिया । घारगे सांडगे कुरवडिया । लेहें[18] पेहें[19] पालटे. ॥ १३२ ॥ स्वाद आगळा[20] दध्योदनीं[21] । तक्रा दिधली वोघेरणी[22] । लवण[23] शाकांचिया श्रेणी । दुणावती भोजन. ॥ १३३ ॥ बेलें आंवळे सालफळें ।

---

१. स्नान. २. घर. ३. पति. ४. 'क्षुधातुर' असा अन्य पाठ. ५. भाताचें शीत. ६. 'ओगरी धवळा' असें पाठांतर. ७. मोगऱ्याचें फूल. ८. शुभ्र. ९. बोटवे. १०. 'आणिलीं' असा अन्य पाठ आहे. ११. अवमानिती. १२. समाधान. १३. तूप. १४. करंज्या. १५. आटवून. १६. पांढऱ्या. १७. उत्तम. १८. चाटण्याचे पदार्थ. १९. पिण्याचे पदार्थ. २०. अधिक. २१. भात. २२. फोडणी. २३. मीठ.

नेपती सुरणें मायणिमुळें । आलें लिंबें अतिरसाळें । कोंभ कोंवळे तौशींचे. ॥ १३४ ॥ मिऱ्या पिंपळियांचे घोस । आंबे भरींव रसाळ सुरस । गाजरें खडशिंगे विशेष । भोंकरें कुहिरिया करवंदें. ॥ १३५ ॥ निर्मळ देवगंगेचें जळ । वेळा वाळा सुपरिमळ । सेवितां गात्रें होती शीतळ । तापत्रयातें त्यागिती. ॥ १३६ ॥ अमर्यादेनें फुगलीं पोटें । धोत्रें ढिलाविती बोटें । रिता ठाव न दिसे कोठें । उदक तेंही घ्यावया. ॥ १३७ ॥ 'भोजन करितां गेला प्राण । पुढती मिळेल होतां जनन । परंतु ऐसें हें परान्न । जन्मोजन्मीं न देखों.' ॥ १३८ ॥ बोले दुर्वास आचार्य, । 'अनेक चक्रवर्तींच्या घरीं । जेविलों परी ऐशी पैरी । नाहीं कोठें देखिली. ॥ १३९ ॥ विश्व पाळी अन्नदानें । त्याचे हातीं निपजलीं अन्नें । त्यांचा स्वाद जाणिजे कोणें । तपोधनें भाग्याचीं ?' ॥ १४० ॥ ऋषींस तृप्ति झाली मोठी । चंद्रमंडळीं लागली दृष्टी । वस्त्रें न दिसती तळवटीं । फिटलीं किंवा राहिलीं. ॥ १४१ ॥ म्हणती, 'माथां असतीं मुखें । तरी होतें बहु निकें, । ग्रास उचलूनी हस्तकें । ऊर्ध्व वदनीं घालितों'. ॥ १४२ ॥ करूनी सागर-तुल्य उदर । सेविजे धर्माचेंची घर, । द्रौपदीहस्तीं निरंतर । हेंचि भोजन करावें. ॥ १४३ ॥ उठले हस्त प्रक्षाळूनी । विडे[4] दिधले त्रयोदशगुणीं । बैसका न करवे म्हणोनी । सुखशयनीं पहुडले. ॥ १४४ ॥ डोळे लावितांचि तेथ । साहीजणें झालीं गुप्त । कृष्णचरित्र अत्यद्भुत । ब्रह्मादिकां नेणवे. ॥ १४५ ॥ धर्मआज्ञेनें अतिसत्वरा । सहदेव पातला गंगातीरा, । नमस्कारीत ऋषीश्वरां । म्हणे, 'जी ! शीघ्र चलावें. ॥ १४६ ॥ अन्नें विस्तारिलीं पात्रीं । तीं पडावीं तुमच्या वैक्त्रीं । त्वरा करावी पवित्रीं । तीं निवतील अतिविलंबें.' ॥ १४७ ॥ दुर्वास बोले ऋषींप्रती, । 'थोर अविवेकें पडली भ्रांती । दुर्योधनाचीये युक्ती । तपश्चर्ये नागवलों. ॥ १४८ ॥ जाणत केलें विषभक्षणा । कालसर्पैशीं संघटणा । विष्णुभक्तांची करितां छळणा । आतलें विघ्न रोकडें. ॥ १४९ ॥ अंबरीष करितां कष्टी । चक्र लागलें माझे पाठी, । तैशीच हे ही

१. कांकडी. २. वेलदोडा. ३. तऱ्हा. ४. **'त्रयोदशगुणी विडा'**—पूगीफल (सुपारी), नागवेलीचीं पानें, चुना, कात, जायफळ, जायपत्री, वेलची, केशर, कंकोळ, कर्पूर, लवंगा, बदाम, पिस्ते किंवा खोबरें. तांबूलाचे गुण वर्णिले आहेत ते असेः—'तांबूलं मुखरोगनाशि निपुणं संवर्धनं तेजसो नित्यं जाठरवह्निवृद्धिजननं दुर्गंधदोषापहम् । वक्त्रालंकरणं प्रहर्षजननं विद्वत्कृपाप्रेरणे कामस्यायतनं समुद्भवकरं लक्ष्म्याः सुखस्यास्पदम् ॥.' ५. वाढिलीं. ६. मुख. ७. अविचार. ८. 'क्रीडन' असें पाठांतर. ९. प्राप्त झालें.

होईल गोष्टी । उठाउठी पळावें. ॥ १९० ॥ तींतडी अन्नें म्यां करविलीं । तितुकीं दिसती वांया गेलीं, । द्रौपदी सती जर क्षोभली । तर शापील आम्हांतें.' ॥ १९१ ॥ आलिंगुनी सहदेवातें । म्हणे, 'शांतवीं धर्मरायातें । माझा आशीर्वाद तुम्हांतें । कल्याण करू सर्वदा. ॥ १९२ ॥ दुर्योधनाच्या विचारें । सत्य पातलों छळणाचारें, । परी सागर शोषावया पामरें । शक्ति कोठूनी आणावी? ॥ १९३ ॥ कृष्णकृपेच्या शशि[2]मंडळीं । सर्वदा वसती पांडव बळी । ते पोळिजेत विघ्नजाळीं । हें कैसेनी घडेल? ॥ १९४ ॥ कृष्णकृपेची अक्षय नौका । तीमाजी पांडव बैसले देखा । शत्रुअपायमृगोदका[3]- । माजी बुडती कैसेनी?' ॥ १९५ ॥ निरोप पाठवूनी धर्मा । गेला दुर्वास स्वाश्रमा । कृष्णपांडवांचा प्रेमा । चढोवढी दुणावे. ॥ १९६ ॥ धर्म म्हणे, 'कृष्णस्मरणीं । कैंची भवभयाची कहाणी[4]? । अवघीं असा समाधानीं । चिंता नेदा आतळों. ॥१९७॥ अमृतसमुद्रीं बसविला । तयासी मृत्यु कोठूनी आला?। कुंजरपृष्ठीं[5] जो बैसला । तया श्वान चावे केउता? ॥ १९८ ॥ मनीं कृष्ण, वदनीं कृष्ण, । भूतमात्रीं देखे कृष्ण, । त्यांचीं विघ्नें होती कृष्ण । स्वयें होत सुखदाता. ॥ १९९ ॥ हस्त ठेउनी पांडवमाथां । अभय दिधलें समस्तां, । आज्ञा मागोनी विश्वकर्ता । जाता झाला द्वारके. ॥ १६० ॥ यापरी सरला 'थालीपाक' । ऐकतां भवभयाचा [6]पंक । नातळत[7] हें कविनायक । व्यास बोले भारतीं. ॥ १६१ ॥ पुढें 'घोषयात्रा' निरूपण । श्रोते परिसोत सावधान[8], । मुक्तेश्वराचें चित्तसुमन[9] । संतचरणीं सर्वदा. ॥ १६२ ॥

---

## अध्याय बारावा.

हस्तिनापुरींचा वृत्तांत । 'दुर्वासयात्रा' झाली व्यर्थ । ऐकोनी गांधारीसुत । चिंताग्रस्त मानसीं. ॥ १ ॥ पाचारूनी शकुनीकर्णा । दुःशासना कुरुनंदना । म्हणे, 'उपाय पांडवहनना । शीघ्र काळीं विचारा.' ॥ २ ॥ शकुनी सांगे श्रेष्ठ युक्ती, । 'तुम्हांस[10] प्रसन्न सर्व जगती, । पांडव वनवासी कष्टती । भणंगप्राय[11] पामरें. ॥ ३ ॥ वल्कल[12]वसनी निराहारी । सखेद[13] द्रौपदी सुंदरी । संकीर्ण काष्ठाचिये परी । कृश मलीन मानसें[14]. ॥ ४ ॥ श्वेत[15] ताडपत्रें कर्णीं । कमळनालीं

---

१. जलदी. २. चंद्र. ३. मृगजल. ४. गोष्ट. ५. हत्तीच्या पाठीवर. ६. चिखल. ७. न स्पर्शें. ८. लक्ष्यपूर्वक. ९. फूल. १०. 'तुम्ही संपन्न सर्व संपत्ती' असा पाठभेद. ११. भिकारी. १२. झाडाची साल. १३. 'सदैव' असें पाठांतर. १४. 'शरीर डोळसा' असा अन्य पाठ आहे. १५. शुभ्र.

वेष्टिले पाणी[1] । लोटलिया अर्धरजनी । स्वल्प आहार अशना[2]. ॥ ५ ॥ नाहीं अभ्यंग ना तांबूल । नाहीं कुंकुम ना काजळ । चीरकंचुकीवीण[3] सर्वकाळ । दुर्बळवधूसारिखी. ॥ ६ ॥ सेना घेउनी सांगातें । ऐश्वर्य दावितां शत्रूंतें[4] । धिक्कारुनी आपुलीं जीवितें । लज्जे प्राण त्यागिती. ॥ ७ ॥ अमूल्य वस्त्रें रत्नाभरणें । छत्रें चामरें सुवर्णपणें[6] । सुवर्णशिबिका[7] सुखासनें । विचित्र डोळां दावावीं. ॥ ८ ॥ दिव्य सुमनें[8] हरिचंदनें । कुंकुम केशर सुंदर वैसनें, । कस्तूरीलेप सुगंध चूर्णें । तांबूलपर्णें[10] कर्पूरी. ॥ ९ ॥ प्रचंड वाद्यांचे बोभाट[11] । ऐकतां होय हृदयस्फोट[12] । मेघधारीं हव्यवाट[13] । तेंवी निस्तेज करावे. ॥ १० ॥ महदैश्वर्य देखोनी दृष्टी । पुरुष टाकोनी उठाउठी । अप्रार्थितां ते गोरटी[14] । वश होईल तुम्हांतें. ॥ ११ ॥ तुळितां भासती निर्बळ । तरी मारूनी टाकावे तत्काल । इतुकेन तुम्हां क्षेम कुशल । ध्रुवा ऐसें जाणपां. ॥ १२ ॥ हेचि एक बुद्धि अचल । वना निघावें तात्काळ । विलंब करितां अर्ध पळ । मंत्र[15] फुटेल बहुकर्णीं. ॥ १३ ॥ धृतराष्ट्रातें बोलिजे ऐसें । गोक्षीरा पाहाणें असे, । घोषयात्रेचेनी[16] मिषें । अद्वैतवना निघावें.' ॥ १४ ॥ ऐसें बोलतां सौबळ । मानवले कौरव सकळ, । म्हणती, 'बुद्धिसमुद्र हा मातुळ[18] । होय सर्वज्ञ[19] सर्वथा.' ॥ १५ ॥ विकर्ण म्हणे, 'अविचार युक्ति । जो जो संकल्प चिंतिजे चित्तीं । तैसें घडतें निश्चिती । ईश्वर आपणची निजांगें. ॥ १६ ॥ आपण करूं जावें एक । प्रारब्ध घडवी आणिक, । ईश्वरमायेचें कौतुक । ब्रह्मादिकां न कळे. ॥ १७ ॥ काळ ईश्वर आणि प्रारब्ध । साहा शास्त्रें आणि चार वेद । प्रमाणतेचे[20] शब्द । काय कृत्रिम[21] मानावे? ॥ १८ ॥ आपुलें केलें पावे सिद्धी । हे मूर्खाची मूर्खबुद्धी । ईश्वरें प्रेरिलिया प्रारब्धीं । जसें असेल तेंचि होतसे. ॥ १९ ॥ उत्तमीं सन्मार्गीं वर्तावें । होईल तें उगेंचि पाहावें । इच्छिल्या सारिखें फळ व्हावें । हें सर्वथा अज्ञान. ॥ २० ॥ पुढिलियां उपजवी संताप । तोचि आपण पावे त्रिविध[22] ताप, । कांडकें[23] डंवचितां काळसर्प । दंश कीजे विषदंतीं.' ॥ २१ ॥ ऐसें बोलतां विकर्ण । सकळीं केली हो!

---

१. हात. २. भक्षण. ३. लुगडें. ४. स्त्री. ५. 'पांडवांतें' असा अन्य पाठ आहे. ६. 'सूर्यपर्णें' असें पाठांतर. ७. पालखी. ८. पुष्पें. ९. वस्त्र. 'सुरंग वसनें' असाही पाठ आहे. १०. विड्याचीं पानें. ११. आवाज. १२. फुटणें. १३. अग्नि. १४. स्त्री. १५. मसलत. १६. गवळवाडा. १७. जाणें. १८. मामा. १९. 'कुशळ' असें पाठांतर. २०. 'प्रमाण बोलती ते शब्द' असा अन्य पाठ. २१. खोटे. २२. आधिदैविक, आधिभौतिक, आध्यात्मिक. २३. काठी.

हेळणा[1], । जेंवी अध्यात्मनिरूपणा[2] । अनाचारी हांसती. ॥ २२ ॥ घ्यावया पांडवांच्या प्राणा । निश्चयो केला जावया वना । प्रज्ञाचक्षूचिया[3] मना । कें बोधवावें पातलें[4]. ॥ २३ ॥ म्हणती भूपाळचक्रवर्ती, । 'गोप येऊनी करिती विनंती, । गोक्षीर पशुसंपत्ती । विस्तरली सुरवाडें[5]. ॥ २४ ॥ धेनू महिषी म्हैसे[6] गाढे । कालवडी[7] धांवती वृषभा पाडें । हरिणीपाडसां ऐसें कोडें[8] । नूतन वत्सें धांवती. ॥ २५ ॥ वृषभ पाहोनियां दृष्टी । राजचिन्हें करावीं पृष्ठीं । सेना भगवती[9] हे तुष्टी[10] । क्षीरपानीं[11] पावेल. ॥ २६ ॥ मस्तकीं वंदूनियां आज्ञा । जातसों अद्वैतवना । घोषयात्रा करूनी प्राज्ञा । उद्यां येऊं मागुते.[12]' ॥ २७ ॥ धृतराष्ट्र म्हणे, 'न रुचे मनीं । ऐकतां वाटे अनर्थ[13] कर्णीं, । अवघे पडाल महाव्यसनीं[14] । ऐसें चित्ता अवगमे[15]. ॥ २८ ॥ तापसमुखें ऐकिली गोष्टी । अद्वैतवनाचिये निकटीं । आश्रमीं राहिले जगजेठी । पांडुपुत्र निर्धारें. ॥ २९ ॥ कापट्यें हारविली संपदा । सभेसी द्रौपदीचिया आपदा । दुःशासनाचिया दुरुक्तिवादा । स्मरोनि भीम हुंकारे. ॥ ३० ॥ श्मश्रु[16] पिळूनी हस्तकीं । पार्थ बोलिला[17] क्रोधावर्तकीं[18], । 'कर्णाचिया[19] रक्तोदकीं । प्रक्षाळीन अंश्वातें[20].' ॥ ३१ ॥ शकुनिमरणाचे मंत्र । सहदेव जपे अहोरात्र । त्रिपुरदहनीं[21] जेंवी त्रिनेत्रे[22] । तेंवी कोपेल[23] देखतां. ॥ ३२ ॥ किंवा तळीं पातल्या करीन । सिंहझडपे आंवरी कोण? । तैसा खवळेल भीमसेन । माझ्या कुमरां देखिल्या. ॥ ३३ ॥ व्यर्थ मरण पावाल मंद । वना जावें हा मूर्खवाद । घोषयात्रा हा कृत्रिम शब्द । लटिका मातें परिसवा. ॥ ३४ ॥ न जाउनी[24] अरण्यव्योहाळीं[25] । महत्वें असावें आपुले स्थळीं, । जिये स्थळीं पांडव दिसती बळी । पाहों नका तियेतें. ॥ ३५ ॥ सर्पफणींचे छायेप्रती । दर्दुर[26] पातला सुखविश्रांती, । व्याघ्रवृकाचिये[27] विश्रांती ।

---

१. अवमान. २. 'आत्मनिरूपणा' असा अन्य पाठ. ३. धृतराष्ट्र. ४. 'बोधवावया पातले' असा अन्य पाठ. ५. सुखानें. ६. रेडा. ७. पाडी. 'कांतारीं' असा अन्य पाठ. ८. कौतुक. 'हरिणीबालकांचेनि पाडें' असें पाठांतर. ९. देवी. १०. संतोष. ११. दूध. १२. 'शीघ्र येऊं भेटीसी' असा अन्य पाठ. १३. 'विघ्न' असें पाठांतर. १४. संकटांत. १५. अवगमणें=जाणणें, वाटणें. १६. मिशा. १७. 'बोले' असा अन्य पाठ. १८. आवेश. १९. 'कौरवांचिया' असें पाठांतर. २०. 'हस्तातें' असें पाठांतर. २१. 'त्रिपुरभेदनीं' असा अन्य पाठ आहे. २२. शिव. २३. 'धांवेल' असा पाठभेद. २४. 'जावें' असें पाठांतर. २५. क्रीडा. २६. बेडूक. २७. लांडगा. 'व्याघ्रविवराचिये' असा अन्य पाठ.

हरिण पातला स्वभावें. ॥ ३६ ॥ तेंवी समीप[1] देखोनियां तुम्हां । क्रोध नावरे त्या भीमा, । निमित्त पाहोनी संग्रामा । प्रवर्तेल[2] निघातें. ॥ ३७ ॥ असंख्य मिनल्या चतुरंग[3] । तुम्ही युद्धीं पावाल भंग[4] । मातें शोकाचा विभाग । जोडवावया जातसां. ॥ ३८ ॥ अस्त्रें लाधला अर्जुन । तेणें त्रैलोक्य मानी तृण । समीप पातल्या तुमचें सैन्य । बळें कलह करील. ॥ ३९ ॥ पडेल[5] प्राणाशीं संबंधू । युद्धीं अपजयाचा खेदू । प्राप्त जालिया विषादू । जन्मवरी न खंडे[6].' ॥ ४० ॥ शकुनी म्हणे[7], 'सत्य गोष्टी । न पडों पांडवांच्या दृष्टी । तयांच्या आश्रमा निकटीं । काज नाहीं आमुचें[8]. ॥ ४१ ॥ यथार्थ ऐकें महाराज ! । नाहीं पांडुपुत्रांशीं काज, । घोषयात्रा करूनी सहज । शीघ्र येऊं[9] तेव दर्शना. ॥ ४२ ॥ आंणीक[10] ऐका जी ! कारण । अवचट[11] जालिया दर्शन । द्वादश वर्षें न होतां पूर्ण । युद्ध सहसा न करिती. ॥ ४३ ॥ आमुच्या कार्या जातसों आम्ही । पांडव हीनशक्ति संग्रामीं । त्यांची शंका अंतर्यामीं । व्यर्थ वहासी समर्था !' ॥ ४४ ॥ राजा म्हणे, 'न कळे मातें । आवडे तें स्वीकारा चित्तें । तुम्हां[12] जाउनियां मागुतें । स्वस्थ[13] यावें स्वस्थाना.' ॥ ४५ ॥ आग्रह देखोनी पुत्राचा । पिता वदला सखेद वाचा, । 'जैसा भोग असेल यांचा । तैसा घडो प्रारब्धें. ॥ ४६ ॥ क्षेम[14] जाउनी क्षेम यावें । पांडवां वैरंपड[15] न व्हावें.' । 'अवश्य' म्हणोनी अंधवे[16] । नमस्कारूनी चालिले. ॥ ४७ ॥ होतां रायाचें उत्तर । चालिले कौरवांचे भार । जैसा उलथे जळसागर । बुडवावया युगांतीं. ॥ ४८ ॥ नगरवासी सहकामिनी । राजदारा[17] शिबिकासनीं[18] । दासदासीवस्त्राभरणीं । शृंगारूनी चालिले. ॥ ४९ ॥ अठरा वर्णी जीविका ज्यासी । क्रय[19] विक्रय[20] द्रूय लाभासी । नाना वस्तूंचिया राशी । असंख्यात संगीं निघाले. ॥ ५० ॥ अठरा सहस्र[21] कनकरथ । दिव्य पताका सुवर्णकेतें[22] । वारु[23] जुंपिले सुशोभित । पवनवेगी[24] सांजिरे[25]. ॥ ५१ ॥ तीस सहस्र मत्त करटी[26] । झुली

---

१. 'सन्मुख' असाही पाठ आहे. २. 'बळें कलह वाढवीती' असाही पाठ आहे. ३. सैन्य. ४. पराभव. ५. 'घडेल' असा अन्य पाठ. ६. मोरोपंत—वनपर्व—अध्याय ७ गीति ६-८ पहा. ७. अध्याय २३९ श्लोक १८ पहा. ८. 'सर्वथा' असा अन्य पाठ. ९. 'घेऊं' असें पाठांतर. १०. 'आणीक असे एक कारण' असा अन्य पाठ. ११. एकाएकीं. १२. 'बुद्धि' असा अन्य पाठ आहे. १३. 'शीघ्र' असा अन्य पाठ. १४. सुखरूप. १५. प्राप्त. १६. सर्व. १७. 'राजदासी' असा अन्य पाठ आहे. १८. पालखी. १९. विकत घेणें. २०. विकत देणें. २१. 'अंत:पुराचें सहस्र' असा अन्य पाठ. २२. ध्वज. २३. घोडा. 'वारू सज्जिले' व 'अश्व पालाणिले' असे पाठभेद आहेत. पालाणिले=खोगीर घालून तयार केले. २४. वायु. २५. चांगले. २६. हत्ती.

घातल्या सुवर्ण पृष्ठीं । [1]महावंत बैसले पृष्ठीं । हेमतकटी पताका. ॥ ९२ ॥ [2]दशन गुंडाळिले कनकरत्नीं । [3]मदोदकें स्रवती धरणी । श्वेत चामरें शोभती कर्णीं । चहूं चरणीं नूपुरें. ॥ ९३ ॥ चवरडोळी राजकुमर । माळाकुंडलेंकिरीटधर । छत्रछाये दि[4]नकर । यातें लोटिती माघारे. ॥ ९४ ॥ आप्त सोयरे सुहृदजन । तीन सहस्र बळसंपन्न । मध्यें वेष्टूनी दुर्योधन । अष्टौ दिशा चालती. ॥ ९५ ॥ नव्याण्णव सहस्र नव शतें । नव दशक अधिक तेथें । अमोल्य अश्वपृष्ठीं वरुते । [5]राउत राणे शोभती. ॥ ९६ ॥ [6]पदातिसेना असंख्यात । तयाचें कवण करी गणित? । नाना शस्त्रीं मंडित हस्त । पुढें गर्जत धांवती. ॥ ९७ ॥ प्रस्थान[7]भेरी कुंजरभेरी । प्रलयभेरी विशाळ भेरी । उष्ट्यानीं [8]शकटभेरी । वाद्यकारीं ठोकिल्या. ॥ ९८ ॥ सनया नफेरिया [9]बुरंगें । [10]पांवे नरगे जेगट शृंगें । [11]तटक फुटलें तेणें [12]विहंगें । भयें पळती दशदिशा. ॥ ९९ ॥ ऐसे हर्षें पातले [13]घोषस्थाना । दुरूनी देखती अद्वैतवना । गो[14]प गोपी दुर्योधना । दंडवतें घालिती. ॥ ६० ॥ गोपकन्या गोपस्त्रिया । कनकताटीं आरतिया । ओंवाळूनी कौरवराया । पैं [15]कुरवंडी सांडिती. ॥ ६१ ॥ तयां वोपूनी वस्त्राभरणें । बहुव तोषविले मानें, । ते म्हणती, 'जी! आपुल्या नयनें । धेनु[16]खिल्लारें पाहिजे. ॥ ६२ ॥ धर्मापासूनी आणिल्या एथें । वृद्धि जाली अपरिमितें । परि गोरसीं गोडी अत्यद्भुतें । पहिल्या ऐशी न देखों. ॥ ६३ ॥ लोपतां पांडवांच्या गोष्टी । [17]खुळगे उपजती म्हैशीपोटीं । क्षीरपानें माजले [18]सृष्टी । थडका देती सात्विकां. ॥६४॥ धेनूसी धर्मवृद्धि थोडी । वांझा उपजती [19]कोलवडी । ऐशी काळाची [20]परवडी । विपरीत डोळां देखिजे. ॥ ६५ ॥ [21]असह्य वृषभांच्या [22]दांवणी । तरुण धेनूंच्या अपार श्रेणी । पोळ माजले नानावर्णीं । गोत्रपुरुष नंदीचे. ॥ ६६ ॥ कोमल तृण चरोनी वनीं । गो[23]ठणीं येती धेनूंच्या श्रेणी । वो[24]हीं दाटल्या चहुं [25]स्तनीं । दुग्धधारा वर्षती. ॥ ६७ ॥ तृप्त जालिया मार्ग धरणी । लोटल्या पयरसाच्या

१. महात. २ दांत. ३. 'दानोदकें शिंपिती' असा अन्य पाठ आहे. ४. सूर्य. ५. स्वार. ६. पायदळ. ७. नौबत. ८. गाडा. ९. 'बुनुग । शृंगें कोहोळा मृदंग ।' असाही पाठ आहे. १०. 'पांवे नगारे गर्जत शृंगें' असा अन्य पाठ आहे. ११. 'तडक' असा अन्य पाठ आहे. १२. पांखरें. १३. गोठा, गौळवाडा. १४. गौळी. १५. आरती. १६. कळप. 'गोक्षीरातें' असाही पाठ आहे. १७. रेडे. १८. 'भूतळवटीं' असा अन्य पाठ. १९. पाड्या. २०. रीत. २१. 'असो' असा अन्य पाठ. २२. तांडा. २३. गुरें जमण्याच्या जागीं. २४. ओटी अगर कांस. २५. 'कोनीं' असाही पाठ आहे.

तटिनी[1] । अश्व कुंजर दुग्धपानीं । स्वानंदें माजले. ॥ ६८ ॥ क्षीरपान करिती बहुतें । एक भक्षिती नवनीतें । दधि शर्करा उभय हस्तें । स्वेच्छ एक भक्षिती'. ॥ ६९ ॥ हस्त रोंविल्या न फुटे । ऐशीं दुग्धें सरसें दाटें । सुवर्णपात्रीं अतिचोखटें । रायापुढें ठेविलीं. ॥ ७० ॥ मृग वधूनी बहुवसें । आणूनी भक्षिती विचित्र मांसें । मद्यपानीं सुखसंतोषें । एक माजले डुल्लती. ॥ ७१ ॥ संगियां संगें दुर्योधन । स्त्रियांसहित वनक्रीडणें । तें जें जया आवडे वन । तेणें तेथें रमावें. ॥ ७२ ॥ चित्रसेन गंधर्वनाथ । संगीं गंधर्व अप्सरा असंख्यात । सहस्त्र कामिनींसमवेत[2] । अरण्यक्रीडे पातला. ॥ ७३ ॥ अद्वैतवनींची वृक्षदाटी । रम्य कासारें[3] देखिलीं दृष्टी । कमळवनामाजी संतुष्टी । हस्तियुग्में क्रीडती. ॥ ७४ ॥ चहुं दिशां ठेऊनी दूत । जळक्रीडे स्त्रियांसहित । कौरवसेना निर्घाली[4] तेथ । उद्धटपणें नेणतां. ॥ ७५ ॥ गंधर्वदूत प्रबळ प्रचंड । आडवे केले सुवर्णदंड । म्हणती, 'मानव अवघे मूढ । चतुर एकही न देखों. ॥७६॥ गंधर्वराज सहकामिनी । क्रीडा करी सरोवरजीवनीं[5] । अवसर विलोकूनी नयनीं । यावें[6] जावें विचारें'. ॥ ७७ ॥ येरू वाहूनी धनुष्यबाणा । विंधिते झाले गंधर्वगणा, । जाणवलें चित्रसेना । सेवकजनीं सकोपें. ॥ ७८ ॥ राजा बोलिला कठिणोत्तरीं,। 'ताडण करा तीक्ष्ण शरीं । सहज[7] पांडवांचे वैरी । शत्रु असती आमुचे. ॥ ७९ ॥ धरिती संग्रामाची पैज । तरी आतांच करा त्यांचें काज । कौरव मारूनी वोपूं राज्य । खंडूं[8] व्याज वैरियांचें. ॥ ८० ॥ आम्ही शक्राचे[9] निज गण । अर्जुन शक्राचा नंदन । त्याचा वैरी दुर्योधन । सहज वैरी आमुचा.' ॥ ८१ ॥ आज्ञापितां गंधर्वपती । आयतीं शस्त्रें प्रयोजिलीं[10] हातीं । ताडण करितां निर्घातीं । प्राण बहुतीं त्यागिले. ॥ ८२ ॥ घायाळ झाले असंख्यात । कौरवराया सांगती दूत । राजा कोपला अत्यद्भुत । मुखें प्रेरी सैनिकां. ॥ ८३ ॥ 'चित्रसेनाचें छेदूनी शिर । एथें आणा अतिसत्वर । दुर्योधन कौरवेश्वर । नाहीं अद्यापि ठाउका. ॥ ८४ ॥ सकळ[11] गंधर्वांच्या शिरीं । माळा बांधाव्या तरूवरी । जें देखोनी सुरासुरीं । चोज अद्भुत मानिजे.' ॥ ८५ ॥ दूत धाडिला चित्रसेना, । 'सांडूनियां अद्वैतवना । शीघ्र जावें गंधर्वभुवना' ।

---

१. नदी. २. स्त्रियांसहित. ३. तळीं. ४. 'पातली' असा अन्य पाठ. ५. पाणी. ६. 'न वजावें विवेकें' असा अन्य पाठ. ७. स्वाभाविक. ८. फेडूं. 'पांडवांतें ये काळीं' असा अन्य पाठ. ९. इंद्राचे. १०. सोडिलीं. 'शस्त्रें सज्ज करूनियां दूतीं' असा अन्य पाठ. ११. मोरोपंत—वनपर्व—अ० ७ गी० २० पहा. [पृ० १०७.]

आज्ञा केली **दुर्योधनें.** ॥ ८६ ॥ खेचर[1] बोलती हास्यवचन, । 'आम्हीं स्वर्गीचे देवगण । मनुष्यआज्ञा आम्हां तृण । मशकप्राय[2] **कौरवें.** ॥ ८७ ॥ सर्वां-सहित रक्षणें प्राण । तरी हस्तिनापुरा करावें गमन । विलंब करितां **यमसदन** । दृश्य होईल तात्काळीं.' ॥ ८८ ॥ खळबळिलें **कौरवांचें** कटक[3] । जेंवी युगांतीं पावक[4]मुख । गंधर्व म्हणती, 'प्रलयोदक । बाणधारा मोकलूं[5].' ॥ ८९ ॥ अंकुशें स्पर्शोनियां माथे । गज प्रेरिले तीन अयुतें । उभारले खड्ग हातें । अश्ववार[6] धांवती. ॥ ९० ॥ रथ लोटूनी धडधडाट । बाण सोडिती सणसणाट । अग्नियंत्राचे[7] कडकडाट । उभय दळीं माजले. ॥ ९१ ॥ **कर्ण शकुनी दुःशासन** । सकळ जळसंद **विकर्ण** । रथारूढ अवघेजण । युद्धकदना मिसळले. ॥ ९२ ॥ **कर्णें** हस्तींच्या शरमारें । [8]गंधर्व लोटिले माघारे । हस्त पाद अवयव शिरें । खंड विखंड पडती[9]. ॥ ९३ ॥ **कौरव** गर्जती सिंहनादीं । म्हणती, 'खेचर[10] भंगले रे! युद्धीं' । हें परिसोनी काळक्रोधी । **गंधर्वराज** क्षोभला. ॥ ९४ ॥ आरुढोनी **चित्रसेन** । मोकली[11] कोटिच्या कोटि बाण । एक एक अवलोकून । बाणजाळीं खिळिले. ॥ ९५ ॥ गंधर्वांच्या शरसंधानीं । मानवशक्ति अपार उणी, । जेंवी कां पंडिताची वाणी । अव्युत्पन्ना[12] नावरे. ॥ ९६ ॥ गंधर्वहस्तींचे कुऱ्हाडे । **कर्णा** आंगीं भेदले गाढे । रथ टाकूनियां एकीकडे । धांय[13] टाकीत राहिला. ॥ ९७ ॥ गंधर्वविद्येचे बळें । एक एक झाले विकळ । जेंवी कां वृक्ष पाषाण अचळ । चालविल्यावीण न चालती. ॥ ९८ ॥ वारू खिळिले ठायींचे ठायीं । कुंजर स्तंभप्राय भुई । रथ गुल्में तैशीं पाहीं । गंधर्वशरीं जर्जर. ॥ ९९ ॥ **शकुनी** राजा आणि अनुज[14] । धरितां संग्रामाची पैज । गंधर्वबाणीं होऊनी निस्तेज । प्रेतदशा पावले. ॥ १०० ॥ पायदळें ठेऊनी पाठी । पळते झाले बारा वाटी । म्हणती, 'ये ऐसे संकटीं । **पांडवांसी** रिघावें शरण.' ॥ १०१ ॥ धैर्य धरितां **दुर्योधन** । पुढें लोटला **चित्रसेन** । संधी संधी भेदले बाण । म्हणे, 'निर्वाण[15] मांडलें'. ॥ १०२ ॥ चत्वार[16] बाण सोडोनी पुढती । चारी वारू[17] पाडिले क्षिती ।

---

१. गंधर्व. २. घुंगुरडे. ३. सैन्य. ४. अग्नि. ५. सोडूं. ६. घोडेस्वार. ७. तोफांचे. 'असिपत्राचे' असा अन्य पाठ आहे. ८. 'गंधर्व सेनेचीं अपारें' असें पाठांतर. ९. 'पडलीं' असा अन्य पाठ. १०. गंधर्व. ११. सोडी. १२. ज्ञानरहिताला, मूढाला. १३. 'धाव टाळीत' असा पाठभेद आहे. १४. 'अनुजानुज' व 'राजानुज' असे पाठ आहेत. १५. अंत, समाप्ति. १६. चार. १७. घोडा.

सर्वेचि मारूनी सारथी । गतप्राण तो केला. ॥ १०३ ॥ दुर्योधन उतरोनी क्षिती । आरूढला विकर्णरथीं । तया वेष्टीत बंधुपंक्ती । प्राणधाकें मीनल्या[2]. ॥ १०४ ॥ हें देखोनी गंधर्वनाथ । संगियाशीं धांवला त्वरित । दुर्योधन बंधूंसहित । धरूनी रथीं घातला. ॥ १०५ ॥ हस्त आकळोनी पाठीशीं । स्तंभीं वांधिला मुक्तकेशी । दु[3]:शासन बंधू पाशीं । कर्ण[4] केशीं बांधिला. ॥ १०६ ॥ दुर्योधनाच्या कामिनी[5] । धरूनी वाहिल्या रथयानीं । जयजयकाराचे ध्वनी । खेचर[6]लोका निघाले. ॥ १०७ ॥ तयापासूनी सोडवावया । शक्ति कवणा नव्हेचि राया ! । बंदी पडल्या सकळ स्त्रिया । आणि राजा बंधूंशीं. ॥ १०८ ॥ सेना घेऊनी सेनापती । पळत पातला पांडवांप्रती । धर्मराज देखोनी क्षिती । दंडवतें घातलीं. ॥ १०९ ॥ म्हणे, 'तुझे बंधु सगुण । घोषयात्रे पातले जाण । गंधर्वीं करूनी कंदन[7] । धरूनी नेती[8] स्वर्गलोका. ॥ ११० ॥ बंदी धरूनी पुरुषनारी । रथीं घातल्या बळात्कारीं । रुदन करिती दीर्घ स्वरीं । 'धर्मा ! धर्मा !' म्हणोनी. ॥ १११ ॥ बाळकें केली अन्यायकरणी । तरी तूं मानाभिमानाचा धनी, । तुवां उपेक्षा केलिया मनीं । रक्षणार कोणी असेना.' ॥ ११२ ॥ भीम म्हणे, 'बहुत बरवें । आम्हीं यत्नीं[9] जें करावें । तें सिद्धी पावविलें देवें । अनायासें करूनियां. ॥ ११३ ॥ करावीं तीं फळती पापें । तेथें कायसा विकल्प । आम्ही करावया साक्षेप । कारण कांहीं असेना. ॥ ११४ ॥ पांचांमाजी एक व्यक्ती । स्नेहें असते जरी सांगाती । तरी गंधर्वांची केतुली प्राप्ती ? । वक्र[10] दृष्टी पहावया. ॥ ११५ ॥ शकुनीलागीं सांगा निरुतें[11], । 'कपटपाश[12] धरूनी हातें । पुढें होई संग्रामातें । राजयातें सोडवीं.' ॥ ११६ ॥ कर्णास म्हणे कठिणोत्तरीं, । 'शत्रु पराभवीं समरीं, । दुर्योधनासहित नारी । सोडवीं कां प्रतापें.' ॥ ११७ ॥ 'दुःशासना ! हीनशक्ती । वस्त्रें फेडिलीं जया हातीं । ते हस्त तुटोनी पडले क्षिती । कां काजा न येती संग्रामा ? ॥ ११८ ॥ तेचि हस्त करूनियां पुढां । बंधू भाजा[13] सोडवीं

---

१. 'ध्वजस्तंभ तोडुनी विरथी । पृथ्वीवरी आणिला ॥' असाही पाठ आहे. २. मिळाल्या. ३. 'दुःशासनादि' असा अन्य पाठ आहे. ४. 'शकुनी रथीं घातला' असा अन्य पाठ. ५. स्त्रिया. ६. गंधर्व. ७. युद्ध. ८. 'नेलें' असा अन्य पाठ. ९. झटून उद्योग करणें. 'आक्षेप' असें पाठांतर आहे. १०. 'वक्र नेत्रीं पहावया' असा अन्य पाठ आहे. ११. निखालस. १२. फांसे. १३. स्त्रिया.

मूढा! । वेंगना केली ते माकडा । विसरलासी ये काळीं.' ॥ ११९ ॥ धर्म म्हणे, 'बापा! भीमा! । हें बोलणें श्लाघ्य नव्हे आम्हां, । क्लेशकाळीं नरेंद्रोत्तमा! । वर्मशब्द न वंदावे. ॥ १२० ॥ वोखटें गोमटें स्वभावें । मनुष्यापासूनी घडे अघवें । समयीं वर्मीं जरी खोंचावे । तरी पुरुषार्थ कायसा? ॥ १२१ ॥ आपणामाजी हो आपण । आचरावें न्यून पूर्ण । पैरखीं गांजिलिया अभिमान । सर्व मिळोनी रक्षावा. ॥ १२२ ॥ पार्था! धरीं कां पुरुषार्था? । भीमा! नाठवीं मागील कथा । नकुलसहदेवा! माद्रीसुता! । सिद्ध होईं ममाज्ञा. ॥ १२३ ॥ मैत्री रक्षुनी गंधर्वराज । मुक्त करी धृतराष्ट्रतनुज । तरीच युद्धाचें काज । नाचरावें तयाशीं. ॥ १२४ ॥ नेऊं भाविती जरी बळात्कारीं । तरी मग शिक्षा करावी समरीं । दुर्योधन सह कैलत्रीं । सोडवूनी आणावा. ॥ १२५ ॥ ज्ञातियांमाजी असलिया भेदू । बाह्य दाखवणें अभेदू । ऐसें बोलती वचन साधू । तैसें तुम्हीं वर्तावें. ॥ १२६ ॥ अपमान जाला दुर्योधना । तो मज धर्मा कुरुनंदना । ऐसा खेद मानूनी मना । धांवा वेगीं सुहृद हो!' ॥ १२७ ॥ हांसोनी भीम बोले, 'प्राज्ञा! । हो कां प्रमाण समर्थाज्ञा.' । पार्थें स्वीकारिली प्रतिज्ञा । मुक्त करावया कौरवां. ॥ १२८ ॥ वीरश्री वरूनी चौघीं । वज्रकवचें बांधलीं वेगीं । भीम म्हणे, 'आमुच्या आंगीं । कृतघ्नता परिसिली. ॥ १२९ ॥ गंधर्वें उपकार केला आम्हां । त्या लागीं जातसों युद्धकर्मा । जें मानलें राया धर्मा । तेंचि मान्य आमुतें.' ॥ १३० ॥ कौरवांचिये कनकरथीं । वेंळघले चौघेही पुरुषार्थी । सवेग गरुडाचिये गती । पाठीलागीं पावले. ॥ १३१ ॥ धनुष्यें सज्ज करूनी मुष्टी । तूंणीर आंवळिले पृष्ठीं । खड्ग बांधोनियां कटितटीं । पाठोपाठी निघाले. ॥ १३२ ॥ म्हणती, 'उभा राहें रे! चित्रसेना! । व्यर्थ श्लाघ्यता मानिसी मना । मुक्त करीं गा! दुर्योधना । बंधु आमुचा म्हणोनी. ॥ १३३ ॥ आम्ही नसतों या वनीं । अथवा न देखतों नयनीं । तरी हा पुरुषार्थ तुझा जनीं । प्रकट होता निर्धारें पां. ॥ १३४ ॥ आतां सांडूनी दुर्योधना । बंधू आणि कौरवांगना । उरलेनि यशें शक्रभुवना । जातां लाभ दिसतसे.' ॥ १३५ ॥ गंधर्व म्हणे,

---

१. बडबड. २. योग्य. ३. 'खोंचावे' पाठांतर. ४. वाईट. ५. परक्यानें. ६. 'तरी मग विरोधाचें' असा अन्य पाठ. ७. स्त्री. ८. वांकडे. ९. 'आंगीं' असाही पाठ आहे. १०. 'सोडवितां कौरवां स्वधर्मा' असाही पाठ आहे. ११. चढलें. १२. भाते.

'अर्जुना! ऐक। गुरुवाक्याची प्रमाणता एक। इतर उपदेशिती लोक। परि तें प्रमाण कवणातें? ॥ १३६ ॥ देवेंद्राचे आज्ञाशब्दीं। हें कार्य पावलें सिद्धी। तें भंगोनी तुझिया बुद्धी। केंवी आम्ही वर्तावें? ॥ १३७ ॥ येथें न घालूनियां मन। आश्रमा जावें हो! परतोन। हित अनहिताचें लक्षण। विचार-दृष्टी नोळखां.' ॥ १३८ ॥ अर्जुन म्हणे, 'कळलें सकळ। देहीं अवयव अव्यंग अविकळ। ते खंडितां मूर्ख बरळ। नाश करी रूपातें. ॥ १३९ ॥ जेथ अपाय चिंतिजे मनीं। ते[2] अपाय योग्य नाहींत जनीं। आतां मित्रत्व रक्षूनी। मुक्त करीं गोत्रजां[3].' ॥ १४० ॥ गंधर्व म्हणे, 'कदां न घडे'. । म्हणऊनी युद्धीं मिसळले गाढे। माद्रीपुत्रांसीं बळी पाडें। भीमअर्जुन क्षोभला. ॥ १४१ ॥ गंधर्वांच्या शरसंधानीं। कोंदलें आकाश आणि धरणी। पार्थाचिये तीक्ष्ण बाणीं। खंड विखंड पाडिले. ॥ १४२ ॥ पावकास्त्रें[4] पर्जन्यास्त्रें। वज्रास्त्रें शक्रास्त्रें सर्पास्त्रें। वायव्यास्त्रें पर्वतास्त्रें। परिपाडें[5] हाणिती. ॥ १४३ ॥ दोघे जाणती प्रयोजनें[6]। दोघे जाणती निवारणें। जैशीं पंडितांचीं वचनें। एक[7] एकां न तुटती. ॥ १४४ ॥ गंधर्वविद्येच्या विशेषीं। दुर्योधन बंधू आणि स्त्रियांसी। रथ उडवूनी आकाशीं। गगनमार्गें चालिले. ॥ १४५ ॥ अर्जुनें समंत्रबाणजाळीं। कवळूनी पाडिले भूमंडळीं। जैसे वृक्षाहूनी भूतळीं। व्याध[8] वोढी पक्षियां. ॥ १४६ ॥ मत्स्यजीवी पसरूनी जाळें। मत्स्य कवळी एकेचि काळें। तेंवी अर्जुनें संधानबळें। रथ पाडिले भूतळीं. ॥ १४७ ॥ गंधर्व मात्र[9] करूनी तेथ। गुप्त झाला सकळांसहित। अदृश्य होऊनी असंख्यात। बाण मारी निघातें. ॥ १४८ ॥ कालाग्निरुद्र जपोनी बाणीं। प्रकट केला अर्ध क्षणीं। विंधोनी गंधर्वांच्या श्रेणी। असंख्य रणीं पाडिल्या. ॥ १४९ ॥ धरा[10] सुवासिनी[11] बाळी। रक्तकुंकुम चर्चिलें भाळीं। खेचरांच्या[12] शीसकमळीं[13]। माथे पुष्पीं तुरंबिले[14]. ॥ १५० ॥ पांच नाराच[15] शरघातीं। चारी वारू आणि सारथी। यांतें मारिलें गदाघातीं। गंधर्व रागें धाविन्नला. ॥ १५१ ॥ सन्मुख सोडूनी दहा बाण। गदा छेदूनी केली चूर्ण। करावया गंधर्वाचें हनन। शर निर्वाण काढिला. ॥ १५२ ॥ अर्जुनहस्तींहून सुटतां

---

१. बाप. २. 'तेथ आपणाशींच हानी' असा अन्य पाठ आहे. ३. भाऊबंद. ४. अग्नि. ५. 'इडेपाडे पीटिती' असें पाठांतर. ६. सोडणें. ७. 'युक्तिजाळें खंडिती' असाही पाठ आहे. ८. कोळी. ९. कपट. १०. पृथ्वी. ११. स्त्री. १२. गंधर्व. १३. मस्तक. १४. फुलले. १५. बाण.

बाण । कांपिन्नला चित्रसेन । म्हणे, 'ब्रह्मांडाचें दहन[1] । करूं शके निर्वाण.'[2] ॥ १५३ ॥ अंतरा थोकूनी रहंवरा[3]। विनीत[4] बोले जोडूनी करा, । 'प्रवर्तलों मित्राचारा । सुख द्यावया तुम्हांतें. ॥ १५४ ॥ तें तुम्हीं विसरोनी सकळ । युद्धा प्रवर्तलेती उतावेळ । उपकार जाणावया कुशळ । तुम्हीच एक चतुर हो!' ॥ १५५ ॥ पांडव म्हणती, 'अगा मित्रा ! । रहस्य कळलें अतिपवित्रा । परी दृष्टी देखतां कुंतीपुत्रा । श्लाघ्य नव्हे लौकिकीं. ॥ १५६ ॥ आम्ही असतों दूर वनीं । वार्ता न पडती हो! श्रवणीं । अवस्था न देखतों नयनीं । तरी मग हो कां भलतसें. ॥ १५७ ॥ आम्हां देखतां अनुचित कृत्य । होऊं नये हें जाण सत्य । आतां बोलणें हें अगत्य । प्रीतिभावें करूनियां. ॥१५८॥ उपकार ठेवूनी आमुच्या माथां । मुक्त करावें कौरवनाथा, । देखोनी तुझिया पुरुषार्था । परम संतोष धर्मातें.' ॥ १५९ ॥ गंधर्व निवेदी वृत्तांत, । 'शक्र-आज्ञेनें पावलों एथ, । दुर्योधन मदोन्मत्त । अष्टौ मदें[5] मातला. ॥ १६० ॥ ऐश्वर्य दावावया धर्मा । गर्वें पातला दुष्टकर्मा । त्यातें दवडूनियां स्वधामा[6] । बांधोनियां आणावें. ॥ १६१ ॥ तें म्यां सिद्धी नेलें काज, । तुम्हीं आग्रहें मांडिलें[7] झुज, । आतां सांगेल धर्मराज । तें म्यां करणें सर्वथा.' ॥ १६२ ॥ पातले धर्माच्या दर्शना । खेचरीं नमस्कारिलें चरणां । धर्में देऊनी आलिंगना । स्नेहभावें बोलत. ॥ १६३ ॥ 'माझे सुहृद् बंधपाशीं । पडिले[8] भोगविशेषीं । ते सोडूनी कीर्तिघोषीं । यश जोडीं सुमित्रा! ॥ १६४ ॥ दुर्योधन बंदीं पडला । तो धर्मवाक्यें मुक्त केला । याहूनी पुरुषार्थ आगळा । कोण तो सांग त्रिलोकीं?' ॥ १६५ ॥ अजातशत्रूच्या उत्तरा । दुर्योधन सहबंधुदारा[9] । आणूनियां युधिष्ठिरा । निज हस्तकीं वोपिलें. ॥ १६६ ॥ आज्ञा मागोनी कुरुनंदना । गंधर्व गेले इंद्रभुवना । वृत्तांत ऐकोनी शचीरमणा[10][11] । परम कौतुक वाटलें. ॥ १६७ ॥ 'शिक्षा केली दुर्योधना । भला भला गा! चित्रसेना!' । आज्ञा देऊनी अमृतघना[12] । मृत गंधर्व उठविले. ॥ १६८ ॥ धर्मासन्मुख दुर्योधन । मुख न दाखवी अधोवदन, । धर्म म्हणे, 'बापा! मन ।

---

१. 'गहन' व 'हनन' असे पाठभेद आहेत. २. 'करूं शके एका बाणें' असें पाठांतर आहे. ३. रथ. ४. नम्र. ५. 'ऐश्वर्यमदें' असाही पाठ आहे. ६. आपल्या घरीं. 'दंडूनियां त्यातें शक्रधामा' असाही पाठ आहे. ७. गंधर्वांनीं. ८. 'बंधु पडिले पाशीं' असें पाठांतर. ९. 'प्रारब्ध' असा अन्य पाठ आहे. १०. स्त्री. ११. इंद्र. १२. मेघ.

व्याकुळ कांहीं न करावें. ॥ १६९ ॥ खेळतां जित अथवा हारी । वांचूनि नाहीं तिसरी परी । तेही पुरुषाचे शरीरीं । काळें कर्में होतसे. ॥ १७० ॥ जेणें अनर्थीं पडिजे ताता[1] ! । ऐसा सायास न कीजे आतां । घेऊनी सुहृदां समस्तां । निज नगरासी जाईजे[2]. ॥ १७१ ॥ भीमादिक सहोदर । तुझे आज्ञेचे आज्ञाधार । हे राहाटले[3] विहिताचार । सेवा तुज वडिलाची. ॥ १७२ ॥ कष्टलासी येऊनी वना । विश्रांतीसी जाऊनी सदना । कांहीं खेद मानिसी मना । तरी आण[4] तुज माझी.' ॥ १७३ ॥ कांहीं नेदितां प्रत्युत्तर । घेऊनी शकुनि-सहोदर । मौन्यें चालिला हस्तिनापुर । खेद बहुत मानसीं. ॥ १७४ ॥ वस्त्रें आच्छादूनी वदन । मार्गीं करी दीर्घ रुदन । शांतवी[5] शकुनीकर्ण । परि तो कांहीं नायके. ॥ १७५ ॥ प्राणत्यागाचा निर्धारा[6] । नेमूनी नँ[7] वचे हस्तिनापुरा । मुख न दाखवी राजेश्वरा । भीष्मद्रोणकृप यांतें. ॥ १७६ ॥ 'गंधर्व स्वस्थळातें नेते । अथवा रणीं प्राण घेते । तें बरें, परंतु पांडवहस्तें । सुटका जघन्य[8] त्रैलोक्यीं.' ॥ १७७ ॥ परम चिंतेच्या हैव्यवाटीं[9] । पडला दुःखें हृदय पिटी । धर्में सोडविलें हे मोठी । लाज मानी दुरात्मा. ॥ १७८ ॥ इतुकें झालें निरूपण[10] । पुढील कथेचें अनुसंधान । जन्मेजयाप्रती सर्वज्ञ । वैशंपायन निरोपी. ॥ १७९ ॥ नगरीं धाडूनी दुर्योधन । अद्वैतवनीं कुरुनंदन । बंधूंसहित सुखसंपन्न । ऋषीसंगीं वर्तत. ॥ १८० ॥ मुक्तेश्वराची सुवाणी । मंजीररूपें[11] सद्गुरुचरणीं । गर्जना करीत श्रवणीं । कौतुकानंद न [12]खंडे. ॥ १८१ ॥ इति श्रीभारते वनपर्वणि । घोषयात्रा[13]निरूपणीं । कथा परिसिली श्रोतेजनीं । पुढां सादर परिसावें. ॥ १८२ ॥

---

## अध्याय तेरावा.

शोकयुक्त दुर्योधन । सांडूनियां नगर सदन[14] । प्रवेशला महावन । जेथें सिंहव्याघ्रादि वसती. ॥ १ ॥ [15]अवलोकुनी सरोवर गहन । तीरीं[16] रचिलें [17]दर्भशा-

---

१. वत्सा! २. 'गृहा जाइजे संतोषें' असाही पाठभेद आहे. ३. वागले. ४. शपथ. ५. 'शांतवीती' असा अन्य पाठ आहे. ६. निर्धार=निश्चय. ७. न जाई. ८. नीच कृत्य. ९. अग्नि. १०. मोरोपंत–वनपर्व–अ० ७ गी० ५-५८ पृ० १०५-११३ पहा. ११. नूपुर. १२. 'वोसंडे' असाही पाठ आहे. १३. वनपर्व–घोषयात्रापर्व–अध्याय २३६-२४६ पहा. १४. 'भुवन', 'गमन' असेही पाठ आहेत. १५. 'प्रवेशोनी महावन' असें पाठांतर. १६. 'तळीं' असा अन्य पाठ आहे. १७. 'आस्तरण' असाही पाठ आहे.

यन । त्यागावया आपुला प्राण । प्रायोपवेशीं[1] बैसला. ॥ २ ॥ परिवार बोळवूनी[2] नगरा । त्यागिलें वस्त्र अलंकारां । भोजन वनफलआहारा[3] । तांबूलादि वर्जिलें. ॥ ३ ॥ पाचारूनी दुःशासना । म्हणे[4], 'स्वीकारीं राजासना । सन्मानूनी भीष्मद्रोणां । सेवा करीं वडिलांची. ॥ ४ ॥ रक्षूनी ब्राह्मणांच्या वृत्ती । न्यायें पाळीं सर्व जगती । सांडुनी मनुष्यलोकींची वस्ती । मी जातसें परलोका.' ॥ ५ ॥ ऐकूनी बंधू करिती शोक, । 'जळो तें राजश्रीचें सुख[5], । तुज वेगळें घेऊनी विख । प्राण त्यागूं अवघेही.' ॥ ६ ॥ कर्णशकुनी म्हणती, 'राया[6]! । आग्रह वाढविशी वायां । कवण[7] लवून तुझिया पायां । स्पर्शेल तें सांग पां? ॥ ७ ॥ जय अपजय उभय सांग । हा क्षत्रवृत्तीचा विभाग । यावेगळा तिसरा मार्ग । भुवनत्रयीं असेना. ॥ ८ ॥ दुःशासनबंधुवर्गीं । प्राण वेंचूनी रणरंगीं[8] । तुज रक्षावें[9] युद्धप्रसंगीं[10] । विहिता[11]चार तयांचा. ॥ ९ ॥ तैसेच अर्जुनवृकोदर[12] । तुझे अनुज आज्ञाधार । त्यांहीं संग्राम तुज समोर । करूनी सेवा दाविली. ॥ १० ॥ त्याचा खेद कायसा मना? । ऊठ चाल राजासना । उभय हस्तांमाजी कोणा । संकोच वाटे उपकारें.' ॥ ११ ॥ सुयोधन म्हणे, 'ऐकां सत्य । विचारें बोध करितां बहुत । परि माझे हृदयीं संताप शांत । होतां मार्ग दिसेना. ॥ १२ ॥ गंधर्व प्राण घेते हातीं । धरूनी नेते स्वस्थळाप्रती । तेणें संतोष होता चित्तीं । जयानंदासारिखा. ॥ १३ ॥ धर्मरायाचे प्रार्थनें । भीमार्जुनांचे आंगवणें[13] । मुक्त झालों हें मज ठेंगणें । पीडौं[14] बाधी आप्त हो! ॥ १४ ॥ स्पर्शलें[15] अपमानाचें श्वान । विटाळलें देहभाजन[16] । तें तात्काळ त्यागिल्याविण । शोक माझा शमेना.' ॥ १५ ॥ यावरी प्रवर्तली रजनी । निद्रा लागली[17] सकळां नयनीं । हे वार्ता पाताळभुवनीं । दैत्यदानवीं परिशिली. ॥ १६ ॥ पूर्वीं देवीं पराभविले । ते दानव पाताळभुवनीं गेले ।

---

१. उपोषणें करून प्राणत्याग करणें. [वनपर्व—अ० २४९.] २. पोंचवून, रवानगी करून. ३. 'पान' असाही पाठ आहे. ४. मोरोपंत—वनपर्व—अ० ७ गी० ६१-६९ पहा. [पृ० ११३.] ५. 'मुख' असाही पाठ आहे. ६. अध्याय २४९-५० पहा. ७. 'कवणें लांछनें तुझी काया । स्पर्शिली ही सांग पां ॥' असाही पाठ आहे. ८. 'समरगीं' असाही पाठ आहे. ९. 'यश द्यावें तुजलागीं' असा पाठभेद. १०. 'बहुत' असाही पाठ आहे. ११. योग्य. १२. भीम. १३. शक्तीनें, पराक्रमानें. १४. 'त्या लांछनें' असाही पाठ आहे. १५. 'बहुत' असाही पाठ आहे. १६. पात्र, मडकें. १७. 'दाटली' व 'पातली' असे पाठभेद.

शुक्राचार्ये उपदेशिले । दिव्य मंत्रें सबीजें. ॥ १७ ॥ तेणें मंत्रें करूनी होम । भंगिती सुरांचे पराक्रम । दुर्योधना खेद परम । ऐकोनी साहाय्या उदेले. ॥ १८ ॥ कृत्या[1] धाडूनी विशाळा । नेला दुर्योधन पाताळा । मिळोनी दानवांचा मेळा । शांतविती[2] स्वमुखें. ॥ १९ ॥ म्हणती, 'चिंता दवडीं चित्तें । आम्ही वधूं पांडवांतें, । जय ऐश्वर्य लाधे तूतें । ऐसें करूं जाण पां. ॥ २० ॥ क्षत्रिययोनींत जन्मले । [3]संशप्तक दानव भले । आम्ही तूतें सहाय दिधले । पांडववधा कारणें. ॥ २१ ॥ हरूनी [4]कवचकुंडलांतें । [5]अमोघ शक्ति कर्णातें । शक्र देईल अर्जुनातें । वधावया संग्रामीं. ॥ २२ ॥ त्या दिव्य शक्तीशीं निवारण । सहसा नाहीं गा! जाण । तेणें अर्जुनाचा प्राण । नाश पावेल निर्धारें. ॥ २३ ॥ सहसा त्यागूं नको प्राणा । सुखें जाय राजासना । आम्हीं पांडवांच्या हनना । [6]सहाय तूतें सर्वस्वें.' ॥ २४ ॥ कृत्या प्रेरूनी वेगेंशीं । जेथें होता प्रायोपवेशीं । तेथें ठेवितां संपली [7]निशी । प्रातःकाल उदेला. ॥२५॥ न कळे स्वप्न किंवा साचसें । सांगे कर्णाप्रती संतोषें । [8]राधेय म्हणे, 'निज मानसें । खेद सांडीं नरेंद्रा! ॥ २६ ॥ [9]भाक प्रमाण देतसें हातें । रणीं मारीन अर्जुनातें, । चौघे बंधू वधूनी तूतें । पशुप्राय वोपीन.' ॥ २७ ॥ पावोनियां समाधान । न्हेता झाला वस्त्राभरण । सारूनियां सुखभोजन । तांबूलादि घेतलें. ॥ २८ ॥ हत्ती घोडे [10]पदाति रथ । छत्र उभारूनी [11]हरित । [12]चौघे गजरें हर्षभरित । हस्तिनापुरा पातले. ॥ २९ ॥ नमस्कारिलें [13]गंगाकुमरा । [14]प्रज्ञाचक्षु राजेश्वरा । द्रोण-

---

१. राक्षसी, आसुरी उग्र देवता, आज्ञाकारी देवता. २. अध्याय २५१ पहा. ३. संशप्तक—पूर्वी शपथ घेतल्यामुळें युद्धास जो पराङ्मुख होत नाहीं तो, सत्यप्रतिज्ञ. "ज्यानें मी युद्धांत अमुक योध्यास मारीन, न मारीन तर ज्या गतीस पंचमहापातकी जातात ती गति मला प्राप्त होईल, अशी शपथ घेतली, त्याला हें नांव साधारण आहे. जो अशी शपथ घेणारा तो संशप्तक होय. भारती युद्धांत दुर्योधनाकडून अर्जुनासमागमें युद्ध करणारे दोन संशप्तक होते:—एक त्रिगर्त राजाचे सुशर्मा, सुरथ, सुधनु, सुबाहु आणि सुधन्वा, असे पांच पुत्र, आणि सत्यवर्मा, सत्यरथ, सत्यव्रत, सत्येषु व सत्यकर्मा, हे पांच भिन्न भिन्न राजे. यांणीं अर्जुनास एका पाठीमागें एकानें युद्धास बोलाविलें, परंतु त्यानें या सर्वांसही मारिलें." (भारत—द्रोणपर्व—अध्याय १७; भा० प्रा० ऐ० कोष.) 'सम्यक् शप्तमंगीकारो यस्य सः=संशप्तकः' असा याचा विग्रह आढळतो. ४. हीं कवचकुंडलें कर्णास उपजत प्राप्त झालीं होतीं, तीं इंद्रानें विप्रवेषानें कर्णाकडे जाऊन मागून घेतलीं—अशी कथा आहे. ५. व्यर्थ न जाणारी. ६. 'साहाय्य झालों' असा अन्य पाठ. ७. रात्र. ८. कर्ण. ९. शपथ. १०. पायदळ. ११. 'त्वरित' व 'श्वेत' असे पाठभेद आहेत. १२. 'वाद्य' असाही पाठ आहे. १३. भीष्म. १४. धृतराष्ट्र.

कृपाचार्यविदुरा । विनयभावें वंदिलें. ॥ ३० ॥ भीष्म म्हणे, 'ऐक[1] बापा! । वर्जितां[2] आचरे जो पापा । तो शरीरभोग दुःखा अमुपा[3] । पात्र होय निर्धारें. ॥ ३१ ॥ वडिलीं वारितां रोहटे[4] अविधी । त्याशीं स्वयें दंडूनी शिकवी बुद्धी । ईश्वर गुप्त[5] प्रमाण शब्दीं । दंड करवी परहस्तें. ॥ ३२ ॥ जेणें जें जें कर्म करावें । त्याशींच पडेल[6] तें भोगावें । हरिहर साहाय्य जालिया बरवें । विपरीत करूं न शकती. ॥ ३३ ॥ वना जाऊनी केली करणी । ते सुवार्ता ऐकिली श्रवणीं । परम संतोष वाटला[7] मनीं । तो काय याचा बोलणें? ॥३४॥ ज्या कर्णाचा भरंवसा मनीं । तो अवघ्यांआधी पळाला रणीं । केउत्या[8] गेल्या बंधुश्रेणी । तुज बंधनीं शिरकल्या. ॥ ३५ ॥ पांडवीं प्रतापें सोडविलें । हें ईश्वरें तूतें उपदेशिलें । पांडवांचें बळ दाविलें । तुळूनियां तुजप्रती. ॥ ३६ ॥ आतां सख्य करूनी त्यांशीं । वांचवी आपणा समस्तांशीं । वृद्धपणीं धृतराष्ट्राशीं । दुःख नेदीं सर्वथा.' ॥ ३७ ॥ ऐकोनी भीष्माची सुवाणी । प्रत्युत्तर नेदिती कोणी । दुर्योधन कर्ण शकुनी । जाते झाले स्वधामा[9]. ॥ ३८ ॥ एकत्र मिळोनी अवघेजण । म्हणती 'पांडवयश न्यून[10] । होय ऐसा महायज्ञ । विशेष आम्ही करावा. ॥ ३९ ॥ धर्मे राजसूययज्ञ केला । तो कीर्तिघोष विश्वीं भरला । तो लोपोनी जाय वहिला[11] । ऐशी ख्याति करावी. ॥ ४० ॥ दुर्योधनाचा कीर्तिगभस्ती[12] । अक्षयी उजळावा त्रिजगतीं । जेणें पांडवांची कीर्ती । खद्योतप्राय[13] होरपे[14]. ॥४१॥ संपदा असे[15] हो! अपार । कनकरत्नांचे गिरिवर । पाचारूनी ऋषीश्वर । यज्ञारंभ करावा.' ॥ ४२ ॥ ऐकोनी मानलें पितयातें, । परम संतोष गांधारीतें, । भीष्म म्हणे, 'याहीपरतें । निकें[16] आमुतें पैं काय?' ॥ ४३ ॥ विदुर म्हणे, 'क्षेम कुशळ । विलंब न करावा अळुमाळ[17]'. । आप्त म्हणती, 'आम्ही सकळ । साहाय्य तूतें सर्वस्वें.' ॥ ४४ ॥ पलाशतरू[18]चिया तुळणी । धत्तूरवृक्ष योजिला मनीं । कीं आम्रविटपा[19]सननीं । अर्कद्रुम[20] बैसविला. ॥ ४५ ॥ तेंवी शिल्पकरांहातीं । सभा रचविली कुशल युक्ती । जेणें सकळ लोक म्हणती, । 'उणी एथें मयसभा.' ॥ ४६ ॥ ऋषि म्हणती,

---

१. अध्याय २५२ पहा. २. निषेधितां. ३. पुष्कळ. ४. वागे. ५. 'गुरु' असाही पाठ आहे. ६. 'अवश्य' असाही पाठ आहे. ७. 'पावलों' असा पाठभेद. ८. कोठें. ९. घर. १०. 'शून्य' असाही पाठ आहे. ११. तात्काल. १२. सूर्य. १३. काजवा. १४. 'होतसे' असा अन्य पाठ आहे. १५. 'वेंचूनी अपार' असाही पाठ आहे. १६. चांगलें. १७. क्षणमात्र. 'शून्य' असाही पाठ आहे. १८. 'फणस'असाही पाठ आहे. १९. वृक्ष. २०. रुई.

'दुर्योधना! । अयुक्त करणें राजसूययज्ञा । [1]पृथिवीपाळ तूतें प्राज्ञा! । [2]भेणंगप्राय [3]लेखिती. ॥ ४७ ॥ **पांडव** बलाढ्य वसती वनीं । पृथ्वी जयाची कायशी [4]कहाणी? । महिमा रक्षावया जनीं । वार्ता तेही न बोलिजे. ॥ ४८ ॥ **प्रज्ञाचक्षू** जीवमानीं । अधिकार नाहीं [5]तंव यज्ञीं । हें रहस्य मनींचें मनीं । गुप्त ठेवीं शहाणिया! ॥ ४९ ॥ **विष्णूनें** केला [6]**वैष्णव**याग । तो तुवां संपादावा सांग । ज्याचिया [7]सुकृताची [8]शिंग । स्वर्गमंडपा [9]भेदिल. ॥ ५० ॥ सुवर्ण[10]लांगलाचिया मुखें । [11]लेखन कीजे यज्ञभूमिके । सुवर्णरत्नें अमोलिकें । अपार वोपीं ब्राह्मणां.' ॥ ५१ ॥ 'अवश्य' म्हणोनी दुर्योधन । करिता झाला **वैष्णवयज्ञ** । पाचारिले ऋषि ब्राह्मण । शत सहस्र जाणते. ॥ ५२ ॥ मूळ पाठविले दूत । राजे पातले समस्त । **द्रुपद यादव कृष्णनाथ** । न येती ते तया यागा. ॥ ५३ ॥ '**पांडव** कष्टती अरण्यवासी । आम्ही येइजे कोण्या संतोषीं? । आम्हाविण तो विशेषीं । याग सांग संपादावा.' ॥ ५४ ॥ **दुःशासन** [12]कुटिलमती । दूत धाडिला **धर्मा**प्रती । नमस्कारूनी बद्धहस्तीं । विज्ञापना जाणवी. ॥ ५५ ॥ '**दुर्योधनें** मांडिला यज्ञ । तुम्हांवेगळें [13]आम्हां कोण? । पांचहीजणीं कृपा करून । अवश्य आलें पाहिजे.' ॥ ५६ ॥ हांसोनी बोले **धर्म**राज, । '**कौर**ववंशीं [14]वंशध्वज । **दुर्योधन** सभाग्य सहज । भूषणरूप आमुतें. ॥ ५७ ॥ अवश्य आलें पाहिजे आम्ही । परि [15]प्रतिज्ञा नेमिली [16]वाङ्नियमीं । ते पूर्ण न होतां स्वधर्मी । भ्रष्ट आम्ही [17]विधिमुखें. ॥ ५८ ॥ त्रयोदश वर्षें लोटलिया जाण । होईल आतांचें दर्शन'. । तंव आवेशूनी **भीमसेन** । दूताप्रती बोलत. ॥ ५९ ॥ 'चतुर्दश वर्षांचा आरंभ । होतां माजेल समारंभ । [18]**धार्त**राष्ट्र आणि [19]पद्मनाभ । रणस्तंभीं दो भागीं. ॥ ६० ॥ **पार्थ**शराग्निज्वाळादीप्ती । चापटणत्कार मंत्रोक्ति । **धार्त**राष्ट्रांचिया

---

१. राजे. २. भिकारी. ३. मानिती. ४. गोष्ट. ५. तुला. ६. वैष्णव नामक यज्ञ. या यज्ञाची अधिदेवता विष्णु. सुवर्णाचा नांगर करून यज्ञभूमि सिद्ध करून तिजवर हा यज्ञ करतात. ७. पुण्याची. ८. अत्युच्च अग्र (शिखा). पायली इत्यादि माप भरलें असतां धान्याचा शंकूसारखा आकार होतो ती. ९. 'सर्व माया भेदिली' असाही पाठभेद आहे. १०. नांगर. ११. नांगरणें. १२. कपट. १३. 'आप्त' असाही पाठ आहे. १४. वेळू; (पक्षीं) घराणें. 'विजय' असाही पाठ आहे. १५. अध्याय २५६ श्लो० १३-१४ पहा. १६. वाङ्निश्चय. १७. 'गुरु' किंवा 'विश्व' असाही पाठ आहे. १८. धृतराष्ट्राचे पुत्र. १९. कृष्ण.

आहुती । पाठोपाठीं पडतील. ॥ ६१ ॥ प्रथम आहुति **भीष्मद्रोण** । पूर्णाहुति **दुर्योधन** । **दु**:शासनाचें रक्तपान । पुरोडाश घ्यावया. ॥ ६२ ॥ सहज येऊं तया ठाया । विभागी असों उत्तरकार्या । निरोप सांगें **कौ**रवराया । पुत्रमित्रां सर्वांतें.' ॥ ६३ ॥ दूत सांगती हे वार्ता, । **धृ**तराष्ट्र परम चिंता । **भी**ष्माशीं म्हणे, 'माझिया चित्ता[1] । समाधान उपजेना. ॥ ६४ ॥ बोलिले तैशीच करिती[2] करणी । हा निश्चय मानिला मनीं'. । **भी**ष्म म्हणे, 'राहें मौनी । होईल तें विलोकीं.' ॥ ६५ ॥ असो. मांडला महा यज्ञ । स्थानीं नेमिले ऋत्विजजन । तृप्त जाहला हुताशन[3] । आज्याहुती[4] प्राशितां. ॥ ६६ ॥ घृत शर्करा पायस[5] ताटीं । ब्राह्मण तोषले लक्षकोटी । रत्नसुवर्णाचिया मुष्टीं । बहु दक्षिणा वांटिली. ॥ ६७ ॥ वस्त्रें भूषणें धेनू महिषी । अश्व कुंजर दास दासी । भूमिदान निष्क[6]राशी । याचकइच्छे दिधल्या. ॥ ६८ ॥ **कौ**रवपक्षी बोलती आप्त, । 'युगानयुगीं यज्ञ बहुत । केले परि हें अत्यद्भुत । नाहीं श्रवणीं परिशिलें. ॥ ६९ ॥ **ध**र्में राजसूय यज्ञ केला । तो बहुतेकांतें विस्मयो जाला । तो या मेरूपुढें गमला । सर्षप[7]प्राय ये काळीं.' ॥ ७० ॥ 'याग केला **ध**र्में सांग. । त्याचा सहस्रावा भाग । न पवे **दु**र्योधनाचा याग.' । ऐसें एक बोलती. ॥ ७१ ॥ **क**र्ण गर्जोनी बोले वाणी, । '**पां**डव मारिल्या रणांगणीं । राजसूय यज्ञ करोनी धरणी, । दानोदकें बुडवणें. ॥ ७२ ॥ सार्वभौमसंपत्तीची[8] माळा । घालूनियां **दु**र्योधनाचे गळां । अश्वमेधयागीं सकळां । महाकौतुक दावणें.' ॥ ७३ ॥ ऐकोनी **क**र्णाचें वचन । **अं**धें दिधलें आलिंगन । **विदुर कृ**प **भीष्म द्रो**ण । भाळ हातें स्पर्शिती. ॥ ७४ ॥ पुढती प्रतिज्ञा[9] बोले **क**र्ण, । 'रणीं मारीन मी **फा**ल्गुन[10] । अन्यथा असे तैं तो पाषाण । अथवा प्रेत भूमंडळीं.' ॥ ७५ ॥ संपला **दु**र्योधनाचा यज्ञ । **अ**द्वैतवनीं **कु**रुनंदन । निशाकाळीं महा स्वप्न[11] । देखता झाला लोचनीं. ॥ ७६ ॥ मृग येऊनी स्वप्नाप्रती । म्हणे, 'राया! **ध**र्ममूर्ती! । आमचें कुळ पावेल शांती[12] । पुढें संतती खुंटल्या.

---

१. 'व्यथा' असा अन्य पाठ आहे. २. 'करितील' असाही पाठ आहे. ३. अग्नि. ४. तुपाच्या आहुति. ५. खीर. 'पायस घोटीं' असाही पाठ आहे. ६. होन. 'भूतिग्राम निष्कराशी' असा अन्य पाठ. ७. मोहरी. ८. 'सार्वभौमपदाची माळ' असाही पाठ आहे. ९. कर्णाची भयंकर प्रतिज्ञा पहा. [मोरोपंत–वनपर्व–अ० ७ गी० ११७-११९ पृ० १२०.] तसेंच महाभारत–वनपर्व–अ० २५७ श्लो० १६-१७ पहा. १०. अर्जुन. ११. अध्याय २५८ पहा. यांत मृगस्वप्नोद्भवाची कथा आहे. १२. नाश.

॥ ७७ ॥ नित्य वधूनी मृगांचीं शतें । भोजन देशी ब्राह्मणांतें । शेष नुरेचि बीजापुरतें । ऐसें केलें पवित्रा! ॥ ७८ ॥ आतां कृपा करूनी दीना । गमन करावें[1] आणिका वना.' । करुणा आली कुरुभूषणा । अभय वोपी हरिणांतें. ॥ ७९ ॥ जागृत होऊनी विशाळकीर्ती । स्वप्न सांगे अनुजांप्रती । सांडूनी अद्वैतवनाची वस्ती । काम्यकारण्या चालिले. ॥ ८० ॥ काम्यकवनीं करितां वास । भेटी पातला वेदव्यास । नमस्कारूनी कुरुनरेश । सुखसंवादीं बैसला. ॥ ८१ ॥ 'घेईन अर्जुनाचा प्राण' । ऐशी प्रतिज्ञा बोलिला कर्ण । तें परिसोनी अतिउद्विग्न । धर्मराजा मानसीं. ॥ ८२ ॥ आपुल्या अपराधाचेनि दोषें । बंधु शिणती[2] अरण्यवासें । हेंही स्मरोनी विशेषें । परम दुःखें विलपत. ॥ ८३ ॥ व्यास म्हणे, 'कुंतीसुता! । कासया व्याकुळ करिशी चित्ता । तपोदानें क्लेशावस्था । हरूनी कल्याण पाविजे.' ॥ ८४ ॥ आवडी[3] पुसे युधिष्ठिर नृप, । 'श्रेष्ठ दान किंवा तप । जेणें खंडोनी संसारताप । परम श्रेयें[4] पाविजे.' ॥ ८५ ॥ व्यास म्हणे, 'सावधान[5] । निग्रहवूनी[6] शरीर प्राण । स्त्रीपुरुषेंशीं निर्मळ मन । द्विजपूजनीं जयाचें. ॥ ८६ ॥ चंदन झिजोनी परांतें[7] निववी । अगरु[8] जळोनी परिमळ दावी । आपण शिणोनी परांतें[9] जीववी । परोपकारी जो नर. ॥ ८७ ॥ तेणें कोटि तपें केलीं राया! । [10]तीर्थें वंदिती त्याचिया पायां । इंद्रादिक देव तया । सदा द्वारीं तिष्ठती. ॥ ८८ ॥ अकिंचन[11] आणि दानशील । भक्तीनें वोपी स्वल्प जळ । तेणें दिधलें भूमंडल । कनकाचल[12] दक्षिणे. ॥ ८९ ॥ याविषयीं इतिहास गहन । सांगेन ऐकें सावधान । '[13]व्रीहिद्रौणीक' महदाख्यान । चरित्र मुद्गलऋषीचें. ॥ ९० ॥ तो मुद्गल नामें ऋषीश्वर [14]श्रोत्री । वास करूनी कुरुक्षेत्रीं । [15]कंदमूलआहार पत्रीं । धर्मन्यायें

१. दुसरें. २. श्रम पावती. ३. 'आदरें' असाही पाठ आहे. ४. कल्याण. ५. लक्षपूर्वक. ६. दंडून. ७. 'परताप' असें पाठांतर आहे. ८. चंदनविशेष. ९. 'पुढिलां' असाही अन्य पाठ आहे. १०. 'तीर्थें नित्य वंदिती पायां' असाही पाठ आहे. ११. भिकारी. १२. मेरु. १३. व्रीहिद्रौणिक=व्रीहि=साळी (भात) व द्रोण=पानांचा द्रोण. मुद्गल शेतांत गळलेला एकेक भातगोटा टिपून पानांचे द्रोणांत टाकी व तो द्रोण भरला म्हणजे अतिथीस भोजन देऊन आपण जेवी. म्हणून यास व्रीहिद्रौणिक आख्यान म्हणतात. वनपर्व–अध्याय २५९-२६१ या अध्यायांत ही कथा आहे. १४. श्रोत्रिय, अग्निहोत्री. १५. 'पावक तोषवी अग्निहोत्री' असाही पाठ आहे.

वर्तत. ॥ ९१ ॥ शि[1]लोंछवृत्तीं वे[2]चिती कण । ते[3]णें करिती शरीरपोषण । ऐ[4]शा परी चौघेंजणें । प[5]क्षाहार संपादिती. ॥ ९२ ॥ प्र[6]थम ब्राह्मण तोषविती आधीं । भगवद्भावो यथाविधि । उरलेनि अन्नें क्षुधाव्याधी । चौघेंजणें परिहरती.॥९३॥ आपण भार्या स्नुषा सुत । चौघांचेंही एक चित्त । शरीरलोभाचा कुवात । एकातेंही ना[7]तळे. ॥ ९४ ॥ इंद्र मुख्य करूनी वि[8]बुध । अतिथी होऊनी घेती प्रसाद । हरिहरब्रह्मा गुणानुवाद । अखंड करिती तयाचा. ॥ ९५ ॥ चौघीं[9] षण्मास वेंचूनी कण । प्रा[10]णाहार संचित अन्न । तेव्हां [11]आंवतुनियां ब्राह्मण । तृप्त करिती तयांतें. ॥ ९६ ॥ वृत्तांत ऐकूनी ऐसा । अत्रिपुत्र मुनि दुर्वासा । लक्षूनी पारण्याच्या दि[12]वसा । येता झाला मध्यान्हीं. ॥ ९७ ॥ म्हणे, 'भोजन देई त्वरें । पीडिलें क्षुधेच्या वै[13]श्वानरें । नमस्कारूनी अत्यादरें । भोजनपात्रीं बैसविला. ॥ ९८ ॥ सर्वही अन्न भक्षिलें वेगीं । शेष आंगा लेपिलें सर्वांगीं । अ[14]वंचक भाव जाणोनी योगी । जाता जाला स्वाश्रमा. ॥ ९९ ॥ नाहीं कोप उ[15]बग चिन्ह । गेलिया मागें करिती स्तवन । म्हणती आम्ही धन्य धन्य । कृपा केली समर्थे. ॥ १०० ॥ यापरी साधूनियां वेळ । अन्न भक्षिलें सात वेळ । वि[16]कृति [17]उपेक्षा अ[18]ळुमाळ । चौघांतेंही न देखे. ॥ १०१ ॥ चढता आदर भोजनीं । देखता झाला प्रतिदिनीं । दुर्वासरूपें शूळपाणी । संतोषला दयाळ. ॥ १०२ ॥ ते वेळीं प्रसन्न मुखें जाणा । आलिंगिलें चौघां जणां । म्हणे, 'धन्य धन्य तुलना । तुम्हां नाहीं त्रिलोकीं. ॥ १०३ ॥ तुम्हीं इह लोक जिंतिला । पर लोक पायातळीं सू[19]दला । ब्रह्मसुखाचा लाधला । स्वानंदसिंधु निर्धारें. ॥१०४॥ छळितां क्लेश केले तुम्हातें । तें म्यां जाळिलें भवबीजातें । आतां अक्षय सायुज्यातें । पावोनियां सुख भोगा.' ॥१०५॥ ऐसें अनुवादतां तेथ । घंटाघोष घवघवित । दिव्य विमान हंसयुक्त । ऋषीलागीं पातलें. ॥ १०६ ॥

१. पक्ष्याप्रमाणें दाणे टिपून निर्वाह करणारा. २. 'ज्या जीवन' असाही पाठ आहे. ३. 'कपोतिकन्याय जाण' असाही पाठ आहे. ४. 'वेंचून एक एक कण' असाही पाठ आहे. ५. पक्षाहार=पक्ष=पंध्रवडा व आहार=भोजन. एकेक दाणा टिपतां टिपतां पंधरा दिवसांनीं चौघांस व अतिथीस पुरण्यापुरतें धान्य मिळे. त्यामुळें त्यांस पंधरा दिवसांनीं एकदांच जेवायास मिळत असे. ६. 'तेणें' असा अन्य पाठ. ७. न स्पर्शे. ८. देव. ९. 'मिषें' असाही पाठ आहे. १०. 'दशाहार सांचविती अन्न' असाही पाठ आहे. ११. आमंत्रण करून. १२. 'पहावया मन इच्छा' असा अन्य पाठ. १३. अग्नि. १४. निष्कपट. १५. कंटाळा. १६. बदल. १७. अनास्था. १८. तिलप्राय. १९. घातला.

नमस्कारूनियां दूतीं । म्हणितलें, 'चालिजे स्वर्गाप्रती । इंद्र [1]चंद्र प्रजापती । वाट पहाती स्वामिया !' ॥ १०७ ॥ मुद्गल म्हणे, 'स्वर्गलोकीं । सर्व वस्ती अक्षय सुखी । किंवा कोणी महादुःखी । पीडिजेती प्रारब्धें ? ॥ १०८ ॥ किती गुण किती दोष । स्वर्गाहूनी स्थान विशेष । तेथें वसती महापुरुष । ते कोण कोण सांगिजे.' ॥ १०९ ॥ दूत म्हणती, 'स्वर्गभुवनीं । सर्वही वसती रत्नसदनीं । बैसोनियां विमानयानीं । स्वेच्छानंदें क्रीडती. ॥ ११० ॥ दिव्य वस्त्रें दिव्य [2]आभरणें । दिव्य गंध दिव्य [3]सुमनें । दिव्य सुंदरींचीं आलिंगनें । सुखमैथुनें मनइच्छा. ॥ १११ ॥ स्वेच्छ सुधारसपान, । जरा क्षुधा रोग मरण । मळमूत्रादि [4]कश्मल जाण । तया लोकीं असेना. ॥ ११२ ॥ कामधेनू पुरवी काम । कल्पिलें वोपी [5]कल्पद्रुम । पारिजातांचा [6]आराम । दिव्य गंधें [7]घमघमित. ॥ ११३ ॥ परम विश्रांति नंदनवनीं । रत्नपुलिनी [8]मंदाकिनी । अमृतोदकीं हेम[9]नलिनी । सहस्रदळीं फुललिया. ॥ ११४ ॥ ऐसा स्वर्गींचा [10]सुखाड । अंतीं आघाताचे दगड । लागती तोही [11]निर्वाड । स्वल्प कांहीं परिसतु. ॥ ११५ ॥ विशेष देखोनी पावती खेदा । [12]सन्मानालागीं उपजे स्पर्धा । मैत्री आर्जव सुख-संवादा । कोणी कोणाशीं न मिळती. ॥ ११६ ॥ पुण्य सरतां एकाएकीं । टोणपा बैसे हो ! मस्तकीं । ते वेळीं होऊनी परम दुःखी । अधःपंथीं उतरणें. ॥ ११७ ॥ म्हणोनी [13]सत्यलोकपर्यंत । सर्व जाणोनी अंतवंत । तत्वनिष्ठ ज्ञानिये संत । सत्य मार्गीं निघाले. ॥ ११८ ॥ तपयोगें स्वर्गस्थान । शुद्ध जें कां ब्रह्म सनातन । भक्तीनें हरिहराचें [14]भुवन । वैकुंठ आणि कैलास. ॥ ११९ ॥ सांडोनियां देहाभिमान । सर्वभूतीं [15]समसमान । ते पावती [16]पदनिर्वाण । कैवल्यधाम ज्या म्हणती. ॥ १२० ॥ म्हणोनी वामदेव शुक । याज्ञवल्क्य वसिष्ठ जनक । सर्व मानूनी [17]मायिक । ब्रह्मानंदीं मिसळले.' ॥ १२१ ॥ हे मुद्गलें ऐकोनी वाणी । विमान पाठविलें परतोनी । अहंममतेतें त्यागुनी । सोऽहंध्यानीं बैसला. ॥ १२२ ॥ कर्म अर्पितां भगवंतीं । तात्काळ [18]चित्तशुद्धीची प्राप्ति । चित्तशुद्धीनें वैराग्यशांती ।

---

१. 'सूर्य निशापती' असाही पाठ आहे. २. अलंकार. ३. पुष्पें. ४. घाण. ५. वृक्ष. ६. बाग. ७. सुवासयुक्त. ८. गंगा. ९. कमलिनी. 'कुमुदिनी' असें पाठांतर. १०. सुख. ११. निर्णय, निकाल. १२. 'समान पुण्यें' असाही पाठ आहे. १३. ब्रह्मलोक. १४. 'दर्शन' असाही पाठ आहे. १५. 'समाधान' पाठांतर. १६. मोक्षपद. १७. खोटें, असत्य. १८. 'चिच्छुद्धीची' असाही पाठ आहे.

निर्धारेशीं पाविजे. ॥ १२३ ॥ वैराग्यशांतीनें अचल ज्ञान । ज्ञानें कैवल्य[1]-निधान । ब्रह्मप्राप्तीलागीं सोपान । सर्व सिद्धांतीं बोलिजे. ॥ १२४ ॥ या परी मुद्गल ऋषि तेथें । पावला अक्षय ब्रह्मस्वरूपातें । पुढती दुःखवार्ता जेथें । कल्पांतींही नाढळे[3]. ॥ १२५ ॥ तैसेंचि त्वांही धर्मराया ! । सांडूनी संसारिक माया । विचारें स्वस्थ करूनी हृदया । आत्महिता लागावें. ॥ १२६ ॥ प्रारब्ध करूनी प्रमाण । होईल तें पहावें मौनें करून । आत्मस्वरूपाहूनी मन । ढळों नेदीं सर्वथा.' ॥ १२७ ॥ ऐसें सांगोनी राया धर्मा, । व्यास गेला निज आश्रमा । वैशंपायन नरेंद्रोत्तमा । जनमेजया निरूपी. ॥ १२८ ॥ इति श्रीवनपर्व भारतीं । श्रीहिद्रौणिकव्रतसमाप्ती । जैयद्रथविटंबना श्रोतीं । अत्यादरें परिसणें. ॥ १२९ ॥ मुक्तेश्वराची मनो आर्ती । कोरान्न[7] मागे संतांप्रती । अवधान स्नेहाचिया हातीं । स्वल्प मुष्टी न धरावें. ॥ १३० ॥

---

## अध्याय चौदावा.

काम्यकवनीं कामनातीत । धर्मराज बंधूंसहित । सर्वें[9] धौम्य पुरोहित । सारसार जाणता. ॥ १ ॥ आश्रमीं द्रौपदीनिधान । ठेवूनी पुरोहित संरक्षणा । पारधी गेले पांचही जण । मृगमांसें आणावया. ॥ २ ॥ क्षुधे पीडती ब्राह्मण । शीघ्र द्यावया भोजन । वधूनी आणावया मृगगण । वना गेले प्रतापी. ॥ ३ ॥ सैंधवराजा[11] जयद्रथ । कोटिक[12] सौवीर मित्र सहित । त्रिगर्तराज[13] बलोन्मत्त । पूर्वद्वेषी[14] धर्माचा. ॥ ४ ॥ वाजी[15] वारण[16] रथ पदाती[17] । सेनासमुद्र लोटला क्षिती । गर्जना परिसोनी श्वापदजाती । गिरिकंदरीं रिघाल्या[18]. ॥ ५ ॥ जात असतां विवाहकार्या । चुकोनि आले तया ठाया । आश्रमद्वारीं पांडवजाया । कनकलतिका[19] देखिली. ॥ ६ ॥ तीतें अवलोकितां नयनीं । हृदय भेदलें पंच[20]-बाणीं । जैसा भ्रमे मद्यपानी । तेंवी पडला भूतळीं. ॥ ७ ॥ म्हणे, 'हे काय

---

१. मोक्ष. २. जिना. ३. 'नाठवे' असाही पाठ आहे. ४. 'धरूनी मौन' पाठांतर. ५. महाभारताच्या वनपर्वांत 'द्रौपदीहरणपर्व' म्हणून एक पोटपर्व (अ० २६२-२७१) आहे त्यांत ही कथा सविस्तर आहे. ६. 'वृत्ती' पाठांतर. ७. कोरें अन्न, कोरडी भिक्षा, कोरें धान्य. ८. 'घालावें' पाठांतर. ९. निरिच्छ. १०. 'सर्वज्ञ' पाठांतर. ११. सिंधु नदीचे लगत्याचा प्रांत. १२. कोटिक ऊर्फ कोटिकास्य हा शिवी वंशांतील सुरथ राजाचा पुत्र होता. १३. याचें नांव क्षेमकर असें होतें. पुढें ओवी ३८ पहावी. १४. 'पूर्ण' असाही पाठ आहे. १५. घोडे. १६. हत्ती. १७. पायदळ. १८. शिरल्या. १९. सुवर्णवल्ली. २०. मदन.

शक्र[1]रमणी, । किंवा साकार[2] सौदा[3]मिनी, । ईचेनी पाडें[4] त्रिभुवनीं । अंगना आन असेना.' ॥ ८ ॥ म्हणे, 'कोटिका! विचारीं । सुकुमार हे कवणाची कुमारी । कवणा सभाग्याची नारी । प्राणेश्वरी डोळसा[5]. ॥ ९ ॥ जरी मिळे ऐशी भाज[6] । तरी पुढारीं[7] आर्त[8] नाहीं मज[9] । क्षत्रियकुळीं जन्मोनी काज । सर्वही म्यां साधिलें.' ॥ १० ॥ कोटिक येऊनी आश्रमनिकटीं । वंदी जोडिल्या पाणिपुटीं । म्हणे, 'तूं कवणाची गोरटी[10] । वनसंकटीं एकली? ॥ ११ ॥ सुवर्णचंपकचारुकलिके! । लावण्यमूलपीठरेणुके! । नृप चौडंक गर्जती मुखें । [11]लोलो लागला म्हणोनी. ॥ १२ ॥ तुझा वृत्तांत पडावया[12] श्रवणीं । जोगवा[13] मागिजे जोडूनी[14] पाणी । उदेयो[15] करीं कुलस्वामिनी! । आनंदाचे आनंदीं.'॥ १३॥ द्रौपदी म्हणे, 'मी द्रुपदतनया । पांचा पांडवांची जाया । एकटी[16] वनीं न पवें भया । पती समर्थ म्हणवोनी.' ॥ १४ ॥ कोटिकें सांगतां ही वार्ता, । धैर्य न धरवे जयद्रथा । अद्भुत नावरे कामव्यथा । येता झाला जवळिकें. ॥ १५॥ म्हणे, 'कुशल वो कल्याणरूपे!' । येरी म्हणे, 'श्रीकृष्णकृपे.' । पुढती बोले, 'दरिद्रतापें । कष्ट भोगिशी काननीं. ॥ १६ ॥ राज्यभ्रष्ट श्रीभ्रष्ट । त्यांचे संगतीं भोगिशी कष्ट । आतां त्यागीं ते सर्वभ्रष्ट । परम अभाग्य पांच ही.॥ १७॥ माझी भार्या होऊनी प्रीती । आरुढें कां कनकरथीं । पांडव पातल्या शस्त्रघातीं । पाठवीन यमलोका.' ॥ १८ ॥ द्रौपदी म्हणे, 'हे मिथ्या मातु । मी तंव बलिष्ठांची वस्तु । अभिलाषितां सद्यो मृत्यु । पावशील पापिष्ठा! ॥ १९ ॥ अन्याय करूनियां अद्भुत । पळशी सप्त पाताळांत । तेथूनी काढील पवनसुत[17] । अर्ध क्षण न लागतां. ॥ २० ॥ मीनल्या राजे कोट्यानुकोटी । एक बाणें वधील किरीटी । जैशीं तृणें हव्यवाटीं[18] । भस्म होती स्पर्शतां. ॥ २१ ॥ निद्रित देखोनी केसरी[19] । त्याची स्मश्रु उपडितां[20] करीं । व्याघ्र ताडोनी लत्ताप्रहारीं । [21]अजाकळपीं लपतोसी. ॥ २२ ॥ सर्पपुच्छ रगडोनी चरणीं । हातें काढी मस्तकमणी । तया वांचता मार्ग जनीं । कोण तो दावी पामरा!? ॥ २३ ॥ तेंवी

१. शची. २. मूर्तिमंत. ३ वीज. ४. प्रमाणें. ५. सुंदरी. ६. स्त्री. ७. 'अंतुरीं' असाही पाठ आहे. ८. आवड. ९. 'पुरलें सहज' असाही पाठ आहे. १०. स्त्री. ११. लोभ. १२. 'पडतां' पाठांतर. १३. भिक्षा. १४. 'मागती पसरूनी' पाठांतर. १५. 'उदो' पाठांतर. १६. 'एकली' पाठांतर. १७. भीम. १८. अग्नि. १९. सिंह. २०. 'उपडिशी' पाठांतर. २१. 'पहाशी अजाकळपीं लपावया' पाठांतर.

मी **पां**डवांची [1]वनिता । मृत्यु [2]पावशी स्पर्श करितां । जेंवी ज्वाला आलिंगितां । पतंग भस्मे तात्काळीं.' ॥ २४ ॥ ऐसें [3]बोलतां **पां**चाळी ते । [4]**सैं**धव न पवे भयशंकेतें । **द्रौ**पदी धरूनी कठिन हस्तें । बलात्कारें वोढिली. ॥ २५ ॥ वेगीं वाहूनी [5]कनकरथीं । पळता झाला पवनगती, । **धौ**म्य म्हणे, 'मंदमती ! । मृत्यु मोलें घेतला. ॥ २६ ॥ अर्ध घटिकेमाजी जाण । अनर्थ पावशी दारुण । अपमान भोगुनी लांछन । जन्मवरी [6]खंडेना.' ॥ २७ ॥ रथ [7]पळे त्वरा मोठी । **धौ**म्य धांवे पाठोपाठी । तंव अवचिन्हें [8]देखे दृष्टी । **ध**र्मराज काननीं. ॥ २८ ॥ भालू भुंकती समोरी । पिंगळे [9]करकरती तरूवरी । [10]उलूक सुचविती घूत्कारीं । हानि जाली म्हणवोनि. ॥ २९ ॥ [11]सव्य चाष [12]अपसव्य काक । आडवे जाती [13]दंदशूक । मुखें पसरोनी [14]जंबुक । फिरफिरोनी [15]बोभाती. ॥ ३० ॥ **ध**र्म म्हणे, '**भी**मा! **कि**रीटी! । आश्रमीं अनर्थ दिसे दृष्टी । [16]मृगया सांडोनी उठाउठी । चला [17]वहिलें आश्रमा.' ॥ ३१ ॥ वेगीं आश्रमाजवळी पातले । तंव [18]धात्री शोकें भूतळीं लोळे । हृदय पिटी पाणितळें । केश मोकळे पाठिशीं. ॥ ३२ ॥ वृत्तांत पुसे **कुं**तीसुतु । ते म्हणे, 'येऊनीयां **ज**यद्रथु । **द्रौ**पदी [19]घेऊनी निज वस्तु । रथें सहित पळाला.' ॥ ३३ ॥ ऐकोनी धाविन्नले पांचही जण । घेतलीं खड्गें धनुष्यबाण । पुढें पळे **सैं**धव [20]करीन । पंच सिंह पाठिशीं. ॥ ३४ ॥ योजन एक [21]अंतरले । ते क्षणामाजी आटोपिले । गर्जना ऐकोनी कांपिन्नले । सर्व ही संगी नृपाळ. ॥ ३५ ॥ **सैं**धव सांगे संगियांप्रती, । '**पां**डव मारूनी शस्त्रघातीं । पांच ही शिरें दूताहातीं । **दु**र्योधना पाठवा'. ॥ ३६ ॥ आज्ञापितां [22]**सैं**धवपाळें । परतलीं राजयांचीं दळें । **पां**डव वेढूनी शस्त्रजाळें । वर्षते झाले अपार. ॥ ३७ ॥ **शा**ल्व **को**टिक **सु**रथपुत्र । **त्रि**गर्तराज **क्षे**मंकर । [23]**कु**लिंदाधिप महाक्रूर । सैन्यें अपार तयांचीं. ॥ ३८ ॥

---

१. स्त्री. २. 'पावशी मज स्पर्श' पाठांतर. ३. 'बोले' पाठांतर. ४. जयद्रथ. ५. 'दिव्य' अन्य पाठ. ६. 'सुटेना' पाठांतर. ७. 'पळवितां' पाठांतर. ८. 'देखलीं' पाठांतर. ९. 'गजबजती' पाठांतर. १०. घुबड. ११. डावा. १२. उजवा. १३. सर्प. १४. कोल्हे. १५. 'बोलती' पाठांतर. १६. 'मृग किंवा वन' पाठभेद. १७. सत्वर, तत्काळ. १८. दासी. १९. 'पापवंत' असाही पाठ आहे. २०. करी+इन=हत्तीश्रेष्ठ. २१. 'अंतरलें । ते क्षणामाजी आटोपिलें' पाठांतर. २२. जयद्रथ. २३. 'कुलिंदादि महावीर' पाठांतर.

द्वादश राजे सौ[1]वीर क्रूर[2] । कुहननामाचे राजेश्वर । घेऊनी रथ सौ[3] सहस्र । युद्धकदना मिसळले. ॥ ३९ ॥ मदोन्मत्त विशाळ करटी[4] । पुढां लोटिले सहस्र साठी । जाती अश्वांचिया घाटी[5] । लक्ष येक पाठिशीं. ॥ ४० ॥ पांच[6] सहस्र झुंजार[7] रथी । प्रचंड धनुष्यें धरूनी हातीं । बाण लावूनियां शीतीं[8] । पांडव उजू लोटले. ॥ ४१ ॥ पांच लक्ष पायींचे वीर । शूलपट्टीशखड्गधर । म्हणती, 'वेढूनी पांडुकुमर । खंडविखंड करांवे[10]'. ॥ ४२ ॥ भीम लक्षी [11]कुंजर-भार । रथियां उजू अर्जुनवीर । नकुल म्हणे, 'अश्वभार । तो भाग[12] पैं माझा. ॥ ४३ ॥ पदातिदळावरी सहदेव । लोटला जैसा रण भैरव । म्हणे, 'एक ही नेदीं जावों । परतोनियां स्वदेशा.' ॥ ४४ ॥ गदा वोपितां बाहुबळें । फुटती गजांचीं [13]कुंभस्थळें । तेथू[14]नियां अशुद्ध[15] गळे । धरा भिजोनी वहातसे. ॥ ४५ ॥ [16]महावंतांचीं शिरकमळें । छेदूनी सांडी एकेचि वेळे । सांडणें सांडितां रातोत्पळें[17] । तेंवी भ्यासुर भासती. ॥ ४६ ॥ धनंजयें एकेचि शरें । छेदिलीं सारथियाचीं शिरें । पाठी रथियांतें बाणधारे । शत सहस्र पाडिले. ॥ ४७ ॥ अश्व सहित राउत राणे । नकुळें खिळिले एके बाणें । प्रेतें पाडूनी[18] गतप्राणें । शरसंधानीं[19] खेळविती. ॥ ४८ ॥ सहदेवें सोडूनियां बाण । पदातियांचे[20] छेदिले चरण । मस्तक करूनियां भिन्न । कोथळे[21] भूमी पाडिले. ॥ ४९ ॥ सोडूनी अर्जुनें शरा । सौवीरराजे पाडिले बारा[22] । माजल्या अशुद्धाचिया[23] पुरा- । माजी पडिले प्रवाहीं. ॥ ५० ॥ निमालें त्रिगर्तांचें[24] सैन्य । घेऊनी पळाला[25] एकला प्राण । सेनेसहित जाला चूर्ण । कुलिंद कोठें दिसेना. ॥ ५१ ॥ मुख्य धुरा पावल्या नाशा, । कटकें पळालीं दाही दिशा, । [26]घोरें[27] भाविन्नला वळसा । घ्यावया

---

१. या बारा सौवीर कुमरांचीं नांवें येणेंप्रमाणें होतीं:—१ अंगारक, २ कुंजर, ३ गुप्तक, ४ शत्रुंजय, ५ संजय, ६ सुप्रवृद्ध, ७ भयंकर, ८ भ्रमर, ९ रवि, १० शूर, ११ प्रताप, १२ कुहन. २. 'कुमर' पाठांतर. ३. 'एक' पाठभेद. ४. हत्ती. ५. 'थाटी' पाठभेद. ६. 'पन्नास' पाठभेद. ७. योद्धे. ८. धनुष्याची दोरी. ९. 'झुंजा' पाठांतर. १०. 'करा रे' पाठभेद. ११. गजसमूह. १२. 'विभाग' पाठभेद. १३. गंडस्थळ. १४. 'धरा फुटोनी वहाती जळें । तेंवी अशुद्धें धांवताती ॥' पाठांतर. १५. रक्त. १६. महात (हत्तीस हाकणारा). १७. कमळें. १८. 'करूनी' 'पाडिलीं' 'पाडी' पाठांतरें. १९. 'शस्त्रें सांधे उखळिती' पाठांतर. २०. 'आधीं' पाठभेद. २१. कोथळा=मोठें पोतें. २२. मागें ३९ वे ओवीवरील १ ली टीप पहा. २३. रक्ताच्या. २४. याचें नांव क्षेमंकर होतें. मागें ३८ वी ओवी पहा. २५. 'गेला' पाठभेद. २६. 'भीम भरला अति आवेशा । म्हणे मारीन अवध्य तें ॥' असाही पाठ आहे. २७. 'थोर' पाठांतर.

उश्वासभासा[1] । अवकाश नाहीं. ॥ ९२ ॥ मार देखोनी जयद्रथ । रथ सांडिला द्रौपदीसहित । प्राणधाकें असे पळत । चरणचाली धाबरा. ॥ ९३ ॥ धर्म भीमातें वारित । सैंधव पळाला सांडूनी रथ । दळें मारिशी कां व्यर्थ । दीनहीनें बापुडीं? ॥ ९४ ॥ पुढां पातले पार्थ भीम ।तंव द्रौपदीसहित परतला धौम्य । पुसती, 'केउता सैंधव अधम?। तो शोधूनी मारावा.॥९५॥ द्रौपदी घेऊनी राया धर्मा । म्हणती जावें[2] स्वाश्रमा । सैंधव वधूनी शिरपद्मा । दावावया आणितों.'॥९६॥ धर्म म्हणे, 'धरूनी आणा । नासूं[3] नको त्याचिया प्राणा,। वृद्ध धृतराष्ट्राचिया मना । शोकदुःख न द्यावें. ॥ ९७ ॥ दुःशला गांधारीनंदिनी । ते आम्हां कनिष्ठ भगिनी । सैंधव मारिल्या सुवासिनी । विटंबेल वैधव्यें.' ॥ ९८ ॥ द्रौपदी म्हणे[4], 'भीमा! अर्जुना! । देखतां क्षणीं घ्यावा[5] प्राणा[6] । त्यातें वधिल्यावीण मना । समाधान[7] मज नाहीं.' ॥ ९९ ॥ धर्म धौम्य द्रौपदी सती । इंद्रसेनें[8] वाहूनी रथीं । स्वाश्रमा पाठवूनी भद्रजाती[9] । सैंधवापाठीं धाविन्नले. ॥ ६० ॥ सैंधव बैसोनी आणिके रथीं । पळत असतां पवनगती । अर्जुनें मंत्रबाणशक्ती । अश्वचरण खंडिले. ॥ ६१ ॥ रंहंवर[10] सांडूनी संकटीं । प्राणधाकें पळतां नेटीं । भीमें धांवोनियां पाठी । मुष्टिघातें ताडिलें. ॥ ६२ ॥ हात घालोनियां केशीं । उलथोनी पाडिला भूमीसी । लत्ताप्रहारें ताडितां कुशी । अशुद्ध[11] वमी भडभडां. ॥ ६३ ॥ अर्जुन म्हणे, 'गा! धर्मआज्ञा । वधूं नको याचिया प्राणा'. । मुखीं ताडूनी चंडकणा[12] । किरीट पायें मर्दिला. ॥ ६४ ॥ अर्धचंद्र बाण तिखट । मस्तकीं काढिले पांच पाट[13] । भूमी घांसोनी लल्लाट । रक्तमय तें[14] केलें. ॥ ६५ ॥ मिशी काढिली डावेकडे । खांड उजवे[15] अंगें देहुडे । विरूपता मुखाकडे । लोक दृष्टी देखती. ॥ ६६ ॥ कपाळीं काजळ लेपन । नासिकीं लाविला श्वेत चूर्ण[16] । ध्वजस्तंभेशीं बांधोन । धर्माजवळी पातले. ॥ ६७ ॥ ब्राह्मण पाहूनी पिटिती हो! टाळी । द्रौपदी हासे

---

१. 'श्वासा' पाठांतर. २. 'जावें जी' पाठांतर. ३. 'नाश न करितां' पाठांतर. ४. अध्याय २७१ श्लोक ४५-४६ पहा. ५. 'ध्यावे' पाठांतर. ६. मोरोपंत—वनपर्व—अ० ९ गी० ३९ पृ० १३३ पहा. ७. 'समाधान पैं' पाठांतर. ८. धर्मराजाचा सेवक. ९. हत्तीसारिखे धिंमे, गाढे. १०. रथ. ११. रक्त ओके. १२. थापटी. १३. पांच पाट काढणें=कोणाची अप्रतिष्ठा करावयाची असतां डोकीच्या केंसांचे वस्तऱ्यानें पांच पट्टे काढणें. हा एक शिक्षेचा प्रकार समजतात. १४. 'पैं' पाठांतर. १५. 'उजवा गंदे व्हडे' असाही पाठ आहे. १६. चुना.

गदारोळी[1], । भीम म्हणे, 'वो पांचाळी ! । आज्ञा देईं वधावया.' ॥ ६८ ॥ 'पांच पाट काढिले शिरीं । हे मरणाहूनी आगळी परी । आतां पापी दुराचारी । जीवदानें सोडावा.' ॥ ६९ ॥ ऐकोनी द्रौपदीचिया वचना । धर्म म्हणे, 'भीमसेना ! । सोडीं याचिया गळबंधना । देहसंबंधी म्हणवोनी.' ॥ ७० ॥ भीम बोले कठिण[2] वाचा । 'विक्रीत दास[3] मी पांडवांचा । ऐसें बोलेल तरी याचा । प्राण आम्ही रक्षणें. ॥ ७१ ॥ न म्हणतां करीन शिरच्छेद.' । धर्म म्हणे, 'न करीं वध । मुक्त केला हा दोषशब्द । धर्मबुद्धी वसों दे.' ॥ ७२ ॥ मग म्हणे, 'गा जयद्रथा ! । हें उचित मानलें चित्ता । मिळोन दुष्टाचिया मता । ऐसेंच कर्म करावें. ॥ ७३ ॥ पुरे आयुष्याची अवधी । तंव असों दे हेचि बुद्धी । उपदेश करितां कोटि शब्दीं[4] । दुष्ट भाव न खंडे. ॥ ७४ ॥ कराल तैसें पावाल फळ । असो[5] तूं जाईं क्षेमकुशळ.' । पाठविला[6] सैंधवपाळ । परि तो सखेद मानसीं. ॥ ७५ ॥ न वजाय[7] हस्तिनापुरा । रागें पातला गंगातीरा । आराधूनी श्रीशंकरा । मनकामना निवेदी. ॥ ७६ ॥ म्हणे, 'वरदान वोपीं मातें । रणीं मारीन पांडवांतें.' । हासोनियां[8] उमाकांतें । प्रत्युत्तर बोलिजे. ॥ ७७ ॥ 'केलिया कल्पांतीं जें नव्हे । माझेनी[9] जें न देववे । तें मागतां तुझेनि जिव्हे । लज्जा कैशी न पविजे ? ॥ ७८ ॥ नरावतार तो अर्जुन । कृष्ण तो आदिनारायण । एकरूपी दोघेजण । सत्य स्वरूप विष्णूचें. ॥ ७९ ॥ विष्णु तोचि मी यथार्थ । त्याचेनि घातें माझा घात । वरमागता तो मूर्ख एथ । देता तोही तैसाची. ॥ ८० ॥ केले तपाचे सायास । तरी जय पावशी एक दिवस । अर्जुन नसतां तो विशेषें[10] । कांहीं एक देखसी. ॥ ८१ ॥ परंतु जय त्यांचे भागीं । हानि अपजय तुमचा संगीं । कृष्णकृपेस्तव ते जगीं । नातळती विघ्नातें.' ॥ ८२ ॥ ऐसें बोलोनी विरूपाक्ष[11] । होता झाला अप्रत्यक्ष । सकळ मूर्खांमाजी तो मूर्ख । म्हणवूनी मानी श्लाघ्यता. ॥ ८३ ॥ येऊनी सांगे दुर्योधना, । 'आराधिलें त्रिलोचना । तेणें पांडवांचिया हनना । वरप्रदान मातें वोपिलें.' ॥ ८४ ॥ मूर्खवचन प्रमाण मूर्खा । तेंवी संतोष कुरुनायका । म्हणे, 'तूं विभागी सुखदुःखा । आतांमाजी[12]

---

१. गदगदां. २. 'क्रूर' पाठांतर. ३. अध्याय २७२ श्लोक १०-११ पहा. ४. 'कुबुद्धी' असा पाठ आहे. ५. 'आतां' पाठांतर. ६. 'यापरी पाठविला' पाठभेद. ७. जाय. ८. 'ऐसे ऐकूनी' पाठांतर. ९. 'वाटे' पाठांतर. १०. 'तूंचि यश' पाठभेद. ११. शिव. १२. 'आम्हालागीं' पाठभेद.

तूं जिवलग.' ॥ ८५ ॥ झालिया जयद्रथविटंबना । पुढें मार्कंडेय ऋषि गहना । कथिल कथानिरूपणा । तें सज्जन परिसोत. ॥ ८६ ॥ इति भारतपर्वणि । सकळ तीर्थांचिया श्रेणी । जोडिती इये ग्रंथश्रवणीं । मुक्तेश्वर कवि वदे. ॥ ८७ ॥

---

## अध्याय पंधरावा.

धर्मराज काम्यकवनीं । असंख्यात तपोधनांचिया श्रेणी । मार्कंडेय महामुनी । एकासनीं जवळिकें. ॥ १ ॥ धर्म म्हणे, 'महापुरुषा ! । द्रौपदी आमुची पवित्र योषा[1] । कायावाचामनें दोषा । स्पर्शली नाहीं स्वप्नींही. ॥ २ ॥ अनुसूया[2] किंवा सावित्री[3] । उपमे कांहीं वदाव्या वक्त्रीं । या वेगळी पहातां नेत्रीं । ब्रह्मांडघटीं दिसेना. ॥ ३ ॥ ऐशिया[4] पवित्रेसि दुर्जनीं । दुःख दिधलें सभास्थानीं । जयद्रथें स्पर्शोनी पाणी । जायाहरण केलें पापियें. ॥ ४ ॥ मैंज[5] समर्थाची जाया । पावली विपत्ति ऐशिया । तें मज सांगा ऋषिवर्या ! । सर्वद्रष्ट्या सुजाणा !' ॥ ५ ॥ ऐकोनी हांसे[6] सर्वज्ञमूर्ती, । 'हे अवस्था कायशी किती ? । सूर्यवंशीं दाशरथी । रामचंद्र जाणतसां. ॥ ६ ॥ त्याची भार्या गुणसुंदरी । नामें सीता परमेश्वरी । जनकचक्रवर्तीची कुमरी । मूर्त रमा भगवती. ॥ ७ ॥ राक्षसाचिये कारागृहीं । षण्मासवरी शिणली पाहीं । तिची अवस्था ऐकतां महीं । खंडविखंड होऊं पाहे.' ॥ ८ ॥ नमस्कारूनी धर्मराजें । म्हणितलें, 'विस्तारें सांगिजे.' । ऋषि म्हणे, 'ऐक सहजें । कारण जालें कथावया. ॥ ९ ॥ पुलस्त्य ब्रह्याचा नंदन । विश्रवा[7] सुनामा तपोधन । भारद्वाजें कन्यारत्न[8] ।

---

१. स्त्री. २. अत्रीची स्त्री. 'शांडिल्या' असें पाठांतर. ३. सत्यवानाची स्त्री. ४. 'ऐशिया सतीतें' असाही पाठ आहे. ५. 'मागां समर्थांचिया जाया । पावल्या आपत्ति ऐशिया' असाही पाठ आहे. ६. 'सांगे' असाही पाठ आहे. ७. पुलस्त्य हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र होता. त्यानें आपल्या गो नामक स्त्रीचे ठायीं वैश्रवण नामक पुत्र उत्पन्न केला. तो पुत्र बापाची सेवा करावयाची टाकून आजा ब्रह्मदेव याची सेवा करूं लागला. त्यामुळें पुलस्त्य रागावला; परंतु ब्रह्मदेव फार संतुष्ट होऊन त्यानें वैश्रवणास धनाध्यक्षत्व दिलें. तें पुलस्त्यास सहन झालें नाहीं. म्हणून त्यानें आपल्या देहाचे दोन विभाग करून त्यांपैकीं एकाचें नांव विश्रवा असें ठेविलें. त्या विश्रव्याचे (म्ह० अर्थात् पित्याचे अंशाचे) क्रोधशांतीकरितां वैश्रवणानें पुष्पोत्कटादि सुंदर तीन राक्षसी विश्रव्यास दिल्या. ८. हिचें नांव 'गो' होतें.

तयालागीं दीधलें. ॥ १० ॥ तिचे पोटीं जन्मला कुमर । नामें वैश्रवण[1] कु-
बेर । तेणें स[2]त्यलोकेश्वर । तपोतेजें तोषविला. ॥ ११ ॥ सेवेसी निवेदुनी यक्ष ।
ब्रह्मेनें केला धनाध्यक्ष । सा[3]ध्य यक्ष यांमाजी मुख्य । परम प्रिय शिवातें. ॥ १२ ॥
वस्तीसी हेमलंकास्थान । प्र[4]याणा पुष्पक विमान । लोकपाळांमाजी जा[5]ण ।
उत्तरदिशाधीश[6] तो केला. ॥ १३ ॥ तेणें तोषवाया ज[7]नका । सेवे वोपिल्या
त्रय नायिका । पुष्पोत्कटा मालिनी राका । रूपगुणी सुपवित्रा. ॥ १४ ॥
तिहीं पतिव्रताधर्में । पति तोषविला सं[8]भ्रमें । संतोषोनी वल्लभोत्तमें । सु[9]फळ
केल्या त्वरेतें. ॥ १५ ॥ रावण आणि कुंभकर्ण । पुष्पोत्कटेचे नंदन । मा-
लिनीचा बिभीषण । परम पवित्र धर्मात्मा. ॥ १६ ॥ ख[10]र पुत्र आणि शूर्प-
णखा । प्रसवली तिसरी रा[11]का । ब्राह्मण वधूनी सहस्रसंख्या । नित्य दोघें भ-
क्षिती. ॥ १७ ॥ सर्वही वेदशास्त्रीं निपुण । शा[12]स्त्रसाधनीं अतिप्रवीण ।
आगममंत्राचें वि[13]ज्ञान । फळापर्यंत जाणती. ॥ १८ ॥ पुत्रां घेऊनी चौघांजणा ।
पिता पातला गंधमादना । कुबेरसंपदा देखोनी मना । परम विषाद बंधूंतें. ॥ १९ ॥
दक्षिण काशीक्षेत्र गोकर्ण । तेथें पातले चौघेजण । तपश्चर्या अतिदारुण ।
देहदंडन मांडिलें. ॥ २० ॥ लोहकंटकांवरी अंगुष्ठ । ठेवुनी रावण एकनिष्ठ ।
लक्ष जपाचा शेवट । होतां ह[15]वन आरंभी. ॥ २१ ॥ छेदूनियां दाहीं शिरें ।
हवनीं होमी आपुल्या करें । पुढती ब्रह्याच्या वरें । उद्भवती तात्काळ. ॥ २२ ॥
शीत उष्ण वात पर्जन्य । माथां घेऊनी कुंभकर्ण । निराहारी निर्जळी जाण[14] ।
एकासनीं तिष्टत. ॥ २३ ॥ द्वादशाग्नि पंचाग्नि धूम्रपान । सूर्यमंडळ अवलोकन ।
वि[16]ष्णुस्मरणें बिभीषण । तपश्चर्या करितसे. ॥ २४ ॥ खराशी दशग्रीव
म्हणे, । 'तुवां शुश्रूषा करावी आंगें । माझिया रा[17]ज्याच्या विभागें । तुज ऐश्वर्यें
मान.' ॥ २५ ॥ दहा सहस्र वर्षें होतां । तयाप्रति पातला विधाता । म्हणे,
'कष्टं नको आतां । इच्छितार्थ मागिजे.' ॥ २६ ॥ 'अमरत्व निर्भयत्व । तिन्ही

१. हा पुलस्त्य+गो यांचा पुत्र. [अ० २७४ श्लो० १२.] २. ब्रह्मा. ३. 'शंकरगणांमाजी मुख्य' असाही पाठ. ४. 'याना' असाही पाठ. ५. 'मान्य' पाठांतर. ६. 'नैर्ऋत्य' पाठांतर. ७. बाप विश्रवा (पुलस्त्याचा अंश). ८. आदरानें. ९. 'सकळां दीधलें वरातें' असाही पाठ आहे. १०. 'खर त्रिशिरा' पाठांतर. ११. मोरोपंत—वनपर्व अ० १० गी० ८—१२ पृ० १३९—१४० पहा. १२. 'शस्त्रसाधनीं' असाही पाठ आहे. १३. 'विधान' असाही पाठ आहे. १४. 'निराहार निर्जळी जाण' असाही पाठ आहे. १५. 'यज्ञ आरंभिला' असाही पाठ आहे. १६. 'विष्णुस्मरणीं एकाग्र मन' असाही पाठ आहे. १७. 'तपाच्या' पाठांतर.

लोकांचें [1]आधिपत्य । देईं' म्हणोनी मागत । दशानन ब्रह्मयातें. ॥ २७ ॥ 'गंधर्व देव दानव असुर । यक्ष राक्षस सर्प किन्नर । भंग पावोनी मज समोर । दास्य करिती तें करीं.' ॥ २८ ॥ आपलें भक्ष्य म्हणोनी गर्वें । मनुष्यवानरांचीं नांवें । न घे तेथें ब्रह्मदेवें । पुढें उपाय सूचिला. ॥ २९ ॥ कुंभकर्ण नमूनी प्रार्थी, । 'अपार भक्षितां [2]नेसे तृप्ती । षण्मास निद्रेवरी जागृती । एक दिवस मज द्यावी. ॥ ३० ॥ माझिया बळासमान बळी । दुजा नसावा ब्रह्मांडगोळीं । स्वर्ग [3]मैर्दीन पायांतळीं । ऐशी शक्ति मज द्यावी.' ॥ ३१ ॥ यावरी बोले बिभीषण, । 'स्वामी! जालेती प्रसन्न । तरी जो वर मागेन । तो दीधला पाहिजे.' ॥ ३२ ॥ बिभीषण म्हणे, 'विश्वपति! । भगवद्भावना सर्वभूतीं । दया अहिंसा विष्णुभक्ती । चढोवढी मज द्यावी. ॥ ३३ ॥ मांडलिया आपत्तिकाळ । धर्मबुद्धि असावी अचळ । कुसंगती ही न पवे चळ । भाव निर्मळ जैयाचा.' ॥ ३४ ॥ प्रसन्न मुखें चतुरानन । म्हणे, 'राक्षसयोनींत जनन । पावोनी रजस्तमोगुणातीत मन । धन्य धन्य पवित्रा! ॥ ३५ ॥ वचनें जालें अमृतपान । या लागीं अमरत्व कृपेकरून । तुज दीधलें सत्य वचन । कल्पांतींही चळेना. ॥ ३६ ॥ अक्षय्य कोटी कल्पवरी । राज्य करीं सुवर्णनगरीं । लक्ष्मी वसेल तुझ्या घरीं । भर्तार मित्र म्हणोनी.' ॥ ३७ ॥ पाहोनी रावणा कुंभकर्णा । म्हणे, 'संपूर्ण मनकामना । उन्मत्तपणें पावाल विघ्ना । ते ही [5]संज्ञा सांगतसें. ॥ ३८ ॥ कराल विष्णूशीं विरोध । तरी पावाल प्राणवध । विष्णुस्मरणें अक्षय्य आनंद । अनंत काळ भोगाल. ॥ ३९ ॥ [6]जगज्जननीचा अभिलाष । उपजेल तेव्हां पावाल नाश । एरवीं भोगाल संतोष । ध्रुवा ऐसा जाण पां.' ॥ ४० ॥ कैलास आंदोळितां बळी । [7]आणि शिरकमळें पूजितां चंद्रमौळी । शंकरवर महाबळी । लाधला सर्वां वरांतें. ॥ ४१ ॥ प्रसन्न होऊनी गिरिजारमण । देता झाला वरप्रदान । म्हणे, 'बोलिला जें चतुरानन । तेंचि वचन पैं माझें.' ॥ ४२ ॥ शंभुर्स्वयंभुवरदान[9]मेळें । त्रैलोक्यींचें [10]राज्य केलें । ते वेळीं विश्व कैसें गमलें । कीटकप्राय त्यां दृष्टी. ॥ ४३ ॥ दंडूनियां कुबेरातें ।

१. 'अधिपतित्व' पाठांतर. २. 'नसो' पाठांतर. ३. 'मही' पाठांतर. ४. 'मज द्यावा' असाही पाठ आहे. ५. खूण. ६. सीतेचा. ७. 'हस्त्र शिरकला पर्वतातळीं । ते वेळीं स्मरला चंद्रमौळी । गरुडसूक्त व्यासोक्त ॥' असाही पाठ आहे. 'रुद्रकवच रुद्रन्यासोक्त' असा अन्य पाठ. ८. ब्रह्मा. ९. 'बळें' असाही पाठ आहे. १०. 'सामर्थ्य आलें', 'स्वामित्व केलें' असेही पाठ आहेत.

हरितलें पुष्पकविमानातें । लंका जितोनी आपणियातें । ठाव केला वसावया. ॥ ४४ ॥ बंदी घातलें सुरां सकळां । नवग्रहां पायीं एक शृंखळा । ताडूनियां अमरपाळां । भृत्यकामीं योजिलें. ॥ ४५ ॥ मारूनियां ऋषितापस । नित्य खाती मेदमांस[1] । [2]वीरश्री[3] माजले राक्षस । धेनुविप्रां भक्षिती. ॥ ४६ ॥ त्रैलोक्य पीडिलें अंगवणें । हरितलीं धनें अमूल्य रत्नें । अपूर्व तितुकें देखोनी नयनें । हिरोनी नेती दुरात्मे. ॥ ४७ ॥ देवगंधर्वांचिया नारी । दासी केल्या लंकापुरीं । नागकन्या कोटीवरी । रावणगृहीं कामिनी. ॥ ४८ ॥ तिहीं लोकांच्या सुंदरी । हिरोनी आणिल्या बलात्कारीं । दासी सूदल्या सहस्र घरीं । जाति पद्मिनी भोगावया ॥ ४९ ॥ आक्रांतले तिन्ही लोक । दीर्घ स्वरें करिती शोक । क्षोभूनी वैकुंठनायक । चतुरानना विचारी. ॥५०॥ 'कसा कवणापासूनी वर । पावलासे दशशीर?' । ब्रह्मा म्हणे, 'नरवानर । भिन्न असती वरदानीं.' ॥५१॥ सुरां आज्ञापी [6]अमरनाथ, । 'वानर[7]ऋक्षयोनीआंत । शरीरें धरा अत्यद्भुत । लंकानाथ वधावया. ॥ ५२ ॥ राज्य करी राक्षसपाळ । [8]युगचौकड्या तेरा वेळ । लोटल्या त्याची संख्या [9]प्रबळ । बावन्न युगें मनुष्याचीं. ॥ ५३ ॥ पांच कोटी संवत्सर । [10]एकें लक्ष साठ सहस्र । इतकीं वर्षें वर निर्जर । कारागृहीं [11]अंदुबंदें. ॥ ५४ ॥ भोगिताती नाना क्लेश । आतां त्याचा करीन नाश । नांव घ्यावया राक्षस । लोकत्रयीं उरेना. ॥ ५५ ॥ [13]मनुष्यरूपातें धरूनी । हा रावण निर्दाळूनी । स्वर्गीं सुरांतें स्थापूनी । परिहरीन भूभार.' ॥ ५६ ॥ चतुर्धा झाली एक [14]तनु । सौमित्र भरत शत्रुघ्न । पूर्ण अवतार [15]रघुनंदनु । रामरूपें आगळा. ॥ ५७ ॥ अयोध्यापुरींचा नृपनाथ । पुत्र अजाचा दशरथ । [16]अंगनात्रयीं त्रिवेणीयुक्त । [17]तीर्थराज ज्यापरी. ॥ ५८ ॥ कौसल्येचा एक रघुनाथ ।

१. चरबी. 'मद्य' असाही पाठ आहे. २. 'मदें' असाही पाठ आहे. ३. पराक्रमानें. ४. धेनु. ५. 'कान करिती' असाही पाठ आहे. ६. 'रमानाथ' असाही पाठ आहे. ७. अस्वल. ८. रावणाचें आयुष्याची मर्यादा चवदा चवकड्या होती. कृत, त्रेता, द्वापार व कली हीं चार मिळून एक चौकडी किंवा महायुग होतें. महायुगाचें मान (४३,२०,०००) त्रेचाळीस लक्ष, वीस हजार वर्षें आहे. (पहा भास्कराचार्य व तत्कृत ज्योतिष–पृ० ४३.) त्यास १४ नीं गुणिलें म्हणजे (६,०४,८०,०००) सहा कोटी चार लक्ष ऐशीं हजार वर्षें इतकें रावणाचे आयुष्याचें मान येतें. ९. 'केवळ' पाठांतर. १०. 'एकसष्ट' असाही पाठ आहे. ११. 'दुष्टाच्या' असाही पाठ आहे. १२. नशीब. १३. 'धरूनी मनुष्य रूपातें । निर्दाळूनी रावणातें । स्वर्गीं स्थापूनी सुरांतें । परिहरीन भूभार ॥' असा अन्य पाठ. १४. देह. १५. 'मधुसूदनू' असाही पाठ आहे. १६. स्त्री. १७. प्रयाग.

कैकेयीचा पुत्र भरत । लक्ष्मणशत्रुघ्न चंद्रादित्य । देवी सुमित्रा प्रसवली. ॥ ५९ ॥ गर्भाधानापासूनी जाण । चतुर्दश [1]संस्कार जाले पूर्ण । चतुर्दश विद्या हो आपण । वो[2]ळगती तयांतें. ॥ ६० ॥ ताडकासुबाहूचें हनन । सिद्धी नेला [3]ऋषीचा यज्ञ । केलें अहल्याउद्धरण । चरणस्पर्श करूनी. ॥ ६१ ॥ स्वयंवरीं हरचापखंडण । अपमानिला दशानन । केलें जानकीचें पाणिग्रहण । समस्त रायां देखत. ॥ ६२ ॥ मार्गीं जिंकिला [4]भृगुपति । [5]जैयश्री पातले अ-योध्येप्रति । रायें जाणोनी [6]पुरुषार्थी । राजाभिषेक मांडिला. ॥ ६३ ॥ दुंदुभी नामें गंधर्वनारी । ते [7]मंथरा प्रेरिली सुंदरी । कैकेयी [8]बोधोनी कुटिलोत्तरीं । राज्य देईं भरतातें. ॥ ६४ ॥ राम सीता सौमित्र गुणी । अरण्यवासा पाठ-विलीं तिन्ही । तेथ वसतां रक्षोगणीं । चालीजेल वैरातें. ॥ ६५ ॥ पंचवटिके वसतां पाहा हो । निकटवासें वाढला कलहो । असंख्य राक्षससमूहो । राम-हस्तें शमला. ॥ ६६ ॥ यापरी साधी देवकाजा । प्रतिज्ञा करूनी पातली कुब्जा । कैकेयीदासी होऊनी वोजा । उपदेशिला [9]कुंडा [10]मंत्र. ॥ ६७ ॥ राजा गोवूनी [11]भाकेतें । म्हणे, 'अभिषेकीं भरतातें । न करितां त्यागीन प्राणातें । [12]तूं असत्यें लिंपलासी. ॥ ६८ ॥ रामसीतालक्ष्मणा । चौदा वर्षें पाठवीं वना । उत्तीर्ण होईं भाकऋणा । सत्यवादी धार्मिक.' ॥ ६९ ॥ वृत्तांत कळला रघु-नंदना । राज्य सोडूनी निघाला वना । सवें लक्ष्मण पवित्रांगना । जनक-आत्मजा जानकी. ॥ ७० ॥ वना जातां रघुनंदन । दुःखें दशरथें त्यागिले प्राण । रामसीतालक्ष्मण । चित्रकूटीं पातले. ॥ ७१ ॥ राज्य सांडूनी धां-वला भरत । तयाचे मस्तकीं ठेविला हात । पादुका घेऊनी स्नेहभरित । नंदि-

१. एकंदर १६ संस्कार आहेत ते हेः—१ गर्भाधान, २ पुंसवन, ३ अनवलोभन, ४ विष्णुबलि (७ वे महिन्यांत), ५ सीमंतोन्नयन (४ थे, ६ वे किंवा ८ वे महिन्यांत), ६ जातकर्म, ७ नामकरण, ८ निष्क्रमण, ९ सूर्यावलोकन, १० अन्नप्राशन, ११ चूडाकर्म, १२ उपनयन, १३ महानाम्य, १४ समावर्तन, १५ विवाह व १६ स्वर्गारोहण. कांहीं ग्रंथांत ३, ४, ९, ११ व १६ हे गाळून बाकीचे अकरा व केशान्त म्हणून बारावा संस्कार आढळतो. २. आश्रय करतात, सेवितात. ३. विश्वामित्राचा. 'गाधिज' असा अन्य पाठ आहे. ४. परशुराम. ५. 'जायेशीं' अन्य पाठ. ६. प्रतापी, शूर. ७. मंथरा ही विरोचनकन्या. रावणरूप देवकार्य साधण्यासाठीं देवांनीं या कुब्जावेषधारिणी अप्सरेला केकयराजाकडे पाठविलें होतें. केकयराज अश्वपति यानें दासी म्हणून हिला कैकयीपाशीं ठेविलें होतें. (सर्ग ७ श्लोक १-३० पहा.) ८. अ० २७७ श्लो० १७-१९ पहा. ९. कपटाचा. १०. मसलत. ११. शपथ. १२. 'जरी तूं सत्य लोपिशी' असाही पाठ आहे.

ग्रामीं स्थापिल्या. ॥ ७२ ॥ चालतां दंडकारण्यपंथें । विराधें हरिलें जानकीतें । तो मारूनी शस्त्रघातें । मुक्त केला सुपंथ. ॥ ७३ ॥ शरभंग तपोराशी । देखोनी वंदिला अगस्त्य ऋषी । त्याचिया आज्ञा संगियासी । पंचवटिके पातला. ॥ ७४ ॥ आश्रम करूनी वसतां तेथ । शांब शूर्पणखीचा सुत । काळखड्गार्थ अत्यद्भुत । तपश्चर्या आचरे. ॥ ७५ ॥ त्यावरी वाढिन्नली तृणजाळी । शांब लोपला तया तळीं । प्रसन्न होऊनी चंद्रमौळी । काळखड्ग पाठविलें. ॥ ७६ ॥ खड्ग प्राप्त होत्या वेळे । लक्ष्मण वेंची तेथें फळें । शस्त्र झेलूनी करतळें । धारातेज विलोकी. ॥ ७७ ॥ घावो घालिनां वृक्षमूळीं । तुटे शांबाची कंठनाळी । त्याची शोणितखळाळी । भूमि जाली सुरंग. ॥ ७८ ॥ शिर राघवें देखतां नयनीं । राक्षस जाणितला लक्षणीं । शत्रुक्षयातें तेथूनी । मूळ जालें विरोधा. ॥ ७९ ॥ माता देखोनी पुत्रघाता । कपटें जाली सुंदर वनिता । 'सौमित्र करीन' म्हणे 'भर्ता' । तें राघवातें चोजविलें. ॥ ८० ॥ संकेत करूनी लक्ष्मणा । तिच्या छेदविलें कर्णघ्राणा । युद्धा येतां खरदूषणा । चौदा सहस्र निवटिले. ॥ ८१ ॥ शूर्पणखा स्त्रियांसहित । लंके गेली शोक करित, । वृत्तांत ऐकोनी लंकानाथ । अत्यद्भुत क्षोभला. ॥ ८२ ॥ मारीच कनकमृगाकृती । गुंफे धाडिला राघवाप्रति । त्याची देखोनी अंगदीप्ति । लोकदृष्टि वेधल्या. ॥ ८३ ॥ पाहतां हेमकुरंगम । जानकीतें कंचुकीचा काम । म्हणे, 'याचें काढूनी चर्म । मातें देईं दयाळा!' ॥ ८४ ॥ धनुष्य बाण धरूनी मुष्टी । राम धाविन्नला मृगापाठी । सौमित्र ठेविला पर्णकुटी । रक्षावया सीतेतें. ॥ ८५ ॥ माया मृग ताडितां शरें । गर्जिन्नला श्रीरामस्वरें । 'सौमित्रा! धांव धांव त्वरें । निशाचरीं वधियेलों.' ॥ ८६ ॥ जानकी म्हणे, 'सत्वर धांव'. । येरू म्हणे, 'राक्षसमाव'. । सीता क्षोभली म्हणे, 'भाव । आजी कळला कपटिया! ॥ ८७ ॥ राम मारावा राक्षसीं । नातें कपटें भोगूं पहासी, । जळो तुझी भक्ति ऐसी । प्राण देईन पापिष्टा!' ॥ ८८ ॥ लक्ष्मण पावोनी दुःखा । रक्षणा घातली धनुष्यरेखा, । श्रीरामनाडळांची मार्गभूमिका । लक्षूनी गेला सशोक. ॥ ८९ ॥ दंडी मुंडी

१. राक्षसविशेष. २. 'राक्षस संगिया निघातेशी । मारूनी पंचवटिके पातला ॥' असाही पाठ आहे. ३. 'आज्ञे' पाठांतर. ४. शिव. ५. रक्त. ६. 'च्छेद' पाठांतर. ७. स्त्री. ८. जाणविलें. ९. हरण. १०. कपट. ११. 'मारिल्या' पाठभेद. १२. 'लक्षीत' पाठभेद.

काषायवासी । रावण जाला वृद्ध संन्यासी । हस्तें दावूनी जानकीसी । भिक्षा मागे भुकेला. ॥ ९० ॥ फळभिक्षा वोपितां सती । वोढूनी वाहिली पृष्ठीवरुती । वातवेगीं गगनपंथीं । पळता झाला दुरात्मा. ॥ ९१ ॥ दीर्घ स्वरें करीत रूदना, । 'धांव धांव रघुनंदना! । वेगीं धांव धांव लक्ष्मणा! । मज रावणें हरियेलें.' ॥ ९२ ॥ करितां साधूची छळणा । तात्काळ वरपड होइजे विघ्ना । दोष लावितां लक्ष्मणा । दुःखार्णवीं पडियेली. ॥ ९३ ॥ तिचा ऐकोनी शोकशब्द । जीवमात्रा हृदयभेद, । पशु पक्षी मानूनी खेद । रूदन करिती आक्रोशें. ॥९४॥ पर्वतीं स्रवती अश्रुधारा । जीवनें सुटती तरुवरां । फुटों पाहे वसुंधरा । दुःखें देखोनी सीतेच्चीं. ॥ ९५ ॥ विमानयानीं निर्जरदारा । हृदय पिटोनी ताडिती करा । म्हणती, 'क्षयो दशशिरा । शीघ्र हो कां या दोषें.' ॥ ९६ ॥ शोक करितां खंजनाक्षी । ऐकोनी कोपला जटायु पक्षी । पर्वतकुहरांतूनी लक्षी । रावणातें वधावया. ॥ ९७ ॥ उभय पक्षांचा झडझडाट । गर्जनेचा कडकडाट । रोधूनियां रावणवाट । उभा ठेला सन्मुख. ॥ ९८ ॥ म्हणे, 'राक्षसा! पापभरिता! । मृत्यु पावसी मैथिली नेतां, । दशरथमित्रा मज देखतां । जावों कैसा पाहासी?' ॥ ९९ ॥ पर्वतप्राय महाबळी । मुकुट हाणोनी पाडिला तळीं । धनुष्य भंगोनी भूतळीं । खंडविखंड पाडियेला. ॥१००॥ नखीं जर्जर केला देह । शरीरीं सुटला रक्तप्रवाह । 'चंचुप्रहारें शीर्षसमूह । छेदीन' म्हणे 'एकदां.' ॥१०१॥ बळ अद्भुत देखोनी दृष्टी । रावणा भय न सांठवे पोटीं । म्हणे, 'हे सांडूनी संकटीं । प्राण रक्षूनी पळावें.' ॥१०२॥ मग म्हणे, 'रामभक्ता! ऐक वचना । प्रकट करूनी उभयमरणा । निर्वाण झुंज झुंजों जाणां । इच्छा पुरे दोहींची. ॥ १०३ ॥ करितां अंगुष्ठछेदन । आम्हां राक्षसां तात्काळ मरण.' । पक्षी म्हणे, 'पक्षखंडन । होतां निधन आमुतें.' ॥ १०४ ॥ अंगुष्ठ छेदितां पक्षधरें, । पक्ष छेदिले दशकंधरें । पर्वत पडे वज्रप्रहारें । तेंवी पडला भूतळीं. ॥ १०५ ॥ लत्ता ताडी हृदयावरी । बहुत पीडिलें हा काळवरी । रामस्मरणें दीर्घ स्वरीं । महापक्षी पडियेला. ॥ १०६ ॥ सीता वाहूनियां

१. तांबडें वस्त्र नेसलेला. २. 'साधु पुरुषाची' पाठभेद. ३. उदकें. ४. 'फुटती' पाठभेद. ५. पृथ्वी. ६. देवांगना. ७. 'मृगशावाक्षी' असाही पाठ आहे. ८. 'पातला' पाठभेद. ९. गुहा. १०. 'धरावया' पाठभेद. ११. अडवून. १२. 'गगन' पाठभेद. १३. मस्तकगण. १४. 'मग रावण म्हणे वचना' असाही पाठ आहे. १५. मरण. १६. 'पीडा पावला पक्षिगिरी' पाठांतर. १७. 'दीर्घ शरीरीं' पाठभेद.

स्कंधीं । राक्षस संचरे [1]गगनपंथीं । मातंग पर्वताचे संधी । पांच वानर देखिले. ॥ १०७ ॥ त्यावरी सीतेनें टाकिले अलंकार । वरुते पाहाती वानर वीर । कोपें कोपला वायुकुमर । धाविन्नला धरावया. ॥ १०८ ॥ म्हणे, 'मारूनी दुराचारी। सोडवूं समर्थाची नारी । धरूनी नेतो बळात्कारीं । तो दंडीन स्वहस्तें.' ॥ १०९ ॥ उडोनी भेदोनी गेला अर्का, । रावण पळाला प्राणधाका । समुद्र लंघोनी हेमलंका । मनोवेगें [2]टाकिली. ॥ ११० ॥ राक्षस न सांपडेचि हातीं । हनूमान् पावला संगियांप्रती । म्हणे, 'मी करीन याची शांती, । लंके जाऊनी एकदा.' ॥ १११ ॥ रावणें मानूनी कृतकृत्यता । अशोकवनीं रक्षिली सीता । नाना उपायीं प्रबोधितां । तो सर्वथा न बोधे. ॥ ११२ ॥ शापिला असे [3]नलकूबरें । 'परस्त्री भोगितां बलात्कारें । भूमी तुटोनी पडती शिरें' । तें भय असे मानसीं. ॥ ११३ ॥ यालागीं न करी बलात्कार । चित्त नेदितसे सामउपचार । मुक्ति न लभे दंभाचार । तेंवी प्रयत्न असाध्य. ॥ ११४ ॥ येरीकडे राजा राम । मृग वधूनी काढी चर्म । सौमित्र भेटतां दिधलें क्षेमें । खेदभूत जाणोनी. ॥ ११५ ॥ लगबगां गांठिली पर्णकुटी । तंव लावण्यदीपिका न दिसे दृष्टी । शोकांधकार भरला सृष्टी । सीतेविण श्रीरामातें. ॥ ११६ ॥ अवलोकीत दाही दिशा । डोळां न दिसे ते मृगडोळसा । पृथ्वी [5]आप तेज आकाशा । प्रिया पुसे [6]पवनातें. ॥ ११७ ॥ वृक्षवल्लीतृणपाषाणा । अंगना पुसे गंगा[7]जीवना । सर्पां पक्षियां [8]करीना हरिणा । सिंहव्याघ्रां विचारी. ॥ ११८ ॥ जानकीवियोगें जाला वेडा । 'सीते! सीते!' म्हणउनी कवळी झाडा । चंद्रासि म्हणे, 'रे! [9]मार्तंडा! । उष्ण [10]खंडतर सावरीं.' ॥ ११९ ॥ सैरावैरा धांवतां वनीं । कोठें न दिसे लावण्यखाणी, । जटायु पडला जिये धरणी । तया ठायीं पातले. ॥ १२० ॥ आलिंगूनी जटायूतें । रुदन कीजे श्रीरघुनाथें । म्हणे, 'सीताहरणाहूनी मातें । दुःख आगळें मित्राचें. ॥ १२१ ॥ 'दुष्टें नेली रावणें सीता । कपटें केलें माझिया घाता.' । रामचरणीं ठेवूनी माथा । प्राण त्यानें त्यागिला. ॥ १२२ ॥ रामआज्ञेनें पुष्पक विमान । घेऊनी आले विष्णुगण । जटायूतें [11]कृपेकरून । वैकुंठधामा धाडियेलें. ॥ १२३ ॥ पुढें चा-

१. 'नक्षत्रपदीं' पाठांतर. २. 'गांठिली' पाठभेद. ३. कुबेरपुत्र. (नलकूबराची स्त्री रंभा इजवर रावणानें बलात्कार केल्यामुळें हा शाप त्यास प्राप्त झाला. रावण हा कुबेराचा सावत्र भाऊ असल्यामुळें नलकूबराची स्त्री रंभा ही रावणाची सून होती.) ४. आलिंगन. ५. उदकास. ६. वायूतें. ७. पाणी. ८. हस्तिश्रेष्ठ. ९. सूर्य. १०. 'सत्वर' पाठभेद. ११. 'आरूढ' पाठभेद.

लिला जगजेठी । तंव [1]कबंधें कवळिलें दोहीं बाहुटीं । बाहू छेदूनी पाहती दृष्टी । तंव तो विशाळ राक्षस. ॥ १२४ ॥ हृदयांवरी विक्राळ वदन । एक एक बाहू [2]शत योजन । सांपडे तें हो! कवळून । मुखीं घाली सत्वर. ॥ १२५॥ अवलोकितां [3]अवनिजा[4]नोंहो । राक्षस पावला दिव्य देहो । देवयानारूढ पहा हो! । स्वर्गलोका चालिला. ॥ १२६ ॥ जातां विनवी श्रीरघुनाथा, । 'जावें ऋष्यमूक पर्वता । सुग्रीव भेटतां सर्व चिंता । परिहरेल निर्धारें.' ॥ १२७ ॥ पुढें [5]पंपे पातला रघुपती । तंव भेटला [6]हरि मारुती । राम आलिंगूनी प्रीती । म्हणे, 'हा अवतार हराचा.' ॥१२८॥ म्हणे, 'हा आमुचा प्राणदाता । संकटीं आमुतें रक्षिता.' । एक पिंड हेही कथा । तो सर्वज्ञ स्वयें जाणे. ॥ १२९ ॥ त्वरें जाऊनी हनूमंतें । नळ नीळ जांबवंत । तिघांसहित वानरनाथ । सुग्रीव भेटी आणिला. ॥ १३० ॥ नरवानरां पडली गांठी । स्नेहानंदें कोंदली सृष्टी । पिंड[7]प्राण [8]प्रेमें मिठी । तेंवी मित्रता बाणली. ॥ १३१ ॥ रामचरणीं ठेऊनी माथा । सुग्रीव सांगे दुःखावस्था, । 'तुज देखिल्या श्रीरघुनाथा ! । दुःखदारिद्र्य पैं नाशलें. ॥ १३२ ॥ वाळी माझा ज्येष्ठ बंधू । तेणें हरिली [9]रुमा [10]वधू । राज्य हरोनी दुःखखेदू । अरण्यवास भोगवी. ॥ १३३ ॥ माझी हरेल दुःखावस्था । तेचि क्षणीं आणीन सीता.' । ऐकोनी आवेश रघुनाथा । अत्यद्भुत नावरे. ॥ १३४ ॥ बाण लावूनी [11]कोदंडीं । म्हणे, 'युद्धास वाळी काढीं । प्राणशरीरांची जोडी । विखंडीन क्षणार्धें.' ॥१३५॥ सुग्रीव करी वीरगर्जना । वाळी पातला युद्धकदना । मेरुमंदराची तुलना । भिडतां भासे दोहींतें. ॥ १३६ ॥ सहस्र मारिले पर्वत । शिळा [12]पादप असंख्यात । दोघांचेंही बळ अद्भुत । एकमेकां नाटोपती. ॥ १३७ ॥ हें देखिलें रघुनंदनें । हृदय भेदिलें तीक्ष्ण बाणें । वज्रप्रहारें [13]सहस्रनयनें । महापर्वत ज्यापरी. ॥ १३८ ॥ रामबाणें देह त्यागून । शक्रशरीरीं प्रवेशे प्राण । [14]सागरोदकीं गंगा[15]जीवन । जेंवी मिळे समरसें. ॥ १३९ ॥ अंगद निरवूनियां देखा । वाळी गेला विष्णुलोका । तारा किष्किंधाकपिनायका । सुग्रीवातें अर्पिली. ॥ १४० ॥ उत्तरक्रियेनंतरें गुणी । सुग्रीव स्थापिला राजासनीं । तंव मेघमाळा मांडल्या ग-

---

१. राक्षसविशेष. २. 'एक' अन्य पाठ. ३. भूकन्या (सीता). ४. पति. ५. सरोवरविशेष. ६. वानर. ७. शरीर. ८. 'जेंवी' पाठांतर. ९. सुग्रीवाची स्त्री. १०. स्त्री. ११. धनुष्य. १२. झाड. १३. इंद्र. (वाळी हा इंद्राचा अवतार होता म्हणून.) १४. 'सागरीं' पाठभेद. १५. पाणी.

गनीं । वर्षाकाल पातला. ॥ १४१ ॥ चतुर्मासामाजी रघुनाथ । माल्यवंता पर्वताआंत । वसता झाला बंधूसहित । निकट हनूमंत दास्यत्वा. ॥ १४२ ॥ रामकार्य जाणोनी पोटीं । कार्तिकमासीं पातला भेटी । सुग्रीवआज्ञेनें कोट्यानुकोटी । ऋक्षवानर पातले. ॥ १४३ ॥ [1]मासमासाचा अवधी । वानर धाडिले सीताशुद्धी । स्वर्गपाताळ शोधूनी 'शुद्धी । नाहीं' म्हणोनी सांगती. ॥ १४४ ॥ मुद्रिका देऊनी रघुनाथ । दक्षिणे धाडी हनुमंत । अंगदनळनीळजांबवंत । हेही संगें दीधले. ॥ १४५ ॥ दोन मास क्रमितां वाटे । सीताशुद्धि न [3]कळे कोठें । तापसी बीळ शोधूनी कष्टें । समुद्रतीरा पातले. ॥ १४६ ॥ दुःखें प्राण त्यागितां सकळीं । [4]संपाती पक्षी पातला जवळी । तो म्हणे, 'लंके जनकबाळी । अशोकवनीं दिसताहे. ॥ १४७ ॥ समुद्र योजनें एक शतें । उडोनी जाईल गगनपंथें । सीतादर्शन होईल त्यातें । लंकेमाजी निर्धारें.' ॥ १४८ ॥ धैर्य न धरवे [5]प्लवंगमां । म्हणती, 'नुलंघवे समुद्रसीमा । मनपवनगरुडोत्तमा- । वांचूनी चौथा न देखों.' ॥ १४९ ॥ ऐकोनी आवेश अंजनीसुता । [6]वळघला महेंद्रपर्वतमाथां । उत्तर दिशे उगवे सविता । तेंवी भासे सुरांतें. ॥ १५० ॥ उड्डाण करितां महाबळी । पर्वत उडाले अंतराळीं । चक्रप्राय हो ! महीतळीं । वायु भोंवे गरगरां. ॥ १५१ ॥ [7]सिंहिका संहारिली प्रबळ । [8]सुखी केले वीर सकळ । मैनाचलाचेंही मौळें । पादांगुष्ठें लोटिलें. ॥ १५२ ॥ [10]क्रौंच मारिला पडलंके । शोधन करितां मुख्य लंके । अशोकवनीं हेमकलिके । रामांगने देखिलें. ॥ १५३ ॥ खूणे वोपिली राममुद्रा । वरद वदे श्रीरामभद्रा । चूडामणी रामचंद्रा । प्रत्ययातें दीधला. ॥ १५४ ॥ [11]किंकर [12]वनकर जंबुमाळी । [13]अखया कुमर त्राहाटिला [14]पौळी । इंद्रजित दडाला बिळीं । केली होळी लंकेची. ॥ १५५ ॥ समुद्र लंघोनी पातला पुढती । संगिये भेटले परम प्रीती । जयानंदें कोंदली त्रिजगती । घोषें करिती गर्जना. ॥ १५६ ॥ वारितां निघाले मधुवनीं । मत्त जाले [15]मंदिरापानीं । उड्डाणें कि[16]राणें घेती गगनीं । कार्य साधिलें म्हणोनी. ॥ १५७ ॥ श्रीरामा सांगे [17]तारा-

१. 'पांच मासांचा' पाठभेद. २. आंगठी. ३. 'लभे' पाठभेद. ४. जटायूचा भाऊ. ५. वानर. ६. चढला. ७. राक्षसी. (राहूची माता.) ८. 'सुरसा केली विकळ' असाही पाठ आहे. ९. मस्तक. १०. राक्षसविशेष. ११. सेवक. १२. बागेचें रक्षण करणारा. (आराम+रक्षक=वनरक्षक.) १३. रावणपुत्र अक्ष. १४. भिंत. १५. मद्य. १६. उड्डाणें. ('उड्डाणें किराणें' हे दोन एकार्थक शब्द 'पोर वाळ' इत्यादिप्रमाणें योजले आहेत.) १७. तारापति (सुग्रीव).

धीश, । 'हा कार्यसिद्धीचा गर्जनाघोष.' । राघव म्हणे, 'निज मानस । मजही साक्ष देतसे.' ॥ १९८ ॥ समीप येऊनी प्लवंगमीं[1] । लोटांगणें घातलीं भूमी । टाळी लावूनी रामनामीं । जयजयकारें गर्जती. ॥ १९९ ॥ 'सीता देखिली लंके' । अवघे गर्जना करिती मुखें[2] । आवडी उठोनी रघुनायकें । आलिंगिलें समस्तां. ॥ १६० ॥ पुढें ठेवितां चूडामणी[3] । श्रीरामा आठविलीं तिन्ही । पिता माता महीनंदिनी[4] । जेंवी कां भेटों पातलीं. ॥ १६१ ॥ सुग्रीवा आज्ञापी रघुराजु, । 'दळें चालवा लंके उजु । समुद्रतीरा वानरफौजु । आजी पातली पाहिजे.' ॥ १६२ ॥ श्वेतलोहितपीतवर्ण[5] । हरितकपिलचित्रवर्ण[6][7][8] । एकैक रंगी वानरगण । सहस्रकोटी न गणवे. ॥ १६३ ॥ हनूमंतपृष्ठीवरी रघुनाथ । अंगदस्कंधीं सुमित्रासुत । अस्ता करितां दिननाथ[9] । समुद्रतीरा पातले. ॥ १६४ ॥ 'सीता देऊनी वांचवीं प्राण' । रावणा सांगे बिभीषण । बोलतां[10] क्षोभला दारुण । बंधु चरणें ताडिला. ॥ १६५ ॥ सांडूनी सुहृन्मित्रजना । शरण आला रघुनंदना । घेऊनी चत्वार[11] प्रधाना । उत्तरतीरा पातला. ॥ १६६ ॥ मस्तक ठेवितां रामचरणीं । 'चिरंजीव'[12] वंदे वदनीं. । 'रावण वधिल्या लंकाभुवनीं । तूंचि राजा अक्षयी.' ॥ १६७ ॥ सुग्रीवबिभीषणांचे युक्ती । मार्ग मागतां समुद्राप्रती । उदास देखोनी कृपामूर्ती । परम क्षोभें क्षोभला. ॥ १६८ ॥ वाहूनियां धनुष्यबाण । करितां सिंधूचें शोषण । समुद्रें येऊनियां शरण । तरणोपाय बोधिलें.[13] ॥ १६९ ॥ 'नळहस्तें ऋषीचिये शापीं । शिला तरतील समुद्रआपीं । सेतु बांधोनी सह कपी । लंके जावें राघवा!' ॥ १७० ॥ आज्ञा होतां वानरवीरीं । पर्वत टाकिले समुद्रनीरीं[14] । काष्ठें तरती तया कूसरी । सेतु बांधे नळनामा[15]. ॥ १७१ ॥ रुंद विशाळ दश योजनें । लांब तो शताच्या प्रमाणें । पंच रात्रींत रघुनंदनें । लंकापूर वेढिलें. ॥१७२॥ वार्ता सांगतां शुक[16] सारण । दुर्गीं चढला दशानन । रामें सोडूनी एक बाण ।

---

१. वानर. २. 'हरिखें' पाठांतर. ३. शिरोभूषण. (मूद किंवा राखडी.) ४. सीता. ५. लाल. ६. हिरवा. ७. काळा. ८. 'कृष्ण' पाठभेद. ९. सूर्य. १०. रावण (क्षोभला). ११. चार. १२. 'वंदे श्रीराम वदनीं' पाठभेद. १३. 'बोलिला' पाठांतर. १४. उदक. १५. नलवानराविषयीं पुढील उतारे पुरे आहेत:–(१) 'नलः सेतुं करोत्वस्मिन् जले मे विश्वकर्मणः । सुतो धीमान् समर्थोऽस्मिन्कार्ये लब्धवरो हरिः ॥' [अध्यात्मरामायण–युद्धकांड–सर्ग ३ श्लो० ८४]. १६. शुक व सारण हे दोन रावणाचे प्रधान होते.

दाही छत्रें भेदिलीं. ॥ १७३ ॥ शिष्टाई करितां वाळीकुमरें[1] । रावणा बोधिलें मधुरोत्तरें । 'जानकी अथवा आपुलीं शिरें । राघवातें निवेदीं[2]. ॥ १७४ ॥ सीतावराचें वचनौषध । तुतें द्यावया पातलों वैद्य[3], । आग्रहमदाचा विषकंद । सेविनां मरण रोकडें. ॥ १७५ ॥ ऋषि मारूनी त्वां भक्षिले । सकळ देव बंदीं सूदले । पृथ्वीपाल वधूनी हरिलें । सकळ ऐश्वर्य तयांचें. ॥ १७६ ॥ कठिन हरिली[4] रामप्रमदा[5] । कपटें केलें जटायुवधा । इतुके क्रियेचें फळ एकदा । भोगवीन ये काळीं. ॥ १७७ ॥ सौभाग्यकुंकुममळवटें । शोभती स्त्रियांचीं ललाटें । वैधव्यगोमैयाचेनि[6] बरवंटे । लेपूं नको सर्वथा. ॥ १७८ ॥ तुज एकाच्या पातकें पाहीं । अराक्षसी होईल मही । संततीचें नाम तेंही । उत्तरकार्या उरेना.' ॥ १७९ ॥ ऐकोनी दूताच्या उत्तरा । रावण म्हणे, 'धरा, धरा. । जिव्हा छेदूनी वानरा । खंडविखंड करावें.' ॥ १८० ॥ निशाचरीं कवळिनां वेगीं । अंगद उडाला गगनमार्गीं । सुवर्णमंडप सहस्रशृंगी । मस्तकावरी नेतसे. ॥ १८१ ॥ बाहु झाडितां महाबळी । राक्षस पडले समुद्रजळीं, । मंडप टेवूनी सुवेळाचळीं । रामचरण वंदिले. ॥ १८२ ॥ शिष्टाई न मनी रावण । ऐकोनी कोपला रघुनंदन । भुभुःकारूनी वानरगण । लंकेलागीं लागले. ॥ १८३ ॥ लागवेगीं भिडतां दुर्गीं । कर्णाटकयंत्रें गंधक आगी । वर्षतां वाटे काळमेघीं । जेंवी सुटती जलधारा. ॥ १८४ ॥ उल्हाटशक्तीचे पाषाण । गदामुद्गल लहुडी बाण । शूळभिंदिपाळें रक्षोगण[11] । असंख्यात ताडिले. ॥ १८५ ॥ टाकूनी यंत्रमुखींचे मार । गगनींहूनी वानरवीर । वृक्षपाषाणगिरिशिखर । राक्षसमाथां टाकिती. ॥ १८६ ॥ तेणें चूर्ण होती यंत्रें । समस्त राक्षसांचीं भंगोनी गात्रें । विशाळ पसरूनियां वक्त्रें । प्रेतें पडलीं भूतटीं. ॥ १८७ ॥ रथ पदाति अश्व करटी[12] । गणित पहातां कोटिच्या कोटी । वीरवाद्यें गर्जतां सृष्टी । महाप्रळयो मांडला. ॥ १८८ ॥ निशाचर वानर थोर । संग्राम माजला घोरांतर । जैसे पूर्वीं सुरासुर । तारक[13]समयीं माजलें. ॥ १८९ ॥ अठरा पद्में तुल्य झुंजार । युद्धा मिसळले ऋक्ष वानर । अक्षोहिणी शत[14] सहस्र । राक्षससेना दाटली. ॥ १९० ॥ राक्षसवानरांचीं कोटी । प्रेतें पडलीं पृथ्वीतटीं ।

---

१. अंगदानें. २. अर्पण करीं. ३. यांत सुंदर रूपक आहे. ४. घातले. ५. स्त्री. ६. शेण. ७. राक्षसांना. ८. नानी. ९. तोफ. १०. गरनाळ. ११. राक्षसांचे समूह. १२. हत्ती. १३. राक्षसविशेष. याचा कार्तिकेयानें वध केला. १४. 'शत' अन्यपाठ.

रक्तसिंधू[1]चिये लोटीं । क्षीर[2]सिंधु उहुळला[3]. ॥ १९१ ॥ धूम्राक्ष आणि अकं-
पन । हनूमंतहस्तें पावले मरण । वज्रदंष्ट्र महा दारुण । वालिपुत्रें वधियेला.
॥ १९२ ॥ प्रहस्त प्रधान मारिला नळें । हर्षें नाचती गोळांगुळें[4], । कोपोनी
राक्षसपाळें । कुंभकर्ण उठविला. ॥ १९३ ॥ रणा येतां काळकोपी । चवदा
सहस्र गिळिले कपी । सुग्रीव धरूनी सांक्षेपीं[5] । कक्षापुटीं[6] दाटला. ॥ १९४ ॥
कक्षेहूनी जो निसटला । कर्ण घ्राण घेऊनी गेला । राक्षसें क्षोभोनी मांडिला ।
महाप्रळय संग्रामीं. ॥ १९५ ॥ रामें सोडोनी दोन बाण । बाहू उडविले छे-
दून । पाठी विखंडिले दोन्ही चरण । काळनाराचें[7] कर्कशें. ॥ १९६ ॥ सवेंची
विंधोनी बाण एक । गगना उडविला मस्तक । तें देखोनी सूर्यशशांक[8] । नभ
सांडूनी पळाले. ॥ १९७ ॥ कुंभकर्ण पडला[9] समरीं । प्रळयो मांडला लंकापुरीं ।
पुढती संग्राम निशाचरीं । झोटधरणी[10] मांडिली. ॥ १९८ ॥ कुंभनिकुंभ संग्रा-
मदक्ष । देवांतक नरांतक मकराक्ष । बलिष्ठ महोदर विरूपाक्ष । सूड घ्यावया
पातले. ॥ १९९ ॥ जैसा योगनिष्ठ पुरुष । अरिषड्वर्ग[11] करी नाश । तेंवी सात[12]-
ही राक्षस । पवनात्मजें मारिले. ॥ २०० ॥ सहस्र वारूंनीं[13] जुंपिला रथ । वरी
अतिकाय[14] रावणसुत । सौमित्राप्रति रणपंडित । संग्राम करूं पातला. ॥ २०१ ॥
अस्त्रें सोडिलीं दारुणें । तितुकीं खंडिलीं बळसंपन्नें । जेंवी जैनांचीं[15] वादवचनें ।
वेदांती अवगणी. ॥ २०२ ॥ मग सोडूनियां वरद बाणा । शिर उडविलें गगना ।
ओवाळूनी सहस्रकिरणा[16] । प्रसाद वोपी भूतांतें. ॥ २०३ ॥ इंद्र जिंकोनी इं-
द्रजित । रावणाचा ज्येष्ठ सुत । ज्याचे दृष्टी काळ कृतांत[17] । तृणप्राय संग्रामीं.
॥ २०४ ॥ तेणें करूनि बाणवृष्टी । वानर पाडिले सात कोटी । द्रोणाचळाचे
वात पृष्टीं । उठावले[18] पिंगाक्षें. ॥ २०५ ॥ श्रीरामसौमित्र गुणैकराशी । विं-
धोनी बांधिले नागपाशीं । नारदें गरुडमंत्रउपदेशीं । मुक्त केले समर्थें. ॥ २०६ ॥
निकुंबळेसी करितां होम । पावकें देतां रथ उत्तम । विघ्न करी प्लवंगम । तिहीं
याग भंगिला. ॥ २०७ ॥ संग्राम माजला अत्यद्भुत । क्षणैक प्रकट क्षणैक गुप्त ।

---

१. सागर. २. 'क्षार' पाठांतर. ३. उहुळणें=घुसळणें. ४. वानर. ५. वक्षानें, उत्कंठेनें. ६. 'तळीं' पाठांतर. ७. बाण. ८. चंद्र. ९. अध्याय २८७ श्लोक १०–२० पहा. १०. शेंडी. (झोट-धरणी म्ह० एकमेकांच्या शेंड्या धरून लढणें. यास संस्कृतांत 'केशाकेशि' 'युद्ध म्हणतात.) ११. कामक्रोधप्रभृति सहा शत्रु. १२. कुंभनिकुंभादि. १९९ वे ओवींत सांगितलेले. १३. घोडा. १४. विशाळशरीर. १५. नास्तिक. १६. सूर्य. १७. यम. १८. 'वांचविले हनुमंतें' असाही पाठ आहे.

महीं निराळे नभा आंत । दिसे न दिसे मायावी. ॥२०८॥ सर्व शस्त्रें सर्व अस्त्रें । सौमित्रा ताडितां अमित्रें[१] । सौमित्रें वरदमंत्रें । त्या पवित्रें वारिलीं. ॥ २०९ ॥ मग अनुवादे प्रमाणनेमा, । 'श्रीराम विष्णु जानकी रमा । मी ब्रह्मचारी तरी अधमा । मृत्यु हो कां या बाणें.' ॥ २१० ॥ शरसंधानें शिर निवटी । तें धडा लागुनी मागुतें उठी । धनुष्य बाण धरूनी मुष्टी । युद्ध करी सैत्राणें[२]. ॥ २११ ॥ शिरकमळ छेदूनी बाणीं । वायुचक्रीं सूदलें गगनीं । तळीं रुंडें[३] पाडलें धरणी । खंडविखंड करूनियां. ॥ २१२ ॥ रोमैसंख्य[४] भेदले बाण । तेणें सौमित्राचा विकळ प्राण । रामें देऊनी आलिंगन । अजरामर तो केला. ॥ २१३ ॥ रावणें विचारूनी चित्तीं । सौमित्रावरी टाकिली शक्ती । हृदय-भेद जालिया क्षिती । प्रेतप्राय पडियेला. ॥ २१४ ॥ वांचवावया त्याचा प्राण । औषधी सांगे वैद्य सुषेण, । 'द्रोणाचल लंकेहून । चार कोटी योजनें.॥२१५॥ रात्रींत आणाल पर्वत । तरी वांचवीन सुमित्रासुत.' । ऐकोनी प्रतापी हनुमंत । मनोवेगें धाविन्नला. ॥ २१६ ॥ कालनेमी निशाचर । चौदा सहस्र विद्याधर । मारूनी रात्रींतून गिरिवर । लंकाद्वीपीं आणिला. ॥ २१७ ॥ घायीं पिळूनी औषधीरस । वांचविला तो प्रत्यक्ष प्रतापी शेष । मागुता नुगवतांच दिवस । गिरी ठेवूनी पातला. ॥ २१८ ॥ रावण पेटला घोर संग्रामा । म्हणे, 'मी मारीन रामा.' । दहा कोटी प्लवंगमां । समरांगणीं पाडिलें. ॥ २१९ ॥ हें देखोनी रघुनंदनें । मारिलें त्याचें ध्यावया उसनें । पैरदळ[५] मारिलें तें गणने । करितां कोणा न करवे. ॥ २२० ॥ दहा सहस्र मत्त हस्ती । लक्ष एक अ-श्वजाती । पन्नास सहस्र वीर रथी । पदाति एक अर्बुद[६]. ॥ २२१ ॥ इतुकी सेना पडतां रणीं । कबंध एक नाचे धरणीं । कोटि कबंध नाचतां ध्वनी । धनुष्यघंटाझणत्कारें. ॥ २२२ ॥ चतुर्दश घंटा एैक[७] हारी । घणघणाट दिवस भरी । वाजिन्नल्या ते संख्या चतुरीं । विचारिली पाहिजे. ॥ २२३ ॥ चंद्रबाण सोडूनी रामें । छेदिलीं दहाही शिरपद्में । तंव मागुती अतिउत्तमें । पूर्वीलिया ऐशीं निघालीं. ॥ २२४ ॥ पाशुपत प्रेरूनी प्रौढी । शिरें निघती तीं छेदूनी सांडी । लक्ष संख्या जालिया वाढी । खंडतां मार्ग दिसेना.

१. शत्रु. २. थोर, सवेग. ३. मस्तक. ४. साडेतीन कोटी. (मनुष्याचे आंगावर साडेतीन कोटी केंस आहेत.) ५. शत्रुसैन्य. ६. दहा कोटी. ७. 'झणत्कारी' पाठभेद.

॥ २२५ ॥ [1]मातली वर्म सांगे देवा, । 'हृदयीं असे अमृतकुपी ठेवा । ते ब्रह्मास्त्रें भेदिलिया श्रीराघवा ! । [2]शीसवल्ली खंडेल.' ॥ २२६ ॥ अगस्त्यऋषीचा वरद [3]बाण । धनुष्यीं जोडी रघुनंदन । तया मुखीं [4]हुताशन । आणि भास्कर स्थापिला. ॥ २२७ ॥ पुच्छीं ठेविला प्रलयानळ । अष्ट कांडीं लोकपाळ । तो सोडितां ब्रह्मगोल । भंगला वाटे सुरांतें. ॥ २२८ ॥ हृदयीं लागतां कडकडाटी । निस्तेज पडिला पृथ्वीतटीं । प्राण प्रवेशला वैकुंठीं । विष्णुस्मरणें करूनियां. ॥ २२९ ॥ जेंवी कां तापला लोहगोळ । [5]यंत्रमुखीं सुटतां प्रबळ । लागतां भेदूनी वक्षःस्थळ । छिद्र पाडी ज्यापरी. ॥ २३० ॥ तेंवी रावण भेदला उरीं । प्रेत पडलें धरणीवरी । तें देखोनी उभय करीं । शंख करिती राक्षस. ॥ २३१ ॥ वज्रें ताडितां [6]वज्रधरें । खचती पर्वतांचीं शिखरें । तेंवी दशशिराचीं शिरें । रणमंडळीं लोळती. ॥ २३२ ॥ शोणिताचा [7]शोणभद्र । मिळतां लोपला जलसमुद्र । सकळ सुरांसहित इंद्र । हर्षें टाळी पिटीत. ॥ २३३ ॥ जयजयकार करूनी सुर । भूतळीं सोडिती पुष्पभार । विजयी जाला रामचंद्र । [8]धेंडे पिटिले तिहीं लोकीं. ॥ २३४ ॥ शंकर ब्रह्मा इंद्र वरुण । चंद्र सूर्य [9]शमन पवन । स्पर्शोनी श्रीरामचरण । म्हणती, 'निर्दोष जानकी.' ॥ २३५ ॥ जीं जीं जयांचीं ऐश्वर्यपदें । तीं देऊनियां पूजिलीं देववृंदें. । 'निर्दोष जानकी' [10]जातवेदें । प्रमाण करूनी बोलिजे. ॥ २३६ ॥ मूर्तिमंत चारी वेद । मुखें बोलती प्रमाणशब्द । 'जगन्माता जानकी शुद्ध' । साक्ष आम्ही त्रिवाचा. ॥ २३७ ॥ अग्निस्नान करूनी पुढती । शुचिर्भूत पवित्र सती । नमस्कारितां प्राणपती । कृपामूर्ति कळवळली. ॥ २३८ ॥ [11]क्षेम [12]देतां परम प्रीती । सकळ दुःखशोकशांती । लक्ष्मी पातल्या गृहाप्रती । दारिद्र्य कोठें दिसेना. ॥ २३९ ॥ दिनकर आलिया मंदिरा । ठाव न दिसे अंधकारा । टाकिल्या अमृतसागरा । मरणभय केउतें? ॥ २४० ॥ जालिया अनुभवज्ञान । कैचें [12]भवभयाचें भान । तेंवी भेटतां रघुनंदन । सर्व दुःख विसरली. ॥ २४१ ॥ होतां शिवशक्तीशीं मेळ । [13]हरिखें कोंदला ब्रह्मगोळ । जाला सुखाचा [14]सुकाळ । तिहीं लोकीं न साठे. ॥ २४२ ॥ पाडूनी अमृताचा

१. इंद्रसारथी. (इंद्रानें आपला रथ व सारथी लढते समयीं रामास दिला होता.) २. मस्तकपंक्ती. ३. अध्याय २९० श्लो० २६-२७ पहा. ४. अग्नि. ५. तोफ. ६. इंद्रानें. ७. नदी. ८. दंवडी. ९. यम. १०. अग्नि. ११. आलिंगन. १२. संसारभीतीचें. १३. हर्ष. १४. विपुलता.

धन । जे जे रणीं पावले मरण । ते ते उठविले वसंतानें[1] । जेंवी कां वृक्ष फुटती. ॥ २४३ ॥ स्वहस्तें कोदंडपाणी[2] । बिभीषण बैसवीला राजासनीं । अक्षय्य वदे वरद वाणी । जे कल्पांतीं न मोडे. ॥ २४४ ॥ 'जंववरी चंद्रसूर्य गगनीं, । गंगा[3] आणि गौतमी[4] धरणी, । माझी कथा रामायणी । तिहीं भुवनीं वाखाणे; ॥ २४५ ॥ तंववरी लंकेचा भूपाळ । तूं अक्षयी अनंतकाळ, । लया गेलिया ब्रह्मगोल । तूं अक्षयी मम आज्ञा.' ॥ २४६ ॥ आवडी अवनिजा[5] तन्वंगी । प्रीती बैसविली अर्धांगीं । सुग्रीव बिभीषण घेऊनी संगीं । अयोध्यापुरा चालिले. ॥ २४७ ॥ दिव्य विमानीं दोन्ही कटकें । दुंदुभी लाविल्या कौतुकें । जानकीलागीं स्वहस्तकें । आला मार्ग दाखवी. ॥ २४८ ॥ सेतुबंध धनुष्यकोटी । किष्किंधा ऋष्यमूक पंचवटी । भरत शत्रुघ्न पातले भेटी । चित्रकूटाचिया ठाया. ॥ २४९ ॥ गंगायमुना मध्य बेटीं । पवित्र प्रयाग पाहे दृष्टी । भारद्वाजा भेटोनी, भेटी । गुह्यकाचे पातला. ॥ २५० ॥ गुह्यक झाला आनंदभरित । पुढें पाठविला हनूमंत । नंदिग्रामीं बंधु भरत । ऐकतां सन्मुख धाविन्नला. ॥ २५१ ॥ सृष्टी रचितां चतुरानन । बंधु एक भरत जाण । दुजे कुंतीचे नंदन । पांचही जण हे तुम्ही. ॥ २५२ ॥ तिसरी बोलावया गोष्टी । बंधुत्व न दिसे ब्रह्मसृष्टी । धर्म म्हणे, 'कृपा दृष्टी । सेवा फळें साधूचीं.' ॥ २५३ ॥ असो. भरतभेटीचा जाणा । परम आल्हाद रघुनंदना, । जिवाशिवाची ही तुलना । उणी वाटे ते ठायीं. ॥ २५४ ॥ अयोध्यापुरा धांवले दूत । वसिष्ठ माता प्रधान भृत्य[6] । प्रजा पातल्या समस्त । रामभेटी आवडी. ॥ २५५ ॥ देव ऋषींचिया कोटी । पृथ्वीपाळ[7] पातले भेटी, । राम राजा अयोध्यापट्टीं । अभिषेकिला[8] समस्तीं. ॥ २५६ ॥ सिद्ध आशीर्वाद देती, । भाट[9] ब्रिदावली पढती, । युगानुयुगीं रामकीर्ती । विस्तारली प्रतापें[10]. ॥ २५७ ॥ अर्पूनियां वस्त्राभरण । लंके धाडिला बिभीषण । वानरांशीं रविनंदन[11] । बोळविला किष्किंधे. ॥ २५८ ॥ हनूमंता कवळोनी हृदयीं । म्हणे, 'मृत्यु बांधिला तुझ्या पायीं, । कोटि कल्प अचल देहीं । कौतुक पाहीं सृष्टीचें. ॥ २५९ ॥ मी असें तंव असें जवळा । मजहूनी होसी तूं आगळा । तुझी मूर्ति हृदयकमळा- । माजी अचल धरिली असे.' ॥ २६० ॥ हनुमंत म्हणे,

---

१. 'नयन । सुखामृतें पूर्ण झाले' असाही पाठ आहे. २. धनुष्य. ३. 'गंगा गौतमी आणि धरणी' पाठांतर. ४. गोदावरी (नदी). ५. सीता. ६. सेवक. ७. राजे. ८. अध्याय २९१ श्लो० ६६ पहा. ९. स्तुतिपाठक. १०. 'लोकत्रयीं' पाठांतर. ११. सुग्रीव.

‘न कळे मातें । तुझें तूंचि जाणसी निरुतें । माझें मीपण करूनियां परतें । चित्त वसो तव पायीं.’ ॥ २६१ ॥ अकरा सहस्त्र वर्षें वरी । राज्य केलें अयोध्यापुरीं । विमानीं वाहूनी नगरी । शेखीं नेली वैकुंठा. ॥ २६२ ॥ तैसाचि तूंही धर्मराजा ! । भरतखंडीं राम दुजा, । जानकी ते द्रुपदात्मजा । पतिव्रता स्वधर्में. ॥ २६३ ॥ सरले अवदशेचे दिवस । दुष्ट वैरी पावती नाश, । चक्रवर्तीहूनी विशेष । न्यायें पृथ्वी पाळिशी. ॥ २६४ ॥ सैंधवें द्रौपदीतें हरिलें । हें दुर्व्यसन काय केतुलें? । शतकोटिसंख्य चरित्र कथिलें । या परिहाराचिया लागीं.’ ॥ २६५ ॥ धर्मराज हालवी माथा. । ‘कायसी पांचाळीची कथा? । रामसीतेची अवस्था । ऐकतां दुःख लोपलें.’ ॥ २६६ ॥ धर्मराज पुढती करी प्रश्न । ते परिसोत गुरु सज्जन, । ऋषि वदे निरूपण । मुक्तेश्वर कवि वदे. ॥ २६७ ॥

---

## अध्याय सोळावा.

धर्म म्हणे, ‘सर्वज्ञानमूर्ती । पतिव्रता आल्या बहुती, । त्यांमाजी द्रौपदीचिये पंक्ती । तुके ऐशी सांग पां.’ ॥ १ ॥ रूपवंत गुणवंत कुळवंत । भ्रतार सेवी सदा निरत । ते भार्यारूपें मूर्तिमंत । महासिद्धी जाण पां. ॥ २ ॥ चिरंजीवी पावोनी प्रेमा, । म्हणे चिरजीवी, ‘राया ! धर्मा ! । पतिव्रतेचा अगाध महिमा । निरूपीन अवधारीं. ॥ ३ ॥ मद्रदेशीं नरेंद्रोत्तम । अश्वपति हें पवित्र नाम । जयाचे गृहीं नित्य धर्म । वस्तीस असे जाण पां. ॥ ४ ॥ जितेंद्रिय सदाचारी । सत्यवादी परोपकारी । भूतदया जया अंतरीं । मूर्तिमंत वसतसे. ॥ ५ ॥ तया नाहीं पुत्रसंतान । चिंताज्वरें व्यापिलें मन, । सावित्रीचें आरा-

१. स्पष्ट. २. शेवटीं. ३. ‘वंशीं’ पाठभेद. ४. संकट. ५. वांचलें. ६. या अध्यायांत मूळांतील ‘पतिव्रतामाहात्म्यपर्वा’चा (अध्याय २९३-२९९) सारांश आहे. ७. ‘सर्वेशमूर्ति’ असाही पाठ आहे. ८. ‘पंक्तिल्या’ असाही पाठ आहे. ९. तोले, समता पावे. १०. चिरकाळ जगणारा. (मार्कंडेय.) मार्कंडेयाचे आयुष्याची मर्यादा चवदा कल्प होती. एक महायुग (चौकडी=कृत+त्रेता+द्वापार+कलि)=४३,२०,००० वर्षें. एक हजार महायुगें=कल्प=४,३२,००,००,००० वर्षें; व चवदा कल्प=४,३२,००,००,०००×१४=६,०,४८,००,००,००० (सहा खर्व व अठ्ठेचाळीस कोटि) वर्षें. ११. ‘नीति’ पाठभेद. १२. ‘दिसतसे’ असाही पाठ आहे. १३. सावित्री या नांवानें प्रख्यात देवी. “मद्रदेशाच्या अश्वपती राजाची कन्या सावित्री (सावित्री देवीचा अवतार) हिनें शाल्वदेशच्या द्युमत्सेन राजाचा मुलगा

धन । तेणें[1] भक्ती मांडिलें. ॥ ६ ॥ दहा लक्ष जप स्मरणी । लक्ष[2] आहुती हव्यवाहनीं[3] । स्वल्प आहार अष्टम[4] दिनीं । धेनुदुग्धफळमात्र[5]. ॥ ७ ॥ अष्टादश वर्षें वरी । तपश्चर्या करितां थोरी । प्रत्यक्ष सावित्री[6] सुंदरी । प्रसन्न जाली नृपातें. ॥ ८ ॥ कृपेनें आश्वासूनी राजा । म्हणे, हें तप[7] कवण्या काजा? । कवण कामनें[8] भाव तुझा । वेधला असे सांग पां?' ॥९॥ राजा म्हणे, 'वेदमाते! । संततिहीन मी कृपासरिते! । एक पुत्रफल[9] देईं मातें । वंशवृद्धीकारणें.' ॥ १० ॥ बोले सावित्री सुशब्दीं, । 'नेम नेमूनी गेला विधी, । पुत्रसंतान तव प्रारब्धीं । ये काळीं दिसेना. ॥ ११ ॥ लक्ष्मीसमान गुणवेल्हाळी । कन्या लाधशील येणें काळीं । जीचें आख्यान भूमंडळीं । वाखाणितील ऋषिमुखें.' ॥ १२ ॥ ऐसें बोलोनी रायाप्रती । अदृश्य झाली सावित्री भगवती, । संतोष असंतोष चित्तीं । जाँहला[10] तेव्हां रायातें. ॥ १३ ॥ स्वल्प काळें हो! सगर्भा । होती जाली राजवल्लभा[11] । कन्या जन्मली प्रत्यक्ष[12] आभा[13] । भास्कराची सुतेज. ॥१४॥ जातकर्म नामकर्म[14] । करिता झाला नृपसत्तम; । कन्या नोहे, ऐश्वर्यद्रुम[15] । दिवसें दिवस वाढला. ॥ १५ ॥ सावित्रीनें दिधलें ललाम[16] । म्हणोनियां तो जनकोत्तम । 'सावित्री' हें ठेवूनि नाम । स्नेहानंदें पाळित. ॥ १६ ॥ वयें[17] समर्थ देखूनी कुमरी । पिता वरविचार करी, । [18]तीसमान सर्वांपरी । ऐसा गुणी दिसेना. ॥ १७ ॥ पिता म्हणे, 'चातुर्यखाणी! । पृथ्वी शोधूनी सर्वगुणी[19] । पुरुषरत्न आपुल्या नयनीं । परीक्षूनी तुवां यांवें[20].' ॥ १८ ॥ आरूढोनी शिबिकायानीं । वृद्ध पुरोहित प्रधान गुणी । सवें घेऊनी ते सुजाणी । छपन्न देश

---

सत्यवान् यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं यम जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असतां सावित्रीनें त्याच्या मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें; आणि आपल्या बापास शंभर पुत्रांची प्राप्ति, सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, आपणाला शंभर पुत्रांची प्राप्ति, असे वर त्याजपासून संपादिले; शेवटीं सत्यवानाचा प्राणही परत आणिला; हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे." (नवनीत—पृष्ठ २४१ पहा.)

१. 'तपो' पाठांतर. २. 'लक्ष होमी आहुती' पाठांतर. ३. अग्नि. ४. 'षष्ठ' पाठांतर. ५. 'पर्णमात्र' असाही पाठ आहे. ६. ब्रह्मदेवाची स्त्री सावित्री. ७. 'तप मांडिलें कवण्या' पाठभेद. ८. 'काम' असाही पाठ आहे. ९. 'शतपुत्र' पाठांतर. १०. 'जाकळती' पाठभेद. ११. [illegible]. १२. 'जैशी' पाठांतर. १३. कांति. १४. संस्कारविशेष. १५. वृक्ष. १६. गृह=[illegible]=कुल. १७. 'प्रायें' पाठभेद. १८. 'इज' पाठभेद. १९. 'जनीं' पाठभेद. २०. 'ध्यावें' पाठभेद.

शोधिले. ॥ १९ ॥ द्युमत्सेन राजेश्वर । सत्यवान तयाचा कुमर । मनें भावूनी[1] तो भर्तार । येती जाली स्वदेशा. ॥ २० ॥ अश्वपति आपुल्या सदनीं । असतां, पातला नारद मुनी । बैसवूनी कनकासनीं । सर्वोपचारीं पूजिला. ॥ २१ ॥ दृष्टी देखोनी नृपात्मजा । ऋषि म्हणे, 'महाराजा! । आळस दिसे विवाहकाजा । तें[2] कां[3] सर्वज्ञा! सांग पां?' ॥ २२ ॥ राजा म्हणे, 'चतुरेश्वरी । स्वयें गेली वरविचारीं । आली [4]तो वृत्तांत सविस्तरीं । कळला नाहीं आमुतें.' ॥ २३ ॥ स्वयें विचारी विधिनंदन[5] । वर पाहिला कैसा[6] कोण?' । ते म्हणे, 'पवित्र सत्यवान । द्युमत्सेनआत्मज. ॥ २४ ॥ तो एक मानला माझिया चित्ता'. । तंव तेचिकाळीं दूतीं[7] वार्ता । आणिली, म्हणती, 'अनर्था- । माजी पडिला तो नृपवर. ॥ २५ ॥ प्रथम गेले तयाचे नयन । अंधत्वाचा दोष[8] गहन । स्पर्धी दायाद[9] मिळोन । राज्य हरिलें तयाचें. ॥ २६ ॥ अंध अक्षम पुत्र गुणी । भार्येसहित दवडिला वनीं । [10]कंदमूळफळाशनी । वृक्षच्छाये बसतसे.' ॥ २७ ॥ हे ऐकोनी [11]दुश्चित वार्ता । कन्येलागीं प्रबोधी पिता, । 'सत्यवान त्यजूनी भर्ता । वर आणखी विचारीं.' ॥ २८ ॥ येरी म्हणे, 'न घडे ऐसें । एकदां वरिला जो मानसें । तें मन आणिका स्पर्शे । तो व्यभिचार स्वधर्मी. ॥ २९ ॥ अभाग्यभाग्याचीं ओंभाळें[12] । येती जाती आपुल्या काळें, । निश्चयाचा ध्रुव अचळ । चळत्व सर्वथा न पविजे.' ॥ ३० ॥ नारद म्हणे, 'वो! गुणवंते । आणिक एक दोष[13] त्यातें, । तो मजहूनी आणिकातें । ज्ञात नाहीं जाण पां.' ॥ ३१ ॥ राजा म्हणे, 'ऋषिसत्तमा! । प्रकट करूनी सांगिजे आम्हां, । गूढ ठेवूनी ओंम्हां[14] भ्रमा- । माजी न घालीं स्वामिया!' ॥ ३२ ॥ नारद म्हणे, 'लग्नानंतरें । मृत्यु पावेल [15]संवत्सरें.' । हें ऐकूनियां उत्तर । कन्या काय बोलली.[16] ॥ ३३ ॥ येरी म्हणे, 'मी पतिव्रता, । [17]जिणें नाहीं नसतां भर्ता. । आजी अथवा वर्षशता । मरणदिवस सारिखा. ॥ ३४ ॥ कृपेनें अवलोकी श्रीहरी । तरी अविवेकचा विवेक करी, । [18]सुकृत असल्या आपुले पदरीं । सर्व अरिष्टें नाशती. ॥ ३५ ॥

१. भावून. २. 'तंव' पाठभेद. ३. 'कारण' पाठभेद. ४. 'या' पाठभेद. ५. नारद. ६. 'असे' पाठभेद. ७. 'ब्राह्मणीं' पाठभेद. ८. 'बळहीन देखोन' पाठभेद. ९. गोत्रज बंधु. १०. 'वल्कलवासी तृणास्तरणी' असाही पाठ आहे. ११. खिन्नचित्त. १२. ढगें. १३. 'दोष असे त्यातें' पाठभेद. १४. 'मन' पाठभेद. १५. एक वर्षानें. १६. 'नारद बोले सत्योत्तर । लोटल्या एक संवत्सर । मृत्यु पावेल वरिला वर । हा निर्धार जाण पां ॥' असाही ३३ वे ओवीचा पाठ आहे. १७. जगणें. १८. पुण्य.

मरण पावो तात्कालिक, । अथवा वाचो [1]कल्प एक, । सत्यवानाविण आणिक । वरणें नाहीं सर्वथा.' ॥ ३६ ॥ निश्चय देखोनी अंतरीं । नारद म्हणे, 'वो! धन्य कुमरी, । सत्यवानातेंचि वरीं । सकळ कल्याण मी कर्ता. ॥ ३७ ॥ [2]ओ-ळखोनी कन्येचें चित्त । घेऊनी सामग्री समस्त । वना पातला नृपनाथ । द्युमत्सेनाजवळिकें. ॥ ३८ ॥ जो दारिद्र्याभिभूत मध्यारण्यीं । शालवृक्षपर्णसदनीं । वल्कलवासी [3]तृणास्तरणीं । वसे दारापुत्रेंशीं. ॥ ३९ ॥ यासी जाणवी वृत्तांत । द्युमत्सेन विनंति करीत, । 'आमुची दशा हे समस्त । जाणसी कीं सुजाणा? ॥ ४० ॥ नगर देश राज्यसंपत्ती । वैरीं हिरोनी वनाप्रती । अंधदशापुत्रभार्येसहितीं । दरिद्रदानें दवडिलें. ॥ ४१ ॥ दृष्टी जाऊनी झालों अंध, । [4]लक्ष्मीविण जालों मंद, । शाकमूलफलजलकंद । सेवूनी काळ कंठितसें. ॥ ४२ ॥ आपणा समान [5]होयें महाराजा । त्या घरीं वोपीं सुगुणी आत्मजा, । मातें देखोनी भाव तुझा । विकृति न पवे कैसेनी?' ॥ ४३ ॥ अश्वपतीनें प्रार्थिलें, 'हें साचार । सत्यवानावांचून वर । कन्या न [6]करी हा निर्धार । निश्चयेंशीं जाण पां.' ॥ ४४ ॥ वोपूनी संपदा कोटि वरी । सत्यवानातें दिधली कुमरी, । कन्या ठेवूनी वन[7]गव्हरीं । राजा नगरा पातला. ॥ ४५ ॥ ती त्यागूनी वस्त्राभरणें । धरिती झाली वल्कलवसनें । ताडपत्रें श्वेतवर्णें । प्रीती कर्णीं सूदलीं. ॥ ४६ ॥ सासूश्वशुराची शुश्रूषा । ईश्वरातुल्य मानी [8]पुरुषा । कुटुंबामाजी [9]अनारिसा । विषम भाव न दाखवी. ॥ ४७ ॥ दासीदासांचें [10]प्रतिपालन, । अवघियां पाठीं करी शयन, । सकळां आधीं उठे आपण । [11]उषःकाळीं गृहसेवे. ॥ ४८ ॥ भ्रतार विष्णूचे अवयव । ते ही आप्त विषयी सर्व । ऐसा मानी अभेदभाव । संतोषवी पुरुषातें. ॥ ४९ ॥ ब्रह्मीं ठेवूनी ब्रह्मभावना । देवो देवीं रूप जाणा । ब्रह्मनिष्ठ करी भजना । ब्रह्मभावें ज्या परी. ॥ ५० ॥ [12]निशी सरे, तंव नरपार्थिवा । करी [13]पुरुषाची सेवा । दृष्टी नाणी दरिद्रभावा । सेवासुखें संतुष्ट. ॥ ५१ ॥ नारदें सांगितला दिवस । तो [14]लेखितें आली मासोमास, । चत्वार रात्रींचा अवकाश । उरला मृत्युकाळातें. ॥ ५२ ॥ तीन

---

१. चार अब्ज बत्तीस कोटी वर्षें. २. 'जाणोनी कन्येचा भावार्थ' असाही पाठ आहे. ३. 'कंदमूलफल सेवूनी' असाही पाठ आहे. ४. 'अवलक्ष्मीनें केलें' पाठभेद. ५. 'पाहूनी राजा' पाठभेद. ६. 'वरी' पाठभेद. ७. गव्हर=गुहा. ८. नवरा. ९. भिन्न, अन्य असा. १०. 'समाधान' पाठभेद. ११. प्रातःकाळीं, पहांटेस. १२. रात्रि. १३. 'पुरुषाची चरणसेवा' पाठांतर. १४. मोजीत.

दिवस उपोषण । नेघे फळ मूळ अथवा [1]जीवन, । सासरा म्हणे, 'हें निर्वाण । न करीं माते! सर्वथा.' ॥ ९३ ॥ कृपेनें आश्वासूनी राजा । म्हणे, 'हें तप कवण्या काजा? । कवण काम तुझा । तें सांगावें मजप्रती?' ॥ ९४ ॥ ते म्हणे, 'होतां अस्तमाना । फळें भक्षीन तुमची आज्ञा.' । हें ऐकोनी सत्यवाना । परम प्रीती प्रियेची. ॥ ९५ ॥ [2]फरश घेऊनी हातीं । फळें आणावयाचे आर्ती । निघता झाला वनाप्रती, । तंव भार्या [3]वारी आग्रहें. ॥ ९६ ॥ नायकोनी तिचिया वचना । फळांलागीं निघाला वना, । सवें चालली पवित्रांगना । पतिमरणा स्मरोनी. ॥ ९७ ॥ दोघें अटन करितां वनीं । अमृतफळें देखिलीं नगनीं, । भार्या संतोषली मनीं । शुभ सुचिन्हें म्हणोनी. ॥ ९८ ॥ पर्णद्रोण भरिला फळीं । तंव अस्ता पातला सहस्रमौळी । प्रिया प्रार्थी तये वेळीं । म्हणे, 'चला स्वामी! स्वाश्रमा.' ॥ ९९ ॥ काष्ठ मोडितां आंगनेटीं । तडाखा बैसला कष्टीं । मूर्च्छा दाटोनी पृथ्वीतटीं । दंडप्राय पहुडला. ॥ ६० ॥ भार्या मस्तक धरूनी अंकीं । हृदय थापुटी मृदु हस्तकीं, । निशा प्रमाण घटिका ऐकी । तंव प्रहर एक लोटला. ॥ ६१ ॥ तंव रविसमान [10]रविनंदन । वस्त्र वेष्टिलें आरक्तवर्ण । किरीटकुंडलें देदीप्यमान । पदक माळा मेखळा. ॥ ६२ ॥ वामहस्तकीं काळपाश । कवळी लिंगदेहाचा कोश । [11]अंगुष्ठमात्र प्राणपुरुष । [12]आकळोनी काढिला. ॥ ६३ ॥ घेऊनी चालिला दक्षिण पंथीं । अचेतन [13]काष्ठ टेंनिलें क्षिती । पाठोपाठीं चालली सती । [14]धर्मराजा लक्षित. ॥ ६४ ॥ घालूनियां लोटांगण । म्हणे, 'स्वामी! तूं सांग कवण?' । तो [15]म्हणे, 'हरी जगाचा प्राण । तो मी जाण यमधर्म. ॥ ६५ ॥ तूं महासती पतिव्रता । म्हणोनी न पाठविले दूतां, । आंगें येवोनी तव भर्ता । घेवोनियां जातसें. ॥ ६६ ॥ आयुष्याचा संग्रह सरला, । ऋणानुबंध सहज [16]तुटला, । भ्रतारपिंड[17] असे पडला । तो संस्कारीं वो! पवित्रे!' ॥ ६७ ॥ येरी विनवी करूनी नमन, । 'घेऊनी जाशी पतीचा प्राण, । तुम्हां दोघांतें सोडून । जाऊं कोठें सांग पां? ॥ ६८ ॥

---

१. उदक. २. कुऱ्हाड. ३. निवारी, निषेधी. ४. 'जाणोनी' पाठभेद. ५. 'अतिदर्प झाला मनीं' पाठभेद. ६. 'हेली' असाही पाठ आहे. ७. 'पावून' पाठभेद. ८. निजला. ९. 'लेखी' असाही पाठ आहे. १०. यम. ११. हृदयाकाशांत असणाऱ्या अल्पप्राण पुरुषाला (आत्म्याला). १२. 'आकर्षूनी' पाठभेद. १३. 'शव' पाठभेद. १४. 'पतिप्राणातें लक्षूनी' असाही पाठ आहे. १५. अध्याय २९७ श्लो० १२-१६ पहा. १६. 'पुरला' पाठभेद. १७. शरीर.

पुरुष[1]प्राण ठेविजे जेथें । मजही नेऊनी ठेवीं तेथें, । वैधव्यशब्द न शिवे मातें । ऐसें करीं कृपाळुवा ! ॥ ६९ ॥ पतीहूनी ईश्वर नाहीं दुजा । ऐसा निश्चय अं[2]-नेक माझा । तरी स्नेह असावा तुझा । प्रसन्न हो कां म[3]जप्रती. ॥ ७० ॥ धर्मराजा ! तूं पिता माझा । मोहें मानीं म[4]म आ[5]त्मजा, । जामात म्हणोनी पुरुष माझा । आप्त भा[6]वीं आपुला.' ॥ ७१ ॥ कौतुकें [7]धर्मराज म्हणे, । 'सत्यवान वांचवीं प्राणें । हें भिन्न करूनी स[8]त्य वचनें । वर एकचि मज माग.' ॥ ७२ ॥ येरी म्हणे, 'द्युमत्सेन । श्वशुर माझा चक्षुहीन । त्यातें देईं दिव्य नयन । कृपे करूनी स्वामिया ! ॥ ७३ ॥ दरिद्र दवडोनी दुरी । सर्व संपदा भरो घरीं । हें मज देऊनी प्रथम वरीं । सनाथ करीं स्वामिया !' ॥ ७४ ॥ 'दिधलें' म्हणोनी बोले श[9]मन, । 'आतां जाईजे वो ! परतोन, । चरणचाली दूरी गमन । वडलें तूतें सुकुमारे !' ॥ ७५ ॥ येरी म्हणे, 'तुझिया पायां । सोडूनी जातां पडेल काया, । भ्रतार नेशील तया ठाया । मातें नेईं स्नेहाळा ! ॥ ७६ ॥ पुत्रमोहें दीन अतिथी । पूजिला असेल एक भ[10]क्ती । तरी कृपा उपजो तुमच्या चित्तीं । अ[11]नुग्रहो करावया.' ॥ ७७ ॥ हांसोनी बोले विश्व[12]हर्ता, । 'वांचवीं ऐसें न बोलें भर्ता, । या वेगळें आवडे चित्ता । तो दुसरा वर मज माग.' ॥ ७८ ॥ 'वैरीं हरूनी राज्यासी । सासरा केला अरण्यवासी । तें स्वराज्य देऊनी त्यासी । सुखसंतोषीं ठेवावें.' ॥ ७९ ॥ 'दिधलें' म्हणे कृपामूर्ती, । 'आतां परत आलिया पंथीं, । परम संतुष्ट तुझिया भक्ती । मी जालोंसें सुशीले !' ॥ ८० ॥ पुढती विनवी धर्मराजासी, । 'स्वार्थ नाहीं गा ! मज विशेषीं, । भर्ता जया ठाया नेशी । मजही तेथें त्वां न्यावें. ॥ ८१ ॥ जिता मेलिया वियोग नोहे । ऐसें स[13]र्वथा त्वां करावें, । असत्य शि[14]वलें नसेल जीवें । तरी तुज कृपा उपजो. ॥ ८२ ॥ सर्वभूतीं वासुदेवो । ऐसा असेल निश्चित भावो । तरी हें माझें अरिष्ट वा[15]वो । तूंचि करिशी दयाळा ! ॥ ८३ ॥ सा[16]त पावलें सत्संगती ।

१. नवरा. २. 'असेच जरि माझा' पाठभेद. ३. 'कन्ये' पाठभेद. ४. मला. ५. कन्या. ६. समजें. ७. अध्याय २९७ श्लो० २० पहा. ८. 'एक' पाठभेद. ९. यम. १०. 'पंक्ती' पाठभेद. ११. कृपा. १२. यम. १३. 'समर्था' पाठभेद. १४. 'वदलें' पाठभेद. १५. व्यर्थ. १६. सात पदांनीं. [सात शब्द एकमेकांशीं बोलल्यानें अथवा सात पावलें बरोबर चालून गेल्यानें मित्रता होते म्हणून मित्रतेला साप्तपद, किंवा साप्तपदीन असें विशेषण लावतात. साप्तपद किंवा साप्तपदीन म्हणजे मित्रत्व असाही अर्थ आहे. अध्याय २९७ श्लोक २३; कुमारसंभव—सर्ग ५ श्लोक ३९ पहा.]

चालतां अनुग्रह कीजे संतीं । सप्त जन्मांचीं सुनिश्चिती । दुष्ट कर्में परिहरती. ॥ ८४ ॥ हांसोनी बोले दयामूर्ती, । 'सत्यवाना वांचवीं पुढती । हें भिन्न करूनी महासती! । तिसरा वर मज मागें.' ॥ ८५ ॥ 'माझा पिता अश्वपती । त्यासीं नाहीं पुत्रसंतती, । शत पुत्र देऊनी मनोआर्ती[1] । पुरवीं त्याची भगवंता!' ॥ ८६ ॥ 'दिधलें' म्हणोनी 'उदार हस्तें । आतां जाई संतुष्ट चित्तें, । तुझिया भिडे गोंविलें मातें । पतिव्रते! सुपवित्रे!' ॥ ८७ ॥ 'दुर्भिक्षकाळीं अन्नदान, । व्याधिग्रस्ताचें संरक्षण, । केलें असेल तरी तुझें मन । कृपाळु होऊ मजलागीं. ॥ ८८ ॥ गुरुभजन विष्णुस्मरण । हरिहर एकरूपी जाण । ईये[2] निश्चयें असेल मन । तरी स्नेहाळ मज होईं.' ॥ ८९ ॥ पुढती बोले वरदोत्तर, । 'वांचवीं म्हणे निज भर्तार । यावेगळा चतुर्थ वर । माग मातें मन इच्छा.' ॥ ९० ॥ विनयें विनवी वैवस्वता,[3] । 'प्रसन्न मुखें वर वोपितां । वंध्याशब्द माझिये माथां । न बैसे[4] ऐसें करावें. ॥ ९१ ॥ शत पुत्रीं फळीं सुफळ देखा । करीं माझी उदरलतिका, । कृपाळुवा! सुरनायका! । संतानसुख दाखवीं. ॥ ९२ ॥ पितयालागीं दिधला वर, । तैसेचि मातें शत कुमर । द्यावयालागीं मन उदार । केलें तुवां पाहिजे. ॥ ९३ ॥ पुत्रवती[5] सौभाग्यवती । जन्मसावित्री गुणवती । मंगळमाहेश्वरी म्हणती । उभय लोकीं तें करीं. ॥ ९४ ॥ अनुभवाविण ब्रह्मज्ञान । शरीर जैसें प्राणाविण । संन्यासी आणि ज्ञानहीन । कां निर्धन गृहस्थ. ॥९५॥ फळाविण पादप[6]लता[7] । जळ नसतां भ्यासुर[8] सरिता[9] । तैसी संततीवीण वनिता[10] । शोभाहीन सर्वार्थी. ॥ ९६ ॥ तरावया संसार अपांपति[11] । नौका एक सत्संगति । चौरी[12] पुरुषार्थ चौरी[13] मुक्ति । दासी होती सत्संगीं. ॥ ९७ ॥ तुझिये संगें क्रमिलें पंथा । तुजशीं केल्या अमृतवार्ता । अपूर्ण कामें मज समर्था[14] । धाडीशीं हें घडेना.' ॥ ९८ ॥ 'दिधलें' म्हणे श्राद्धदेवो,[15] । 'स्वस्थ करीं मानसभावो । टाकूनी जाई आपुला ठावो । विलंब जाला गुणालये[16] ! ॥ ९९ ॥ संतुष्ट जालों तुझिये गुणीं । बोलशी तैशी दिसे करणी, । अमृतप्राय तुझी वाणी । सत्योदकें प्रवाहे. ॥ १०० ॥ दुरी टाकूनी

---

१. मनःकामना. २. 'या निश्चयीं अचलमन' पाठभेद. ३. यम. ४. 'लगे' पाठभेद. ५. मोरोपंत–वनपर्व–अध्याय १३ गीति ५०-८८ पहा. [पृ० २०३-२०८.] ६. वृक्ष. ७. वेल. ८. भयंकर. ९. नदी. १०. स्त्री. ११. सागर. १२. धर्म, अर्थ, काम व मोक्ष. १३. समीपता, सलोकता, सरूपता व सायुज्यता. १४. 'सर्वथा' पाठभेद. १५. यम. १६. 'गुणज्ञे' पाठभेद.

आलीसि स्थळ। पवित्र गोष्टी क्रमिला काळ, । [१]भ्रतारपिंडा न शिवे [२]अनळ। तैसें चिन्ह दिसतसे.' ॥ १०१ ॥ येरी बोले करूनी नमन, । 'स्वमुखें दिधलें वरदान। पुत्रप्राप्ती उपाय कवण। हें तंव कळलें पाहिजे? ॥ १०२ ॥ 'वांचवीन तव भ्रतार'। ऐसें बोलतां वारंवार। तुवां स्वमुखें दिधला वर। तो अन्यथा होऊं नये. ॥ १०३ ॥ शत पुत्र वोपिले मजलागीं। ते मानस किंवा पुरुषसंगीं। वैधव्यदशेमाजी जगीं। [३]अश्लाघ्यतेतें नेदिजे.' ॥ १०४ ॥ संकटीं पडला धर्मराज। म्हणे, 'माझिये वचनीं गोंविलें मज, । आतां करूं इच्छिलें काज। एथें अनमान कायसें? ॥ १०५ ॥ दृष्टी देखतां पूर्ण चंद्र। सांडी मर्यादा समुद्र, । तेंवी दक्षिणदिशेचा [६]इंद्र। वरदानीं ओळगला. ॥ १०६ ॥ मग म्हणे, 'रुचे तो अंतरीं। वर पांचवा मागें कुमरी!। अटक आली सर्वांपरी। तरी देईन तुजलागीं.' ॥ १०७ ॥ कर जोडूनी विनवीं मुखीं, । 'मी न लिंपें वैधव्याचे पंकीं, । ऐसें करावें उभय लोकीं। कृपाळुवा! जगदीशा!' ॥ १०८ ॥ हस्त ठेवूनियां माथां, । [८]म्हणे, 'तूं माझी धर्मदुहिता. । वांचवीन आतां तव भर्ता। तुज कारणें चिरकाळ.' ॥ १०९ ॥ सावित्री म्हणे, 'त्रैलोक्यपती!। सत्यवानाचें आयुष्य किती?। प्रकट बोलावें मजप्रती। आपुले मुखें दयाळा!' ॥ ११० ॥ पाणि स्पर्शोनियां माथां। [९]म्हणे, 'तुष्टलों तुझिया वृत्ता। चिंता सांडूनियां चित्ता। स्वस्थ जाई स्वाश्रमा. ॥ १११ ॥ चार शतें वर्षें वरी। भ्रतारसंगीं पुत्रपौत्रीं। राज्य करीं आपुल्या नगरीं। विहिताचारें स्वधर्में. ॥ ११२ ॥ लया पावतील सकळ वैरी। आपल्या देशीं आपुल्या नगरीं। एक शत बलिष्ठकुमरीं। राज्य करीं पतिसंगें.' ॥ ११३ ॥ प्राणास आज्ञापी लवलाहीं, । 'जाऊनी संचरें आपुल्या देहीं, । सावित्रीशीं [१०]विश्रांतिनेंहीं। गृहस्थाश्रम संपादो.' ॥ ११४ ॥ वर वदोनी [११]दंडपाणी। अदृश्य जाला तत्क्षणीं, । पतिव्रता समाधानीं। पतिजवळिकें पातली. ॥ ११५ ॥ स्पर्शें स्पर्शतांची पाणी। श्वास टाकी [१२]मुखींहूनी। लवंडोनियां दक्षिण कर्णीं। पर्णास्तरणीं पहुडला. ॥ ११६ ॥ हातें चुरूनियां चरण। म्हणे, 'होइजे जी! सावधान. । आश्रमीं पिता चक्षुहीन। अतिउद्विग्न वियोगें.' ॥ ११७ ॥ तो

---

१. 'पुरुष' पाठभेद. २. अग्नि. ३. निंद्यता. ४. असें विधान संस्कृत काव्यांत आणि सुभाषितांत पुष्कळदां आढळतें. ५. 'मर्यादा जेंवि' पाठभेद. ६. स्वामी. ७. वळला, प्रवण झाला. ८. 'म्हणे तुष्टलों तुझिया व्रता' पाठभेद. ९. 'म्हणे तूं माझी धर्मदुहिता' पाठभेद. १०. 'देईं' पाठभेद. ११. यम. १२. 'मुखघ्राणीं' पाठभेद.

म्हणे, 'पावलों सुखनिद्रेतें । तुवां कां थापटिलें हातें?' । येरी म्हणे, 'प्रभाते । निवेदीन वृत्तांत.' ॥ ११८ ॥ उठोनी बैसला सत्यवान । प्रीती दिधलें आलिंगन, । म्हणे, 'करीं हो! फळभक्षण । कष्टलीस उपवासें.' ॥ ११९ ॥ येरी म्हणे, 'सासू सासरा दोघें । शिणती दोघांचिया वियोगें, । तेथें जाऊनी तयां संगें । फलाहार स्वीकारूं.' ॥ १२० ॥ वणवा लागला डोंगरीं । तें प्रदीप्त काष्ठ धरूनी करीं । वाट शोधीत पुढारीं । स्वाश्रमासी चालिलीं.॥१२१॥ देऊनियां स्कंधाधार । बाहीं¹ कवळिला प्राणेश्वर, । कंटक वारूनियां सुकुमार । म्हणे, 'स्थिर चालावें.' ॥ १२२ ॥ देखोनी सावित्रीचें रूप । सिंह व्याघ्र कुंजर सर्प । नमस्कारूनी म्हणती, 'पाप । तव दर्शनें परिहरे.' ॥ १२३ ॥ स्नुषापुत्र राहिलीं वनीं । आश्रमीं अक्षम वृद्ध² दोन्ही । सखेद चिंतातूर मनीं । शोक करिती आक्रोशें. ॥ १२४ ॥ त्यांचा ऐकोनी शोकशब्द । कृपेनें पावले ऋषीश्वरवृंद³ । म्हणती, 'आमुचा आशीर्वाद । कल्याण करूं तुम्हांतें.' ॥ १२५ ॥ सुवर्चा भारद्वाज धौम्य । आपस्तंब मुनिसत्तम । दाल्भ्य ऋषी पवित्र परम । आश्वासिती सुवाचे. ॥१२६॥ 'सत्यवान आणि सावित्री । आतांचि येत असती रात्री, । अरिष्टरहित पवित्र नेत्रीं । अवलोकाल निर्धारें.'॥१२७॥ तंव सौंचाल⁴ जाला मार्गावरी, । घोष ऐकिला नामगजरीं, । समीप येतां मातापितरीं । उभय बाहीं कवळिलीं. ॥ १२८ ॥ मस्तक सिंचोनी अश्रुपातीं । चौघें बैसलीं एका पंक्ती, । परमानंद न सांठवे चित्तीं । देखोनी दृष्टी दोघांतें. ॥ १२९ ॥ पुत्र पाहे पितृवदन । तंव त्या देखे दिव्य नयन, । म्हणे, 'अवदशा जाली शून्य । भाग्योदयो दिसताहे.' ॥ १३० ॥ वडिलां अर्पूनी अमृतफळां । शेष स्वीकारी वेल्हाळा⁵ । तंव समय प्रातःकाळा । होता जाला स्वभावें. ॥ १३१ ॥ उदया येतां देवँ⁶ तरणी⁷ । तंव वाद्यशब्द ऐकिला श्रवणीं, । घेऊनी सेना अक्षोहिणी । राजमंत्री पातले. ॥ १३२ ॥ प्रजा देशोदेशिक मुख्य । घेऊनी सुवर्णरत्नांचे लक्ष । राजदर्शना पातले दक्ष⁸ । राजबुद्धी रक्षिते.॥१३३॥ निवटूनियां⁹ वैऱ्यांचीं कुळें । प्रधानें राज्य साधिलें बळें । राजा न्यावया उतावळे । मेध्यारण्यीं¹⁰ पातले. ॥ १३४ ॥ मार्गीं बोलती सकळ जन, । 'जरी राजा चक्षुहीन । तरी राज्यीं तया स्थापून । राज्य करूं¹¹ तदाज्ञा. ॥ १३५ ॥

१. भुजांनीं. २. 'वृद्ध पडलीं दोन्ही' पाठभेद. ३. समूह. ४. चाऊलीचा शब्द. ५. लावण्यवती. ६. 'वासरमणी' असाही पाठ आहे. ७. सूर्य. ८. 'दीक्षित' असाही पाठ आहे. ९. मारून. १०. यज्ञारण्यीं. ११. 'रक्षूं' पाठभेद.

जैसा धृतराष्ट्र प्रज्ञाचक्षू[1] । कौरवकुळीं तो अध्यक्षू, । तैसा द्युमत्सेन मुमुक्षू[2] । राजासनीं स्थापणें. ॥ १३६ ॥ यौवराज्यीं सत्यवान । मुख्य पदीं द्युमत्सेन । राजा करूनी सकळ जन । तया छाये सुख भोगूं.' ॥ १३७ ॥ जवळी पातले नमस्कारा । तंव लोचन देखती राजेश्वरा । देखोनी करिती जयजयकारा । महा आनंदें गर्जती. ॥ १३८ ॥ गजस्कंधीं सत्यवान, । कनकरथीं द्युमत्सेन, । दिव्य वाजी[3] मत्त करीन[4] । रथ पदाती असंख्य. ॥ १३९ ॥ सावित्री वाहिली रत्नशिबिके । असंख्य दासदासींचीं शतकें, । छत्रें चामरें सुहस्तकें[5] । परिचारिका ढाळिती. ॥ १४० ॥ राज्यीं स्थापितां राजसुत । तो पुत्र प्रसवला एक शत । याग केले असंख्यात । वाजिमेध इत्यादि. ॥ १४१ ॥ कीर्तीनें मानवलोक भरला, । धर्में परलोक वश केला, । सावित्रीच्या पुण्यें तरला । सत्यवान या रिती. ॥ १४२ ॥ दर्शना अश्वपति आला । शत पुत्र तोही लाधला, । यापरी सावित्रीयें केला । उभय कुळीं उद्धार. ॥ १४३ ॥ जान्हवीसमान सुढाळा[6] । तारिती झाली दोन्ही कुळां[7], । तैशीच द्रुपदाची बाळा । हे द्रौपदी जाण पां. ॥ १४४ ॥ पराभवूनी शत्रुकुळें । राज्य पावशी शीघ्र काळें'. । ऐसें बोलोनी पाणिकमळें[8] । साही[9] मौळें[10] स्पर्शिली. ॥ १४५ ॥ कथा सांगोनी धर्मराजासी । आश्रमा गेला दीर्घायुषी[11]. । 'चरित्र गाती ऐकती तयांसी । दीर्घ आयुष्य होईल. ॥ १४६ ॥ सावित्रीचें महदाख्यान । श्रवण करिती पवित्र जन । धर्मराज त्यां लागून । सुप्रसन्न सर्वदा. ॥ १४७ ॥ कृपेनें पाठवी विष्णुसदना । इच्छिली पुरवी मनकामना' । ऐशा व्यासाचिया वचना । श्रोतीं प्रमाण करावें. ॥ १४८ ॥ मुक्तेश्वराचीं सुढाळ[12] वचनें । परमार्थचंपकाचीं[13] सुमनें । तेथें अभक्त[14] अधमांचीं मनें । योग्य न होती परिमळा. ॥ १४९ ॥ इति **श्रीमहाभारते वनपर्वणि** । पुढां कुंडलाभिहरणीं । कथा वर्तली ते सज्जनीं । श्रवण केली पाहिजे. ॥ १५० ॥

---

## अध्याय सत्रावा.

चक्रवर्तीशिरोमणि[15] । जन्मेजय चातुर्यखाणी । म्हणे, 'वक्त्या ! तुझी वाणी ।

---

१. अंध. २. मोक्षेच्छु. ३. घोडा. ४. हत्तीश्रेष्ठ. ५. 'स्वहस्तकें' पाठभेद. ६. स्वच्छा, पवित्रा, तेजस्विनी. ७. कुडंब; (पक्षीं) नदीचें तीर. ८. हस्तकमळानें. ९. पांच पांडव व द्रौपदी या सहाजणांचीं. १०. मस्तकें. ११. मार्कंडेय. १२. सुरेख, सुंदर. १३. 'परिमळ चंपकाचीं सुमनें' पाठभेद. १४. 'विषयीं चंचरीकांचीं मनें' असाही पाठ आहे. चंचरीक=भ्रमर. (भ्रमरास चांफा आवडत नाहीं.) १५. मूळभारतांतील 'कुंडलाहरणपर्वा'चा (अध्याय ३००-३१० यांचा) सारांश या अध्यायांत कवीनें संगृहीत केला आहे.

कामधेनू आमुतें. ॥ १ ॥ जी वर्षोनी परमामृतें । निववी श्रवणा आणि मनातें । तृषाहारी पुण्यदातें । गंगोदक ज्यापरी. ॥ २ ॥ ब्राह्मणवेष धरूनी दंभें । प्रयत्नें शचीच्या वल्लभें । कर्णाप्रति पुत्रलोभें । [1]कवचकुंडलें याचिलीं. ॥ ३ ॥ ते मज ऐकावयाची आर्ती । म्हणोनी विनवीं जोडिल्या हस्तीं । तुझी वाचा हे भगवती । प्रसन्न हो कां आमुतें.' ॥ ४ ॥ वक्ता वदे स्नेहमेळीं । ब्राह्मणवेष धरूनी हेळी । उतरला असे भूमंडळीं । हितोपदेशाकारणें. ॥ ५ ॥ वक्ता वदे प्रश्नोत्तरीं । द्वादश वर्षें [2]लोटल्यावरी । ब्राह्मणवेषें देव [3]अमरी । [4]कर्णाप्रति पातला. ॥ ६ ॥ सुखशयनीं राजा कर्ण । त्यातें करूनी सावधान । म्हणे, 'पुत्रा! स्वहितवचन । हृदयीं तुवां धरावें. ॥ ७ ॥ पार्थ रक्षावया [5]सांक्षेपें । पुत्रलोभें [6]निर्जराधिपें । दीन याचकाचेनि रूपें । कवचकुंडलें मागिजेती. ॥ ८ ॥ तीं तुवां न द्यावीं सर्वथा । पाठवीं देऊनी [7]आणिका [8]अर्था । हेंचि वारंवार ताता! । प्रार्थूनियां बोलतसें.' ॥९॥ [9]राधेय म्हणे, 'स्वामी! तूं कवण?' । तो म्हणे, 'मी [10]सहस्रकिरण । कुंतीगर्भीं तुझें जनन । जालें जाण मद्रेतें. ॥ १० ॥ आंगीं संलग्न सुवर्ण [11]वर्म । वज्र तें लागे तृणासम । कुंडलें असतां [12]नेणिजे श्रम । क्षुधा आणि तृषेचा. ॥ ११ ॥ निश्चयें मारिशी अर्जुनातें । ऐशी शंका देवेंद्रातें । कवच मागूनी पार्थहस्तें । मरण इच्छी तुजलागीं. ॥ १२ ॥ यत्नें रक्षूनी आपुला प्राण । कार्यें वर्तती [13]विचक्षण, । आत्मनाशें सर्व शून्य । भाग्यभोग या लोकीं.' ॥ १३ ॥

---

१. "इंद्र हा आपल्या पुत्राच्या (अर्जुनाच्या) कल्याणार्थ कर्णापाशीं त्याच्या अंगचीं कुंडलें व कवच यांची याचना करण्याकरितां येणार आहे, हें वर्तमान सूर्यानें त्यास स्वप्नांत येऊन सांगितलें. त्याप्रमाणें इंद्र कपटरूपानें आला असतां व वरील दुर्घट याचना त्यानें केली असतांही वदान्यश्रेष्ठ कर्ण हा आपल्या सत्वास तिळप्रायही ढळला नाहीं. त्यानें आत्मरक्षणार्थ इंद्राची शक्ति मात्र त्याजपासून मागून घेतली, आणि ती घेतल्यानंतर आपल्या हातानें आपली सहज कुंडलें व कवच हीं त्यास आपल्या शरीरापासून त्यानें कापून दिलीं, येणेंप्रमाणें या [अध्यायांतील] कथानक आहे.' (निबंधमाला—अंक ७० पृष्ठ १३ पहा.) २. तेरावे वर्षीं इंद्र कर्णाकडे कुंडलें मागण्यास आला. [अ० ३०० श्लो० ५.] ३. इंद्र. ४. कर्णानें आपल्या आंगचीं कुंडलें कर्णापासून कापून इंद्राला दिलीं म्हणून त्याला **'कर्ण'** असें नांव पडलें. (अध्याय ३१० श्लोक ३८ पहा.) यापूर्वीं त्यास **वसुषेण** किंवा **वृष** असें नांव होतें. (अध्याय ३०९ श्लो० १३-१४ पहा.) ५. यत्नानें. ६. इंद्र. ७. इतर. ८. द्रव्य. ९. कर्ण. १०. सूर्य. ११. कवच. १२. 'न बाधे' पाठभेद. १३. शहाणा.

कर्ण म्हणे, 'निज निर्धारीं । धर्मकाजीं परोपकारीं । शरीर वेंचिता[1] रणचत्वरीं[2] । तो चढे शिरीं शंक्राच्या[3]. ॥ १४ ॥ नश्वर देहाच्या पालटी । सत्य सुकृत जोडे गांठीं । याहूनी श्रेष्ठ लाभ श्रेष्ठीं । कोण तो सांग सुजाणा! ॥ १५ ॥ शरीर दारा[5] पुत्र बंधू । धन संपदा स्वल्प शब्दू । मागतां अपूर्ण कामें खेदू । याचक न पावे मजपाशीं. ॥ १६ ॥ स्वप्नप्राय संसार क्षणिक । धर्म तोचि सत्य एक । येर सर्वही माइक । दिसे तें जाण पां. ॥ १७ ॥ दधीच[6] ऋषीनें दिधल्या अस्थी । शिबि[7] मांस छेदी आपुल्या हस्तीं । जीमूतवाहन पुण्य-कीर्ती । जीवदानीं उदार. ॥ १८ ॥ अमरपाळ असुरवैरी । तो पातला होऊनी भिकारी । ते वेळीं अनेक या संसारीं । माझे दृष्टी दिसेना.' ॥ १९ ॥ सूर्य म्हणे, 'गा! विचक्षणा! । बोलसी तें न मने मना । भांडवल रक्षूनीयां शहाणा । उदमी वर्ते विचारें. ॥ २० ॥ बाईल विकूनियां हाटीं । मांडी गृहस्थाश्रमाची रहांटी । फोडूनीयां नौका पाटीं[11] । उतरीन म्हणे मार्गस्थां. ॥२१॥ देहीं लागल्या क्षयरोग । आवडी मांडी विषयभोग । इच्छी आरोग्यता चांग । तो ही चतुर तुज[12] ऐसा. ॥ २२ ॥ प्रत्यक्ष जित्या पुत्रातें वधी । मग म्हणे मज हो कां वंशवृद्धी । पुत्रा! तैशी तुझी बुद्धी । आत्मघातकी मज वाटे.॥२३॥ रक्षावया आपुला प्राण । कवच कुंडलें न देणें जाण[13].' । ऐकोनी हास्य करी कर्ण । म्हणे, 'ऐक गुरुवर्या! ॥ २४ ॥ ईश्वरइच्छा प्रारब्धगुणीं । सुखदुःखभोग पावे प्राणी । प्रमाण मानी मनुष्य करणी । देव सत्ता वाउगी. ॥ २५ ॥

१. 'वेंची' पाठभेद. २. रणांगणीं. ३. 'सूर्याच्या' पाठभेद. ४. फेऱ्या. ५. स्त्री. 'प्राण' पाठभेद. ६. वृत्रासुराचा वध इंद्राचे हातून होईना तेव्हां ब्रह्मदेवानें दधीच ऋषीपाशीं अस्थि मागण्यास इंद्रास सांगितलें. त्याप्रमाणें इंद्राचे प्रार्थनेवरून दधीचानें प्राण सोडला. नंतर त्याचे अस्थीचें वज्र करून त्याचे योगानें इंद्रानें वृत्रास मारिलें. (महाभारत–वनपर्व अ० १०० पहा.) ७. याचें नांव उशीनर होतें. त्याची परीक्षा करण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेतलें व अग्नीनें कपोताचें रूप घेतलें. नंतर श्येन आपले पाठीस लागला आहे अशा मिषानें कपोत उशीनराजवळ आश्रयार्थ आला. त्यास आश्रय मिळाला हें पाहून माझा भक्ष मला दे असें श्येन म्हणूं लागला. तेव्हां कपोताचे भारंभार उशीनरानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देण्याचें कबूल केलें. परंतु शरीराचा बराच भाग तोडून तराजूंत घातला तरी कपोत जडच येऊं लागला तेव्हां उशीनर स्वतःच पारड्यांत बसला. तें पाहून उभयतां संतुष्ट होऊन आपलीं रूपें प्रकट करून वर देऊन गेले. (महाभारत–वनपर्व–अ० १३०-१३१ पहा.) ८. माने, रुचे. ९. बाजार. १०. वागणूक. ११. फळी. १२. 'म्हणावा' पाठभेद. १३. 'दान' पाठभेद.

ऐका माझिया निश्चयनेमा। मी प्रवर्तल्या दानधर्मा। न देईं असा वदनपद्मा[1]। शब्द न शिवो माझिया. ॥ २६ ॥ उपाय अथवा अपाय घडो, । कायेपासूनी प्राण विघडो, । परी याचकविमुखतेचा न जडो । कलंक मातें सर्वथा.' ॥२७॥ पिता म्हणे, 'गा ! सर्वज्ञा ! । स्वहित साधीं परमप्राज्ञा ! । माझे आज्ञेची अवज्ञा । न घडे ऐसें विचारीं.' ॥ २८ ॥ ऐसें सांगूनी तया सगुणा । गगनचारी[2] संचरे गगना । पुढें स्वल्पचि काळें जाणा । शक्र आला जवळिके. ॥२९॥ अवगमोनी[3] याचकाची प्रतिमा[4]। म्हणे, 'स्वस्थ गा ! नरेंद्रोत्तमा ! । कामीकामकल्पद्रुमा[5] ! । अक्षय नेमा संरक्षीं.' ॥ ३० ॥ कर्णें करूनी नमन । बैसके दिधलें उत्तमासन । म्हणे, 'काय इच्छी तुमचें मन ? । ते आज्ञा स्वामी ! निरूपीं. ॥ ३१ ॥ जाति पद्मिनी[6] लावण्यभरिता[7] । रत्नभूषणीं सुशोभिता । धेनुवाजिवारणरथा । ग्रामभूमी इत्यादि. ॥ ३२ ॥ कनककवच आंगीं जडलें । अमृतस्त्रावी[8] मणिकुंडलें । हें भिन्न करूनी आपुलें । सर्वही तुझें द्विजवर्या !' ॥ ३३ ॥ याचक म्हणे, 'मनोरथवल्ली । उगवतांच तुवां खंडिली । क्षुधित पातल्या तोषवी बोलीं । भोजनरहित बहु मानें. ॥ ३४ ॥ आंगींच्या लग्न सुवर्ण कवचा । स्वहस्तें काढूनी दे मज त्वचा । तुझिया दिव्य कुंडलांचा । काम कर्णीं ल्यावया.' ॥ ३५ ॥ 'अमुल्य वस्तु बहु अपाडें[9] । तें मज माग आपुल्या चाडें[10] । कवचकुंडलांचिये भिडे । न घालीं मातें ब्राह्मणा !' ॥ ३६ ॥ येरू म्हणे, 'यथार्थ पाहीं । बोलसी[11] तितुकें व्यर्थ पाहीं । घेतल्याविण जाणें नाहीं । हा निर्धार दातया !' ॥ ३७ ॥ जंव जंव आग्रह वाढवी द्विज । तंव तंव हांसे कर्णराज, । म्हणे, 'आवडी तृष्णाभाज[12] । पतिव्रता वरिलीसे. ॥ ३८ ॥ नव्हसि यातीचा ब्राह्मण याचक । जाणें अमरांचा[13] नायक, । अर्जुना देऊनी पीयूषक[14] । विष आमुतें वाढिशी. ॥ ३९ ॥ कवचकुंडलमिषें जाण । घेऊं आलासी माझा प्राण, । तरी तुझी वासना पूर्ण । माझेनि मरणें होतसे. ॥ ४० ॥ करीन अर्जुनाचा वध । ऐसा कौरवां दिधला शब्द । तो असत्य प्रतिज्ञेचा बाध । मातें न लागे तें करीं. ॥ ४१ ॥ माझी प्रतिज्ञा नव्हे शून्य । तुझी कामना होय पूर्ण । ऐसें सांगशी[15] विचारून । तें मी करीन सुरेशा !' ॥ ४२ ॥ तोषोनी बोले सहस्त्रनयन[16] ।

---

१. मुखकमल. २. सूर्य. ३. घेऊन. ४. रूप. ५. याचक. ६. उत्तम स्त्री. ७. 'सरिता' पाठभेद. ८. 'अमृतोद्भव' पाठभेद. ९. विलक्षण. १०. इच्छा. ११. 'सर्वथा कामना दुजी नाहीं' असाही पाठ आहे. १२. 'इच्छाभोग' असाही पाठ आहे. स्त्री. १३. देव. १४. अमृत. १५. 'मागें' पाठभेद. १६. इंद्र.

'वज्रा एका करूनी भिन्न । जें जें अस्त्र मागशी दान । तें तें देईन पवित्रा! ॥ ४३ ॥ सकळ शस्त्रांची भगवती । ते मी देतसें दिव्य शक्ती । प्रकाशे प्रळयींचा गभस्ती[1] । तेंवी तेजें[2] लखलखित. ॥ ४४ ॥ काळरूप हे[3] खेचरी । नेमूनी टाकिशी जयावरी । त्यातें मारील निर्धारीं । देवत्रय रक्षितां. ॥ ४५ ॥ पुढती नुठी मागुतेन । हे तुज कळली असो खूण । यालागीं कोठें अकारण । नीच युद्धीं न वेंचीं. ॥ ४६ ॥ एकदा उठोनी अद्भुत । करील एकाचाचि घात । दुसरेन न चले हें निश्चित । वर्म तूतें कळलें असो.' ॥ ४७ ॥ संतोषोनी अमरपती । शक्ति वोपी कर्णाहातीं । समंत्रबीजें मंत्रमूर्ती । मृत्युदाती वैरियां. ॥ ४८ ॥ होतां दिव्य शक्तीची प्राप्ती । कर्ण शस्त्र घेऊनी हातीं । त्वचा काढूनी धैर्यवृत्ती । शक्रापुढें ठेविली. ॥ ४९ ॥ अमृतस्त्रावी अमृतोद्भवा । कुंडलें देतां संतुष्ट मघवा[4], । कर्ण म्हणे, 'देवदेवा! । विज्ञापना परिसिजे. ॥ ५० ॥ छेदूनी देतां आंगत्वचा । नाश झाला मद्रूपाचा । येविषयीं वरद वाचा । कृपेनें दिधली पाहिजे.' ॥ ५१ ॥ शक्र म्हणे, 'पूर्वील्याहूनी । लावण्य फांकेल सहस्त्रगुणी । कोटि मदनांचिया श्रेणी । सांडणें[5] होती तुव रूपा. ॥ ५२ ॥ जे जे देखेल तुज अंगना । तीतें उपजेल भोगवासना । ऐसें सौंदर्य मनमोहना! । पावशील तात्काळीं.' ॥ ५३ ॥ कर्णासीं देऊनी शक्तिवर । स्वस्थळा गेला पुरंदर, । हें ऐकूनी हाहाकार । कौरवकुळीं माजला. ॥ ५४ ॥ हृदय पिटी दुर्योधन, । हस्त चुरी दुःशासन, । शकुनी म्हणे, 'गेला प्राण । समस्तांचा एकदां.' ॥ ५५ ॥ पांडवीं मानिला लाभ थोर । म्हणती, 'मोकळें जालें द्वार । आतां वैरी ते किंकर[6] । अर्ध क्षणीं विभांडूं.' ॥ ५६ ॥ अर्जुनवधा दिधली शक्ति । ऐकूनी धर्म उद्विग्न चित्तीं । धौम्य म्हणे, 'विवेकमूर्ती । पक्षपाती समर्था. ॥ ५७ ॥ शक्तिनिवारणउपावो । कृष्णें केला असेल ठावो । सांडूनी दुश्चित्ततेचा भावो । समाधानीं असावें.' ॥ ५८ ॥ यापरी 'कुंडलाभिहरण' । सांग कथिलें निरूपण । जन्मेजयाप्रति सर्वज्ञ । वैशंपायन निरूपी. ॥ ५९ ॥ यानंतर 'अरणीहरण' । यक्षधर्माचे विचित्र[7] प्रश्न । श्रोतीं होऊनी सावधान । श्रवण केलें पाहिजे. ॥ ६० ॥ इति श्रीआ-

---

१. सूर्य. २. 'थोर तेज' पाठभेद. ३. 'हे अनिवार्य काळखेचरी' असाही पाठ आहे. ४. इंद्र. ५. ओंवाळून टाकण्याचा पदार्थ. ६. चाकर. ७. 'विविध' पाठभेद.

**रण्यपर्वभारत** । मोक्षदातें कर्णामृत । **मुक्तेश्वरकवि** विनवीत । कृपा कीजे सज्जनीं. ॥ ६१ ॥

---

## अध्याय अठरावा.

अद्वैतवनीं पांडव वीर । सर्वे असंख्यात ऋषीश्वर । कंदमूलफलआहार । देऊनी त्यातें पाळित. ॥ १ ॥ कथाश्रवणीं क्रमीत वेळ । म्हणती, 'लोटला दुष्ट काळ, । त्रयोदश वर्षानंतर खेळ । वीरश्रीचा माजवूं.' ॥ २ ॥ ऐसें सहज अनुवादत । तंव ब्राह्मण पातला धांवत । धर्मराजा विनवीत । म्हणे, 'दुःखित निवारा. ॥ ३ ॥ गृहांगणीं [2]मंथनारणी । असतां, पातला [3]हरण हरणीं । वृक्ष मोडोनी संघर्षणीं । अंगकंडू शांतवी. ॥ ४ ॥ अरणी अडकल्या तया शृंगीं । घेऊनी मृग पळाला वेगीं, । [4]अग्निहोत्र न पवे भंगीं । ऐसें करीं धर्मज्ञा!' ॥ ५ ॥ ऐकोनी उठिले पांचही जण । करीं घेतले धनुष्यबाण । वनोपवनें हिंडतां गहन । [7]कुरंग कोठें लक्षेना. ॥ ६ ॥ मध्यान्हीं पातला [8]भानू । उष्णें श्रांतला कुरुनंदनू । [9]न्यग्रोधछाये करूनी शयनू । बंधूप्रति अनुवादे. ॥ ७ ॥ 'जन्मोनी केलें नाहीं पाप । किमर्थ भोगूं हा संताप? । कवण्या कर्माचा हा लोप? । तें तत्वता नेणवे.' ॥८॥ भीम म्हणे, दुर्योधनें । [10]हरिलीं स्त्रियेचीं वसनें । तो घेतला नाहीं प्राणें । त्याचें फळ हें नरेंद्रा!' ॥ ९ ॥ अर्जुन म्हणे, 'दुष्ट कर्ण । ताडितां कुशब्दांचे बाण । केलें नाहीं शिरछेदन । त्याचें फळ हें नरेंद्रा!' ॥ १० ॥ सहदेव म्हणे, 'कपट द्यूतीं । [11]सौबळें हरितां सर्व संपत्ती । मारिला नाहीं शस्त्रघातीं । त्याचें फळ हें नरेंद्रा!' ॥ ११ ॥ तृषापीडित बहुत आतां । नकुळ वेंघोनी वृक्षावरुता ।

---

१. 'दुःखानें' पाठभेद. २. अग्निमंथनदंड. या अध्यायांत मूळांतील 'आरणेयपर्वा'चा म्हणजे अध्याय ३११-३१५ यांचा सारांश कवीनें आणिला आहे. ३. मृग. ४. नेण्याकरितां. ५. 'म्हणोनी पातला लगबगी' पाठभेद. ६. एका तपस्वी ब्राह्मणाच्या अरणी वृक्षावर होत्या. त्याच वृक्षाला एक मृग कंडूशमनार्थ आपलीं शिंगें घांशीत होता. इतक्यांत त्या अरणी त्या मृगाच्या शृंगांत अडकल्या आणि तो मृग पळ काढीत निघून गेला. 'त्या अरणी मृगापासून मला परत आणून द्या' असें त्या विप्रानें धर्मराजास सांगितलें, तेव्हां पांचही पांडव धनुष्य घेऊन त्याच्या पाठीमागें लागले. इत्यादि कथेकडे येथें लक्ष्य आहे. (अ० ३११ पहा.) ७. हरिण. ८. सूर्य. ९. वडाचा वृक्ष. १०. 'देखत हरिलीं' पाठभेद. ११. शकुनि.

दिशा पाहोनियां समस्ता । जळ सभोंवतें विलोकी.[1] ॥ १२ ॥ येरु[2] दक्षिणे-कडे वृक्षीं । वळघोनी दिशा अवलोकी चक्षीं । निबिड वृक्षांच्या कुक्षीं । जलचर पक्षी किलबिलती. ॥ १३ ॥ कर्दळी वृ[3]क्षाचा मांदोळा[4] । [5]हंसकारंडकांचा मेळा । देखोनी म्हणे, 'एथ जिव्हाळा । जलरसाचा दिसतसे.' ॥ १४ ॥ काष्ठ-कमंडलू करीं धरून । अतिसत्वर तो करी गमन । तंव पुढां सरोवर विस्तीर्ण । समुद्रप्राय देखिलें. ॥ १५ ॥ [6]रातोत्पलें नीलोत्पलें । पीतोत्पलें सि[7]तोत्पलें । विकासलीं, तेथें [8]अलिकुलें । झुंकारती सु[9]वासा. ॥ १६ ॥ [10]हस्तें स्पर्शतां [11]जी-वना । वृक्षीं यक्ष करी गर्जना । [12]म्हणे, 'करितां जलप्राशना । महा अनर्थ पा-वशी. ॥ १७ ॥ माझे प्रश्न हे सांगावे । तरिच जल प्राशावें, । अवज्ञा करितां हानी जीवें । पावशील तात्काळीं.' ॥ १८ ॥ येरें [13]अव्हेरूनी शब्द । प्राशन केलें जल [14]अगाध । अतिशीतल आणि सुस्वाद । अमृतोपम सुवासें. ॥ १९ ॥ उदरीं प्रवेशतां जल । मृत्यु पावला तात्काळ । पृथ्वीत[15]ळीं विशाळ । वृक्ष तैसा पडियेला. ॥ २० ॥ विलंब लागतां [16]नकुलातें । धर्में पाठविलें [17]सहदेवातें । येऊनी पाहे तंव बंधूतें । प्रेतदशा पातली. ॥ २१ ॥ आधीं करूं [18]जलप्राशन । मग हे विचारूं कारण । तंव त्या यक्षें घातली आण, । 'उदक हातीं [19]नातळें. ॥ २२ ॥ माझे प्रश्न न सांगतां । अवज्ञा करूनी जळ प्राशितां । बंधू जे पावला अवस्था । ते तूं पावशील तात्काळीं.' ॥ २३ ॥ त्याचें वचन उपेक्षून । येरें करितां जळप्राशन । तात्काळ पावोनियां मरण । बंधूनिकट पडियेला. ॥ २४ ॥ विलंब लागतां दोघांतें । धर्में धाडिलें पार्थातें । तो येऊनी पाहे तेथें । तंव [20]प्राणरहित देखिले. ॥ २५ ॥ म्हणे, 'देवदैत्यदा[21]न-वातें । वधिले न [22]वंचती पुरुषार्थें । ते होऊनी पडिले प्रेतें । हें आश्चर्य भूतळीं.

१. धर्म म्हणे असो आतां । तृषें पीडिलों बहुत [1]आतां । [2]नकुल वळघोनी वृक्षावरुता । जल सभोंवतें विलोकीं ॥' असाही या ओवीचा पाठ आहे. २. 'तव दक्षिणाधिप दिसे वृक्षीं' पाठभेद. ३. 'कदंब द्रुमाचा' पाठभेद. ४. समुदाय. 'दांमोळ' असाही पाठ आहे. ५. बदक. ६. तांबडें कमळ. ७. पांढरें कमळ. ८. भ्रमरसमूह. ९. 'सुस्वरें' पाठभेद. १०. 'पांडवें' पाठभेद. ११. पाणी. १२. अध्याय ३१२ श्लोक १२ पहा. १३. अवमानून, अनादरून. १४. 'ते कदंब' पाठभेद. १५. 'तळीं महाविशाळ' पाठभेद. १६. 'सहदेवातें' पाठभेद. १७. 'नकुलातें' पाठभेद. १८. 'तृष्णाहरण' पाठभेद. १९. न स्पर्शें. २०. मृत. २१. 'मानवातें' पाठभेद. २२. जाती.

१. 'तत्वतां' पाठभेद. २. सहदेव' पाठभेद.

॥ २६ ॥ बाधा खंडोनी तृषेची । मग शोधना करूं तयाची । जळ प्राशी सव्यसाची[1] । तंव तो यक्षें वारिला. ॥ २७ ॥ म्हणे, 'न सांगतां माझे प्रश्न । बळें करितां जलप्राशन । तरी तात्काळ पावशील मरण । हा निर्धार जाण पां. ॥ २८ ॥ मांडल्या दुष्ट कर्माचा भोग । साधनें उपाय होती विलग । मरण पातल्या प्रयोग । औषधाचे न चलती. ॥ २९ ॥ पार्थें[2] सोडूनी बाणवृष्टी । झांकोळली[3] सर्व सृष्टी । यक्ष म्हणे, 'तृणासाठीं । वारूं न शके मद्बळ.' ॥ ३० ॥ पार्थ प्राशितांचि जळ । मृत्यु पावला तात्काळ । विलंब देखोनी कुंतीबाळ । भीम धर्में पाठविला. ॥ ३१ ॥ तोही पहुडला त्यांचिये पंक्ती । पाठी पातला धर्ममूर्ती । चौघे देखोनियां क्षिती । कपाळ[4] हातें पिटीत. ॥ ३२ ॥ 'हिमवंत विंध्य मेरु मंदर । तैसे पडिले चौघे वीर, । मारूं न शकती हरिहर । ते हे कवणें मारिले? ॥ ३३ ॥ शकुनीदुर्योधनें देख । उदकीं कालवलें नेणों विख[5] । कीं यमें प्रेरिला काळपुरुख । तेणें चौघां ग्रासिलें[6].' ॥ ३४ ॥ तंव यक्ष बोले गर्जोनी शब्दू, । 'म्यां मारिले तुझे बंधू । प्रश्न न सांगतां वधू । मजपासाव पावले. ॥ ३५ ॥ तुवां सांगावे माझे प्रश्न । मग करावें जलप्राशन । तुझ्या बंधूंचेही प्राण । दैवयोगें परतती.' ॥ ३६ ॥ धर्म[7] म्हणे, 'जितुकें ज्ञान । तितुकें कांहीं करीन कथन । कैसे कैसे तुझे प्रश्न । ते नावेक[8] परिसवीं.' ॥ ३७ ॥ यक्ष म्हणे, 'युधिष्ठिरा! । सांग माझ्या प्रश्नोत्तरा, । बंधू पडिले ते परिहारा । सांगशी तो सुविचारू. ॥ ३८ ॥ कोठूनी उदयो पाविजे सूर्य? । कोठें त्याची प्रतिष्ठा होय? । कोण त्याचे समागमीं ये? । अस्तवे तो कैसेनी?' ॥ ३९ ॥ उत्तर[9] बोले धर्म सुजाणू, । 'ब्रह्मापासूनी उगवे भानू, । संगीं त्याचे देवगणू[10], । धर्मीं[11] त्याची प्रतिष्ठा. ॥ ४० ॥ घेऊनी लोकांचीं आयुष्यें । अस्तमानाशी जात असे । ब्राह्मणपुण्याचे विशेषें । पुढतीं उदया येतसे.' ॥ ४१ ॥ यक्षें हांसोनी[12] बोलिजे, । 'कैसेनी श्रोत्रिय होईजे? । इच्छिलें महा फळ लाहिजे[13] । कवण्या गुणें सांग पां? ॥ ४२ ॥ अद्वितीय ख्यातिवंत । होता उपाय कोण

---

१. अर्जुन. २. 'पार्थें वारितां सोडूनी' पाठभेद. ३. व्यापिली. ४. 'करें लल्लाट' पाठभेद. ५. पंतही असेंच वर्णन करतात:—'वत्सा! न भंगलासि प्रभुशींहि करुनि तशाहि विषम रणा; । कालविलें काय जळीं त्या दुष्टांहीं वशाहिविष मरणा?' ॥ [मोरोपंत–वनपर्व–अध्याय १५ गीति १५ पृष्ठ २२० पहा.] ६. 'मारिलें' पाठभेद. ७. हा युधिष्ठिरयक्षसंवाद अध्याय ३१३ यांत आहे. ८. क्षणभर. ९. अध्याय ३१३ श्लोक ४३-४४ पहा. १०. 'धर्म' पाठभेद. ११. सत्याच्या ठिकाणीं. १२. अ० ३१३ श्लो० ४५-४६ पहा. १३. 'पाहिजे' पाठभेद.

समर्थ । पुरुष होय बुद्धिवंत । ऐसें साधन कोणतें?' ॥ ४३ ॥ 'सांगवेदवेदार्थ-ज्ञानें । श्रोत्रिय होईजे ब्राह्मणें, । निर्मळ तयाच्या अनुष्ठानें । महा फळ पाविजे. ॥ ४४ ॥ जिंव्होपस्थजयो[1] तेज धृती । तेणें पाविजे निर्दोष कीर्ती । वृद्धसेवनें श्रेष्ठपंक्ती । बुद्धिमंतचि आतुडे.[2]' ॥ ४५ ॥ 'कवण दैवत ब्राह्मणातें? । धर्म-संतान कवण त्यातें? । मनुष्यभाव म्हणिजे ज्यातें । तें सांग काय पांडवा!? ॥ ४६ ॥ प्रयत्नें कीजे पापजोडी । ते काय सांग आपुले तोंडीं? । तुझ्या चातुर्याच्या पैंडिपाडी[3] । आन मातें दिसेना.' ॥ ४७ ॥ धर्म म्हणे, 'एक वचन । ब्राह्मणदैवत वेदाध्ययन[4] । तपश्चर्यामहाधन । धर्मसंतान या नांव. ॥ ४८ ॥ मनुष्यभाव म्हणिजे हानी । तें मरण ऐसें बोलिजे जनीं । मूर्खताअपेशदारिद्र्य-चिन्हीं । मरण त्यातें बोलिजे. ॥ ४९ ॥ पराचे दोष बोलिजे तोंडीं । तेचि जाण पापजोडी । याहूनी पुसावयाची गोडी । काय ते सांग खेचरा[5]!' ॥ ५० ॥ 'क्षत्रियाचें दैवत कोण? । तयाचा धर्म किंलक्षण[6]? । मनुष्यभाव तें म्हणसी[7] मरण । पापाचरण तें कैसें?' ॥ ५१ ॥ 'क्षत्रियाचें दैवत धनुष्यबाण, । धर्म तो करणें नाना यज्ञ, । भय अथवा पलायन । [8]हीन भाव क्षत्रिया. ॥ ५२ ॥ शरण आलियाचा त्याग । हाचि क्षत्रियाचा पापसंग.' । यक्ष म्हणे, 'शब्द सुभग[9] । निकों[10] मातें मानला. ॥ ५३ ॥ सकळ जळांमाजी[11] जळ । कोणतें सुपवित्र निर्मळ? । स्वल्प पेरिल्या पिके पुष्कळ । तें काय मातें परिसवीं. ॥ ५४ ॥ पूज्यांमाजी पूज्य स्थान । तें निर्‍नी सांग पां कवण? । फळांमाजी फळ पावन । श्रेष्ठ तें सांग सर्वज्ञा!' ॥ ५५ ॥ 'उदकांमाजी पवित्र गुणी । जो कां वर्षाव[12] कीजे घनीं, । पेरिल्यामाजी जाण दोनी । पिकें पिकती अचाट. ॥ ५६ ॥ औषधी धान्य बीज येथ । स्वल्प पेरिल्या पिके बहुत, । ब्राह्मणा दिधलें तें अनंत । सहस्रगुणें विस्तारे. ॥ ५७ ॥ पूज्यांमाजी अधिक मान्य । वेदशास्त्रीं बोलिजे धेनू । फळांमाजी श्रेष्ठ जाण । पुत्रफळ[13] त्रिलोकीं.' ॥ ५८ ॥ 'विषय भोगातें भोगीत । बुद्धिसंपन्न जन पं-

---

१. जिव्हा आणि उपस्थ यांचें दमन. २. आतुडणें=सांपडणें, प्राप्त होणें. ३. थोरवी. ४. स्वाध्याय. ५. यक्ष. ६. कोणत्या प्रकारचा. हा यक्षाचा प्रश्न आहे. ७. 'म्हणिजे' पाठभेद. ८. 'मनुष्य' पाठभेद. ९. सुंदर. १०. चांगला. ११. अ० ३१३ श्लो० ५३-५६ पहा. १२. अर्वाचीन रसायनशास्त्रज्ञांचें मतही पावसाचे पाण्याचे निर्मलतेविषयीं असेंच आहे. १३. हें धर्माचें उत्तर आहे.

डित । सकळ भूतां मान्य पंडित । [1]प्रतिष्ठित लौकिकीं. ॥ ५९ ॥ ऐसा कोणी एक प्राणी । श्वासोच्छ्वास वर्ततां घ्राणीं । मृतप्राय मानिजे जनीं । तो कोण सांग सुजाणा?' ॥ ६० ॥ धर्म म्हणे, 'धनिक शहाणा । देवअतिथिपितृगणा । [2]भूतां आप्तां आणि आपणा । तृप्त न करी वैभवें. ॥ ६१ ॥ तो जिताच मृत देख । ऐसें मानिती [3]मन्वादिक.' । यक्ष म्हणे, 'पावलों सुख । [4]तुझेनी वचनें पांडवा!' ॥ ६२ ॥ '[5]कृपणवृत्ती जीवलोभें । धर्मलोपी असत्यदंभें । विषयलो-[6]भाचेनि लाभें । परम श्लाघ्यता मानितें.' ॥ ६३ ॥ 'गुरुस्थानीं कवण श्रेष्ठ? । देवांमाजी कवण वरिष्ठ? । पवनाहूनियां [8]बलिष्ठ । वेगवंत कोण तो? ॥ ६४ ॥ तृणाहूनी बहु अंकुरीं । कोण विस्तार बहुत करी । हें मज सांग पां निर्धारीं । [9]धर्मराजा! धार्मिका!' ॥ ६५ ॥ '[10]माता श्रेष्ठ गुरुजनीं । पिता देवतामुकुटमणी, । पवनाहूनी सहस्रगुणी । मन हें चपळ जाण पां. ॥ ६६ ॥ तृणाहूनी बहु अंकुरीं । संसारचिंता मन विकारी । विरूढ जाय नानापरी । जन्मसहस्रीं न खंडे.' ॥ ६७ ॥ '[11]निर्जलिया न लावी पातया पातें? । आपुल्या कोण उपजे मागुतें? । हृदय नाहीं हो! कवणातें? । कोण वाढतें बहु वेगीं?' ॥ ६८ ॥ 'मत्स्य न लावी पातया पातें । अंडज उपजे हो! मागुतें । हृदय नाहीं पाषाणातें, । नदी [12]वाहे [13]जलवेगीं.' ॥ ६९ ॥ 'कवण मित्र कुटुंबिया? । कवण मित्र घरबा-रिया? । कवण मित्र रोगिया? । मित्र मरतया तो कोण?' ॥ ७० ॥ 'अर्थ मित्र कुटुंबिया, । भार्या मित्र घरबारिया, । औषध मित्र रोगिया, । मित्र मरतया [14]धनदान.' ॥ ७१ ॥ 'कोण अतिथि सर्व भूतां? । सनातन धर्म कोण समस्तां? । काय नाम गा! अमृता? । जगवी कोण जगातें?' ॥ ७२ ॥ 'अतिथी सर्वां, हुताशन । गाई चंद्र अमृत जाण, । निष्काम धर्म सनातन । जगवी तो पवन जाण पां.' ॥ ७३ ॥ 'सांग एकला विचरे कोण? । जन्मोनी कोण पावे ज-नन? । हिमरोगाचें औषध गहन । सकळां स्थान कोणतें?' ॥ ७४ ॥ 'एकला

१. 'जी बहुत' पाठभेद. २. 'भृत्यां' पाठभेद. ३. मनु आदिकरून स्मृतिकार. ४. 'तूं सेवा जीवन' पाठभेद. ५. 'कृत्रिम' पाठभेद. ६. 'भोगाचेनि लाभें' पाठभेद. ७. ६३ व्या ओवींत ज्या प्रश्नांचीं उत्तरें आहेत, ते प्रश्न जींत असले पाहिजेत ती ओवी आमचे अवलोकनीं कोणत्याही प्रतींत नाहीं. परंतु ६२ व ६३ या ओव्यांमध्यें एक ओवी असावी असें दिसतें. ८. 'बहुवट' पाठभेद. ९. 'कवण पूजनीं पावे थोरी । कवण देव श्रेष्ठाधिकारी' पाठभेद. १०. अ० ३१३ श्लो० ५७-५८ पहा. ११. अ० ३१३ श्लो० ५९-६० पहा. १२. 'वाढे' पाठभेद. १३. हें धर्माचें उत्तर आहे. १४. अ० ३१३ श्लो० ६२ पहा.

विचरे तो [1]गभस्ती । [2]चंद्रमा जन्मला जन्मे पुढती । अग्निऔषध हिमरोगशांती । स्थान ते क्षिती समस्तां.' ॥ ७५ ॥ 'कवण एक [3]पद धर्माचें ? । कवण एक पद यशाचें? । कवण एक पद स्वर्गाचें ? । कवण सुखाचें पद सांग पां ?' ॥७६॥ 'विवेक दढता दक्षतेचें । तेंचि एक पद धर्माचें, । दान पद एक यशाचें, । सत्य स्वर्गाचें पद एक. ॥ ७७ ॥ [4]शील तों पद एक सुखाचें । ऐसें खेचरा! जाण साचें.' । वचन ऐकोनी धर्माचें । बहु यक्षाचें मन संतोषे. ॥ ७८ ॥ 'कवण आत्मा मनुष्यातें? । कवण सखा गृहस्थातें? । उपजीवन कोण त्यातें? । कोण सर्वांतें रक्षित ?' ॥ ७९ ॥ 'पुत्र आत्मा मनुष्यातें, । भार्या मित्र गृहस्थातें, । उपजीवन पर्जन्य तें । दान सर्वांतें रक्षित.' ॥ ८० ॥ 'कवण उत्तम धान्यांत ? । 'कवण उत्तम लाभांत ? । कवण उत्तम सुखांत? । कवण धन हें उत्तम ?' ॥८१॥ 'धान्यांत उत्तम दक्षता, । धनांत उत्तम तों [5]ज्ञातृता । लाभ तो शरीरआरोग्यता । तुष्टी तेंचि सुख जाणा. ॥ ८२ ॥ 'लौकिकीं कोण तो धर्म प्रबळ ? । कोण धर्म सांग सुफळ ? । काय नियमिल्या चंचळ । पुरुष नव्हे जाणता ? ॥८३॥ काय असह्य सज्जना ? । तें मज सांग कुरुभूषणा!' । धर्म म्हणे, 'महाप्राज्ञा । अनुक्रमें अवधारीं. ॥ ८४ ॥ '[6]भूतदया अचळ मनीं । तो श्रेष्ठ धर्म जाणिजे जनीं, । यज्ञ दान तप हीं तिन्ही । सुफळ धर्म या नांव. ॥८५॥ चित्त नियमिलें असतां नेमें । न भुले संसाराचिया भ्रमें । भेदकापट्य बाह्यप्रेमें । सुख नोहे सज्जनीं.' ॥ ८६ ॥ 'काय त्यागिल्या प्रीति लोकां? । काय त्यागिल्या न पवे शोका ? । काय त्यागिल्या पुरुष हो कां । संपत्तिवंत पैं होय? ॥ ८७ ॥ काय त्यागिल्या होय सुखी ? । हें मज सांग आपुल्या मुखीं.' । धर्म म्हणे, 'हें कौतुकीं । यक्षराया! परियेशीं. ॥ ८८ ॥ [7]मान त्यागिल्या प्रीति लोकां । क्रोध त्यागिल्या न पवे शोका । काम त्यागिल्या सकळिका । रिद्धि सिद्धि [8]वोळंगती. ॥ ८९ ॥ लोभ त्यागिल्या पाविजे सुख । ऐसें बोलती शुकादिक.' । यक्ष म्हणे, 'तुझें वाक्य । अमृतातुल्य मज वाटे. ॥ ९० ॥ किमर्थ दान ब्राह्मणादिकां ? । किमर्थ दान नटनर्तकां ? । किमर्थ दान गा! सेवकां ? । परिचारकभृत्यांतें ? ॥ ९१ ॥ किमर्थ दान गा! नृपातें ? । हें निवडूनी सांग मातें.' । धर्म म्हणे, 'एक चित्तें । यक्षराजा! परियेसीं.

---

१. सूर्य. २. अर्वाचीन ज्योतिषमताप्रमाणेंही चंद्राचें आयुष्य तीस दिवस आहे. तो तिसावे दिवसानंतर जणूं काय मृत होऊन शुद्ध प्रतिपदेस पुनः जन्मास येतो. ३. स्थान. ४. अ० ३१३ श्लो० ६७-६८ पहा. ५. ज्ञान. ६. आनृशंस्य. ७. अ० ३१३ श्लो० ७५-७६ पहा. ८. आश्रय करतात.

॥ ९२ ॥ परलोकसाधन पुण्यप्राप्ती । दान देणें ब्राह्मणहातीं । लौकिकीं वाढवावया स्फीती[1] । नटनर्तकां देइजे. ॥ ९३ ॥ भरणपोषणालागीं जाण । भृत्या देइजे वेतन दान । भयें रक्षावया प्राण । राजयातें देइजे.' ॥ ९४ ॥ 'कोणें आवरिलें लोकांतें? । कोणें लोपिलें प्रकाशातें? । कोणें त्यागिलें मित्रातें? । कोणें स्वर्गातें न पावती.' ॥ ९५ ॥ 'अज्ञानें आंवरिलें लोकांतें । तिमिरें लोपिलें प्रकाशातें । लोभें त्यागिलें मित्रातें । संगीं स्वर्गातें न पवती.' ॥ ९६ ॥ 'जीतचि पुरुष कोण प्रेत? । राज्य कोणतें प्राणरहित? । मृत श्राद्ध कोण तेथ? । यज्ञही मृत कोणता?' ॥ ९७ ॥ 'दरिद्र पुरुष रहित प्राण । मृत राष्ट्र राजयाविण । अश्रोत्रियातें श्राद्धदान । मृत ऐसें जाण पां. ॥ ९८ ॥ दक्षिणेरहित याग केला । तो मृत ऐसा वहिला.' । यक्ष म्हणे, 'भला रे! भला । धर्मराजा! सुजाणा! ॥ ९९ ॥ कवण हरी दिशांची तृषा[2]? । हें मज सांग पां! महापुरुषा! । कवण अन्न आणि विषा । रूप करूनी मज सांग. ॥ १०० ॥ कोण तो ब्राह्मणा श्राद्धकाळ? । हें मज सांग प्रांजळ. । धर्मराज! परम कुशळ । वक्तयांमाजी मी मानीं. ॥ १०१ ॥ स्नेहें[3] सांडोनियां ठायीं । स्वेच्छ उदक प्राशना नेईं.' । धर्म म्हणे, 'बोलणें कांहीं । सर्वज्ञातें तुज यक्षा! ॥ १०२ ॥ अष्टौ दिशांचें तृषाहरण । करी सर्वत्र एकलें संतमन । धेनु शाक आणि धान्य । अन्नपूर्ण मेदिनी. ॥ १०३ ॥ हींचि पावती सर्व लाघवा । तेंचि विष गा! यक्षदेवा! । श्रेष्ठ ब्राह्मण देखिजे जेंव्हां । तोचि काळ श्राद्धातें.' ॥ १०४ ॥ 'सांग कथिले माझे प्रश्न । धर्मराजा! तूं धन्य धन्य । आतां सांगें पुरुष[4] कवण । धनिकश्रेष्ठ त्रिलोकीं?' ॥ १०५ ॥ 'ज्याचे कीर्तीच्या चंदनें । विश्व चर्चिलें उत्तम गुणें । अनुभवसाक्षात्कारज्ञानें । ब्रह्मनिष्ठ निर्धारें. ॥ १०६ ॥ प्रिय अप्रिय ज्या समान । वस्तु वेगळें न दिसे आन । तोचि एक धनिक जाण । येर सर्वही दरिद्री.' ॥ १०७ ॥ 'वचनीं तोषविलें मातें' । वरद वदे प्रसन्न चित्तें, । 'चौघांमाजी आवडे तूतें । तो उठवीन तवाज्ञा.' ॥ १०८ ॥ धर्म म्हणे, 'गुणवेल्हाळ । नकुळ माद्रीचा वडिल बाळ । तो उठविल्या काम सकळ । पूर्ण माझे समर्था!' ॥ १०९ ॥ 'बळसमुद्र भीमसेन, । शस्त्रधर गुरु अर्जुन, । जाणांमाजी अति सुजाण । सहदेव पांडवा! ॥ ११० ॥ ऐसे सांडूनी गु-

१. कीर्ति. २. अध्याय ३१३ श्लो० ८३-८६ पहा. ३. 'प्रश्न सांगोनी ठायीं' असाही पाठ आहे. ४. अ० ३१३ श्लो० ११७-११९ पहा.

णवंत । इच्छिशी **माद्रीचा** सुत.' । **धर्म** म्हणे, 'गा! परमार्थ । तूंचि विचारीं विवेकें. ॥ १११ ॥ मी **कुंतीचा** वडील कुमर । ज्येष्ठ **माद्रीचा नकुळ** वीर। उभय पुत्रीं या सुपवित्र । दोघी माता लोकीं कीं.' ॥ ११२ ॥ यक्ष बोले सुप्रसन्न, । 'चौघां दिधलें प्राणदान.' । ऐसें बोलतां चवघेजण । उठते झाले तात्काळीं. ॥ ११३ ॥ नमस्कारिलें **धर्मचरणा** । तैसेच वंदिलें यक्षगणा । तंव यक्षता सांडूनी आलिंगना । **यम** आला जवळिकें. ॥ ११४ ॥ म्हणे, 'पुत्रा मी तुझा पिता[1] । म्यांच अरणी[2] हरिल्या आतां[3]। प्रश्नमिषें तुझिया चित्ता । परीक्षिलें सुबुद्धी[4]! ॥ ११५ ॥ अरण्यवास सरला देख । उरलें नष्टचर्येचें वर्ष एक । तेंही क्रमितां दुष्ट लोक । तुम्हां कोणी नेणती. ॥ ११६ ॥ होऊनी **विराटनगरवासी** । नांवें ठेवूनी अनारिसीं[5] । रूपें पालटती आपैसीं । माझेनि वरें वीर हो!' ॥ ११७ ॥ अरणी ही दिधल्या आणून। तेणें तोषला ब्राह्मण । **पांडवा** देऊनी आशीर्वचन । जाता[6] झाला स्वाश्रमा. ॥ ११८ ॥ आश्वासूनी **धर्मरावो** । अदृष्ट[7] जाला **श्राद्धदेवो**[8] । याचेनि स्मरणें होतें[9] वांवो[10] । कोटि संग्रहें[11] पापाचे. ॥ ११९ ॥

## उपसंहार.

एथूनी सरलें **अरण्यपर्व** । पुढारें असें **विराट** अतिअपूर्व ।
तेंही परिसा जैसा शर्वें[12] । दृष्टी दिसे तपांतीं. ॥
**लीलाविश्वंभर** गुरुचरणीं । पुष्पांजली वचनसुमनीं ।
**मुक्तेश्वरें** अर्पूनी मनीं । कृतकृत्यता मानिली. ॥

---



१. अ० ३१४ श्लो० ६-११ पहा. २. मीच मृगाचा वेष घेऊन त्या विप्राच्या अरणी हरण केल्या—असा भाव. [अध्याय ३१४ श्लो० १३ पहा.] ३. 'तत्वतां' पाठभेद. ४. 'सुशब्दी' पाठभेद. ५. भिन्न, निराळीं. ६. यमधर्म जाता झाला. ७. अ० ३१४ श्लो० २३ पहा. ८. यम. ९. 'पाहा हो' पाठभेद. १०. व्यर्थ. ११. 'संग्रहणासे पापाचे' पाठभेद. १२. शिव.